# हिंदु-संस्कृतिप्रदीप





मूल्य ५ रु.

लेखक
पं. महादेवशास्त्री दिवेकर

हिंदुसमाजोद्धारक वाङ्मयमाला

पुस्तक १० वें.

९२८

उद्धरेदात्मनात्मानं—गीता

# हिंदुसंस्कृतिप्रदीप



—: लेखक :—

हिंदुत्वदीपक पंडित महादेवशास्त्री दिवेकर, मिरज.

शके १८६८ ] मूल्य ५ रुपये [ सन १९४६

5.200/-

# अनुक्रमणिका

# ग्रंथकर्त्याची प्रस्तावना.

परमेश्वराच्या कृपेनें हिंदुसमाजोद्धारक वाङ्मयमालेचें दहावें पुस्तक हिंदुसंस्कृतिप्रदीप हें प्रसिद्ध करण्याचा आज योग येत आहे, याबद्दल आनंद व अभिमान वाटतो.

**पूर्वेतिहासः**—हिंदुसमाजोद्धारक वाङ्मयमालेच्या कार्याला १९२६ सालीं प्रारंभ झाला. गेल्या वीस वर्षांत मालेच्या वतीनें हिंदुधर्म, हिंदु-संस्कृति आणि हिंदुसमाज यांवर प्रकाश पाडणारें उत्कृष्ट वाङ्मय आम्हीं प्रसिद्ध केलें, त्याची यादी या ग्रंथाच्या शेवटीं दिली आहे. त्यांतील कांहीं वाङ्मय आज दुर्मिळ आहे. कांहीं पुस्तकांच्या दोन दोन आवृत्त्याहि प्रसिद्ध झाल्या आहेत. हिं. स. मालेच्या बाहेर हिंदुधर्मशिक्षण पुस्तक १।२, गोवर्धन ब्राह्मणांचा इतिहास, सहवासीब्राह्मणपरिचय अशीं पुस्तकें आम्हीं लिहिलेलीं प्रसिद्ध झालेलीं आहेत. आपली वाणी व लेखणी आणि असेल तें बौद्धिक व शारीरिक शक्तिसर्वस्व हिंदुसमाजाच्या सेवेकरतां आम्ही देत आहों.

**शेट मोतीचंदांनीं केलेला गौरवः**—अभिमानाची गोष्ट अशी कीं आमचें हें कार्य समाजाला मान्य झालें असून उत्तेजनहि मिळत आहे. अनेक थोर गृहस्थांना, आमच्या हितचिंतकांना व मित्रांना आमचें हें अल्पस्वल्प कार्य पसंत पडत आहे. म्हणूनच मालेच्या प्रत्येक पुस्तकाला वेळोवेळीं आश्रयदाते लाभले. नवा हिंदुधर्म ग्रंथाच्या प्रस्तावनेंत ज्यांनीं तो ग्रंथ छापण्यास व आम्हाला प्रचारकार्यास उत्तेजन म्हणून शंभर शंभर रुपये दिले, त्यांचा नामनिर्देश आम्हीं केलाच आहे. **श्रीमान् शेट मोतीचंद गौतमचंद शहा मुंबई** यांच्या नांवाचा उल्लेख शंभर रुपयांच्या देणगीबद्दल नजरचुकीनें **नवा हिंदुधर्म ग्रंथाच्या** दुसऱ्या आवृत्तीच्या प्रस्तावनेंत करा-वयाचा राहिला; त्यानिमित्त त्यांना लिहिलेल्या पत्राच्या उत्तरांत (१५।८।४६) ते लिहितातः— “आपल्या ग्रंथासारखीं बहुमूल्य किंमतीचीं पुस्तकें मिळत असतांना शंभर रुपयांची देणगी म्हणजे कांहीं विशेष आहे, असें मला

वाटत नाहीं. अशा देणगीदारांचा उल्लेखहि करूं नये व तशी त्यांनीं अपेक्षाहि करूं नये, असें माझें मत आहे."

**श्री. दांडेकरांची सहानुभूतिः**–या प्रतिनिधिभूत एका पत्रावरून आमच्या वाचकांना सहानुभूतीची कल्पना येईल. गेल्या गणेश–उत्सवांत भिवंडी येथें गेल्या वेळीं श्रीमंत दादासाहेब दांडेकरांसारख्या थोर गृहस्थांचा परिचय झाला. श्रीमंत दादासाहेब दांडेकर हे आमच्या मालेचे आणि कार्याचे अभिमानी आहेतच. त्यांनीं आपले मित्र श्रीमंत शेठ विठूराम शिवलाल लाहोटी यांना हिं. स. मालेच्या कार्यास १०१ रुपये देणेची सूचना केली व ती त्यांनीं मान्य केली. श्री. नारायणराव नाईक, मॅनेजिंग एजन्ट, श्रीराम सिल्क मिल्स–बंगलोर यांनींहि आमच्या कार्यास १०० रुपयांचें साह्य केलें. या साह्यानिमित्त आम्ही या त्रिवर्गांचे आभारी आहों.

**ग्रंथोद्देशः**–हा ग्रंथ मराठी जाणणाऱ्या सर्वांकरितां आहे. या ग्रंथांत हिंदुसंस्कृतीच्या गेल्या दहा हजार वर्षांतील स्थित्यंतरांचें समालोचन केलें आहे. हिंदुसंस्कृतीनें बौद्ध संस्कृतीचा प्रतिकार कसा केला, इस्लामचें आक्रमण कसें बंद पाडलें, याचा ऊहापोह या ग्रंथांत जसा आहे, तसाच ख्रिश्चन व पाश्चात्य संस्कृतीचें आक्रमणहि कोणत्या उपायानें बंद पाडावें याचाहि आहे. थोडक्यांत अखिल हिंदूंना या ग्रंथावरून आपण होतों कसे? झालों कसे? आतां आहों कसे व पुढें कसे झालें पाहिजे, याचें ज्ञान देणारा मराठी भाषेंतील हा बहुमोल ग्रंथ आहे. हिंदूमध्यें जे आत्मप्रत्ययशून्य आहेत, त्यांनाहि या ग्रंथावरून ही हिंदुजाति किती जिवट, चिवट व श्रेष्ठ आहे, हिंदूंची परंपरा कशी उज्ज्वल आहे, जगांतील अखिल मानवांची संस्कृति होण्यास हिंदुसंस्कृति हीच कशी योग्य आहे, याची कल्पना येईल. हिंदूंमध्यें आपल्या उज्ज्वल परंपरेचे गुण यावेत, आत्मविश्वास वाढावा, स्वाभिमान जागृत व्हावा, वृत्ति अंतर्मुख करून हिंदु समाजाला व हिंदु राष्ट्राला समर्थ करण्याकरितां त्यांनीं कार्यप्रवृत्त व्हावें, असा या ग्रंथाचा उद्देश आहे.

**ईशसंकल्पः**–हिंदुधर्म व हिंदुसंस्कृति या विषयांचा अभ्यास, चिंतन व मनन गेलीं ३० वर्षें चालू आहे. या विषयावर आम्ही प्रथम

२७ वर्षांपूर्वी एक लहानसें पुस्तक प्रसिद्ध केलें, त्याचें समाजानें उत्तम प्रकारें स्वागत केलें. तेव्हांपासून त्या विषयाची सर्व बाजूची बरीचशी माहिती आम्हीं संग्रहित केली, आणि या ग्रंथाची लेखी प्रत अडीच वर्षांपूर्वीच संपूर्ण सिद्ध केली. जवळ जवळ साडेपांचशें पानांचा हा ग्रंथ छापणें आपल्या शक्तीबाहेरचें आहे, असें दिसतांच निराशाहि उत्पन्न झाली. परंतु या ग्रंथांतील विचार समाजामध्यें प्रसृत व्हावे, हा ईशसंकल्पच दिसतो. म्हणून एकेक योग जमत गेले व तीन आश्रयदाते लाभले !

**फलटणच्या राजेसाहेबांचें उत्तेजनः**—फलटण संस्थानचे सत्प्रवृत्त आणि सुविद्य दिवाण रावबहाद्दूर श्री. के. वि. गोडबोले यांना या ग्रंथाची सविस्तर माहिती पाठविली आणि श्रीमंत सरकार सं. फलटण यांचेकडे आश्रयाची विनंति केली. **श्रीमंत मालोजीराव नानासाहेब नाईक निंबाळकर,** फलटण संस्थानचे राजेसाहेब यांनीं दिवाणसाहेब यांच्या शिफारसीवरून रुपये ५०० दक्षणा ग्रंथकारास पाठवून या कार्यास प्रारंभ करण्यास शुभशकुन केला. त्याबद्दल या उभयतांचे आम्ही हार्दिक आभार मानतों.

**श्री. प्रतापशेट यांची देणगीः**—शके १८६७ च्या श्रीरामनवमीच्या उत्सवास श्रीमान दानशूर प्रतापशेट तथा मोतीलाल माणिकचंद यांनीं प्रवचनाकरितां अमळनेरास पाचारण केलें. श्रीमान् प्रतापशेट हे ईश्वरनिष्ठ, अध्यात्मनिष्ठ आणि दानशूर कसे आहेत, हें महाराष्ट्राला परिचित आहे. श्रीमंत प्रतापशेटजींनीं आपल्या राममंदिरांत आमचीं नऊ प्रवचनें श्रवण केलीं, आणि या ग्रंथाचें हस्तलिखितहि काळजीपूर्वक पाहिलें. ग्रंथप्रकाशनाच्या कार्यास निदान कागदखरेदीपुरतें पूर्ण साह्य करावें, अशी आम्ही विनंति केली. श्रीमंत प्रतापशेट यांनीं आपल्या औदार्याला अनुसरून दीड हजार रुपयांची देणगी देऊन कागदाची चिंता निवारण केली, त्याबद्दल श्रीमंत प्रतापशेट यांना आम्ही धन्यवाद देतों, व त्यांचें अभीष्ट चिंतितों.

**बडोद्याच्या सौ. राणीसरकारांचा आश्रयः**—बडोदें संस्थानच्या सुशील व सुसंस्कृत महाराणीसाहेब **श्रीमंत हर हायनेस सौभाग्यवती शांतादेवी महाराज** यांच्या खास निमंत्रणावरून शके १८६७ च्या गणपति उत्सवांत लक्ष्मी–विलास पॅलेसमध्यें श्रीगणपतीपुढें प्रवचन केलें. त्यानंतर

कीर्तिमंदिरांतहि प्रवचन झालें. शके १८६५ मध्येंहि श्रीमंत सौ. राणीसरकारनीं उत्सव संपल्यावर एक प्रवचन मुद्दाम केलें होतें. आमची प्रवचनपद्धति आणि विचारसरणी आजच्या काळास योग्य अशी असल्यामुळें श्रीमंत सौ. राणीसरकारांना आमचीं प्रवचनें पसंत पडलीं. गतवर्षी समक्ष त्यांच्या भेटीचा योग आला. त्यावेळीं ग्रंथाचें हस्तलिखितहि अवलोकनार्थ नजर केलें. श्रीमंत हर हायनेस सौ. शांतादेवी राणीसरकार यांनीं आपल्या विद्याधिकाऱ्यांच्या आणि अन्य तज्ज्ञांच्या मतें या ग्रंथाचें अवलोकन करून २००० रुपये पुरस्कार पाठविला; म्हणूनच सर्व चिंता निवारण होऊन हा ग्रंथ प्रकाशित होत आहे.

हे सर्व योग ज्या परमेश्वराच्या कृपेनें आले त्या ईश्वरास आम्ही अनन्यभावानें साष्टांग प्रणिपात करतों.

श्रीमंत हर हायनेस महाराणीसाहेब सौ. शांतादेवी, संस्थान बडोदें यांनीं या ग्रंथास उदार देणगी दिली त्याबद्दल आम्ही त्यांना धन्यवाद देतों, आणि श्रीमंत राणीसरकारांना ईश्वर अखंड सौभाग्य, क्षेम, स्थैर्य, आयुष्य व आरोग्य हीं सर्व देवो, असें आम्हीं इच्छितों. त्याचप्रमाणें बडोदा संस्थानचे विद्याधिकारी, राणीसरकारांचें तज्ज्ञ सल्लागार आणि या कामीं प्रथमपासून योग्य मार्गदर्शन करणारे आमचे हितचिंतक राजरत्न श्रीमंत दाजीसाहेब तांबे अशा त्रिवर्गांचे आम्ही मनःपूर्वक आभार मानतों.

**कोल्हापूर दरबारचे आभारः**—कोल्हापूर दरबारचे प्रतिनिधी ना० गुलाबराव देशमुख यांनीं या ग्रंथाचें शैक्षणिक महत्त्व ध्यानीं घेऊन आणि विशेषतः आमची सर्व बाजूंनीं कशी कुचंबणा होत आहे, हें पाहून तज्ज्ञ **कार्यवाह प्राध्यापक शिंदेसाहेब** यांचे सल्यानें हा ग्रंथ छापण्यास परवानगी दिली; त्याबद्दल आम्ही उभयतांचे कृतज्ञतापूर्वक आभार मानतों.

**विद्वानांचें औदार्यः**—या ग्रंथाचें हस्तलिखित पं. बाळाचार्य खुपेरकर कोल्हापूर व यशवंतरावजी गुण्ये, बी. ए., एल्. एल्. बी., ग्वालेर दरबारचे वकील, पुणें, यांनीं वाचून पाहून उपयुक्त सूचना केल्या; तसेंच अनेक विद्वान विचारी गृहस्थांनीं जें वैचारिक साह्य केलें, त्याबद्दल हा ग्रंथकार त्यांचा ऋणी आहे. विद्वानांचीं मतें त्यांचे नांवांवर प्रकरण २७ मध्यें दिलीं आहेत.

पंडित बाळाचार्य खुपेरकर यांनीं वेळांत वेळ काढून मुद्रितांवरहि नजर टाकली आणि पुष्कळ मार्मिक शोध सुचविले. त्यामुळेंच हा ग्रंथ इतक्या लौकर प्रसिद्ध झाला. त्याबद्दल त्यांचें अभिनंदन करावें तेवढें थोडेंच आहे.

विशेष उल्लेखनीय असें कीं या ग्रंथांतील **यज्ञीय हिंसा व जैनधर्म** हें प्रकरण तयार करण्याचे कामीं मुंबई भारतीय विद्याभुवनाचे डायरेक्टर श्रीमुनिजिनविजयजी यांचें बरेंचसें साह्य झालें. तसेंच प्रकरण १७ मध्यें वीरशैव तथा लिंगायत पंथाची जी माहिती दिली आहे ती बरीचशी पुरविण्याचें काम श्री. च. आ. भोगडे सोलापूर या विद्वान् गृहस्थांनीं निर्व्याज प्रेमानें केलें. या साह्याबद्दल आम्ही या उभय विद्वानांचे हार्दिक आभार मानतों.

**आपटे यांचे आभारः**—मिरजेस आल्यापासून आम्हांस आत्मीयत्वानें लेखन आणि अन्य साह्य करणारे श्री. भाऊराव आपटे, ह्यांनीं ह्या ग्रंथाचे कार्यास साह्य केलें म्हणूनच सुवाच्य प्रेस कॉपी त्वरित तयार झाली. आतां अन्य कामामुळें पूर्ववत् त्यांचें साह्य मिळत नाहीं, ही गोष्ट मनाला चटका लावते. आजवरच्या त्यांच्या साह्याबद्दल आम्ही त्यांचे आभारी आहों. आमचे मित्र वे. मू. महादेवभट देवघर यांचें साह्य लेखनकार्यास अलीकडे होत असतें, हें येथें उल्लेखितों.

**पावसकरांचें अभिनंदनः**—बडोद्याचे उत्कृष्ट फोटोग्राफर श्री. आप्पासाहेब पावसकर यांनीं अल्पावधींत स्नेहसंबंध उत्पन्न केला. बडोद्यास प्रवचनार्थ गेल्या वेळीं आमचा फोटो घेऊन व नंतर त्याचा सुंदर ब्लॉक तयार करून पाठविला, त्याबद्दल तेहि अभिनंदनास पात्र आहेत.

**श्रीज्ञानेश्वरांची कृपा होवोः**—श्रीज्ञानेश्वर प्रेसचे सेवक श्री. कृ. ह. सहस्रबुद्धे यांचें साह्य सर्वतोपरीनें झालें. कोल्हापूर दरबारकडून परवानगी मिळविणें, अनेक अडचणींतून कागद मिळविणें, कामगारांचे संप, रोजच्या नव्या नव्या अडचणी, कायद्याचीं बंधनें, यांना तोंड देऊन, मनःस्वास्थ्य ठेवून, अनेक मोठीं कामें आलीं असतांना तीं डावलून खरोखरच हें काम आत्मीयतेनें आणि सौजन्यानें त्यांनीं पुरें केलें. मध्यंतरीं एक दोन क्षण असे आले होते कीं हें काम कशाला पत्करलें ? कोण हा त्रास ? आतां तरी

राहिलेलें काम दुसरीकडे द्या, असें लिहिण्याची इच्छाहि त्यांना झाली असावी ! त्यावेळीं त्यांनीं जर त्रागा केला असता तर आमचें हें काम कधींच झालें नसतें ! परंतु श्रीज्ञानेश्वरांची कृपा म्हणूनच 'आरब्धस्यान्तगमनं' हा सिद्धान्त त्यांनीं खरा केला, हें येथें कृतज्ञतापूर्वक उल्लेखितों. श्री. सहस्रबुद्धे हे धंदेवाईक असले तरी अंतःकरणानें थोर, सज्जन व मृदु आहेत. श्रीज्ञानेश्वरांची कृपा त्यांचेवर आहेच. या उतार वयांत त्यांना पूर्ण मनःसमाधान लाभो, असें आम्ही इच्छितों.

आभारः—या ग्रंथलेखनाकरितां ज्या विद्वानांनीं आपला वेळ मोडून चर्चा केली, सूचना केल्या, त्यांचें; ज्या विद्यमान व अविद्यमान ग्रंथकारांच्या ग्रंथांचे व ज्या लेखकांच्या लेखांचे आधार या ग्रंथांत घेतले, त्यांचे; ज्या संस्थांनीं व गृहस्थांनीं ग्रंथसाह्य केलें, त्यांचें; आजवर जे मालेवर व लेखकाच्या कार्यावर निर्व्याजपणें लोभ करीत आहेत त्यांचे; ज्या संस्थानिकांनीं व राजे महाराजे यांनीं या मालेंतील कांहीं पुस्तकांना आश्रय दिला, त्यांचे; जे सद्‌गृहस्थ मालेचीं पुस्तकें खपविण्यास निर्हेतुक साह्य करितात त्यांचे; कार्याकरितां प्रकृति कार्यक्षम राहावी म्हणून वेळोवेळीं औषधांचें साह्य ज्यांचेकडून होतें अशा मुंबई, पुणें, मिरजेंतील डॉक्टर–वैद्यांचे आणि इतर सर्वांचे आम्ही कृतज्ञतापूर्वक आभार मानतों.

शेवटीं ज्याच्या कृपेनें हें अल्पस्वल्प कार्य गेलीं २० वर्षें अव्याहत चालू आहे, त्याच्या कृपेनेंच यापुढचें संकल्पित कार्य सिद्धीस जावो, अशी त्याची प्रार्थना करून हें प्रास्ताविक निवेदन पुरें करतों.

मिरज<br>त्रिपुरी पूर्णिमा शके १८६८

हिंदु समाजसेवक,<br>महादेवशास्त्री दिवेकर

# हिंदुसंस्कृति प्रदीप



## प्रकरण पहिलें

## अभिमानास्पद हिंदुसंस्कृति

**(१) हिंदुराष्ट्राचा हक्क:**—या ग्रंथाचें नांव 'हिंदुसंस्कृति प्रदीप' असें असून या ग्रंथांत हिंदु संस्कृति ही कशी आहे, हें दाखवावयाचें आहे. जगांतील प्रत्येक राष्ट्र आपण श्रेष्ठ आहों अशा अभिनिवेशानेंच जगतें. मनुष्यहि स्वाभिमानानें जगला तरच तें खरें जिणें होय! या प्रचंड महायुद्धामध्यें प्रत्येक राष्ट्र स्वाभिमानानें कसें इरेस पडलें होतें हें प्रत्ययास आलें आहे. हिंदुस्थान हें एक प्रचंड राष्ट्र आहे. इतर राष्ट्रांप्रमाणें त्याला या जगांत जगण्याचा, पराक्रम करण्याचा आणि स्वतंत्र होऊन सर्व जगभर आपल्या संस्कृतीचा प्रसार करावयाचा हक्क आहे. जोंवर कांहीं कार्य आहे तोंवरच माणसानें जगावें. जोंवर राष्ट्रापुढें कांहीं ध्येय आहे, आणि जगाला देण्याजोगें राष्ट्राजवळ कांहीं आहे, तोंवरच राष्ट्रानेंहि जगावें. हिंदुराष्ट्राजवळ जगाला देण्याजोगें पुष्कळ आहे आणि तें कार्य ईशसंकल्पाप्रमाणें पूर्ण होईपर्यंत हिंदुस्थानला जगण्याचा हक्क आहे.

**(२) ग्रंथोद्देश:**—पुष्कळ दिवस पिंजऱ्यांत कोंडलेला पोपट जसा आपला स्वाभाविक गगनविहार विसरतो, तद्वतच दीडशें वर्षांच्या परकीय राज्यामुळें हिंदुस्थानांतील स्वाभिमानी वृत्ति जाऊन एक तऱ्हेची पराभवाची वृत्ति उत्पन्न झालेली आहे. हिंदुसमाजांतील कित्येक जाणते आणि बरचसे नेणते लोक या पराभूत विचारांनीं पछाडले आहेत. ते म्हणतात "काय हो, आम्ही हिंदु हे असेच कां? पूर्वी मुसलमानांनीं राज्य केलें, आतां इंग्रज

करतात, न जाणों उद्यां काय होईल?" अशा निराशामग्न झालेल्या अन्तःकरणाकरितां हा ग्रंथ आहे. ज्या हिंदु तरुणांना आणि तरुणींना आपल्या संस्कृतीची ओळखहि नाहीं, त्यांना ती या प्रदीपाचे द्वारें करून द्यावयाची आहे. या हिंदुराष्ट्रांत आजवर कशी समाजधारणा झाली, हिंदुसंस्कृतीनें हिंदुत्वाचें जीवन हिंदु समाजास कसें दिलें आणि हिंदुराष्ट्र कसें जगविलें, हें सर्व येथें दाखवावयाचें आहे. हिंदुसंस्कृतीचें स्वरूप, तिजवर झालेलीं आक्रमणें, तज्जन्य झालेलीं परिवर्तनें हीं सर्व शांतपणें ध्यानीं घेऊन सद्यःपरिस्थितींत राष्ट्रोत्कर्षाचा मार्ग आक्रमण करण्यास या ग्रंथाचें हिंदु समाजाला साह्य व्हावें, हा या ग्रंथाचा उद्देश आहे.

**(३) जेत्यांनींहि मान खालीं घालावीः**—हिंदुस्थान हा आज परतंत्र असला, पराभूत असला तथापि आपण इंग्रजांपेक्षां हीन आहों, असें हिंदूंना वाटण्याचें मुळींच कारण नाहीं. जेते लोक जितांना प्रज्ञाहत करण्याकरितां ज्या अनेक कारवाया करतात, त्यांतील एक कारवाई अशी असते कीं, त्यामुळें जितांना आपलें तें सर्व वाईट आणि जेत्यांचें तें सर्व चांगलें असें वाटूं लागतें. अव्वल इंग्रजींमध्यें इंग्रजी शिकलेल्या शिक्षितांना आपले पूर्वज गाढव, आपले धर्मग्रंथ मूर्खपणानें भरलेले व आपले आचारविचार अगदीं टाकाऊ, असें वाटत असे. अलीकडे ती वृत्ति पुष्कळच कमी होत आहे. जेते लोक जितांना तुम्ही पराक्रमी नाहीं, तुमच्यांत शिस्त नाहीं, ना तुम्हाला इतिहास, ना भाषा, ना शिल्प, ना काव्य, ना शास्त्र, ना शोध असें म्हणून हांगवतात आणि परदास्यांतच राहाण्यास तुम्ही लोक योग्य असा संस्कार दृढ करण्याचा यत्न करतात! परंतु हिंदूंना इंग्रजांपुढें मान ताठ करून आणि जगापुढें छाती पुढें करून अभिमानानें चालावयास लावण्याजोग्या इतक्या गोष्टी आहेत, कीं त्या पाहून जेत्यांनींहि मान खालीं घातली पाहिजे.

जगांतील अनेक विद्वानांनीं, संशोधकांनीं, मानवजातीच्या अभ्यासकांनीं हिंदुसमाजाच्या निरनिराळ्या शाखांचा अभ्यास केला असून त्यांनीं हिंदु संस्कृतीचा मोठाच गौरव केलेला आहे. "India as seen and known by Foreigners" या छोट्या पुस्तकामध्यें जगांतील अनेक

विद्वानांच्या ग्रंथांतील उतारे रावसाहेब देशपांडे यांनीं संग्रहित केलेले आहेत. त्यांचा निष्कर्ष पुढीलप्रमाणें सांगतां येईल.

**(४) सर्वश्रेष्ठ वैदिक वाङ्मयः**— हिंदुस्थानाशिवाय सबंध जगांत वेदांइतकें उच्च आणि उत्कृष्ट वाङ्मय कोणींहि निर्माण केलेलें नाहीं. म्हणून वेद हें जगांतील अद्वितीय वाङ्मय होय! ऋग्वेद हा सर्वांत प्राचीन ग्रंथ असून त्यांतील पवित्र मंत्रांची बरोबरी जगांतील कोणतेंहि वाङ्मय करूं शकणार नाहीं. ज्याला ज्याला म्हणून प्राचीन मानववंशाचा धार्मिक, सामाजिक, राजकीय आणि बौद्धिक दृष्ट्या अभ्यास करावयाचा असेल, त्यानें त्यानें वैदिक वाङ्मयाचा अभ्यास अवश्य केला पाहिजे. आर्यवंशांतील एका शाखेचा इतिहास म्हणजे वेद होत. वैदिक वाङ्मयावरून मानव-जातीच्या इतिहासाची व भाषेची वाढ कसकशी होत गेली, ज्योतिष, वैद्यक, शिक्षा, व्याकरण, निरुक्त यांचा विकास कसकसा होत गेला, हें समजतें. वैदिक वाङ्मय हें होमर कवीच्याच पूर्वींचें नव्हे तर इजित, खाल्डिया, यांच्याहि पूर्वींचें आहे. त्यावरून वेदकालीन लोक विद्या, कला, शिल्प, धातु, नौकानयन, समाजसंस्था या बाबतींत पुढारलेले होते असें स्पष्ट दिसतें. वेदांत प्रतिभा आहे, काव्य आहे, विचारांचें गांभीर्य आहे, स्फूर्तिदायक सूक्तें आहेत. ब्राह्मणांनीं पठण पाठण परंपरेनें केलेलें वेदरक्षण म्हणजे जगांतील सप्त आश्चर्यांच्या पलीकडचें एक आठवें आश्चर्यच होय!

**(५) उपनिषदांमुळें समाधानः**—वेदांमध्यें ईश्वर एकच आहे, तो स्वयंभू आहे, तोच त्राता आहे असें म्हटलें आहे. उपनिषदांइतके अध्यात्मविचारामध्यें ज्येष्ठ आणि श्रेष्ठ तत्त्वज्ञानाचे ग्रंथ पृथ्वीच्या पाठीवर नाहींत. उपनिषदांच्या अभ्यासानें जन्मभर समाधान लाभेल आणि मरतांनाहि समाधानानें मरण येईल. उपनिषदांतील तत्त्वज्ञान हें मनःसमाधानाचें शास्त्र असून मनाची ठेवण कशी उच्च ठेवावी हें शिकवितें. वैदिक वाङ्मय रचण्या-मध्यें जसा स्त्रियांचा भाग आहे, तसाच अध्यात्मचर्चेंतहि त्यांचा भाग आहे. मानसिक उन्नतीला पोषक असा उपाय म्हणजे उपनिषदांचा अभ्यास. वेदांतशास्त्राप्रमाणें सांख्य, योग्य, वैशेषिक, न्याय हीं शास्त्रेंहि हिंदूंच्या बुद्धि-मत्तेचीं निदर्शक आहेत.

**(६) सर्व धर्मांची माताः**–हिंदुधर्म ही सर्व जगाची माता आहे. सर्व धर्मांना या मातेनें धर्माचें स्तन्य दिलेलें आहे. हिंदुधर्म हा मनुष्याच्या मनाला आणि शरीराला विशिष्ट आचारानें वळण लावून ध्येयाप्रत नेतो. जगांतील सर्व विद्यमान धर्मांवर हिंदुधर्मांची छाप पडलेली आहे. दैनंदिन कार्यक्रमांत आजहि हिंदु मनुष्य चिकाटीनें धर्म पाळतो. धर्मांची इतकी पक्कड त्याच्या मनावर आहे.

**(७) सर्व भाषांची जननीः**–संस्कृतभाषा ही सर्व भाषांची आजी किंवा पणजी ठरते. ती सर्व भाषांपेक्षां उच्च आणि समृद्ध अशी भाषा आहे. सर्व तऱ्हेच्या भावना वाणीच्याद्वारें व्यक्त करण्यास सुसमृद्ध संस्कृत भाषेसारखी भाषा नाहीं, आणि देवनागरी लिपीसारखी लिपी नाहीं. हिंदु-धर्मांचे सर्व धर्मग्रंथ संस्कृतमध्यें आहेत. त्याबद्दल हिंदूंना फार अभिमान वाटतो.

**(८) मानववंशाचा पाळणाः**–हिंदुस्थाननेंच या मानववंशाला पाळण्यांत घातलें, त्याला अभ्युदयाचें आणि ईश्वरीज्ञानाचें स्तन्य देऊन त्याची जोपासना केली. वेदकालीन आर्यांनीं मानवी जीवनोपयुक्त अशा कला, शास्त्रें, इतिहास, राजकारण हीं सर्व परिणतावस्थेला नेलीं. ज्यामुळें जगत्रयाला व्यासोच्छिष्ट म्हणतात व ज्यामध्यें भगवान् व्यासांनीं मनुष्य-स्वभाव इतका सुंदर रंगविला आहे, तें प्रचंड महाभारत जगाला अभ्यसनीय आहे. शाकुंतलासारखें नाटक, रामायणासारखें काव्य हीं जगाला अभिमाना-स्पदच होत. श्रीमद् भगवद्गीता हा नीतिशास्त्रावरील उत्कृष्ट ग्रंथ असून सर्व जगांतील भाषांमध्यें त्याचा अनुवाद झालेला आहे.

**(९) हिंदूंचा उमदा स्वभावः**–हिंदु हे मनाने सच्चे, शूर, उदार, धैर्यशाली, बुद्धिमान्, कोणालाहि हार न जाणारे असे आहेत. 'त्यांच्यामध्यें प्रामाणिकपणा आणि परस्पर विश्वास इतका आहे, कीं ते आपापलीं घरें-दारें निःशंकपणें उघडीं टाकून बाहेर जातात. कारण चोरी ही त्यांना माहीतच नाहीं. स्त्रियांचें पातिव्रत्य फार प्रखर आहे. गुलामगिरी मुळींच नाहीं. चंद्रगुप्तकालीं कला, उद्योग यांची फार भरभराट होती. जनन-मरणाची नोंद होत असे. राज्यांत मोठमोठाल्या सडका होत्या आणि त्यावर मैलांचे दगडहि होते." असें हें सर्व विद्वानांनीं केलेलें गौरवपर

वर्णन वाचलें म्हणजे आपण श्रेष्ठ होतों, आहों व होऊं याविषयीं संशय रहातच नाहीं.

(१०) **हिंदु जातीचे पराक्रमः**–हिंदु हे पराक्रमांत कमी आहेत काय? मुळींच नाहीं. जो तोंड पुढें करून असे प्रलाप काढील त्याला असें सांगतां येईल कीं हें पहा, एवढा शिकंदर चालून आला, त्यानें पौरसशीं सामना केला नाहीं, तोंच चंद्रगुप्तानें त्याची धुळदाण उडविली! खिस्तपूर्व दोनशेंच्या सुमारास बॅक्टेरियांतून ग्रीक लोक आले, त्यांना राजा पुष्पमित्र व त्याचा पराक्रमी सेनापती यांनीं चोप देऊन हांकलून दिलें! खिस्तपूर्व ५७ चे सुमारास शकांचें आक्रमण झालें, तें उज्जयनीच्या विक्रमादित्यानें परतवून लावलें. गौतमीपुत्र पुलुमाई शातकर्णी यानें शकांचा राजा नहपान यास इ. स. १२६ मध्यें 'त्राहि भगवन्' करून सोडलें. प्रबळ राजा समुद्रगुप्त यानें पूर्वेकडून होणाऱ्या यूएची घराण्यांतील आक्रमणांना थोपवून धरलें (इ.स. ४५०). इ.स. ६०० त यशोधर्म राजानें मीहिर गुल्लाची रेवडी उडवून दिली. इ.स. ७००मध्यें कनोजच्या श्रीहर्षानें हूणांचा पराभव केला. इ. स. ७१२ त लुटीच्या लालसेनें महंमद कासीमनें सिंध देश व्यापला खरा. पण त्याच्या पाठोपाठ येणाऱ्या जुनैदाला प्रतिहारांच्या नागभट्टानें धूळ चारली. गुजराथेंत मुसलमान आले मात्र, तों बदामीच्या चालुक्य घराण्यांतील सत्याश्रय पुलकेशी त्यांच्यावर तुटून पडला. इ. स. ९०० मध्यें तर कनोजच्या प्रतिहारी घराण्यांतील मिहिरभोज यानें मुलतान व काबूल यांवर अधिराज्य केलें. मथुरेच्या गढहवाल राजानें गझनीच्या अमीरांचा पराभव करून त्यावर तुरुष्क दंड बसविला. राजपुतान्यांतील चाहमानानें आणि पुढें विशालदेवानें मुसलमानांची कणीक चांगली मऊ केली. इ. स. ११७८ मध्यें अबूच्या पहाडाजवळ गुजराथच्या सोळंकीनें शहाबुद्दिनाला असा लोळवला कीं त्यानें पुढें हिंदुस्थानचें नांवहि सोडून दिलें!!

बाप्पा रावळापासून तों प्रतापसिंहापर्यंत राजपुतांनीं इतक्या निकरानें इस्लामशीं झुंज दिली कीं तशी तोड जगाच्या इतिहासांत सांपडणार नाहीं. दक्षिणेंतील विजयानगरच्या विजयी साम्राज्यांत पराक्रमी माणसें कांहीं थोडीं-थोडकीं नव्हतीं. मराठ्यांच्या पराक्रमाची साक्ष ही कीं चंग बांधून दक्षिणेंत उतरलेल्या औरंगजेबाला मराठ्यांनीं चोहोंबाजूनें हल्ले करून पुरेपुरेसें केलें!!

हैदर, टिपु वरील स्वाऱ्या, खर्ड्यांची लढाई आणि दिल्लीच्या तख्तावरील घण हीं मराठ्यांच्या पराक्रमाचीं मोठीं स्मारकें होत. बादशाहीच्या उतरत्या काळांत शीखांनीं मोठा पराक्रम करून स्वतंत्र राज्य स्थापन केलें. तळेगांवच्या लढाईत इंग्रजांवरहि हिंदूंनीं जय मिळविला आणि इंग्रजी अंमल झाल्यापासून आजपर्यंत अनेक पराक्रमाचीं कृत्यें हिंदु जातींनीं केलेलीं आहेत. याचें मोठें उदाहरण म्हणजे या महायुद्धांत ज्या तीस पसतीस वीरांनीं व्हिक्टोरिया क्रॉस मिळविले, त्यांतील अठ्ठावीस तीस हिंदु वीरच आहेत. नाविक व वैमानिक दळामध्यें मोठमोठ्या हुद्यांवरील हिंदु तरुणांनीं पराक्रम गाजविलें आहेत. युद्धसंबद्ध अनेक क्षेत्रांमध्यें संधि मिळाली रे मिळाली कीं हिंदु हे त्या सर्व क्षेत्रांत अग्रेसर होतात इतकें सांगितल्यानंतर हिंदूंच्या पराक्रमाचें अधिक वर्णन करणें नलगे !

**(११) पराभवाचीं अन्य कारणें:**–हिंदुजाति एवढी पराक्रमी असतांना ती मुसलमानी वर्चस्वाखालीं कां गेली आणि आज दीडशें वर्षें परकीय राज्य कसें सहन करीत आहे, असा प्रश्न येईल. त्याचें स्पष्ट आणि रोखठोक उत्तर असें आहे कीं, मुसलमानांच्या स्वाऱ्या म्हणजे राज्यस्थापना नव्हे. भुरट्या चोरांचीं तीं आक्रमणें होतीं. कुतुबुद्दिन ऐबकपासून दिल्लींत राज्य झालें, पण त्याचा अंमल दिल्लीच्या आसपासच होता अल्लाउद्दीन दक्षिणेंत आला खरा, पण कर्नाटक व वरंगळ येथील हिंदु राजांनीं मुसलमानांना मागें हटवून देवगिरी लौकरच बळकावली. खिलजी, तुघलख, लोदी हीं नुसतीं घराणींच झालीं, त्यामुळें सत्ता फारशी वाढली नाहीं. खरें म्हटलें तर फत्तेपूर शिक्रीच्या इ. स. १५२७ मधील लढाईनंतर मोंगल बादशहाची सत्ता दिल्लीस स्थापन झाली! पण अल्पायुषी बाबर संपतांच हुमायुनाच्या वाट्यास वनवासच आला. खरी मुसलमानी सत्ता अकबरापासून औरंगजेबापर्यंत अवघीं दोनशें वर्षें होतीं. पण ती सुद्धां हिंदूंच्या सहाय्यानेंच होती, हें विसरतां कामा नये. दक्षिणेंतील पांचशाह्या या हिंदूंच्या सहाय्यावरच चालल्या होत्या ! शहाजी राजे तर 'किंग–मेकरच' होते आणि ज्या वेळेला औरंगजेबानें हिंदूंशीं वैर धरलें त्याच वेळीं मोंगल साम्राज्याच्या ठिकऱ्या ठिकऱ्या उडाल्या, अशी साक्ष इतिहास देत आहे.

इंग्रजी राज्याचीहि तीच गोष्ट आहे. ब्रिटिश साम्राज्य आज शस्त्र आणि शास्त्र यांत जरी फार पुढें गेलें असलें तरी दीडशें वर्षांपूर्वी इंग्रज आणि हिंदु यांच्या बंदुकींत अवघें पन्नास यार्डांचें अंतर होतें. इंग्रजांनीं राज्य मिळविलें, तें केवळ पराक्रमावर, असें मुळींच नाहीं. हिंदूंचा पराक्रम, हिंदूंचें शौर्य, युद्धकौशल्य ही मुळींच कमी नव्हती, तर हिंदूंतील फाटाफूट, शिस्त, संघटना व देशाभिमान यांचा अभाव यांमुळेंच हिंदु पराभूत झाले. इंग्रजांचें राज्यहि हिंदुस्थानांत इंग्रजांच्या पराक्रमापेक्षां हिंदूंच्याच मदतीनें झालें, आणि त्यांच्याच मदतीवर चाललें आहे. शौर्य कमी म्हणून हिंदु हरले असें नाहीं. हिंदूंच्या कांहीं दोषांमुळें इंग्रजांनीं हिंदूंकडूनच राज्य घेतलें, शेवटीं तें त्यांना हिंदूंच्याच हवालीं करून जाणें भाग पडेल.

(१२) **शास्त्र व संशोधनः**—शास्त्र आणि शोध या दृष्टीनें हिंदु-संस्कृतीमध्यें अभिमान बाळगण्याजोगें पुष्कळच आहे. न्याय, व्याकरण, वेदांत, सांख्य, योग, धर्मशास्त्र यापलीकडे हिंदूंना शास्त्रें माहीत नाहींत, ही समजूत निर्मूल आहे. अंकगणितांतील मूलाधार जो अंक आणि दशमान-पद्धति हा मोठा शोध हिंदूंनींच लावला. त्यांचेपासूनच अरबांनीं व त्यांचे-द्वारां युरोपिअनांनीं ही गणित पद्धति घेतली. बीजगणितांतील द्विघात समीकरणाचा शोध आर्यभट्टानें लावला. भूमिति आणि त्रिकोण मिति या शास्त्राचा विकास यज्ञसंस्थेंतून झाला. शून्यलब्धीची कल्पना भास्करा-चार्यांना न्यूटनच्या पूर्वींच आली होती, आणि पृथ्वी सूर्याभोंवतीं फिरते हा सिद्धांतहि त्यानें पांचव्या शतकांतच मांडला होता. धूमकेतूचा शोध उत्पल यानें लावला. पदार्थविज्ञानशास्त्रांतील अणूची कल्पना नैय्यायिकांची आहे. लोहचुंबक, विद्युत्, नादलहरी, होकायंत्र, रसायनशास्त्र, वैद्यशास्त्र, शल्यतंत्र, शवच्छेदन, शस्त्रक्रिया या सर्वांची माहिती हिंदूंना फार प्राचीन काळापासून आहे. एवंच भौतिकशास्त्रें, शिल्प, ज्योतिष, वैद्यक अशा सर्व शास्त्रांची उपासना इतर राष्ट्रांच्या आधीं हिंदूंनीं केलेली आहे.

(१३) **संस्कृतिप्रसारः**—हिंदूंनीं विश्वावर पराक्रमानें विजय मिळविला, यासंबंधीं नवीनवी माहिती उपलब्ध होत आहे. फार प्राचीन काळीं आर्यांनीं ही पृथ्वी ‘ अश्वक्रांत, रथक्रांत ’ म्हणजे घोडे आणि रथ यांच्या सहाय्यानें आक्रमण केल्याचे उल्लेख सांपडतात. नौकाबंधन, समुद्रयान

यांच्या सहाय्यानें आपले पूर्वज वाटेल तेथें मोठमोठ्या सफरी करीत. सर्व जगांत संस्कृति-प्रसारार्थ वेदकालीन आर्य जात असत. चतुर्वेदाच्या शाखा पाहिल्या तर त्यावरून कुशद्वीप ( सहारा वाळवंट—कांगो स्टेट, पश्चिम व दक्षिण आफ्रिका ), क्रौंचद्वीप ( अल्जेरिया, मोरोक्को, बार्बरी संस्थानें, रशियाखेरीज सर्व युरोप ), शाकद्वीप ( हें अटलांटिक महासागराशीं संलग्न असलेलें भूखंड अथवा सध्यांचा सीथिया प्रांत ), श्वेतद्वीप ( मादागास्कर व आसपासचा भाग ), इत्यादि प्रदेशांमध्यें ब्राह्मणांनीं वैदिक कर्में आणि यज्ञयाग चालविले होते असें दिसतें. सुमात्रा, जावा, कंबोडिया, सयाम या सर्व देशांत प्राचीन काळीं आपल्या वसाहती होत्या. सयाममध्यें आज ब्राह्मणी संस्कृति आहे. कंबोडियाच्या राजाला वैदिकपद्धतीनें राज्याभिषेक होतो. तिकडे गांवांनाहि अयोध्यापूर, कांचीपूर अशीं नांवें आहेत. पूर्वेकडे चीनजपानपर्यंत, उत्तरेकडे मंगोलिया, मांचुरिया, तिबेट, तुर्कस्तान अशा सर्व भूप्रदेशांत हिंदुसंस्कृति होती. इजिप्तवर एकाकाळीं सगराच्या साठ हजार पुत्रांनीं समुद्रोल्लंघन करून राज्य स्थापलें. अफगाणिस्तान, बलुचिस्तान हे तर हिंदुस्थानांतच मोडत असत. पाताळ ( अमेरिका ), मेक्सिको, पेरु हीं हिंदु संस्कृतीचीं केंद्रें होतीं. बौद्धभिक्षूंनीं बुद्धधर्माच्या प्रसारार्थ पूर्वेकडील सर्व भूप्रदेश पायाखालीं घातला होता. ठिकठिकाणीं चाललेलें संशोधन आणि उत्खनन यांमुळें वैदिक संस्कृतीचे अवशेष सर्वत्र उपलब्ध होत आहेत.

(१४) **कलाकौशल्यः**—पराक्रम, शोध, शास्त्रें, आक्रमणशीलता, विश्वसंचार याप्रमाणेंच कलाकौशल्यामध्यें हिंदूंनीं फारच प्रगति केलेली होती. शिल्प, धातूचें ओतकाम, तलम वस्त्रें तयार करणें या बाबतींत सर्व जगाला थक्क करण्याजोगें कौशल्य हिंदूंमध्यें होतें. काश्मीरच्या शालीला आठ हजार रुपये पडत. आंब्याच्या कोयीच्या टरफलांत घालून किंवा शिंपल्याच्या संपुटांत घालून धोतरजोडा देत असत. मोहरेच्या आंगठींतून सबंध वस्त्र जाईल असें तलम वस्त्र येथें होत असे. तीर्थें, कुंडें, घाट, पुष्करणी, सरोवरें, विद्यामंदिरें, क्रीडाभुवनें हीं पाहून तर परस्थ आजहि थक्क होतात! कोरीव लेणीं, शिलायंत्रें, भव्य पुतळे यांतहि आपल्या पूर्वजांनीं फारच प्रगति केलेली होती. इतकी सर्व अभिमानस्थानें असतांना हिंदूंनीं पराभूत मनोवृत्तीनें स्वतःला कमी समजणें हें अगदीं अपमानास्पद आहे.

**(१५) एकरूप हिंदुसमाजः**–प्राचीन काळीं आपल्या पूर्वजांनीं सर्व जगभर संस्कृतिप्रसार केला, त्याचे अवशेष आज क्वचित् दिसत असले तरी हिंदुस्थानासारख्या खंडप्राय देशांत अखिल हिंदुसमाजांत जें सांस्कृतिक साम्य उत्पन्न केलें आहे तेंहि अपूर्व आहे. अखिल हिंदुसमाज हा धर्म, भाषा, लिपी, आचार, ऐतिहासिक परंपरा, समाजव्यवस्था अशा सर्व क्षेत्रांत एकरूप आहे. दक्षिणेकडील एकदोन भाषा सोडल्यास बाकी सर्व भाषा संस्कृतोत्पन्न असून शेंकडा पाऊणशें शब्द संस्कृतोत्पन्न आहेत. देवनागरी लिपी हीच मुख्य लिपी असून अन्य लिप्या तिचींच अपत्यें आहेत. सण, संस्कार, धार्मिक आचार, व्रतें, नेमधर्म आणि वेशभूषा यांतहि अखिल हिंदूमध्यें सादृश्य आहे. रामायण भारताचा एवढा जबरदस्त संस्कार आहे कीं बाटून अहिंदु झालेल्या लोकांमध्येंहि त्यांचा उल्लेख दैनिक व्यवहारांत दहापांच वेळां होतो. अनेक आक्रमणें आणि आपत्ति यांना तोंड देऊन हिंदुसमाजाला सांस्कृतिक दृष्ट्या एकसंध राष्ट्र बनविलें, ही कामगिरी केवढी अभिमानास्पद आहे!

**(१६) अन्य संस्कृतींचे प्रवाहः**–हिंदु संस्कृति ही वैदिक वाङ्मय, उपनिषदें, रामायण, भारत, स्मृतिसूत्रें, भाष्यें, पुराणें, काव्यें, नाटकें, संतवाङ्मय अशा सर्व ठिकाणीं दृग्गोचर होते. हिंदुसंस्कृतीमध्यें जैन वा बौद्ध धर्मांतील विचारांचे प्रवाहहि येऊन मिसळलेले आहेत. इस्लाम आणि पाश्चात्य संस्कृतीनेंहि तिजवर कांहीं आघात केलेले आहेत. त्या सर्वांचें स्वरूप या प्रदीपांत दाखवावयाचें आहे.

प्राचीनकालीं सनातन मानव संस्कृति हें नांव हिला देतां येईल. वेदामध्यें तिचें प्रतिपादन आहे, भारतांत तिचा विकास आहे, आर्यांनीं ती पचविली, म्हणून वैदिक संस्कृति, आर्य संस्कृति, भारतीय संस्कृति अशीं नांवें तिला प्राप्त झालीं. बुद्धोत्तर कालांत ही संस्कृति त्रैवर्णिक आर्यांच्या बाहेर पसरूं लागल्यामुळें तिला हिंदुसंस्कृति असें नांव प्राप्त झालें. हिंदुसंस्कृति ही हिंदुसमाजाच्या जीवनांत सर्वत्र व्यापून राहिली आहे. दैनंदिन कार्यक्रमांत, उत्सव सणांमध्यें, साहित्य वाङ्मयामध्यें, काव्यें–कलांमध्यें ती भरून राहिलेली आहे. हिंदुसंस्कृति ही आध्यात्मिक शांतीला आणि भौतिक प्रगतीला पोषक अशी असल्यामुळें तिच्या व्याप्तीप्रमाणें तिचें महत्त्वहि फार आहे.

आतां आपण हिंदुसंस्कृति यांतील दोन्ही शब्दांची चिकित्सा करूं. पैकीं हिंदु कोणास म्हणावें, हिंदूची धार्मिक, सामाजिक व राष्ट्रिय व्याख्या कोणती, याचें सांगोपांग विवेचन 'नवा हिंदुधर्म' या ग्रंथांत प्रकरण ७ मध्यें केलें आहे. वाचकांनीं तें प्रकरण अवश्य वाचावें, एवढी सूचना देऊन आतां संस्कृति या शब्दाकडे वळतों.

**(१७) संस्कृति म्हणजे काय ?** :—संस्कृति, सम् उपसर्गपूर्वक कृति म्हणजे चांगली कृति, चांगलें कृत्य असा याचा धात्वर्थ आहे. प्रकृति म्हणजे मूळ स्वरूप, विकृति म्हणजे बिघाड आणि ती न होण्याकरितां शरीराकडून चांगली कृति करून घेणें म्हणजे संस्कृति होय. संस्कृति हा शब्द आजच्या व्यापक अर्थानें प्राचीन वाङ्मयांत नाहीं. धर्म * हा शब्दच या व्यापक अर्थानें वापरलेला आहे. गुणधर्म, वर्णधर्म, जातिधर्म, सामान्य-धर्म, राजधर्म, प्रजाधर्म, पुत्रधर्म, पितृधर्म, असे हे सर्व शब्दप्रयोग व्यापक अर्थानें संस्कृतीची कल्पना देतात.

संस्कृति या शब्दाचा आजकालचा व्यापक अर्थ Culture and Civilization या दोन इंग्रजी शब्दांवरूनच घेतलेला आहे. कल्चर म्हणजे मनाचा सुसंस्कृतपणा आणि सिव्हिलिझेशन म्हणजे आधिभौतिक सुधारणा होय. संस्कृतिमध्यें मानवीजीवनाच्या सर्व अंगांचा आणि उपांगांचा समावेश होतो. काव्य, कला, गायन, चित्रकाम, रांगोळी काढणें, भरतकाम, अशांचा समावेश धार्मिक क्षेत्रांत होऊं शकत नाहीं. पण संस्कृतीमध्यें सर्व मानव-कृतीचा समावेश होतो.

संस्कृति म्हणजे संस्कारक्षम अशा मनावर झालेला संस्कारसमुच्चय होय. संस्कार म्हणजे मनावर होणारा ठसा किंवा आघात. माणसाच्या मनावर भौतिक आणि भौगोलिक परिस्थितीमुळें, शिक्षणामुळें, धार्मिक आचारामुळें आणि परंपरेमुळें अनेक संस्कार होतात, त्या सर्व संस्कार समुच्चयाला संस्कृति असें म्हणतां येतें. Culture म्हणजे संस्कृति हा शब्द मनाच्या सुसंस्कृतपणा-पासून मानसशास्त्र, अध्यात्म, वेदांत, आत्मसाक्षात्कार इतक्यांचा बोधक आहे, आणि Civilization म्हणजे भौतिक सुधारणा, कीं जिला अंतच नाहीं.

---

* **टीप**:—फक्त धर्मशास्त्रांत धर्म हा शब्द आचार, व्यवहार, प्रायश्चित्त आणि तत्त्वज्ञान एवढ्याच विषयांचा घेतला आहे.

संस्कृति शब्दाची स्पष्ट कल्पना यावी म्हणून कांहीं उदाहरणें देतों. एक मनुष्य हिरवें कच्चें खातो, तर दुसरा तें शिजवून म्हणजे त्यावर संस्कार करून खातो. एक सुताचें वस्त्र बनवतो तर दुसरा वल्कलें नेसतो. एकाला अशुद्ध ग्राम्य भाषा बोलण्याला आनंद वाटतो, तर दुसरा शुद्ध, स्वच्छ व संभावित भाषा बोलतो, एकजण शरीर, वस्त्रें, घर, हीं सर्व ओंगळ ठेवतो, तर दुसरा अत्यंत स्वच्छतेनें वागतो. एकाच्या मनाचा विकास मुळींच झालेला नाहीं तर दुसरा सभ्यता, विनय, व शिष्टाचार, हीं लक्षांत घेऊन वागतो. एक स्वाभिमानानें व स्वश्रमानें जगतो, तर दुसरा ऐदीपणानें जगूं इच्छितो. एकाची दृष्टी परद्रव्य व परस्त्री यांकडे सतत असते, तर दुसऱ्याला त्यांचा तिटकारा असतो. एकाला चित्रकला, गायन, नाट्य, वगैरे विषयांची आवड तर दुसरा यांविषयीं अत्यंत अरसिक असतो. याचें कारण त्या दोघांच्या मनावरील संस्कारांतील अंतर हेंच होय.

(१८) **विद्वानांच्या व्याख्याः**—विद्वानांनीं केलेल्या पुढील व्याख्यावरून संस्कृतीची कल्पना येईल:—

(१) अंतःसृष्टि आणि बाह्यसृष्टि यांतील ज्या ज्या गोष्टींवर मानवानें आपल्या मानव्याची संस्कार मुद्रा ठोकली आहे, त्या त्या सर्व गोष्टींचा कलाप म्हणजे त्याची संस्कृति. (संस्कृति—संगम)

(२) संस्कृति म्हणजे अध्यात्मिक व अधिभौतिक शक्तींना सामाजिक जीवनास उपयुक्त बनविण्याची कला. (हिंदुधर्मसमीक्षा)

(३) संस्कृति म्हणजे एखाद्या समाजाच्या परंपरागत वैशिष्ट्यपूर्ण विचार आणि आचार यांच्या पद्धति. (प्रो. दि. य. देशपांडे, एम्.ए.)

(४) सस्कृति म्हणजे त्या त्या काळांतील आचारविचारांची उन्नतावस्था. (प्रो. न. र. फाटक.)

(५) मनुष्याच्या ज्ञानाचें, बुद्धीचें, कल्पनेचें, सद्गुणाचें, परिणत फळ म्हणजे संस्कृति होय.

(६) माणुसकी व बुद्धीचा विकास म्हणजे संस्कृति.

(७) यत्नपूर्वक केलेली प्रगति म्हणजे संस्कृति.

(८) मानवी जीवनाच्या प्रत्येक अंगांत मनाचा जो सुसंस्कृतपणा व्यक्त होतो, व त्यामुळें समाजाची धारणा, प्रभव व अभ्युदय

**होतो; मनुष्यांत दया, प्रेम, वात्सल्य, बंधुत्व इत्यादि भावनांचा विकास होऊन ज्यामुळें माणुसकीची वाढ होते ती संस्कृति होय !**

**(१९) मनाची ठेवणः**— संस्कृतीच्या वरील व्याख्यांवरून तिचें व्यापकत्व वाचकांच्या ध्यानीं येईल. कित्येकांचें मतें संस्कृति ही प्राधान्यें करून त्या त्या समाजाच्या मानसिक सामर्थ्याची द्योतक असते. संस्कृतींत बाह्य सुखसोयींचा अंतर्भाव होईल, पण तें संस्कृतीचें प्रधान अंग नव्हे. सुखसोयीच्या साधनांच्या वाढीबरोबर मानसिक गुणांचा विकास झाला तरच त्याला संस्कृतीची वाढ झाली असें म्हणतां येईल. या दृष्टीनें अगदीं सोप्या भाषेंत संस्कृतीची व्याख्या सांगावयाची झाल्यास समाजाच्या **मनाची ठेवण** म्हणजे संस्कृति असें म्हणतां येईल. समाजांतील मनुष्याच्या मनाची ठेवण ही संस्कारप्रधान आणि संस्काराधीनच असते. ती ठेवण सर्वांच्या मनाची सारखी असते असें नाहीं. मनुष्याचें मन हें सुख, आहार, निद्रा, भय, मैथुन या क्षेत्रांत सर्वत्र सारखें असलें तरी त्या मनाच्या ठेवणीमध्यें शिक्षण, आचार, परंपरा, परिस्थिति यामुळें अंतर पडतेंच. कोंकणांतील दरिद्री माणसाचें मन, काटकसर व कंजुषपणा यांनीं युक्त असतें तर देशावरील माणसाचें मन त्यांपेक्षां स्वाभाविक उदार असतें. एका मार्मिक ग्रंथकारानें जगांतील निरनिराळया माणसांच्या ठेवणीचें चित्र रेखाटलें आहे. त्यांतील एक दोन उदाहरणें येथें येऊन स्पष्टीकरण करतों.

**(२०) दोन प्रसिद्ध उदाहरणें**:— " One Englishman is a fool, two Englishmen start a club, and three Englishmen establish British Empire. तसेंच One Scotchman is a good householder, two Scotchmen start a bank, and three Scotchmen manage British Empire ". या वाक्यसमूहांत किती मार्मिकपणानें मनाचें चित्रण केलें ! एकटा इंग्रज हा गाढव आहे, तो कांहीं करूं शकत नाहीं. पण दोन इंग्रज जमले कीं त्यांच्या संघटनेला प्रारंभ होतो, तो इतका कीं पुढें तिसऱ्या इंग्रजाच्या सहाय्यानें तिचें पर्यवसान इंग्रजी राज्याच्या प्रस्थापनेंत होतें ! एकटा स्कॉचमन म्हणजे ठाकठिकीनें संसार करणारा गृहस्थ होय. दोन स्कॉचमन जमले म्हणजे त्यांच्या आर्थिक योजना चालू राहातात आणि बँकेपासून सुरवात होते. तीन स्कॉचमन

मिळालें कीं ते आपली संघटना वाढवून ब्रिटिश साम्राज्याची आर्थिकदृष्ट्या सुस्थिति संभाळतात. महाराष्ट्रिय आणि गुजराथी यांच्या मनांच्या ठेवणींतहि असेंच अंतर नाहीं काय? एकाचा ओढा स्वाभाविक विद्या व राजकारण यांकडे तर दुसऱ्याचा ओढा स्वाभाविक व्यापार, मंडळ्या, कंपन्या काढून पैसा मिळविण्याकडे!

येथवर केलेल्या विवेचनावरून संस्कृति म्हणजे समाजाच्या मनाची ठेवण; संस्कृति म्हणजे मनावर माणसांनें मिळविलेला विजय आणि निसर्गावर मिळविलेला विजय, संस्कृति म्हणजे अध्यात्मिक शांति आणि आधिभौतिक प्रगति; संस्कृति म्हणजे संस्कार समुच्चय अर्थात् मनाचा सुसंस्कृतपणा होय. संस्कृति शब्दाची एवढी फोड झाल्यानंतर संस्कृतीवर येणाऱ्या कांहीं आक्षेपांचा विचार करूं.

**(२१) परिस्थिति व संस्कृतिः**—कांहीं लोक परिस्थितिवाद आणि अर्थवाद लोकांपुढें मांडून संस्कृतीची हेटाळणी करतात. त्यांचें म्हणणें मनुष्य हा परिस्थितीचा गुलाम आहे. मनुष्यावर जे कांहीं बरे वाईट संस्कार होतात, ते सर्व भौतिक व भौगोलिक परिस्थितीचें फळ होय. पण हें म्हणणें मनुष्याच्या इच्छास्वातंत्र्याच्या विरुद्ध आहे. परिस्थिति जिकडे नेईल तिकडे वाहात जाणारा एक ओंडका म्हणजे मनुष्यप्राणी नव्हे. परिस्थितीशीं झगडून इष्ट त्या गोष्टी मानवानें प्राप्त करून घेतल्या आहेत, अशी साक्ष इतिहास देतो. एकाच परिस्थितींत निरनिराळे समाज असतात, पण त्या सर्वांचे संस्कार सारखे नसतात. हिंदुस्थानांत एकाच भौतिक व भौगोलिक परिस्थितींमध्यें हिंदु, मुसलमान, ख्रिश्चन, पार्शी, इत्यादि समाज आजहि आहेत. पण हिंदुसमाजांतून देशाभिमानी व राष्ट्राकरितां सर्वस्वाचा होम करणारे जेवढे निघाले त्याच्या एक शतांशानें तरी अन्य समाजांतून निघाले काय? हिमालयाच्या पायथ्याशीं आणि गंगेच्या कांठीं हिंदुस्थानांतील निरनिराळ्या जमाति आहेत. पण सर्वांच्या मनाची ठेवण सारखी आहे काय? हिंदुमनावर विश्वबंधुत्व, राष्ट्रियत्व, यांचे संस्कार आहेत. त्यामुळें ते उदार, संग्राहक व सहिष्णु आहेत; पण अन्य जमातींमध्यें त्यांचा अभाव असल्यामुळें ते समाज जात्यभिमानी, संकुचित वृत्तीचे, असहिष्णु आणि स्वार्थी आहेत, असें दिसून येतें. तात्पर्य परिस्थितिवाद हा अन्वय

व्यतिरेकानें मुळींच सिद्ध होत नाहीं. परिस्थिति हें एक निमित्त कारण आहे, येवढें मात्र खरें. शास्त्रीय परिभाषेंत बोलावयाचें म्हणजे मनुष्याचे मूळ संस्कार आणि शिक्षणामुळें उत्पन्न केलेले संस्कार हेच त्याच्या कर्तृत्वाचें उपादान कारण होय. बाह्य जड परिस्थितीप्रमाणें (नेचर) नर्चर्‌ला म्हणजे शिक्षणाला आणि प्रयत्नाला मान दिला म्हणजे भौतिक परिस्थितिवाद लंगडा पडतो.

(२२) **अर्थवादी व संस्कृतिः—** अर्थवादाचेंहि तसेंच आहे. माणसाचें शील, चारित्र्य, व सौजन्य हें सर्व आर्थिक परिस्थितीवरच अवलंबून असतें. संस्कृति वगैरे कांहीं नाहीं असें अर्थवादी म्हणतात, पण तेंहि अन्वय-व्यतिरेकानें सिद्ध होऊं शकत नाहीं.

' बुभुक्षितः किं न करोति पापं ', म्हणजे बुभुक्षित मनुष्य पोटाकरितां काय वाटेल तें करितो. खायला नाहीं मिळालें, पैसा नसला म्हणजे चोरें-ण्याची बुद्धि होते हें खरें आहे. पण श्रीमंतांच्या खादाड मुलांना घरांत यथास्थित चार वेळां खायला मिळत असतांना हॉटेलमध्यें जाऊन वाटेल तें खाऊन बापाच्या नांवानें बिलें पाठविण्याची संवय असते, यास काय म्हणावें ? अन्नाला महाग असणाऱ्यानें किंवा ज्याला घरांत कोरड्यास भाकरी या दोन पदार्थांशिवाय कांहींच खावयास मिळत नाहीं, अशा भुकेबंगालानें हॉटेलांत चोरून खाल्लें किंवा राजरोस खाल्लें तरी तें क्षम्य होईल, पण वस्तुस्थिति याच्या उलट आहे.

पैसा नाहीं म्हणून मनुष्य पाप करतो हें जसें खरें आहे, तसेंच पैशाच्या अतिलोभामुळें मनुष्य फार पातकी होतो असा अनुभव आहे. पैसा नाहीं म्हणून सगळें पाप उत्पन्न होतें हें खरें नाहीं. सुसंस्कार व सुशिक्षण असलें म्हणजे द्रव्याचा योग्य उपयोग होतो. अगदीं दरिद्री मनुष्यसुद्धां सुसंस्कारामुळें आपलें शीलचारित्र्य चांगलें राखूं शकतो. पण सुसंस्काराच्या अभावीं संपन्न मनुष्यही त्वरित शीलभ्रष्ट होतो. न्याय मार्गानें वागणाऱ्याला त्याची बुद्धि व कर्तृत्व याप्रमाणेंच पैसा मिळतो. परंतु पुष्कळ लोकांना घडगंज पैसा मिळवावयाला कांहींतरी दारुण कर्म म्हणजे सांठेबाजी, नफे-बाजी, आणि काळाबाजार यांचाच अवलंब करावा लागतो !

**नाच्छित्वा परमर्माणि नाकृत्वा कर्म दारुणम् ।**
**नाहत्वा मत्स्यघातीव प्राप्नोति महतीं श्रियम् ॥** महाभारत ॥

आपल्याच माणसांचे, शेजाऱ्या पाजाऱ्यांचे गळे कापण्यांचे धंदे काळ्या बाजाऱ्यांनीं केले नाहींत काय? धान्य, कापड, राकेल, मोड, व साखर, अशा या जीवनोपयुक्त वस्तूंच्या पायीं लोकांना अडवून, छळून, छिनून, जे या युद्धामध्यें लक्षाधीश बनले व कोट्याधीश झाले ते सर्व काय बुभुक्षित होते? त्यांच्या ठिकाणीं सुसंस्कार नव्हते, संस्कृति नव्हती म्हणूनच त्यांनीं तीस चाळीस लक्ष लोकांना उपाशी मारून कोट्यवधी लोकांना अन्नान्न करावयाला लावून आपलें उखळ पांढरें केलें. दुसऱ्या लोकांना छळणें, मारणें, त्रास देणें, या दारुण कर्मांशिवाय मनुष्य संपन्न होत नाहीं, हें जें वरील श्लोकाचें सार आहे, तें अन्यथा नाहीं.

पैसा म्हणजे संस्कृति नव्हे तर पैसा हें एक संस्कृतीचें साधन आहे. शिक्षण म्हणजे संस्कृति नव्हे, तर तेंही एक संस्कृतीचें साधन आहे. स्वच्छतेचे संस्कार जर माणसांत नसतील तर पैसा असूनहि उपयोग नाहीं. स्वच्छतेचे संस्कार असलेला दरिद्री मनुष्य सुद्धां कष्ट करून स्वच्छता ठेवील. पुष्कळ श्रीमंत लोक घामट, अव्यवस्थित, आणि घाणेरडे असतात तर पुष्कळ दरिद्री लोक स्वच्छ, नीटनेटके व टापटिपीचे असतात. कृष्णा, गोदा, भीमा कांठचे लोक स्वच्छतेच्या दृष्टीनें सर्व सारखे नाहींत. त्याचें कारण संस्कारांचें अस्तित्व आणि त्यांचा अभाव हें होय. संस्कृति म्हणजे संस्कार समुच्चय. हे संस्कार समाजामध्यें मुरत मुरत यावे लागतात. त्यालाच अनुवंशिक संस्कार म्हणतात. स्वच्छता, परद्रव्य, परस्त्री, परनिंदा, यांविषयीं शुचिर्भूत असणें, दुसऱ्याशीं नीट बोलणें, व्यवस्थित वागणें, शोध करणें, विषयाचें नीट ग्रहण करणें असे हे सर्व संस्कार आहेत. त्याला फार मोल दिलेलें आहे म्हणून आर्थिक, भौतिक, आणि भौगोलिक परिस्थिति कशीहि असली तरी तिला पुरून उरण्याजोगी संस्कृति म्हणून कांहीं आहे, असें मानावें लागतेंच.

**(२३) हिंदु संस्कृतीचें वैशिष्ट्यः—** हिंदु संस्कृतीचें वैशिष्ट्य इतिहासाचार्य राजवाड्यांनीं सूत्र चतुष्टयामध्यें सांगितलें आहेः—

**(१) अखिल मानववंशाशीं समबुद्धीनें वागणें.**

**(२) स्वतः उच्च स्थितीला पोंचून निकृष्टांना उत्कृष्ट स्थितीस पोंचण्याचा मार्ग दाखविणें.**

**(३) शेजारास आलेल्या लोकांचा, त्यांचा धर्म, पंथ, वर्ण, वंश अशा निमित्तानें द्रोह न करणें.**

**(४) आश्रयास आलेल्यांना शेजारधर्माप्रमाणें राहावयास सांगून हळु हळु आपली संस्कृति त्यांचेमध्यें मुरविणें आणि त्यांना सुसंस्कृत करून आपल्यामध्यें समाविष्ट करणें.**

या तत्त्व चतुष्टयामुळें हिंदु संस्कृति परिस्थितिसापेक्ष अवश्य ते बदल करून चांगलें असेल तें पचवून जिवंत राहिलेली आहे. आर्यांनीं अनार्यांना सुसंस्कृत करून प्राचीन काळीं चवथ्या वर्णांत घातले. तसेंच नाग, राक्षस, गरुड, किन्नर, अशा विविध समाजांना संस्कृति देऊन आत्मसात केले. मध्यकालांत ग्रीक, हूण, शक, मगध, यवन इत्यादींना पचवून चातुर्वर्ण्याचे घटक बनविले. आपल्या विशाल उदरांत उदारतेनें आणि सहिष्णुतेनें अन्यांचा संग्रह करावयाचा असा हिंदु संस्कृतीचा दंडक आहे. वर्णसंस्था व जातिसंस्था या विविध गटांना पचविण्याकारितांच उत्पन्न केल्या. भिन्न भिन्न मनुष्यसमूहाचें एकीकरण करणारी संस्था म्हणजे चातुर्वर्ण्य संस्था होय. अनेक संस्कृतींना एका सूत्रांत गोवून बंधुभावनेनें एकत्र रहावयास शिकविणें हें हिंदु संस्कृतीचें धोरण आहे. शेजारास असलेल्या कातकरी, गोंड, भिल्ल इत्यादि वन्य मानवसमाजालाहि हिंदु संस्कृतीनें आपलें वांशिक जीवन स्वतंत्रतेनें राखण्यास मोकळीक दिली आहे.

**(२४) तर्कदुष्ट कल्पनाः**—हिंदुस्थानामध्यें हिंदुसमाजाशेजारीं जे अहिंदु समाज आहेत, त्याचें कारण हिंदूंचें औदार्य आणि सहिष्णुत्व हेंच होय. अन्य समाजांशीं अनुदारतेनें वागण्याचें धोरण नाहीं, म्हणूनच या संस्कृतीनें अनेक आस्तिक व नास्तिक पंथसुद्धां पचवलें. पारमार्थिक मत व उपासना भिन्न असलीं तरी एकाच समाजाचे घटक म्हणून हिंदुसमाजांमध्यें राहातां येतें. मतांतराबरोबर समाजांतर केलें पाहिजे, ही तर्कदुष्ट कल्पना व्यक्तिस्वातंत्र्याविरुद्ध आहे. हिंदुसंस्कृतीचें वैशिष्ट्य उदारता, संग्राहकता आणि सहिष्णुता हें आहे. या मुळेंच तिचा प्रभाव जगावर

पडला. ज्या वेळीं या त्रिगुणांना संकुचितपणा आला, त्यावेळीं हिंदुसंस्कृतीला पराभूत व्हावें लागलें. या प्रदीपामध्यें वेदकालापासून तों आतांपर्यंतच्या आपल्या संस्कृतीचें समालोचन करावयाचें आहे, म्हणून आतां वैदिक संस्कृतीचा विचार करूं.



## प्रकरण दुसरें

# वैदिकसंस्कृति

या प्रकरणांत वेदकालीन संस्कृतीची थोडी कल्पना द्यावयाची आहे. थोडी म्हणण्याचें कारण वैदिक वाङ्मयमहोदधि इतका खोल आणि गंभीर आहे कीं त्यांतील रत्नांची नुसती माहितीहि देणें अशक्य आहे. देव, असुर, पृथ्वी, स्वर्ग, पाप, पुण्य, पशुपक्षी, मनुष्यें, ध्वनि, धातु, उदक, उष्णता, लता, वेली, वनस्पति, शस्त्रें, अस्त्रें गृह, कुल, वंश, दान, भाषा, खेळ, वाद्यें, व्यापार इत्यादि शेंकडो विषय वेदांमध्यें आलेले आहेत. त्या विश्वकोशावरून संस्कृतीचा आढावा घेणें दुर्घट असल्यामुळें वेदकालीन संस्कृतीची थोडी ओळखच या प्रकरणांत करून द्यावयाची आहे.

(२५) **वेदकालः**—वेदांचा काल हा कोणी खिस्तपूर्व दहा हजार वर्षें तर कोणी तो खिस्तपूर्व तीन हजार वर्षांपर्यंत आणतात. सनातनी लोक तर वेद हे अपौरुषेय म्हणजे माणसांनीं मुळीं केलेलेच नाहींत असें समजतात. या वादावरून वेदांचें श्रेष्ठत्वच सिद्ध होतें.

(२६) **वेदमहतिः**—आर्यपरंपरेंत वेद हे अत्यंत पवित्र व उच्च असे धर्मग्रंथ मानिलेले आहेत. जगांतील हें प्राचीन वाङ्मय भारतीयांनीं आजपर्यंत अगदीं प्राचीन काळीं होतें, तसेंच संरक्षित करून ठेवलेलें आहे;

ही गोष्ट जशी अभिमानाची तशीच भाग्याचीहि आहे. जगामध्यें सप्ताश्चर्यें ( Seven wonders ) आहेत असें म्हणतात; परंतु त्या सर्वांपेक्षां कित्येक हजार वर्षांपूर्वींचें वाङ्मय, जशाचें तसें ठेवणें व प्राचीन मंत्रद्रष्टे ऋषी ज्या पद्धतीनें, ज्या ठसक्यानें व ज्या अभिनिवेशानें ते म्हणत, त्याच तऱ्हेनें तें आज म्हणणें हें जगांतील महदाश्चर्य नव्हे काय ? जगांतील अनेक विद्वान या वैदिक वाङ्मयाकडे आश्चर्यचकित दृष्टीनें पाहातात, कारण सर्व संशोधकांचे मतें प्राचीन मानवसमाजाच्या संस्कृतीचें स्वरूप वेदांशिवाय अन्यत्र आढळत नाहीं. वैदिक आर्यांच्या विचारांची, भावनांची व कल्पनांची परिस्फुटता वेदांमध्येंच दृग्गोचर होते.

**(२७) वेदांचा उपयोगः**—वैदिक ज्ञानाचा आजच्या कालांत काय उपयोग ? या प्रश्नाचें उत्तर हेंच कीं अत्यंत प्राचीन वाङ्मय या दृष्टीनें संशोधक अभ्यासकाला याचा फार उपयोग आहे. सरकारनें पुराणवस्तु संशोधन व त्याचें रक्षण याकरितां एक खातें काढलेलें आहे, त्याकरितां खूप पैसा खर्च होतो. पुराणवस्तुसंग्रहाचा जर संशोधकांना उपयोग आहे, तर वेदाचा उपयोग कां होऊं नये ? श्रीछत्रपती शिवाजी महाराजांचे वेळचा जुना अस्सल कागद, श्रीहर्ष, अशोक, पुलकेशी यांच्या वेळचे ताम्रपट, नाणीं आणि जुने कागद सांपडले तर ते त्या खात्याला फार मोलाचे वाटतात, वृत्तपत्रांतून त्याचा मोठा बोलबाला होतो व त्यावरून अनेक अनुमानेंहि काढिलीं जातात. हजार दोन हजार वर्षांपूर्वींचे ऐतिहासिक उलाढालीवर प्रकाश पडणारे कागद जसे महत्त्वाचे आहेत, त्याहिपेक्षां दहा हजार वर्षांपूर्वींचे पठण—पाठण—परंपरेनें जतन करून ठेवलेले वैदिक वाङ्मयरूपी कागद फारच महत्त्वाचे आहेत. श्रीशिवाजी महाराज व त्यांचे सहकारी यांच्यामधील संवादबोधक पत्रें जशीं महत्त्वाचीं आहेत तशींच वसिष्ठविश्वामित्र संवाद, दाशराज्ञ युद्ध, अत्रिऋषींनीं केलेली राज्यक्रांति यांवर प्रकाश पाडणारीं वेद-राशींतील मंत्ररूपी पत्रें फार महत्त्वाचीं आहेत.

**(२८) गणेशपूजनः**—वैदिक परंपरेचे संस्कार हिंदुसमाजाच्या जीवनांत तर फार खोलपर्यंत गेलेले आहेत. उदाहरणार्थ, श्रीगणपतीचें पूजनच घेऊं. हिंदुसमाजांत सर्वत्र श्रीगणेशपूजा व गणपति उत्सव चालू आहे. गणांतील श्रेष्ठ जो गणपति, विद्वानांत विद्वान जो ब्रह्मणस्पति त्याची पूजा व त्याचें

स्मरण हिंदुसमाजानें गेलीं दहा हजार वर्षें सातत्यानें ठेविलें आहे, ही गोष्ट अभिमानास्पद नाहीं काय ? हिंदुसमाज ज्या गणेश देवतेला पूज्य समजतो, तिचा उल्लेख वेदांमध्यें पुढीलप्रमाणें आहेः—

**गणानां त्वा गणपतिं हवामहे कविं कवीनां उपमश्रवस्तमम् ।**
**ज्येष्ठराजं ब्रह्मणां ब्रह्मणस्पते, आ नः शृण्वन् ऊतिभिः सीद सादनम् ॥** –ऋग्वेद ( २।२३।१ )

**निषुसीद गणपते गणेषु त्वामाहुर्विप्रतमं कवीनाम् ।**
**न ऋते त्वत्क्रियते किंचनारे महामर्कं मघवन् चित्रमर्च ॥**

**भावार्थ**–हे गणांच्या गणपते, विद्वानांत विद्वान अशा ज्येष्ठराज ब्रह्मणस्पते, आम्ही तुझें स्तुतिपूर्वक आवाहन करतों. तूं ही आमची स्तुति-सूक्तें ऐक. हें गणांच्या गणपते, तुला विप्रांमध्यें श्रेष्ठ समजतात. तुझ्याशिवाय कोणत्याच कार्याला प्रेरणा होत नाहीं. इंद्रानेंसुद्धां तुझी पूजा केली आहे. यास्तव आम्हीहि तुझें पूजन करतों.

**(२९) वेद एकचः**–अलीकडे वेद चार आहेत, असा चुकीचा समज झालेला आहे. पूर्वीं एकच वेद, एकच देव, एकच वर्ण आणि एकच अग्नि होता.

**एक एव पुरा वेदः प्रणवः सर्व वाङ्मयः ।**
**देवो नारायणो नान्यः एकोऽग्निर्वर्ण एव च ॥** श्रीभागवत ९-१५॥

वेदव्यासांनीं अध्ययन सुलभ व्हावें म्हणून एका वेदाचे चार विभाग केले. म्हणूनच त्यांना व्यास ही पदवी प्राप्त झाली.

**विव्यास वेदान् यस्मात्स तस्माद्व्यास इति स्मृतः ।** भारत १–६४–१३०

वेदाच्या चार भागांना ऋक्, यजु, साम, अथर्व अशीं नांवें ठेवलीं आणि त्यांचें अध्ययन करणाऱ्या ब्राह्मणांना ऋग्वेदी, यजुर्वेदी, सामवेदी आणि अथर्ववेदी असें म्हणूं लागले. एकापेक्षां अधिक वेदभागांचें अध्ययन करणाऱ्या ब्राह्मणांना द्विवेदी, त्रिवेदी, चतुर्वेदी असें म्हणूं लागले. त्यावरून पडलेलीं आडनांवें आज प्रचारांत आहेत.

**(३०) वेदशाखांचा विस्तारः**–एका वेदाचे जसे चार भाग केले, तद्वतच व्यासांनीं वेदांच्या शाखाहि केल्या. या वेदशाखांवरून वेदकालीन

आर्य हे 'कृण्वन्तो विश्वमार्यम्' (ऋग्वेद ९–६३–५) या धोरणानें सर्व जगभर संस्कृतीचा प्रसार करीत होते असें सिद्ध होतें. ऋग्वेदाच्या पांच, शुक्ल यजुर्वेदांतर्गत काण्वांच्या पंधरा, वाजमाध्यंदिनांच्या सतरा, कृष्ण यजुर्वेदाच्या आठ अशा शाखा आहेत. जाबाल शाखेंत सव्वीस, गालव शाखेमध्यें चोवीस, चरक शाखेमध्यें बारा व मैत्रायणी शाखेमध्यें सात पोटभेद आहेत. सामवेदाच्या सहा शाखा असून त्यांतील राणायनीय शाखेंत आठ पोटभेद आहेत. अथर्ववेदाच्या नऊ शाखा आहेत. महार्णवादि ग्रंथांत या शाखांचें परिगणन केलेलें आहे. डॉ. रघुवीर यांनीं 'Vedic Studies' या मासिकाच्या १९३५ च्या अंकांत हा शाखाविस्तार दिला आहे. वैदिक आर्यांना आर्यावर्त, भरतखंड हा प्रदेश फार लहान वाटत होता, म्हणून ते तडक उत्तर ध्रुवापर्यंत संस्कृतिप्रसारार्थ गेले होते. कुशद्वीप, * क्रौंचद्वीप, शाकद्वीप आणि श्वेतद्वीपापर्यंत वैदिक संस्कृति पोंचलेली होती. मनूनें ब्राह्मणांच्या अदर्शनामुळें पुष्कळ क्षत्रिय जाति म्लेंच्छ व वृषल बनल्या, ( वृषलत्वं गता लोके ब्राह्मणादर्शनेन च । अ. १०।४३ ) असें वस्तुस्थितिनिदर्शक म्हटलें आहे. प्राचीनकाळीं आर्यांची संस्कृति व सनातन वैदिक धर्म सर्व जगभर होता, पण पुढें जसजसे त्या धर्माचे मिशनरी जे ब्राह्मण ते तो देश सोडून भरतखंडांत आले, तसतसे तेथील लोक म्लेंच्छ, वृषल म्हणजे अन्यधर्मीय बनले, वेदकालीन आर्य आक्रमणशील होते, म्हणूनच त्यांनीं सर्व जगभर वेद नेले व संस्कृतीचा प्रसारहि केला. आज महाराष्ट्रांत वैदिक मंडळीमध्यें शाखाभेदजन्य जीं मंत्रजागरासंबंधीं भांडणें होत आहेत, तीं पाहिलीं म्हणजे वैदिक आर्यांच्या ध्येयाचें हे वैदिक लोकच कसें विडंबन करीत आहेत, याचें आश्चर्य वाटतें.

(३१) **वेदपरिचयः**—श्रुति, वेद, आम्नाय, मंत्र व निगम अशीं पांच नांवें वेदांना आहेत. ऐकतों व ऐकत आलों यावरून श्रुति, विद्—जाणणें, त्यावरून वेद, अभ्यसनीय विषय म्हणून आम्नाय, मननाचा विषय म्हणून मंत्र, हेतुपूर्वक तत्त्वप्रतिपादन म्हणून निगम; अशीं हीं सार्थ नांवें पडलीं आहेत. ऋग्वेदामध्यें देवताविषयक फारच चांगलीं सूक्तें आहेत. ब्रह्मणस्पति, अग्नि,

---

* या द्वीपांबद्दल परिच्छेद १३ पहा.

बृहस्पति इत्यादि देवतांचीं वर्णनें कर्तव्याला स्फूर्ति देणारीं आहेत. इंद्र, रुद्र, वरुण, देवतांचीं सूक्तें, मरुत् देवतांचीं वर्णनें हीं सैनिकांना शौर्य व पराक्रम करण्यास प्रोत्साहक अशीं आहेत. यास्तव ऋग्वेदास सद्विचार-वेद असें म्हणतां येईल. यजुर्वेदामध्यें अश्वमेध, पुत्रकामेष्टि, राजसूय, विश्व-जित् ( समाजाकरितां सर्वस्व अर्पण करण्याचा यज्ञ ) असे अनेक यज्ञ सांगितले आहेत. त्यांवरून यजुर्वेदास सत्कर्मवेद असें म्हणणें योग्य होईल. सामवेद हा स्वराच्या आलापांनीं चित्ताची एकाग्रता आणि गायनामुळें भक्तिरसाचा उद्रेक करून ईश्वरभक्तीकरितां आहे; म्हणून सामवेदाला सदु-पासना वेद हेंच नांव उचित होय. ज्येष्ठ ब्रह्माचा साक्षात्कार करून देणारा अथर्ववेद असल्यामुळें त्याला ब्रह्मवेद हेंच नांव योग्य आहे. अथर्ववेदामध्यें ब्रह्म, स्कंभ, आत्म, प्राण, ब्रह्मचर्य इत्यादि अध्यात्मसंबंधाचीं सूक्तें पहाण्याजोगीं आहेत.

**(३२) मंत्र, ब्राह्मण व उपनिषदें**:– ' मंत्रब्राह्मणयोर्वेदनामधेयं ' वेदाचे मुख्य विभाग मंत्र व ब्राह्मण असे दोन आहेत. ऋषि हे मंत्रद्रष्टे होते. त्यांना हे मंत्र जसे स्फुरले, तसे ते त्यांनीं उच्चारले. त्या सर्व मंत्रांचें एकत्रीकरण म्हणजे संहिता ( जुळणी ) होय. मंत्रांची जुडगी म्हणजे संहिता. चारहि वेदांचे संहिताग्रंथ स्वतंत्र आहेत. संहिताग्रंथ हा वेदाचा मुख्य भाग होय. ब्राह्मण शब्दाचा मूळ अर्थ यज्ञकर्मावरील एकाद्या याज्ञिकाचें विवेचन असा आहे. कोणच्या मंत्राचा कुठें विनियोग करावा, कोणता ग्रंथ कुठें म्हणावा, हें ब्राह्मण ग्रंथांत सांगितलें आहे. थोडक्यांत ब्राह्मण ग्रंथाला 'यज्ञशास्त्र ग्रंथ ' हें नांव देतां येईल. ऐतरेय, कौषीतकी, तैत्तिरीय, शतपथ, तांड्य, षड्विंश, जैमिनीय, गोपथ असे निरनिराळ्या वेदांचे ब्राह्मण ग्रंथ आहेत. संहिता व ब्राह्मण यांप्रमाणें वेदांचा आरण्यकें व उपनिषदें असा एक भाग आहे. आरण्यकें हीं ब्राह्मण ग्रंथांतीलच एक भाग होत. शेवटच्या आश्रमांत अरण्यांत जाऊन अध्ययन करण्याचीं धर्मवाक्यें व त्यांनाच जोडलेली जी तत्त्वज्ञानाची चर्चा तिलाच उपनिषदें म्हणतात. उपनिषदांना वेदान्त म्हणजे वेदाचा शेवटचा भाग किंवा वेदांचें अंतिम ध्येय असें दुसरें नांव आहे. उप+नि+सद्=म्हणजे कोणाच्या जवळ जाऊन बसणें असा याचा अर्थ आहे. या ग्रंथामध्यें तत्त्वचर्चा हीच प्रमुख आहे. ब्राह्मण, आरण्यक व उपनिषदें

हीं प्रत्येक वेदामध्यें आहेत. उ. ऋग्वेद–ऐतरेय ब्राह्मण, ऐ. आरण्यक व ऐ. उपनिषद्, कौषीतकी ब्राह्मण, कौ. आरण्यक, कौ. उपनिषद्; कृष्णयजुर्वेद–तैत्तिरीय ब्राह्मण, तै. आरण्यक व तै. उपनिषद्; शुक्लयजुर्वेद–शतपथ ब्राह्मण, बृहदारण्यक उपनिषद् इत्यादि.

(३३) षडंगेंः– शिक्षा, कल्प, व्याकरण, निरुक्त, छंद व ज्योतिष हीं सहा वेदांगें वेदार्थज्ञानाकरितां आवश्यक आहेत. शिक्षा म्हणजे स्पष्ट उच्चार करून व आघात देऊन संहिता म्हणणें. शब्द व त्यावरील आघात, शब्दावयव व त्यावरील आघात, स्वरमाधुर्य व शब्दसंधि असे शिक्षेचे सहा विभाग तैत्तिरीय उपनिषदांत सांगितले आहेत. प्रातिशाख्यांचाहि संबंध शिक्षेशींच येतो. प्रातिशाख्यांमध्यें पदपाठावरून संहितापाठ कसे तयार करावयाचे व म्हणावयाचे याचे नियम आहेत. एकेक शाखेचें एकेक पाठ पुस्तक,म्हणूनच प्रातिशाख्य असें नांव आहे. कल्प म्हणजे श्रौत, गृह्य, धर्म व शूल्ब सूत्रें होत. श्रौतसूत्रांमध्यें अग्निहोत्र व यज्ञयाग यांची माहिती आहे. गृह्यसूत्रांमध्यें गर्भाधानादि अंत्येष्टिपर्यंतचे संस्कार, पंचमहायज्ञ, श्राद्धादि विषय आहेत. धर्मसूत्रें हीं गृह्यसूत्रासारखींच असून त्यांत कर्म, विधि व चार वर्णांच्या आचारविचारांची माहिती आलेली आहे. शूल्बसूत्रांचा संबंध श्रौतसूत्रांशीं असून त्यांत वेदीची रचना, अग्निकुंडाची रचना व महत्त्वमापन हे विषय आलेले आहेत. व्याकरण या अंगाचा अर्थ तर स्पष्टच आहे. तथापि व्याकरणावरील जुनीं वेदांगांचीं पुस्तकें आज उपलब्ध नाहींत. पाणिनीचें प्राचीन व सर्वोत्कृष्ट असें व्याकरणशास्त्र आज उपलब्ध आहे, पण त्यांत केवळ वेदभाषेचाच विचार नाहीं. निरुक्त ग्रंथामध्यें वेदांतील कठीण शब्दांचें विवेचन व व्युत्पत्ति हीं दिलीं आहेत. निघण्टु हा ग्रंथहि या अंगांतच येतो. हा ग्रंथ म्हणजे वैदिक शब्दकोश होय. छंदःशास्त्र व ज्योतिषशास्त्र या वेदांगांतील कांहीं भागांचे एकेक ग्रंथ उपलब्ध आहेत. छंदःशास्त्रामध्यें वेदांतील वृत्तांची माहिती आहे. वेदांगज्योतिष हा ज्योतिःशास्त्रावरील लहान पद्यात्मक ग्रंथ आहे. त्यामध्यें चंद्र व सूर्य यांचीं स्थानें, सत्तावीस नक्षत्रांचीं स्थानें अमावास्या व पूर्णिमा या विषयांचें गणित दिलेलें आहे. श्रौतसूत्रें हीं अग्निहोत्र व यज्ञयाग यांकरितां आहेत. तीन किंवा अधिक अग्नीशीं संबद्ध अग्निहोत्र असतें व त्यापेक्षां अधिक अग्निकुंडांचा

संबंध यज्ञयागांत येतो. स्मार्तकर्म म्हणजे एका अग्नीवरील कर्म, नित्याचें होमहवन, पंचमहायज्ञ व षोडष संस्कार हें होय! गृह्यकर्में व स्मार्तकर्में हीं एकच होत.

आतांपर्यंत वेदाचें महत्त्व, शाखाविस्तार, षडंगें इत्यादींची माहिती दिली. आतां वेदाच्या अंतरंगांत शिरून आजच्या आपल्या जीवनालाहि उपयुक्त अशा विषयासंबंधीं वेदकालीन आर्यांचे विचार पहावयाचे आहेत. वेदांतील मुख्य संस्था म्हणजे यज्ञ ही होय. त्या संस्थेचें राजकीय, सामाजिक व धार्मिक दृष्ट्या महत्त्व सांगून वेदकालीन राज्यपद्धतीची कल्पना देणार आहें. त्यानंतर धैर्य, निर्भयता, पुरुषार्थ, दीर्घायुष्य, देशभक्ति, ब्रह्मचर्य, समाजसंघटना यांसंबंधाचे उतारे देऊन वेदकालीन लोकस्थिति कशी होती याचें विवेचन करूं. कोणत्याहि समाजाचा सुसंस्कृतपणा मापण्याचें साधन म्हणजे स्त्रियांचा दर्जा, स्त्रियांचें शिक्षण आणि स्त्रियांसंबंधींचे विचार हे होत. म्हणून त्याचीहि माहिती देतों. शेवटीं या सर्वाला ईश्वरी कृपेचें अधिष्ठान कसें हवें असतें, यासंबंधींचे उतारे देऊन हें प्रकरण पुरें करतों.

(२४) **यज्ञसंस्था व राजकारणः**—यज्ञवेदी हा आर्यांच्या कार्यक्षेत्राचा केंद्र होता. वैदिक आर्यांची मुख्य संस्था म्हटली म्हणजे यज्ञ ही होय. या यज्ञसंस्थेवरून आर्यांच्या आक्रमणशीलतेची चांगली कल्पना येते. "इयं वेदिः भुवनस्य नाभिः", म्हणजे यज्ञवेदि हा वसाहत करणाऱ्या आर्यांचा गुरुत्वमध्य होता. जेथें आर्य यज्ञ करीत, ती भूमि आर्यांच्या स्वाधीन राहिली पाहिजे, असा त्यांचा दंडक होता. म्हणूनच राक्षस हे ऋषींना यज्ञ करण्यास प्रतिबंध करीत. अधिक भूभाग आक्रमण करण्याच्या इच्छेनें असुरराक्षसांच्या प्रदेशांत मुद्दाम जाऊन ऋषी यज्ञ करीत. यज्ञांत विघ्न होऊं लागलें म्हणजे आर्य राजे त्यांच्या साह्यास धांवून जात, व सैन्याच्या जोरावर यज्ञ समाप्त करीत. त्यानंतर ती भूमि कायमची आर्य राजांची होई. हें विश्वामित्राच्या यज्ञावरून सिद्ध होतें. रावणानें नाशकापर्यंतचा भूभाग आक्रमिला होता व सैन्यहि ठेविलें होतें. विश्वामित्र व भारद्वाजादि ऋषींनीं आर्यावर्तांत आपले आश्रम न थाटतां दक्षिणापथांत ते थाटले. विश्वामित्राचा एक यज्ञ झाल्याबरोबर रामाच्या मदतीनें पंचवटींतील राक्षसांच्या सैन्यांचा धुव्वा उडाला. यावरून यज्ञसंस्थेंत राजकीय भाग होता, हें उघड होतें.

शत्रूच्या प्रदेशांत जावें, तेथें यज्ञ करण्यास प्रारंभ करावा, मेखलाधारी तरुणांस उपनयन करून घेऊन बरोबर बाळगावें, राक्षसांनीं हल्ला केला म्हणजे त्यांच्या नांवानें गवगवा करून आर्यक्षत्रियांस त्यांच्या विरुद्ध उठवावें व निर्विघ्नपणानें यथासांग यज्ञ होईल, इतकी शांततेची परिस्थिति होईपर्यंत म्हणजे तो सर्व प्रदेश आर्य राजांच्या ताब्यांत पूर्णपणानें येईपर्यंत व तेथील शत्रु पूर्णपणानें हाकालले जाईपर्यंत आर्यक्षत्रियांकडून युद्ध करवावें; अशा प्रकारचा आक्रमणशील आर्यांचा यज्ञसंबद्ध राजकीय भाग होता. आतां यज्ञसंस्थेच्या सामाजिक आणि इतर अंगांकडे पाहूं.

(३५) **यज्ञसंस्था व कारागीर वर्गः**—यज्ञांशीं त्रैवर्णिकांचा साक्षात् संबंध असे व इतरांचा परंपरेनें असे. यज्ञसंस्था ही वैदिक प्रवृत्तिपर धर्माची उत्कृष्ट खूण आहे. सर्व मंत्रांचा संबंध विनियोगरूपानें यज्ञांशीं जोडलेला आहे. विविध सूक्तांवरून व यज्ञीय प्रार्थनांवरून इंद्र, आदित्य, वरुण, वायु, अग्नि, विष्णु, पूषन्, सोम, सूर्य, मरुत्, रुद्र, आश्विन, बृहस्पति, उषा, इत्यादि देवतांची कल्पना येते. या सूक्तांमध्यें दान, कर्म, संस्कार व अध्यात्म यांविषयींचे विचार आढळतात. कश्यप, अत्रि, वसिष्ठ, भृगु, आंगिरस, भरद्वाज, विश्वामित्र, गौतम, जमदग्नि या ऋषींचा संबंध यज्ञकर्माशीं विशेष दिसतो. यांच्यासंबंधाच्या अनेक गोष्टी व आख्यायिका वेदांत सांपडतात. दर्शपूर्णमास, पिंडपितृयज्ञ, चयन, अग्निष्टोम, वाजपेय, दशपेय, ज्योतिष्टोम, अश्वमेध, राजसूय, पुरुषमेध, महाव्रत, बृहस्पतिसत्र, स्वर्गसत्र, नक्षत्रसत्र, अशा नांवांवरून यज्ञांच्या स्वरूपाची यथार्थ कल्पना येते. यज्ञसंस्थेची पूर्ण वाढ झाली होती म्हणून तिला सुतार, सोनार, लोहार, चांभार, शिंपी, विणकर, कुंभार, रथकार, दोऱ्या वळणारे, वाद्यवादक, अशा तऱ्हेचे कारागीर लागत. चतुर्वेदांखेरीज इतिहास, पुराण, वाकोवाक्य, देवविद्या, ब्रह्मविद्या, क्षत्रविद्या, नक्षत्रविद्या, सर्पविद्या, गणितशास्त्र, महत्त्वमापन, अत्तरें काढणें अशा विद्यांचा उल्लेख कांहीं ठिकाणीं आढळतो. गाई, बैल, घोडे हे घरोघरीं असत. घोड्यांचा उपयोग शेतीकडेहि होत असावा.

(३६) **यज्ञसंस्थेचे परिणामः**—यज्ञसंस्थेनें तत्कालीन समाजाच्या जीवनावर पुढीलप्रमाणें चांगलाच परिणाम केलाः—(१) गान व नृत्य या सुधारलेल्या कला अस्तित्वांत आणल्या. (२) प्राणिशास्त्र वाढविलें, शिल्प-

शास्त्र पूर्णतेस नेलें. व्याख्यानें, इतिहास व पुराणें यांची वृद्धि केली. (३) रानटी व मागसलेल्या समाजांना उत्सवाच्या निमित्तानें आकर्षून घेतलें. (४) जनतासंबंधामुळें व्यवहारधर्म उत्पन्न केला. (५) यज्ञ हे सामाजिक संपत्तीच्या उपभोगाचें साधन बनविलें. (६) अग्निहोत्रपुरस्सर वसाहती स्थापण्याचें कार्य सुगम केलें. (७) व्यापारवृद्धीस साह्य केलें. (८) समाजाच्या विस्ताराबरोबर व्यापक संघ निर्माण करून त्यांत ऐक्य नांदावें म्हणून राष्ट्रिय धर्म उत्पन्न केला. (९) यज्ञानिमित्त अनेक विद्वान् एकत्र येऊं लागल्यामुळें तत्त्वज्ञानाच्या वाढीस उत्तेजन मिळालें.

(३७) **यज्ञांतील प्रार्थना**:–विविध यज्ञांमध्यें देवतांना उद्देशून ज्या प्रार्थना म्हटल्या जात, त्यांवरून वैयक्तिक व सामुदायिक उत्कर्षाची आणि समष्टिधर्माची कल्पना येते. मी, माझी बायको, माझें घर यापलीकडे कांहीं न पाहण्याची संकुचित दृष्टि त्याकाळीं नव्हती. जग अनित्य आहे, जगाशीं कांहीं कर्तव्य नाहीं, आपला स्वार्थ बरा, आपण बरे, असें म्हणण्यांत मोठा पुरुषार्थ आहे, असली हीन वृत्ति त्या समाजांत नव्हती, हें पुढील कांहीं प्रार्थनांवरून ध्यानीं येईल.

हे अग्ने, तूं शरीरसंरक्षण करणारा आहेस, तूं आयुष्य, शक्ति देणारा आहेस; तूं माझ्या शरीरांतील सर्व उणेपणा काढून टाक आणि माझ्या हातून मोटी सेवा घे. (वाजसनेयी संहिता ३–१५) तसेंच पुढें वाज. ९–२१ येथें

**आयुर्यज्ञेन कल्पतां प्राणो यज्ञेन कल्पतां चक्षुर्यज्ञेन कल्पतांँ श्रोत्रं यज्ञेन कल्पतां पृष्ठं यज्ञेन कल्पतां यज्ञो यज्ञेन कल्पताम् ।**

"या यज्ञानें आयुष्याची वाढ होवो. यानें प्राणवायु वाढो. डोळे चांगले होवोत, पाठीची वाढ होवो. यज्ञानें यज्ञाची वाढ होवो."

अथर्ववेद कां. १९ सू. ६० ते ६३ मध्यें 'माझ्या वाणींत वक्तृत्व-शक्ति, नासिकेमध्यें प्राणशक्ति, डोळ्यांमध्यें उत्तम दृष्टि, श्रवणेंद्रियांमध्यें तीक्ष्णता असावी, असें म्हटलें असून, केस पिकूं नयेत, दांत किडूं नयेत; बाहूंमध्यें बल, मांड्यांमध्यें सामर्थ्य, जंघामध्यें चापल्य, पायांमध्यें स्थिरता, माझे सर्व अवयव धष्टपुष्ट असावेत, माझा अंतरात्मा उत्साहयुक्त असावा, प्रबळ शत्रूंशीं टक्कर देण्याचें सामर्थ्य असावें, मी सुखानें नांदावें, स्वर्गांत

अखंड वास्तव्य व्हावें, माझें सर्व जीवन शुद्ध व पवित्र असावें, असें मागणें मागितलेलें आहे.

**'वाङ्म आसन्नसोः प्राणश्चक्षुरक्ष्णोः श्रोत्रं कर्णयोः ॥ अपलिताः केशा अशोणा दन्ता बहु बाह्वोर्बलम् ॥१॥ ऊर्वो रोजो जंघयोर्जवः पादयोः ॥ प्रतिष्ठा अरिष्टानि मे सर्वात्मा निभृष्टः ॥२॥ उत्तिष्ठ ब्रह्मणस्पते देवान् यज्ञेन बोधय ॥ आयुः प्राणं प्रजां पशून् कीर्तिं यजमानं च वर्धय ॥४॥'**

जिला राष्ट्रिय प्रार्थना म्हणतां येईल आणि जीमध्यें राष्ट्राच्या स्वास्थ्याची मागणी केलेली आहे अशी वैदिकांच्या म्हणण्यामध्यें नेहमीं येणारी फार महत्त्वाची एक प्रार्थना आहे—

**'ॐ आ ब्रह्मन् ब्राह्मणो ब्रह्मवर्चसी जायतामस्मिन् राष्ट्रे । राजन्य इषव्यः शूरो महारथो जायताम् । दोग्ध्री धेनुर्वोढाऽनड्वानाशुः सप्तिः पुरंधिर्योषा जिष्णूरथेष्ठाः । सभेयो युवा । अस्य यजमानस्य वीरो जायताम् । निकामे निकामे नः पर्जन्यो वर्षतु । फलिन्यो न ओषधयः पच्यन्ताम् । योगक्षेमो नः कल्पताम् ॥'** तैत्तिरीय संहिता ७।५।१८

**भावार्थः**—'परमात्मन् ! या राष्ट्रांत ब्राह्मणवर्ण तेजस्वी व विद्वान होवो. क्षत्रियवर्ण अचुक निशाणबाज, धाडसी व युद्धकुशल होवो. गाई दुधाळ, बैल बळकट, घोडे चपळ, स्त्रिया पतिव्रता, लढवय्ये जयिष्णु, तरुण आपल्या विद्वत्तेची व वक्तृत्वाची सभेवर छाप पाडणारे असे होवोत. नागरिकांना सत्पुत्र होवोत. योग्य वेळीं पाऊस पडो. शेतें उत्तम पिकोत व आमच्या राष्ट्राचा योगक्षेम उत्तम चालो.'

याप्रमाणेंच पुढील प्रार्थना राष्ट्रिय आहेतः— ऋ. १।८।४.

**वयं शूरेभिरस्तृभिरिंद्र त्वया युजा वयम् । सासह्याम पृतन्यतः ॥**

**वयं जयेम त्वया युजा वृतमस्माकमंशमुद्वा भरेभरे । अस्मभ्यमिंद्र वरिवः सुगं कृधि प्रशत्रूणां मघवन् वृष्ण्यारुज ॥** ऋ. १।१०२।४.

**भावार्थः**—हे इंद्रा, आम्ही तुझ्या सन्निध राहून आणि अस्त्रांचा प्रयोग करणाऱ्या शूर वीरांचे सहवासांत राहून आमच्यावर ससैन्य आक्रमण करणाऱ्या शत्रूंचा पराभव करूं. हे ऐश्वर्यसंपन्न प्रभो, तुझ्या सहवासांत

राहून आम्हांभोंवतीं वेढा घातलेल्या शत्रूंवर आम्ही विजय प्राप्त करूं. देवा, युद्धामध्यें आमच्या भागाचें तूं रक्षण कर. हे इंद्रा, आमच्याकरितां धन अगदीं सौलभ्यानें मिळेल असें कर. आणि शत्रूचें बल नष्ट होऊन त्याचा नायनाट होईल असें कर. ( सारांश, परमेश्वराची कृपा आम्हांवर व्हावी म्हणजे आमचे शत्रू त्याच्या कृपेनें सर्वत्र पराजित होतील. )

**ॐ मयि मेधां मयि प्रजां मयीन्द्र इन्द्रियं दधातु । मयि मेधां मयि प्रजां मय्यग्निस्तेजो दधातु । मयि मेधां मयि प्रजां मयि सूर्यो भ्राजो दधातु ॥** तैत्तिरीय संहिता ३।३।१.

**भावार्थः**—भगवान् इंद्र मला स्मरणशक्ति, मुलेंबाळें आणि इंद्रियसामर्थ्य देवो. भगवान् अग्नि मला स्मरणशक्ति, मुलेंबाळें व विचारशक्ति देवो. भगवान् सूर्य मला स्मरणशक्ति, मुलेंबाळें व तेजास्विता देवो.

**(३८) वैदिक राज्यपद्धतिः**—वेदावरून आर्यांच्या राज्यपद्धतीवर चांगलाच प्रकाश पडतो. अनेक प्रकारच्या शासनसंस्था त्या कालीं असाव्या. मंत्रपुष्पाचे वेळीं जे मंत्र उच्च घोषानें म्हटले जातात व जे हिंदूंच्या नित्य परिचयांतले आहेत, त्यांवरून वैदिक आर्यांच्या राजकीय आकांक्षा व्यक्त होतात.

**ॐ राजाधिराजाय प्रसह्य साहिने । नमो वयं वै श्रवणाय कुर्महे ।**
**स मे कामान्कामकामाय मह्यम् । कामेश्वरो वै श्रवणो ददातु ।**
**कुबेराय वै श्रवणाय । महाराजाय नमः** ॥१॥ (तै. आ. १।३१।६)

**ॐ स्वस्ति । साम्राज्यं भौज्यं स्वाराज्यं वैराज्यं पारमेष्ठ्यं राज्यं महाराज्यमाधिपत्यमयं समन्तपर्यायी स्यात् सार्वभौमः सार्वायुष आन्तादापरार्धात् । पृथिव्यै समुद्रपर्यन्ताया एकराळिति** ॥२॥

( ऐ. ब्रा. ८।१५ )

**भावार्थः**—सर्वशक्तिमान् राजाधिराज व उपासकांची प्रार्थना ऐकून घेणाऱ्या प्रभूला आम्ही सर्व उपासक नमस्कार करतों. तो आमची मनकामना पूर्ण करो. त्या सर्व राजाधिराज महाराजाला आम्ही प्रणिपात करतों. आम्हां सर्वांचें कल्याण होवो. आमचें साम्राज्य, भौज्य, स्वराज्य, वैराज्य, पारमेष्ठ्य, महाराज्य, आधिपत्य समुद्रापर्यंत वाढो. आमचें स्वराज्य,

सर्व भूमंडलावर पसरो. आम्हांला पूर्ण आयुष्य प्राप्त होवो. अनन्त कालपर्यंत सर्व पृथ्वीवर आमचें एकछत्री राज्य होवो.

(३९) **अत्रिकुलाचें राजकारणः**—वेदामध्यें अत्रिकुल हें स्वराज्य-विषयक चळवळीकरितां प्रसिद्ध आहे. अत्रिमुनी आपल्या अनुयायी वर्गासह स्वराज्यार्थ यत्न करीत होते. तें स्वराज्य तत्कालिन सर्व लोकांकरितां होतें. अत्रिऋषीच्या चळवळीचा परिणाम असुरांच्या राज्यावर झाला! म्हणून त्यांनीं अत्रि ऋषींना अनुयायांसह यंत्रगृहांत घातलें. तेथें त्या अंधारकोट-डींत नीटपणें उभें राहाण्यासहि जागा नव्हती. त्यामुळें त्या सर्वांना अतिशय त्रास झाला व ते अशक्त झाले. पुढें चळवळ जोरांत वाढल्यावर सर्वांना सोडून देणें भाग पडलें. अश्विनीकुमारांनीं (वैद्यांनीं) त्यांना सहज पचणारें पौष्टिक अन्न देऊन पुनः ताजेतवाने केलें. (ऋ. १।११६–११७।३) या अत्रिऋषीचे मुलगे व नातु हे सर्व लोक स्वराज्याचे उपासक होते. रातहव्य आत्रेय कुलामध्यें लोकराज्याविषयीं बऱ्याच खटपटी चालत असत असें पुढील मंत्र सांगतो. त्यांतील 'बहुपाय्ये स्वराज्ये' हे शब्द महत्त्वाचे आहेत. त्याचा अर्थ 'बहुभिः रक्षितव्ये स्वराज्ये' म्हणजे पुष्कळ लोकांच्या मान्यतेनें चालणारें राज्य असा सायणाचार्यांनीं दिलेला आहे.

**आयद् वामीय चक्षसा मित्रवयं च सूरयः।**
**व्यचिष्ठे बहुपाय्ये यतेमहि स्वराज्ये ॥** ऋ. ५।६६।६.

**भावार्थः**—मित्रभावानें वागणारे अर्थात् वैमनस्यहीन सज्जनांनो, तसेंच विशाल दृष्टीच्या सज्जनांनो, तुम्ही व आम्ही सर्व विद्वान् मिळून व्यापक आणि ज्याच्या रक्षणाला अनेक लोकांच्या सहाय्याची अपेक्षा आहे, अशा स्वराज्याची व्यवस्था उत्तम करण्याचा व्यवस्थित यत्न करूं.

(४०) **अन्नाचें स्वामित्वः**—राज्यें चालविण्यास आणि लढाया जिंकण्यास अन्नाचा भरपूर संग्रह पाहिजे हें या महायुद्धानेंहि सिद्ध केलें आहे. वेदकालीन आर्य हे अन्नाच्या स्वामित्वाविषयीं फारच दक्ष असत व तशी प्रार्थना करीत.

**यंतु नदयो वर्षंतु पर्जन्याः। सुपिप्पला ओषधयो भवन्तु।**
**अन्नवतामोदनवतामामिक्षवतां। एषा ँ राजाभूयासं ॥**

—तै. ब्रा. २।७।१६.

नद्या वाहोत, पाऊस पडो, गडगंज पिको. अन्न, भात, दूध, तूप यांचें स्वामित्व आम्हाला प्राप्त होवो.

(४१) **ब्रह्मचर्यः**—वेदकालीन आर्यांना ब्रह्मचर्याचें महत्त्व फार पटलेलें होतें म्हणून त्यांनीं त्यासंबंधीं पुढील विचार प्रगट केले आहेत:—

**ब्रह्मचर्येण तपसा देवा मृत्युमुपाघ्नत ।**
**इंद्रो ह ब्रह्मचर्येण देवेभ्यः स्वराभरत ॥** अथर्ववेद, ११।५।१९
**आचार्यो ब्रह्मचारी ब्रह्मचारी प्रजापतिः ।**
**प्रजापतिर्विराजति विराडिन्द्रोऽभवद्वशी॥** अथर्ववेद, ११।६।१६
**ब्रह्मचर्येण कन्या युवानं विन्दते पतिम् ।**
**अनड्वान्ब्रह्मचर्येणाश्वो घासं जिगीर्षति ॥** अथर्ववेद, ११।५।१८

**भावार्थः**—ब्रह्मचर्यरूप तपानें सर्व देवांनीं मृत्यु दूर केला. त्या देवांसाठीं ब्रह्मचर्याच्या योगानेंच खरोखर इंद्रानें स्वर्गांतील तेज आणलें. राष्ट्रामधील आचार्य व प्रजेचें पालन करणारे अधिकारी ब्रह्मचारी असावेत. अशा प्रकारचे जे ब्रह्मचारी प्रजापालक असतात तेच विशेष रीतीनें शोभतात. त्यामध्यें जो वशी म्हणजे संयमशील असतो तो इंद्र होतो. कन्या ब्रह्मचर्य पालन करून तरुण पतीला प्राप्त करते. बैल व घोडा हे पशूसुद्धां ब्रह्मचर्य पालन करून गवत पचवूं शकतात.

ब्रह्मचर्याचा व मनाचा निकट संबंध आहे. मनावर ताबा ठेवण्यास, संयमशील होण्यास आणि नियमितपणानें वागण्यास ब्रह्मचर्याची फार आवश्यकता आहे. ब्रह्मचर्य पाळल्यानें या गोष्टी सहज साध्य होतात.

(४२) **नियमितपणाः**—वेदकालीन आर्यांना मनावर ताबा ठेवण्याकरितां नियमितपणाची म्हणजे नियमबद्ध वर्तनाची आवश्यकता वाटत होती. सूर्य, चंद्र व इतर ग्रह यांच्या गति जशा नियमबद्ध आहेत. पावसाळा, हिवाळा व उन्हाळा हे जसे नियमितपणें येतात, त्याप्रमाणें माणसांनीं नियमित वागलें पाहिजे, असा उपदेश त्यांनीं केला आहे:—

**कालादापः समभवन्कालाद् ब्रह्म तपो दिशः ।**
**कालेनोदेति सूर्यः काले निविशते पुनः ॥१॥**

कालेन वातः पवते कालेन पृथिवी मही ।
द्यौर्मही काल आहिता ॥२॥ ( अथर्ववेद १९।५४ )

भावार्थः–" वेळेवर पाऊस पडतो, वेळेवर उन्हाळा होतो, वेळेवर ब्रह्म प्रगट होतें, वेळेवर सूर्य उगवतो व वेळेवर पुनः मावळतो. वेळेवर वारा सुटतो व वेळेवर पृथ्वी व आकाशांतील सर्व कार्यें होत असतात. "

(४३) दीर्घायुष्यः–वेदकालीन आर्य दीर्घायुषी होते. 'शतायुर्वै पुरुषः' असा वाक्प्रचार त्याकाळीं रूढ होता. शंभर वर्षांपूर्वी मरणें म्हणजे पाप समजत. पौष्टिक अन्न कसें संपादन करावें, कसें उत्पन्न करावें आणि मिळवून तें खावें, आणि आरोग्याचे कोणते नियम कसे पाळावेत हें सर्व शास्त्र समाजाला परिचित होतें. जगांत मृत्यूसारखी हानि नाहीं. यास्तव अनेक असुरांनीं तपस्या करून अमरत्वाचे वर मागितलेले आहेत. कोणत्याहि पुरुषार्थाचें आणि ऐहिक ऐश्वर्य मिळविण्याचें आणि भोगण्याचें साधन दीर्घायुष्य हें आहे. महाभारतकालीन सर्व वीर दीर्घायुषी होते. सांप्रतच्या युद्धांतसुद्धां वयोवृद्ध, अनुभवी असेच पुष्कळ सेनापति होते. आज हिंदुस्थानांतील तरुण पिढी फारच अल्पायुषी दिसते. या पिढीला आरोग्यरक्षणाचें, पौष्टिक अन्न खाण्याचे नियम शिकवून दीर्घायुषी कसें व्हावें हें शिकविलें पाहिजे. वेदकालीन आर्य किती सोप्या भाषेंत कसें दीर्घायुष्य आणि ऐश्वर्य मागतात, हें पहाः–

पश्येम शरदः शतं जीवेम शरदः शतम् ॥ ऋ. ७।६६।१६
प्रब्रवाम शरदः शतम् । अदीनाः स्याम
शरदः शतं भूयश्च शरदः शतात् ॥ –यजु. ३६।२४
बुध्येम शरदः शतम् । रोहेम शरदः शतम् ॥
पूषेम शरदः शतम् । भवेम शरदः शतम् ॥
भूयेम शरदः शतम् । भूयसीः शरदः शतात् ॥ –अथर्व. १९।६७
नन्दाम शरदः शतम् । मोदाम शरदः शतम् ।
भवाम शरदः शतम् । अजीतास्याम शरदः शतम् ॥
–तै. आ. ४।४२

भावार्थः–शंभर वर्षें पहावें, जगावें, ऐकावें, ( सृष्टीचा उपभोग घ्यावा ), व्याख्यानें द्यावींत, शंभर वर्षें दैन्य न येतां आम्हीं जगावें आणि

शंभर वर्षांपेक्षांहि अधिक काल आम्ही आनंदांत असावें, शंभर वर्षें ज्ञान मिळवावें, तें वाढवावें, शरीरानें पुष्ट व्हावें, संपन्न व्हावें, उन्नतिप्रत आम्ही जावें, इतकेंच नव्हे तर शेंकडों वर्षांपेक्षांहि अधिक काल आम्ही सदोदित उत्कर्ष पावत असावें. वैदिक आर्यांची ही विजिगीषा बुद्धि व महत्त्वाकांक्षा प्रत्येक हिंदूनें हृत्पटलावर कोरून ठेवण्यास नको काय ?

**(४४) मनानें चांगलें चिंतावें:**–मन ही एक मोठी शक्ति असून, वेदकालीन आर्यांनीं त्या शक्तीचा अनुभव घेतलेला होता. संकल्प करणारें मनच बंधमोक्षाच्या इमारती उभारीत असतें. या जगांत मनाच्या विविध वृत्ति दृग्गोचर होतात. मन जर हातांत आलें, मनावर प्रभुत्व चालवितां येऊं लागलें, आणि मनांतील कुवासना, कुविचार आणि असत् प्रवृत्ति घालवून तेथें सुविचार व सत्प्रवृत्ति यांचा प्रादुर्भाव होईल तर वैयक्तिक उन्नतीला विलंबच नाहीं. वैदिक ऋषींनीं आपल्या मनामध्यें सदैव शिव-संकल्प असावेत अशा प्रार्थना केल्या आहेत. त्यांतील एक उत्कृष्ट भाग यजुर्वेदामध्यें आहे. प्रत्येक ऋचेंत मनाचें विविधतेनें वर्णन केलें असून शेवटीं तें माझें मन शिवसंकल्पयुक्त होवो ("तन्मे मनः शिवसंकल्पमस्तु") असा चरण प्रत्येक मंत्राच्या शेवटीं घातलेला आहे. त्यांतील फक्त दोनच मंत्र येथें उद्धृत करितों:—

**यत्प्रज्ञानमुत चेतो धृतिश्च यज्ज्योतिरन्तर्मृतं प्रजासु ।**
**यस्मान्न ऋते किंचन कर्म क्रियते तन्मे मनः शिवसंकल्पमस्तु ॥**

वा. यजु. १४।३.

**सुषारथिरश्वानिव यन्मनुष्यान्नेनियतेऽभीशुभिर्वाजिन इव ।**
**हृत्प्रतिष्ठं यदजिरं जविष्ठं तन्मे मनः शिवसंकल्पमस्तु ॥** वा.यजु.३४।६.

**भावार्थ:**–जें माझें मन मला ज्ञान, चिंतनशक्ति व धैर्य देतें, जें मन लोकांच्या अंतःकरणांत अमरज्योतीसारखी तेजस्विता वाढवितें व ज्याच्याशिवाय कांहींसुद्धां कर्म केलें जात नाहीं, तें माझें मन शिवसंकल्प करणारें होवो. जसा उत्तम सारथी लगाम आपल्या हातांत धरून रथाच्या घोड्यांना हवा तसा चालवितो, त्याचप्रमाणें हें मन मनुष्यांना नेत असतें. हें हृदयांत असतें, तें फार वेगवान आहे व कधींहि क्षीण होत नाहीं; म्हणजे

त्याच्या आकांक्षा वाढतच असतात. असें हें शक्तिशाली माझें मन उत्तम संकल्प करणारें बनो.

**(४५) धैर्य व निर्भयता:**-धैर्य व निर्भयता हे दोन्ही गुण परस्पर पोषक अथवा एकाच वृत्तीचीं निरनिराळीं नांवें आहेत. मानवी जीविताला यांची अत्यंत आवश्यकता आहे. गीतेंत (भ. गी. १६-१) दैवी संपत्तीचें पहिलें लक्षण 'अभयं' म्हणजे निर्भयता हें सांगितलें आहे आणि मनूनें दशलक्षणात्मक जो धर्म सांगितला त्यांतील पहिला गुण 'धृतिः' धैर्य हा सांगितला आहे. वैदिक आर्यांचे धैर्य व निर्भयता यांसंबंधाचे विचार प्रार्थनेच्या रूपानें हिमालयांतील गंगेप्रमाणें घो घो वहात असतांना हिंदूंच्या हृदयांत म्हणजे प्राणांत धैर्य व निर्भयता हे गुण अवश्य आले पाहिजेत, आणि हिंदु हा भित्रा आणि कच खाणारा हा समज नष्ट झाला पाहिजे.

द्युलोक व पृथ्वि, दिवस व रात्र, सूर्य आणि चंद्र, ब्रह्म व क्षत्र, सत्य व सरलता, भूत आणि भविष्य हीं द्वंद्वें जशीं कधींहि न भितां सारखीं पुढें चाललीं आहेत, त्याप्रमाणेंच माणसानें धैर्यानें व निर्भयतेनें आपल्या ध्येयाच्या मार्गांत सदैव पाऊल पुढें टाकलें पाहिजे, असें खालील मंत्र सांगतात:—

यथा द्यौश्च पृथिवी च न बिभीतो न रिष्यतः
एवा मे प्राण मा बिभेः ॥ —अथ. २।१५।१.

यथाहश्च रात्री च न बिभीतो न रिष्यतः
एवा मे प्राण मा बिभेः ॥ —अथ. २।१५।२.

यथा सूर्यश्च चंद्रश्च न बिभीतो न रिष्यतः
एवा मे प्राण मा बिभेः ॥ —अथ. २।१५।३.

यथा ब्रह्म च क्षत्रं च न बिभीतो न रिष्यतः
एवा मे प्राण मा बिभेः ॥ —अथ. २।१५।४.

यथा सत्यं चानृतं च न बिभीतो न रिष्यतः
एवा मे प्राण मा बिभेः ॥ —अथ. २।१५।५.

यथा भूतं च भव्यं च न बिभीतो न रिष्यतः
एवा मे प्राण मा बिभेः ॥ —अथ. २।१५।६.

(४६) **पुरुषार्थ व उद्योगः**--धर्म, अर्थ, काम व मोक्ष असे चार पुरुषार्थ वैदिक आर्यांच्या पुढें होते. प्रपंच व परमार्थ, प्रवृत्ति आणि निवृत्ति, अभ्युदय आणि निःश्रेयस यांच्याकडे त्यांचें सारखेंच लक्ष होतें. संन्यासमार्गीय व जगताचा कंटाळा करण्यास सांगणारी अशी शिकवण वेदांत नाहीं. जगाकडे रहस्यपूर्ण दृष्टीनें पहा, पुरुषार्थी व्हा, प्रजावान् व्हा, प्रज्ञावान् व्हा, असाच उपदेश ठिकठिकाणीं आहे. प्रजा, द्रव्य, गायी, ज्ञान, वीर्य इत्यादि सर्व मिळवून मनुष्यानें शंभर वर्षें समाज व राष्ट्रसेवा करावी अशा आकांक्षा वेदामध्यें व्यक्त केल्या आहेत.

**ऊर्जे त्वा बलाय त्वौजसे सहसे त्वा अभिभूयाय**
**त्वा राष्ट्रभृत्याय पर्यूहामि शत शारदाय ॥** अथ. १९।३७।३.

पुरुषार्थी मनुष्यावरच ईश्वराचें कृपाछत्र असतें, ईश्वरकृपासंपादनार्थ मनुष्यानें पुरुषार्थाकरितां अखंड झटलें पाहिजे. जो सतत उद्योग करतो, श्रम करतो, त्यावरच परमेश्वर कृपा करीत असतो. ‘God helps those who help themselves’ ही इंग्रजी म्हण वेदकालीन आर्यांच्या दहा हजार वर्षांपूर्वींच्या खालील वाक्यखंडाचाच निःसंशय अनुवाद आहे.

**न ऋते श्रान्तस्य सख्याय देवाः ।** ऋ. ४।३३।११

धैर्यानें, उत्साहानें, अनहंकारानें मनुष्यानें सतत उद्योग करावा, यासंबंधाचे प्रोत्साहक, हृदयस्पर्शी, आणि आलस्यादि दोष झडझडून टाकावयास लावणारे असे विचार सर्व हिंदु तरुणांनीं नित्य पाठांत ठेवण्याजोगे आहेत ते असेः--

**नाऽना श्रान्ताय श्रीरस्ति । पापोनृषद्वरो जन इंद्र इच्चरतः सखा । चरैवेति ॥१॥ पुष्पिण्यौ चरतो जंघे भूष्णुरात्मा फलग्रहिः । शेरे अस्य सर्वे पाप्मानः श्रमेण प्रपथे हताः । चरैवेति ॥२॥ आस्ते भग आसीनस्योर्ध्वस्तिष्ठति तिष्ठतः । शेते निपद्यमानस्य चराति चरतो भगः । चरैवेति ॥३॥ कलिः शयानो भवति संजिहानस्तु द्वापरः । उत्तिष्ठंस्त्रेता भवति कृतं संपद्यते चरन् ॥ चरैवेति ॥४॥ चरन् वै मधु विंदति चरन्स्वादुमुदुंबरन् । सूर्यस्य पश्य श्रेमाणं यो न तंद्रयते चरन् । चरैवेति ॥५॥** --ऐत. ब्रा. ७।१५

**भावार्थः**—श्रमाविना श्रीची प्राप्ति होत नाहीं. आळशी मनुष्य पापी समजावा. पुरुषार्थी मनुष्याचा मित्र ईश्वर आहे. म्हणून यत्न करा व पुरुषार्थ संपादन करा. ॥१॥ जो चालतो (व्यायाम घेतो) त्याच्याच मांड्या पुष्ट होतात; फलप्राप्तिपर्यंत यत्न करणारा मनुष्य प्रभावशाली ठरतो. प्रयत्न करणाऱ्याचे मार्गांत येणारे पापभाव म्हे. विघ्नें आपोआपच नष्ट होतात. याकरितां यत्न करा, कष्ट करा. ॥२॥ जो घरीं बसतो, त्याचें नशीबहि बसतें. जो उभा राहतो त्याचें नशीबहि उभें राहतें. जो निजतो, त्याबरोबर त्याचें दैवहि झोपीं जातें. त्याप्रमाणें जो चालूं लागतो त्याचे मागोमाग त्याचें दैवहि येतें. म्हणून मनुष्यानें प्रयत्न केला पाहिजे व साक्षेपी झालें पाहिजे ॥३॥ झोपीं गेला कीं कलियुग लागतें, आळस सोडला कीं द्वापर युगाला प्रारंभ होतो, उठून बसणें हें त्रेतायुगाचें लक्षण होय व उद्योगाला लागणें म्हणजेच कृतयुग होय. याकरितां मनुष्यानें उद्योगच केला पाहिजे. ॥४॥ मधमाशी भ्रमण करून मध मिळविते, पक्षीहि संचार करून मधुर फळें प्राप्त करून घेतात. सूर्याचें तेज व त्याची शोभा हीं त्याच्या निरलस व सतत भ्रमणाचीं फळें होत. याकरितां प्रयत्न करा व परिश्रम करा. देव कर्त्या माणसांची इच्छा करितात व आळशी व अयोग्य वागणाऱ्यांचें दमन करतात. (ऋ. ८–२–१८)

**पिबतं च तृप्णुतं चा च गच्छतं प्रजां च धत्तं द्रविणं च धत्तम् ॥१॥ जयतं च प्रस्तुतं च प्रचावतं प्रजां च धत्तम् द्रविणं च धत्तम् ॥२॥ हतं च शत्रून् यततं च मित्रिणः प्रजां च धत्तं द्रविणं च धत्तम् ॥३॥ ब्रह्मजिन्वतमुत जिन्वतं धियो हतं रक्षांसि सेधतममीवाः ॥४॥ क्षत्रं जिन्वतमुत जिन्वतं नॄन् हतं रक्षांसि सेधतममीवाः ॥५॥ धेनूर्जिन्वतमुत जिन्वतं विशोहतं रक्षांसि सेधतममीवाः ॥६॥ ऋ. ८।३५।१० ते १२ व १६ ते १८.**

**भावार्थः**—प्या, तृप्त व्हा, पुढें चला, प्रजाधारण करा, द्रव्य जवळ ठेवा. ॥१॥ विजयी व्हा, प्रशंसनीयांचें संरक्षण करा, प्रजा व द्रव्य वाढवून त्यांचें संरक्षण करा. ॥२॥ शत्रूंचा नाश करा, मित्रांशीं सहकार्य करा, प्रजा व धन संपादन करा. ॥३॥ ज्ञान प्राप्त करून घ्या, सद्बुद्धीचें रक्षण करा, दुष्टांचा नाश करा व रोगांना नष्ट करा. ॥४॥ क्षात्रतेज कमवा आणि पुढाऱ्यांच्या सान्निध्यांत रहा, राक्षसांचें हनन करून रोगराईला दूर लोटा.

॥५॥ गोधन प्राप्त करा, प्रजासंपन्न व्हा, दुष्टांचा नाश करा व रोगांचें निवारण करा. ॥६॥

उद्योगाची व पुरुषार्थाची नुसती महति वेदांत गायली आहे असें नसून आळस, करंटेपणा, अनुद्योग हे दुर्गुण झडझडून जावोत आणि आम्हांवर घरांतल्या घरांत बसून बसून वृद्ध होण्याचा प्रसंग कधींहि न येवो अशी इंद्राकडे मागणी केलेली आहे. ( ऋ. ८-२१-१५ )

(४७) **दारिद्र्य कसें घालवावें ?** :—दारिद्र्य म्हणजे या जगांतील मरण होय ! दारिद्र्य म्हणजे पाप होय. शारीरिक, आर्थिक, मानसिक, कोणतेंहि दारिद्र्य म्हटलें कीं तें एकंदरींत अत्यंत वाईटच होय ! तिच्याशीं निकरानें संग्राम करून कौशल्य, कारागीर आणि कला या वाढवून पैसा मिळविल्याशिवाय दारिद्र्य हटत नसतें. वेदकालीन आर्य सांगतात—

**अरायिकाणे विकटे गिरिं गच्छ सदान्वे । शिरिं विष्टस्य सत्वभिस्ते भिष्ट्वा चातयामसि ॥** ऋ. १०।१५५।१

**अदोय द्दारु प्लवते सिंधोः पारे अपूरुषम् । तदारभस्व दुर्हणो तेन गच्छ परस्तरम् ॥** ऋ. १०।१५५।३

**भावार्थ**—हे धनहीन, विरूप, कुरूप व सदा आक्रोश करणारे दरिद्रते, निर्जन पर्वतावर जा, नाहींतर वज्रासारख्या कठीण हृदयाच्या मनुष्याच्या पराक्रमाचे साह्यानें तुझा समूळ नाश आम्ही करूं शकूं. कौशल्यानें दारिद्र्यरूपी समुद्राच्या पार जाण्याकरितां आम्ही यत्न करतों. याकरितां कारागिरीला प्रारंभ करा. दारिद्र्यानें अत्यंत पीडित झालेल्या मनुष्यांनो, दारिद्र्याच्या पार या कारागिरीनें जावें, कारण कौशल्य व कला हींच दारिद्र्याचा नाश करतात.

(४८) **द्रव्यार्जनः**—वैदिक आर्य हे धनधान्यांचे आणि हरतऱ्हेच्या संपत्तीचे मोठे भोक्ते होते. जीवनाला द्रव्याची व अन्नाची अपेक्षा आहे. किंबहुना धर्मसुद्धां अर्थमूलकच आहे. सुखाचें मूल धर्म, व धर्माचें मूळ अर्थ आहे, असें ते मानीत. अर्थामध्यें धन, धान्य, पुत्र, विद्या, शरीर, स्त्री, गो, अश्व या सर्वांचा ते समावेश करीत. मनुष्याच्या शरीराबरोबर शेंकडों धनें उत्पन्न झालीं आहेत, असें पुढील मंत्रांत म्हटलें आहे.

एकशतं लक्ष्म्यो मर्त्यस्य साकं तन्वा
जनुषोऽधिजाताः ॥ अथर्व. ७।११५।३

जगांतील अनेक व्यवहारांना धनाची अपेक्षा आहे. धनप्राप्तीबरोबर घोडे, रथी, वीर्य, बल, आणि समाजकल्याणेच्छा वाढली पाहिजे. नाहीं तर हावरेपणामुळें दुसऱ्याला उपद्रव देण्याची इच्छा मात्र उत्पन्न होईल. ती न व्हावी म्हणून कोणाच्याही धनापहाराची इच्छा करूं नये, असें ठासून ईशावास्योपनिषदांत सांगितलें आहे. (मा गृद्धः कस्यचित् धनं)

कुटुंबांतील प्रत्येक माणसानें स्वतः घाम गाळून कांहीं तरी द्रव्य मिळवावें. ऐदीपणानें मेलेलें अन्न खाऊं नये. स्त्रियांनीं घरांतील निरनिराळीं कामें करणें म्हणजे तें द्रव्योत्पादनच आहे. फुकटखाऊपणा हा एकंदरींत वाईट !

कारुरहं ततो भिषगुपलप्रक्षिणी नना ।
नानाधियो वसूयवोऽनु गा इव तस्थिम ॥ (ऋ. ९।११२।३)

**भावार्थः**–एक ऋषी म्हणतो मी पुरोहित किंवा कारागीर आहे. माझा बाप वैद्य असून, आई जात्यावर दळण दळते. याप्रमाणें आम्ही निरनिराळीं कामें करून द्रव्य मिळवितों, व एकत्र राहतों.

धन हें मुख्यतः व्यापारानें मिळतें. म्हणून माणसानें व्यापार करावा. व्यापारांत घातलेलें मूळ धन वाढवावें. भांडवल कधीं घटूं देऊं नये. लाभामध्यें खो घालणाऱ्यांचा निषेध करावा. मनुष्यानें विपुल द्रव्य नीतीनें व्यापार व उद्योगधंदे करून मिळवावें आणि त्याचा सत्पात्रीं व्यय करावा; असे विचार वेदांमध्यें आहेत.

मनुष्यानें दैवावर न विसंबतां, कोणत्याहि उद्योगांत माघार न घेतां, कच न खातां नेटानें सतत उद्योग करावा म्हणजे त्याला यश येतें.

"अप्रतीतो जयति संधनानि प्रतिजनान्युत सा सजन्या" जो मनुष्य कच न खातां उद्योग करितो तोच धनप्राप्ति करण्यांत विजयी होतो.

शूरग्रामः सर्ववीरः सहावान् जेता पवस्व सनिता धनानि ।
तिग्मायुधः क्षिप्रधन्वा समत्स्वसाह्वः साह्वान् पृतनासु शत्रून् ॥
( ऋ. ९।९०।३ )

भावार्थः-जो शूर, सर्व प्रकारें वीर्यवान्, सहनशील, विजयी, शस्त्रास्त्रांनें युक्त, शत्रूला असह्य, शत्रूच्या छातींत धडकी भरविणारा असतो, तोच सर्व प्रकारचें धन मिळवूं शकतो; असें क्षत्रियाचें वर्णन आहे. परंतु सामान्य माणसानें "अप्रतीतो जयति" हेंच वाक्य हृदयावर कोरून द्रव्यार्जनास लागलें पाहिजे.

(४९) **समाजसंघटनाः**-वेदकालीन आर्यांना समाज व राष्ट्र यांच्या कल्पना होत्या. समाजामध्यें संघटना असल्याशिवाय तो जगूं शकत नाहीं, आणि राष्ट्र या पदवीलाहि तो पोंचत नाहीं. समाज असंघटित, अव्यवस्थित आणि फुटीर असला म्हणजे त्याजवर चहूंकडून आक्रमणें होतात. तीं तशीं होऊं नयेत म्हणून आणि राष्ट्र या दृष्टीनें तेजस्विता यावी म्हणून, आर्यांनीं बाह्य दिखाऊ ऐक्यापेक्षां अंतस्थ टिकाऊ ऐक्य पाहिजे, अशा इच्छा प्रगट केल्या आहेत. यासंबंधीं महत्त्वाचे फक्त दोनच मंत्र येथें देतो:-

समानो मंत्रः समितिः समानी समानं मनः सहचित्तमेषाम् ।
समानं मंत्रमभिमंत्रये वः समानेन वो हविषा जुहोमि ।
समानीव आकूतिः समाना हृदयानि वः ।
समानमस्तु वो मनो यथा वः सुसहासति ॥

(ऋ. १०।१९१।३-४).

भावार्थः आपणा सर्वांचा विचार एक असावा. आपल्या सर्वांची सभा एक असावी. आपणा सर्वांचें मन एकविचारानें युक्त असावें-आपलें चित्त एकाच ध्येयाच्या चिंतनांत असावें, आपण सर्व मिळून एकाच सामग्रीनें देवांचें यजन एकविचारानें करूं या. लोकहो! तुमची आकांक्षा एक, तुमचें अंतःकरण एक, तुमचें मन एक असूंद म्हणजे तुमची संघशक्ति बळकट होईल, व तुम्ही संघटितपणें आलेल्या कोणत्याहि प्रकारच्या आपत्तींना प्रतिकार करूं शकाल.

(५०) **देशभक्तिः**-स्वदेश, मातृभूमि, Motherland या कल्पना आपल्या परंपरेंत नाहींत, त्या पाश्चात्य परंपरेंत आहेत, असा समज रूढ आहे. परंतु वेदांमध्यें 'हे माते! तुझ्यापासून आमचा जन्म आहे, तूंच आम्हाला लहानाचें मोठें केलें आहेस, तुझ्याच आधारावर आमचें वास्तव्य

आहे, पृथ्वीच्या स्वरूपानें तूंच आमचा आसरा आहेस,' अशी स्तुती आहे. Nationalism देशाभिमान ही कल्पना अलीकडील युगांतील असली तरी निदान मातृभूमीची कल्पना तरी वेदांत आहे.

**(१) त्वज्जातास्त्वयि चरंति मर्त्यास्त्वं बिभर्षि द्विपदस्त्वं चतुष्पदः। तवेमे पृथिवि पंचमानवा येभ्यो ज्योतिरमृतं मर्त्येभ्य उद्यन् सूर्योरश्मिभिरातनोति ॥** (अथर्व. १२।१।१५)

**(२) उपहूता पृथिवीमाता उपमां पृथिवीमाता ह्वयताम ॥** यजु. २।१०

**(३) नमो मात्रे पृथिव्यै माहं मातरं पृथिवीं हिंसिषं मा मां माता पृथिवी हिंसीत् ॥** तै. सं. १।८।१५.

(१) हे पृथ्वीमाते, आम्ही सर्व तुझ्यापासून उत्पन्न होत्साते तुझ्यावरच हिंडत फिरत आहोंत. पृथ्वीमाते, तूंच सर्व द्विपाद व चतुष्पाद प्राण्यांचें पोषण करितेस. हे पंचमानव (ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य, शूद्र व निषाद) तुझेच सुपुत्र आहेत; यांच्याकरितां उदयास येणारा सूर्य आपल्या किरणांनीं अमृतरूप तेज प्रसृत करीत असतो. (२) मातृभूमीची भक्ति केली आहे म्हणून ती मातृभूमि आज मला उत्साहित करो. (३) मातृभूमीला नमस्कार असो. मजकडून मातृभूमीला कोणताहि त्रास न पोंहचो. त्याचप्रमाणें मातृभूमि (रुष्ट होऊन) माझें कोणतेंही अहित न करो.

**(५१) मित्रत्वः**—स्वदेशभक्तीचा अतिरेक अन्यदेशीयांच्या मत्सरांत होतो म्हणून वैदिक ऋषींनीं वेदमातेपाशीं

**आयुः प्राणं प्रजां पशुं कीर्तिं द्रविणं ब्रह्मवर्चसं**
**मह्यं दत्त्वा व्रजत ब्रह्मलोकम् ॥** अथर्व. १९।७१।१

आयुष्य, आरोग्य, प्रजा, पशु, बल, द्रव्य हीं सर्व आम्हाला आमच्या देशांत प्राप्त होवोत असें म्हटलें असलें तरी त्यामुळें उन्मत्त होऊन दुसऱ्यास उपद्रव देण्याची वृत्ति कधीं न व्हावी, अशीहि दक्षता त्यांनीं घेतली आहे. समाज व राष्ट्र या दृष्टीनें समर्थ, तेजस्वी, वर्चस्वी आणि मनस्वी असें असावें, आक्रमकांचा प्रतिकार करावा, पण भूतमात्राशीं मित्रभावानेंच वागण्याची दृष्टि ठेवावी असें त्यांचें ध्येय होतें.

**मित्रस्य मा चक्षुषा सर्वाणि भूतानि समीक्षन्ताम् । मित्रस्याहं चक्षुषा सर्वाणि भूतानि समीक्षे । मित्रस्य चक्षुषा समीक्षामहे ॥**

( –वाज. यजु. ३६।१८ )

**भावार्थः**–" मित्रदृष्टीनें सर्व भूतमात्र माझ्याकडे पाहोत. मित्राच्या दृष्टीनें मी सर्व भूतमात्रांकडे पाहतों. आपण सर्व परस्परांकडे मित्रदृष्टीनेंच पाहूं या. "

(५२) **वेदकालीन लोकस्थितिः**–वैदिक वाङ्मयाला प्राथमिक स्थितींतील किंवा रानटी वाङ्मय असें कदापि म्हणतां येणार नाहीं. कारण वेदांमध्यें निरनिराळ्या विषयांविषयीं व व्यवहारांविषयीं जे विचार व जे शब्दसमुच्चय आढळतात त्यांवरून वैदिकसंस्कृति अत्यंत परिणत होती असेंच सिद्ध होतें. ग्राम, नगर, पुरी व राष्ट्र हे शब्द वेदांमध्यें आलेले आहेत. "अभिराष्ट्रेण वर्धताम् ।" ( अथर्व. ६।७८।२ ) म्हणजे 'राष्ट्रासह आपली उन्नति करा' असें म्हटलें आहे. गृह, वेश्म, शाला, प्रासाद, हर्म्य, अट्ट, सौध, अगार, अग्निशाळा, यज्ञशाळा या शब्दांवरून घरें, वाडे, मंदिरें, हवेल्या असे सर्व प्रकार त्यावेळीं होते. पर्यङ्क म्हणजे पलंग, तल्प म्हणजे गादी, उपबर्हण म्ह. उशी, धवित्र म्ह. पंखे, या वस्तूंचा उपयोग श्रीमंतांच्या घरामध्यें होत असे. रथ्या म्हणजे रस्ता, अंतःपन्था म्हणजे भुयारांतील मार्ग, सेतु म्ह. पूल, खनन, खनित्र, रथकार, तक्षा, सुशिल्प, ऋभु, कारी, क्षत्ता, अनुक्षत्ता, अभिक्षत्ता (खोदकाम करणारे), अयस्ताप (लोहार) या शब्दांवरून विविध प्रकारच्या कारागिरांचा बोध होतो. त्यावेळीं सर्व वाहनांमध्यें रथाची आवड अधिक होती. हिरण्यरथ, विद्युद्रथ, अश्वरथ, सप्ताश्वरथ, सप्तचक्ररथ हे शब्द निरनिराळ्या प्रकारच्या रथांचे निदर्शक आहेत. परशु, खड्ग, सूची, आयुध, सुआयुध, उग्रायुध, तिग्मायुध इत्यादि आयुधवाचक शब्द त्यांतील तरतमभाव दर्शवितात. धनु, इषु, तीक्ष्णेषु इत्यादि शब्दांवरून धनुर्वेदाच्या प्रगतीचा बोध होतो. वैदिक कालचे शुक्रवासाः, सुवासाः, दुर्वासाः, रंजयिता, उष्णीष (पागोटें), सामूल (लोकरीचें वस्त्र), परिधान (उपरणें), पांडव (शुभ्र वस्त्र), ऊर्णा (लोकर) असे वस्त्रांविषयीं उल्लेख आहेत. ("ऊर्णासूत्रेण कवयो वयंति" यजु. १९।८० ) आहन, उदंचन, कद्रु, पिशिल, द्रोण, कलश, रजतपात्र हे शब्द वेदकालीं

कोणकोणत्या तऱ्हेचीं भांडीं असावींत, हें सुचवितात. अयस्, रजत, चंद्र, सीस, सुवर्ण, हिरण्य हे शब्द धातूंची कल्पना देतात. हिरण्यमणि, हिरण्यबाहु, हिरण्यस्रक्, हिरण्यशृंग, कर्णशोभन, कुरीर (शीर्षालंकार) या शब्दांवरून तत्कालीन अलंकारांचा बोध होतो. वीणा, नादी, तूणव, करकरी हे शब्द वाद्यवाचक आहेत. वर्म, कवच, हस्तघ्न, दुंदुभि, उपानह, रज्जु, तंतु इत्यादि शब्दांवरून कातड्याचे पदार्थ कोणकोणते असावेत हें दिसतें. वेदकाळीं व्रीहि, यव, माष, तिल, मुद्ग, प्रियंगु, श्यामाक, नीवार, गोधूम इत्यादि धान्यें होतीं व त्यांचे विविध पदार्थ करीत असत. घृतौदन, दध्योदन, पायस, पृषदाज्य, आमिक्षा इत्यादि शब्दांवरून त्यावेळीं दुधातुपाची कशी रेलचेल होती याची कल्पना येते. घरांत मुली धार काढीत व या दुहिता धारोष्ण दूध सर्वांना देत व स्वतः पीत असत.

(५२) **स्त्रियांचें समाजांत स्थानः**—वैदिक धर्मांत गृहस्थाश्रम हा मुख्य आश्रम मानलेला आहे. त्यामुळें स्त्रीविषयीं फारच उच्च विचार वेदांमध्यें आहेत. स्त्रीच्या उत्पत्तिविषयीं मोठी मजेदार आख्यायिका दिली आहे. " प्रारंभीं परब्रह्म हें एकटें होतें. त्याला चैन पडेना म्हणून सोबतीला दुसरें कोणीतरी हवें असें त्याला वाटलें. नंतर तें परब्रह्म स्वतः एका जुळलेल्या स्त्रीपुरुषांच्या जोडप्याच्या आकाराचें झालें. त्यानें त्याचे दोन भाग केले. तेच स्त्री व पुरुष आणि पत्नी व पति हे होत. जो भाग पुरुषाकडून भरला जात नाहीं तो स्त्री भरते व अशा दृष्टीनें स्त्री व पुरुष मिळून प्रजा उत्पन्न होते." ( बृ. आ. ब्रा. १ ब्रा, ४० ). येथें स्त्रीपुरुष हे दोघें बरोबरीचे आहेत, त्या दोघांची उत्पत्तीहि एकदम बरोबरच झाली असें सांगितलें आहे.

स्त्रीवांचून पुरुष पूर्ण नाहीं व पुरुषावांचून स्त्री पूर्ण नाहीं. हीं दोघें एकमेकांचीं पूरक अतएव तुल्यबल होत. 'अर्धो वा एष आत्मनः यत् पत्नी' ( तै. सं. ६।१।८ ). पत्नी ही जणुं काय पुरुषाचें अर्धें शरीर आहे.

आत्मा हाच पुत्र होय. जी पुत्ररूपानें पत्नीला जन्म देते ती जाया होय. पति गर्भरूपानें जायेमध्यें प्रविष्ट होतो व पुन्हां नवीन स्वरूपानें तो दहाव्या महिन्यांत जन्माला येतो. पति हा गर्भरूपानें पत्नीला माता करतो व पतीला जन्म देणारी म्हणून ती जाया, असें उत्कृष्ट तत्त्व वेदांत सांगितलेलें आहे.

'स वै नैव रेमे तस्मादेकाकी न रमते स द्वितीयमैच्छत स हैतावानास यथा स्त्रीपुमांसौ संपरिष्वक्तौ स इममेवात्मानं द्वेधा पातयत्ततः पतिश्च पत्नीचाभवतां तस्मादिदमर्धं बृगलमिवस्व इति ह स्माह याज्ञवल्क्यस्तस्मादयमाकाशः स्त्रिया पूर्यत एव तां समभवत्ततो मनुष्या अजायन्त ॥' बृ. दा. अ. १ ब्रा. ४०.

'अर्धो ह वा एष आत्मनस्तस्माद्यज्जायां न विंदते नैतावत् प्रजायते असर्वो हि तावद्भवति अथ यदैवं जायां विंदतेऽथ प्रजायते तर्हि सर्वो भवति' –वाजसनेय ब्राह्मण.

'आत्मा वै पुत्र नामासि इति । जायायास्तदेव जायात्वं यतोऽस्यां पतिः पुनर्जायते ॥ तथाच बव्हृच ब्राह्मणम् पतिर्जायां प्रविशति गर्भो भूत्वेह मातरम् । तस्यां पुनर्नवो भूत्वा दशमे मासि जायते ॥ तज्जाया जाया भवति यदस्यां जायते पुनः ॥

(५४) **गृहपत्नीचे अधिकारः**—स्त्रीविषयीं इतके उच्च विचार अन्यत्र दुर्मिळ आहेत. गृहपत्नी, गृहिणी या नात्यानें तिचे अधिकार किती आहेत, हें पहाण्यासारखें आहे. विवाहामध्यें गृहप्रवेश झाल्यावर जे मंत्र म्हणतात त्यांवरून गृहिणीच्या अधिकाराची कल्पना येते. 'पत्नी हि सर्वस्य मित्रं' असें तैत्तिरीय संहितेमध्यें (६–२–९) वाक्य आलेलें आहे. पत्नी ही घरांतील सर्वांची मित्र असते. नवरा, दीर, सासू, सासरा, अतिथी, अभ्यागत, आप्तेष्ट या सर्वांचा परामर्श घेणें, सर्वांकरितां तन आणि मन झिजविणें हें मित्रभावनेशिवाय शक्य आहे काय? गृहिणी ही घरांतील सर्व वस्तूंची काळजी घेणारी, टापटिपीची, सदा हंसतमुख आणि सर्व कामें उत्साहानें करणारी असें वर्णन तैत्तिरीय संहिते (६–२–१) मध्यें आलेलें आहे. 'पत्नी हि पारीणह्यस्येशे ।'

वधूनें वरगृहांत प्रवेश केल्यानंतर तिला पुढील संदेश आजसुद्धां समजून देण्याजोगा आहे. 'हे स्त्रिये, तूं घरांतील सर्व माणसांना, पशुपक्ष्यांना, आप्तेष्टांना, घरांतील सर्व वस्तूंना व स्थानांना कल्याणकारक होऊन तूं घरांत ये. येथें तुझी संतती वाढो. गृहकृत्यांत तूं जागरुक राहा. पतीच्या संगतीनें शरीरसौख्य प्राप्त करून घे. ज्ञानवान होऊन सभेमध्यें भाषण कर. मनाची

प्रसन्नता, संतति, सौभाग्य, ऐश्वर्य, द्रव्य यांची इच्छा करणारी, पतीला अनुकूल कर्में करणारी आणि इंद्राच्या सुखाशीं स्पर्धा करणारी अशी तूं हो. बलवान् समुद्रानें जसें नद्यांकरितां साम्राज्य उत्पन्न केलें, त्याप्रमाणें तूं पतीच्या घरीं जाऊन त्या सम्राटाची पट्टराणी हो. सासरा, दीर, नणंद, सासू यांच्यामध्यें राहून त्यांना सुख देणारी तूं सम्राज्ञी हो. हे स्त्रिये, उत्तम भाग्याच्या प्राप्तीकरितां ( पति म्हणतो ) मी तुझें पाणिग्रहण करीत आहे. मज पतिबरोबर तूं पूर्ण वृद्धावस्थेपर्यंत राहा. भाग्यवान्, श्रेष्ठ अशा देवतांनीं तुला माझीं, गृहपतीचीं कर्तव्यें पार पाडण्याकरितां दिलेलें आहे. हे स्त्रिये, तूं उत्तम मांगल्य करणारी, गृहांत स्वच्छता, टापटीप, व्यवस्था ठेवून त्याचें ऐश्वर्य वाढविणारी, पतीची सेवा करणारी, सासू सासरा व घरांतील इतर माणसें यांना सुख देणारी अशी होऊन या घरांत प्रविष्ट हो. तूं प्रसन्न मनानें शय्येवर चढ व आपल्या पतीकरितां प्रजा उत्पन्न कर. इंद्राच्या इंद्रायणीप्रमाणें ज्ञानयुक्त होऊन प्रकाश देणारी अशी तूं हो. शंभर वर्षांच्या आयुष्याकरितां उत्तम ज्ञानसंपन्न होऊन गृहस्वामिनी होऊन सुखानें राहा. सर्वांचा प्रेरक असा श्रीसविता तुझें कल्याण करो.

अथर्ववेदांतील ज्या मंत्रांमध्यें गृहपत्नीला तिच्या कर्तव्याचा व अधिकाराचा वरील संदेश दिलेला आहे ते मंत्र पुढीलप्रमाणें आहेतः—

शिवा भव पुरुषेभ्यो गोभ्यो अश्वेभ्यः शिवा ।
शिवास्मै सर्वस्मै क्षेत्राय शिवा न इहैधि ॥ ३।२८।३
इह प्रियं प्रजायै ते समृध्यतामस्मिन् गृहे ।
गार्हपत्याय जागृहि एना पत्या तन्वंसं ॥
स्पृशस्वाथ जिर्विविदथ मा वदासि ॥ १४।१।२१
आशासाना सौमनसं प्रजां सौभाग्यं रयिम् ।
पत्युरनुव्रता भूत्वा संनह्यस्वामृताय कम् ॥ १४।१।४१
यथा सिंधुर्नदीनां साम्राज्यं सुषुवे वृषा ।
एवा त्वं सम्राज्ञ्येधि पत्युरस्तं परेत्य ॥ १४।१।४२
सम्राज्ञ्येधि श्वशुरेषु सम्राज्ञ्युत देवृषु ।
ननान्दुः सम्राज्ञ्येधि सम्राज्ञ्युत श्वश्र्वाः ॥ १४।१।४४.

गृह्णामि ते सौभगत्वाय हस्तं मया पत्या जरदष्टिर्यथासः। भगो अर्यमा सविता पुरंधिर्मह्यं त्वा दुर्गार्हपत्याय देवाः ॥ १४।१।५०.

सुमंगली प्रतरणी गृहाणां सुशेवा पत्ये श्वशुराय शंभूः । स्योना श्वश्वै प्रगृहान् विशेमान् ॥ १४।२।२६.

आरोहतल्पं सुमनस्यमानेह प्रजां जनय पत्ये असौ । इंद्राणीव सुबुधा बुध्यमाना ज्योतिरग्रा उषसः प्रतिजागरासि ॥ १४।२।३१.

प्रबुध्यस्व सुबुधा बुध्यमाना दीर्घायुत्वाय शतशारदाय। गृहान् गच्छ गृहपत्नी यथा सो दीर्घं त आयुः सविता कृणोतु ॥ १४।२।७५

(५५) स्त्रियांच्या आकांक्षाः—वेदांमध्यें स्त्रियांच्या ज्या ठिकठिकाणीं प्रार्थना आहेत, त्यांचा सारांश पुढीलप्रमाणें देतां येईलः—'इंद्राणीप्रमाणें मी सौभाग्यसंपन्न व्हावें. अदितीप्रमाणें सुपुत्रांची माता मी व्हावें. माझे पुत्र शत्रूंचा संहार करणारे असे व्हावेत. माझी मुलगी गृहिणीपदाला योग्य व्हावी. आणि मी स्वतः सर्व कार्यांत जयशाली, भाग्यशाली व वीर्यशाली असावें.'

वैदिकसंस्कृति गृहस्थप्रधान आहे. गृहस्थाश्रमापासून धर्माचरणाला प्रारंभ होतो; म्हणून नमुनेदार घर असावें. गृहिणी दक्ष असावी तरच गृहरक्षण व गृहशिक्षण होतें. नमुनेदार गृह कसें असावें, हें पुढील मंत्रांत सांगितलें आहेः—

अनुव्रतः पितुः पुत्रो मात्रा भवतु संमनाः ।
जाया पत्ये मधुमतीं वाचं वदतु शन्तिवाम् ॥ अथर्व. ३।३०।२

भावार्थः—"वडिलांचें अपूर्ण राहिलेलें कार्य मुलानें पूर्ण करावें व मुलानें आईशीं मनमिळाऊपणानें वागावें. पत्नीनें पतीशीं मधुर व शांत भाषण करावें."

वेदकालीन आर्यांच्या स्वभावाला पोषक अशा सर्व वृत्ति स्त्रियांमध्यें दिसतात. कुटुंबांतील प्रत्येक गृहिणी पुढील मंत्रांत सांगितलेल्या ध्येयाची असेः—

मम पुत्राः शत्रुहणोऽथो मे दुहिता विराट् ।
उताहमस्मि संजया पत्यौ मे श्लोक उत्तमः ॥ ऋ. १०।१५९।३

भावार्थः—"माझे मुलगे शत्रूंचा निःपात करणारे होवोत. माझी मुलगी विशेष तेजस्वी व्हावी, आणि मी उत्तम विजयशाली व्हावें. तसेंच माझ्या पतीला उत्तम कीर्ति मिळावी."

**(५६) स्त्रियांचें शिक्षणः**—वेदकालीन स्त्रियांचें शिक्षण सर्वांगीण होतें. स्त्रियांनीं शिकूं नये, त्या निरक्षर असाव्या या कल्पना अवैदिक आहेत. चारी वेदांचे मंत्र रचणारे मंत्रद्रष्टे जसे ऋषी होते, त्याप्रमाणें वेदांतील सूक्तें रचणाऱ्या जवळ जवळ वीस पंचवीस स्त्रीऋषिका होत्या. (१) रोमशा, ऋ. मंडल, १ सूक्त १२६ (२) लोपामुद्रा, मं. १ सू. १७९. (३) ममता, मं. ६ सू. १० (४) अपाला, मं. ८ सू. ९१ (५) घोषा, मं. १० सू. ३९।४० (६) अदिति, मं. १० सू. ६० (७) श्रद्धा, मं. १० सू. १५१ (८) इंद्रमाता, मं. १. सू. १५३ (९) यमी, मं. १ सू. १५४. याप्रमाणें वीस पंचवीस स्त्री-ऋषिकांची माहिती देतां येईल. गार्गि, वाचक्नवी, मैत्रेयी यांसारख्या ब्रह्मवादिनी स्त्रिया ब्रह्मवेत्त्यांशीं बरोबरीच्या नात्यानें जशा चर्चा करणाऱ्या होत्या, तशाच विश्पला, मुद्गलानी इत्यादि स्त्रिया आपल्या पतीबरोबर शत्रूशीं लढतहि होत्या! खेल राजाचें शत्रूबरोबर युद्ध चाललें होतें. त्यांत त्याचा पराभव होऊं लागला तेव्हां त्याची राणी विश्पला इनें सैन्याचें पुढारीपण घेतलें, व शत्रूबरोबर भयंकर युद्ध दिलें. त्यांत विश्पलेची जांघ तुटली, त्यावेळीं राजवैद्यांनीं लोखंडाची जांघ करून बसविली. 'जंघां विश्पलाया अधत्तं' ॥ (ऋ. १।११८।८). नंतर तिनें पुन्हा युद्ध करून शत्रूचा पराभव केला. युरोपमध्यें जशी 'जोन ऑफ आर्क' तशी वेदकालीं विश्पला ही पराक्रमानें चमकत होती; विश्पलेप्रमाणें मुद्गलपत्नी मुद्गलानी हीसुद्धां महापराक्रमी होती. हिनेंहि आपल्या पतीचें दरोडे-खोरांपासून रक्षण केलें होतें. दरोडेखोरांनीं त्यांच्या गायी चोरून नेल्या व तिच्या नवऱ्याला बांधून एकीकडे टाकलें. त्यावेळीं मुद्गलानीनें रथांतून, पतीच्या धनुष्यबाणांनीं शत्रूंशीं युद्ध केलें व त्यांचा पराभव करून पतीला व गायींना सोडवून आणलें. (ऋ. मं. १० सू. १०२)

**(५७) स्त्रियांचें कलाकौशल्यः**—" जायेव पत्य उशती सुवासाः " असें (ऋग्वेद ४।३।२) वर्णन आहे. त्यावरून स्त्रिया उत्कृष्ट तऱ्हेचीं व तलम वस्त्रें प्रसंगविशेषीं नेसत; " सुभगे कांपीलवासिनी " (तै. सं. अ. ६) या वाक्यावरूनहि तेंच सिद्ध होतें. सुकपर्दा, सुकुरीरा, स्वौपशा अशीं तै. सं., ४।१।५ येथें विशेषणें आलेलीं आहेत. त्यांचा विचार केल्यास स्त्रिया वेणी घालीत, कधीं केस पिळून बुचडा घालीत व कधीं केशकला-

पाची रचना अत्यंत मनोहर टापटिपीनें करीत असाव्या. "यथा ह वै योषा सुवर्णं हिरण्यं पेशलं बिभ्रती रूपाण्यास्ते" असें तै. ब्रा. (३।३।५) म्हटलें आहे. त्यावरून स्त्री शक्त्यनुसार सुवर्णाचे अलंकार धारण करी, ती आपली राहाणी व्यवस्थित टापटिपीची ठेवी असें दिसतें. श्रीमंतांच्या स्त्रियांचा उल्लेख शतपथ ब्राह्मणांत (१३।४।१) आलेला आहे. तो पाहिला म्हणजे त्यांच्या अलंकारांची व थाटामाटाच्या राहाणीची कल्पना येते.

सूच्च्या अच्छिद्य मानया सीव्यतु ।
पेशस्वति तंतुना संव्ययन्ति ।

या उल्लेखावरून स्त्रिया शिवणकाम व विणकाम या कला जाणत होत्या असें म्हणतां येतें. "पत्न्य उपगायन्ति" तै. सं. (७।५।७) "पत्न्यश्च काण्डवीणा" ऐतरेय आरण्यक (५।१।५), या वाक्यावरून व ताण्डव ब्राह्मणांतील आपघाटिला नामक वाद्याच्या उल्लेखावरून यज्ञपत्न्या सामगान करणाऱ्या ऋत्विजांची साथ करीत, अलगुजासारखें सुषिर वाद्य तोंडानें वाजवीत व विण्यासारख्या तंतुवाद्यामध्येंहि त्या कुशल असत, असें म्हणण्यास आधार मिळतो. स्त्रियांच्या ठिकाणीं गृहिणीकर्मातील नैपुण्य, कलांतील अभिज्ञता व युद्धांतील शौर्य हीं सर्व असूनहि त्या अत्यंत विनयशील असत. "स्नुषा श्वशुरा लज्जमाना निलीयमानैति" असें वर्णन ऐतरेय ब्राह्मणांत आहे. सासुरवासिनी या वडील माणसांपुढें विनयानें वागत व पदर सावरून बाजूला होत. तात्पर्य वैदिक स्त्रिया विद्या व शिक्षण यांनीं पूर्ण असतांना "विद्या ददाति विनयं" हें तत्त्व त्यांच्या हाडींमाशीं खिळलेलें होतें. यज्ञामध्यें यज्ञपत्नी या नात्यानें स्त्रियांना बराच मान असे. त्या मोकळ्या मनानें वावरत असत, यज्ञप्रसंगीं त्या तत्त्वज्ञानाची चर्चा करीत व उत्सवामध्यें भाग घेत आणि आनंदानें कालक्रमणा करीत. स्त्रियांची योग्यता पुरुषाबरोबर मानली जाई, किंबहुना त्यांचे हक्क "अर्धं भार्या मनुष्यस्य" या नात्यानें पुरुषांच्या बरोबरीचे असत. आर्यांच्या पत्न्यांचा स्वभाव आनंदी, राहणी साधी व वृत्ति निर्भय असे. आर्य हे स्वभावानें प्रागतिक, पवित्र व निग्रही होते. तशाच आर्यस्त्रियाहि होत्या. आर्यांच्या घरांत सुगृहिणीचें महत्त्व फार असे. गृहिणी म्हणजेच घर अशी समजूत होती. या

गृहिणी गृहकृत्यांत दक्ष असत. त्या शाकान्न व मांसान्न सिद्ध करीत. घरांत दूधदुभतें पुष्कळ असे. दूध काढणें हें मुलींचें मोठें काम समजलें जाई.

(५८) **ईश्वरः**—वेदामध्यें इंद्र, वरुण, अग्नि, मरुत, सोम, सूर्य अशा अनेक देवता आलेल्या आहेत. ऋग्वेदांतील मुख्य देव इंद्र व अग्नि हे होत. विष्णूचाहि उल्लेख पुढें आलेला आहे. तथापि निर्गुण, निराकार, सर्वज्ञ, सर्वशक्तिमान, सर्वाधार, विश्वतोमुख अशी एक शक्ति असावी अशा निश्चित विचाराचे पुष्कळ मंत्र आहेत, त्यांतील कांहीं देतों:—

सहस्रशीर्षा पुरुषः सहस्राक्षः सहस्रपात् ।
स भूमिं विश्वतो वृत्वात्यतिष्ठद्दशाङ्गुलम् ।। ऋग्वेद १०।९०
विश्वतश्चक्षुरुत विश्वतो मुखो विश्वतोबाहुरुत विश्वतस्पात् ।
सं बाहुभ्यां धमति सं पतत्रैर्द्यावाभूमी जनयन्देव एकः ।।
(ऋग्वेद १०।८१।३)

यो भूतं च भव्यं च सर्वं यश्चाधितिष्ठति ।
स्वर्यस्य च केवलं तस्मै ज्येष्ठाय ब्रह्मणे नमः।। (अथर्ववेद १०।८।१)
यत्रादित्याश्च रुद्राश्च वसवश्च समाहिताः ।
भूतं च यत्र भव्यं च सर्वे लोकाः प्रतिष्ठिताः ।
स्कम्भं तं ब्रूहि कतमः स्विदेव सः ।। अथर्व. १०।७।२२
हिरण्यगर्भः समवर्तताग्रे भूतस्य जातः पतिरेक आसीत् ।
स दाधार पृथिवीं द्यामुतेमां कस्मै देवाय हविषा विधेम ।।
( ऋग्वेद १०।१२१।१ )

यः प्राणतो निमिषतो महित्वैक इद्राजा जगतो बभूव ।
य ईशे अस्य द्विपदश्चतुष्पदः कस्मै देवाय हविषा विधेम ।।
( ऋग्वेद १०।१२१।३ )

एषो ह देवः प्रदिशोऽनु सर्वाः पूर्वो ह जातः स उ गर्भे अंतः ।
स एव जातः स जनिष्यमाणः प्रत्यङ् जनास्तिष्ठति सर्वतोमुखः ।
( वा. सं. ३२।४)

स नः पिता जनिता स उत बन्धुर्धामानि वेद भुवनानि विश्वा ।
यो देवानां नामधा एक एव तं संप्रश्नं भुवना यन्ति सर्वा ॥

( अथर्ववेद २।१।३ )

भावार्थः—हजारों मस्तकें, हजारों डोळे आणि हजारों पाय यांनीं युक्त असा हा परमेश्वर आहे. त्यानें या पृथ्वीला सर्व बाजूंनीं व्यापलें असून, त्याचेहिपलीकडे तो उरलेला आहे. ज्याचे सर्व बाजूला डोळे, ज्याचीं सर्व बाजूला मुखें, ज्याचे सर्व बाजूला हात व पाय आहेत, असा हा एकच देव आपल्या बाहूंनीं व पायांनीं सर्वत्र गति उत्पन्न करितो. आकाशापासून पृथ्वीपर्यंतचें सर्व विश्व उत्तम रीतीनें त्यानेंच उत्पन्न केलें आहे. जो भूत, वर्तमान व भविष्यकालीन सर्व वस्तुमात्रावर अधिकार चालवितो व ज्याचा केवल प्रकाशच स्वर्गसुख देणारा आहे, त्या श्रेष्ठ ब्रह्माला नमस्कार असो. ज्यामध्यें आदित्य, रुद्र व वसु मिळून राहिलेले आहेत; व ज्यामध्यें भूतकाळचे व भविष्यकाळचे सर्व लोकलोकांतर राहिले आहेत, तोच सर्वांचा आधारस्तंभ आहे व तोच खरा आनंदकंद आहे. जो सुवर्णा-प्रमाणें तेजस्वितेनें सृष्टीच्या पूर्वींपासून चमकत आहे, जो सर्व भूतमात्रांचा स्वामी आहे व जो पृथ्वी व द्युलोक यांचा आधार आहे, त्या एका ईश्वराला सोडून मनुष्यानें (आम्हीं) दुसऱ्या कोणत्या देवाची पूजा करावी बरें? जो आपल्या मोठ्या शक्तीमुळें सजीव व हालचाल करणाऱ्या जगताचा एकच अधिपति झाला आहे व या जगांतील द्विपाद व चतुष्पादांवर ज्याचें स्वामित्व, त्याला सोडून दुसऱ्या कोणत्या देवाची मानवांनीं (आम्हीं) पूजा करावी बरें? हा एक देव सर्व दिशा व उपदिशांमध्यें व्यापलेला आहे. तोच पूर्वींपासून आहे व तोच गर्भामध्यें येत असतो. भूतकालीं झालेले पदार्थहि तोच आहे व भविष्यकालीं होणार असलेले पदार्थहि तोच आहे. हे मनुष्यहो, सर्व बाजूंना जीं तोंडें दिसत आहेत तीं सहस्रावधि मुखें त्याचींच आहेत. असा तो तुमच्यासमोर उपस्थित झालेला आहे. "तो आम्हां सर्वांचा पिता—रक्षक—आहे, तोच सर्वांचा जनक—उत्पादक—आहे, तोच सर्वांचा बन्धु आहे व तोच सर्व भुवनांना जाणत आहे. सर्व देवतांचीं नांवेंहि तोच धारण करतो. अशा देवाला जो जाणतो त्याला सर्व भुवनें प्राप्त होतात.

उपरि निर्दिष्ट ईश्वराचें ज्ञान, जो निश्चयानें करून घेत असतो त्याला ईश्वर व अन्य देव हे आयुष्य, कीर्ति, प्रजा इत्यादि सर्व देतात अशी फलश्रुति पुढील मंत्रांत सांगितली आहेः—

**यो वै तां ब्रह्मणो वेदामृतेनावृतां पुरीम् ।**
**तस्मै ब्रह्म च ब्रह्मा च आयुः कीर्तिं प्रजां ददुः ॥**

(तै. आ. १।२०।३)

ईश्वराचे ठिकाणीं कोणकोणत्या शक्ति आहेत, त्या मिळाव्या म्हणून उपासक कशी प्रार्थना करितो हें पुढील मंत्रावरून चांगलें समजून येईलः—

**तेजोऽसि तेजो मयि धेहि । वीर्यमसि वीर्यं मयि धेहि ॥**
**बलमसि बलं मयि धेहि । ओजोऽसि ओजो मयि धेहि ॥**
**मन्युरसि मन्युं मयि धेयि । सहोऽसि सहो मयि धेहि ॥**

हे ईश्वरा, तेज, वीर्य, बल, ओज (प्रतिभा), उत्साह आणि या सर्वांना पोषक अशा शक्ति तुजजवळ आहेत, त्या तूं माझ्या ठिकाणीं स्थिर कर.

येथवर दिलेल्या वेदांतील उताऱ्यांवरून वैदिक आर्य हे मोठे कर्मयोगी, उत्साही, उद्योगी, तेजस्वी, तपस्वी, जयस्वी, आक्रमणशील, वर्धिष्णु व प्रभविष्णु अशा वृत्तीचे दिसतात. जगांतील उपभोग्य वस्तूंचे उपभोग ते घेत असत. वीरपुत्र, दमदार घोडे, बळकट जनावरें, दुधाळ गायी, स्वर्गसुख, कुलीन, सुगृहिणी व सुंदर स्त्रिया इत्यादींची याचना ते देवतांजवळ करीत असत. आर्यांच्या या आक्रमणशील वृत्तीनेंच त्यांनीं उत्तरध्रुवापर्यंत आपले झेंडे फडकावले. वेदकालीन आर्यांचें आर्यावर्त हेंच मुख्य मूलस्थान होय. तेथूनच ते सर्व जगभर विजिगीषु वृत्तीनें पसरले.

—*—

प्रकरण तिसरें

# उपनिषदांतील ब्रह्मविद्या

(५९) **उपनिषदांतील अध्यात्मः**—वैदिक वाङ्मयांतील उदात्त नि उच्च विचारांचा भाग म्हणजे उपनिषदें होत. मनुष्याला मानसिक नि अध्यात्मिक शांतीशिवाय खरें सुख मिळत नाहीं. सुखाचें साधन मनुष्या-जवळच आहे. विषय, वित्त, व लौकिक यांपासून माणसाला कितीहि सुख झालें, तरी त्याचा वीट येतो व तेंहि नकोसें वाटतें. ऐहिक विषयाच्या पलीकडे पूर्ण शांतीचा कांहीं विषय असावा अशी जिज्ञासा माणसामध्यें उत्पन्न होते. कारण जगांतील सर्व द्रव्य आणि उपभोग्य वस्तु एकाच माणसाला मिळाल्या तरी त्यामुळें तो सुखी होऊं शकेलच असें नाहीं. त्यापलीकडे निर्विषय सुखाची इच्छा मनुष्याला होते. तें सुख शोधतां शोधतां त्याची सहजच अध्यात्माकडे प्रवृत्ति होते. ही अध्यात्मविद्या उपनिषदामध्यें आहे. जगांतील कोणत्याहि वाङ्मयांत नसलेली अशी ही श्रेष्ठ विद्या उपनिषदामध्यें आहे.

(६०) **जगापलीकडील वस्तूचा शोधः**—ऐहिक जगांतील सर्व सुखें पूर्णपणें मिळाल्यावर जगापलीकडील वस्तु शोधण्याचा मनुष्याचा स्वभाव आहे. आधीं प्रपंच मग परमार्थ, आधीं पोटोबा मग विठोबा, या म्हणींतहि तोच अर्थ आहे. ऋग्वेद संहितेमध्यें तत्त्वज्ञानाचे विचार मधून मधून बरेच आले असले, तथापि ब्राह्मण ग्रंथांमध्यें तत्त्वज्ञानाचा विचार बाहुल्यानें आलेला आहे. नासदीय सूक्त, हिरण्यगर्भसूक्त, व पुरुषसूक्त यांमध्यें आणि इतरत्रहि वेदांत सत्, असत्, अमृत, मृत्यु, ऋत, सत्य, विराट, हिरण्यगर्भ, तमस, ज्योति, असे तत्त्वज्ञानसंबद्ध विषय आलेले आहेत. उपनिषदामध्यें तत्त्वविचार प्रधान आहे. अनेक विद्वानांचे मतें भारतीय युद्धानंतर उप-निषदांची रचना झाली असें सिद्ध झालें आहे. कारण भारतीय युद्धानंतरच पारमार्थिक विचारांची उचल अधिक झाली. कर्माचें महत्त्व कमी झालें व उपासना व ज्ञान यांचें महत्त्व वाढलें. ऋषींप्रमाणें राजेहि तत्त्वज्ञानाच्या

गूढ चर्चा करूं लागले, आणि आपले शोधहि मांडूं लागले. या चर्चेंतील अग्रगण्य नायक म्हणजे जनक व याज्ञवल्क्य होत. याशिवाय शांडिल्य, सत्यकाम, जाबाल, गार्ग्यायण, उद्दालक, श्वेतकेतु, भारद्वाज, नचिकेतस् इत्यादि तत्त्ववेत्त्यांचीं नांवेंहि उपनिषदांमध्यें आलेलीं आहेत.

**(६१) उपनिषदांतील चर्चाः**—कर्म, उपासना व ज्ञान असे वेदाचे तीन भाग पडतात. ज्ञानभाग उपनिषदांमध्यें आहे. फक्त अपवाद म्हणून एकच 'ईशावास्योपनिषद्' हें संहितेंतील असून अन्य ब्राह्मण ग्रंथांतील आहेत. उपनिषदांत जीव, जगत्, ब्रह्म, यांचा विचार सोप्या, साध्या, सरळ, बाळबोध भाषेंत आणि प्रश्नोत्तर रूपानें केलेला आहे. उपनिषदांत प्रवृत्तीचे व निवृत्तीचे विचार आढळतात. कोणी ज्ञानाचा, तर कोणी कर्माचा, तर कोणी ज्ञान व कर्म यांच्या समुच्चयाचा पुरस्कार केलेला आहे. जनकासारख्या तत्त्वज्ञानेच्छु क्षत्रिय राजानें एतदर्थ अनेक सभा भरविल्याचे उल्लेख आहेत. राजर्षि जनक व ब्रह्मर्षि याज्ञवल्क्य यांनीं पुष्कळ ब्रह्मचर्चा केली आहे. जगांत व जगाबाहेर सर्वांतर्यामीं सर्वज्ञ, सर्वशक्तिमान असें एक तत्त्व आहे; त्याला जाणणें हें मनुष्याचें कर्तव्य आहे. ज्ञानानें जीवात्मा परमात्म्यांत विलीन होतो, हाच त्याचा मोक्ष होय; असें या तत्त्वचर्चेचें थोडक्यांत सार आहे.

**(६२) नासदीय सूक्ताचें श्रेष्ठत्वः**—भरतखंडांत अध्यात्मज्ञानाचा प्रादुर्भाव फार प्राचीन काळीं झाला असें ऋग्वेदांतील नासदीय सूक्तावरून म्हणतां येतें. यासारखा प्रगल्भ, स्वतंत्र, मुळाला हात घालणारा, अध्यात्म विचारानें भरलेला इतका प्राचीन लेख जगांत उपलब्ध नाहीं. सृष्टीचें अगम्य मूलतत्त्व काय, याची चर्चा करणारें हें नासदीय सूक्त सर्व उपनिषदांचें उपनिषद् आहे. यावरून उपनिषदापूर्वीं वैदिक तत्त्वज्ञान किती उच्च दर्जाला पोंचलें होतें, हें समजतें. वैदिक तत्त्वज्ञान हें साक्षात् सांहितिक तत्त्वज्ञान व वेदांत तत्त्वज्ञान हें औपनिषद् तत्त्वज्ञान असल्यामुळें या दोहोंना जोडणारा मधला दुवा ईशावास्योपनिषद् हा होय. कारण तो एका बाजूनें संहितेंतील शेवटचा अध्याय आहे, तर दुसऱ्या बाजूनें उपनिषदांतील पहिलें उपनिषद् आहे. अशा ईशावास्याच्या पलीकडच्या नासदीय सूक्तांतील विषय अवलोकन केल्यावांचून वेदांत–तत्त्वज्ञानाचा





काय, पण जगांतील कोणत्याहि तत्त्वज्ञानाचा उलगडा नीट होणार नाहीं. यास्तव वैदिक तत्त्वज्ञानाला भूषणभूत असलेलें हें आद्य सूक्त तत्त्वज्ञानाचा एक नमुना म्हणून येथें भाषांतरासह देतों.

**नासदासीन्नो सदासीत्तदानीं नासीद्रजो नो व्योमा परो यत् ।**
**किमावरीवः कुह कस्य शर्मन्नम्भः किमासीद्गहनं गभीरम् ॥१॥**

—नासदीय सूक्त ( ऋ. मं. १०।१२९)

**भावार्थः**—तेव्हां म्हणजे मूळारंभीं असत् नव्हतें आणि सत्‌हि नव्हतें। अंतरिक्ष नव्हतें आणि त्या पलीकडचें जें आकाश तेंहि नव्हतें ! ( अशा स्थितींत ) कोणी (कोणाला) आवरण घातलें !(म्हणावें) ? कोठें ? कोणाच्या सुखासाठीं ? अगाध व गहन पाणी (तरी) होतें काय ?

**न मृत्युरासीदमृतं न तर्हि न रात्र्या अह्न आसीत्प्रकेतः !**
**आनीदवातं स्वधया तदेकं तस्माद्धान्यन्न परः किंचनाऽऽस ॥२॥**

**भावार्थः**—तेव्हां मृत्यु म्ह. मृत्युग्रस्त नाशवंत दृश्य सृष्टि नव्हती, व ( दुसरा ) अमृत म्ह. अविनाशी नित्य पदार्थ ( हा भेद )हि नव्हता. तसेंच रात्र आणि दिवस यांचा भेद कळण्यास कांहीं साधन ( प्रकेत ) नव्हतें. ( जें काय होतें ) तें एकलें एकच स्वधेनें म्ह. आपल्या शक्तीनें वायूशिवाय श्वासोच्छ्वास करीत म्ह. स्फुरत होतें. त्याखेरीज किंवा त्यापलीकडे दुसरें असें कांहींच नव्हतें.

**तमः आसीत्तमसा गूढमग्रेऽप्रकेतं सलिलं सर्वत्रा इदम् ।**
**तुच्छेनाभ्वपिहितं यदासीत् तपसस्तन्महिनाऽजायतैकम् ॥३॥**

**भावार्थः**—अंधकार होता, आरंभीं हें सर्व अंधकारानें व्याप्त (आणि) भेदाभेदविरहित पाणी होतें, (किंवा) आभु म्हणजे सर्वव्यापी ब्रह्म (आरंभींच) तुच्छानें म्हणजे फोल मायेनें आच्छादिलेलें होतें, असें (यत्) जें (म्हणतात), तें (तत्) मूळ एक (ब्रह्मच) तपाच्या महिम्यानें (रूपांतरानें पुढें) प्रकट झालेलें होतें.

**कामस्तदग्रे समवर्तताधि मनसो रेतः प्रथमं यदासीत् ।**
**सतो बन्धुमसति निरविन्दन् हृदि प्रतीष्या कवयो मनीषा ॥४॥**

**भावार्थ**–( याच्या ) मनाचें जें रेत म्हणजे बीज प्रथमतः निघालें तेंच आरंभीं काम ( म्हणजे सृष्टि निर्माण करण्याची प्रवृत्ति किंवा शक्ति ) झाला. ( हाच ) असतामध्यें म्हणजे मूळ परब्रह्मांत सताचा म्ह. विनाशी दृश्य सृष्टीचा ( पहिला ) संबंध होय, असें ज्ञात्यांनीं अंतःकरणांत विचार करून बुद्धीनें निश्चित केलें आहे.

**तिरश्चीनो विततो रश्मिरेषाम् अधः स्विदासीदुपरि स्विदासीत् ।**
**रेतोधा आसन् महिमान आसन् स्वधा अवस्तात् प्रयति परस्तात् ॥५॥**

**भावार्थ**–(हा) रश्मि म्ह. धागा किंवा किरण यांच्या (मध्यें) आडवा पसरला; आणि खालीं होता म्हटलें तर वरहि होता. ( यांच्यांतले कांहीं ) रेतोधा म्ह. बीजप्रद झाले, व (वाढून) मोठेहि झाले. त्यांचीच स्वशक्ति अलीकडे व प्रयति म्ह. प्रभाव पलीकडे (व्यापून) राहिला.

**को अद्धा वेद क इह प्रवोचत् कुत आजाता कुत इयं विसृष्टिः ।**
**अर्वाग् देवा अस्य विसर्जनेनाथ को वेद यत् आबभूव ॥६॥**

**भावार्थ**–( सताचा ) हा विसर्ग म्हणजे पसारा जेथून झाला, किंवा कोठून आला, हें ( यापेक्षां ) प्र म्हणजे विस्तारानें येथें कोण सांगणार? कोण निश्चयात्मक जाणतो? देवहि या ( सत् सृष्टीच्या ) विसर्गानंतरचे. मग ती जेथून निघाली तें कोण जाणणार?

**इयं विसृष्टिर्यत आबभूव यदि वा दधे यदि वा न दधे ।**
**यो अस्याध्यक्षः परमे व्योमन् सो अंग वेद यदि वा न वेद ॥७॥**

**भावार्थः**–( सताचा ) हा विसर्ग म्हणजे पसारा कशापासून किंवा तो निर्मिला गेला अगर न गेला, तें परम आकाशांत असणारा या जगाचा जो अध्यक्ष ( हिरण्यगर्भ ) तो जाणीत असेल, किंवा नसेलहि! ( कोणी सांगावें? )

(६३) **ईश्वराचें सामर्थ्य**:– आतां अध्यात्मविद्येला आधारभूत अशीं जीं दशोपनिषदें त्यांचा थोडा आस्वाद घेऊं. उपनिषदांतील मुख्य विषय म्हणजे ईश्वराचें आणि आत्म्याचें स्वरूप दाखविणें हा आहे. ईश्वराच्या सामर्थ्याविषयीं आणि त्याच्या व्यापकत्वाविषयीं उपनिषदांमध्यें मोठें

मार्मिक, आणि सुबोध विवेचन आलें आहे. ईशोपनिषदांतील पहिल्याच मंत्रामध्यें हें जगत् ईश्वरानें व्यापलें आहे, असें म्हटलें असून कोणाच्याहि धनाचा अभिलाष न धरण्याचा म्हणजे चोरी न करण्याचा उपदेश केला आहे.

ईशावास्यमिद ँ सर्वं यत्किञ्च जगत्यां जगत् ।
तेन त्यक्तेन भुञ्जीथा मा गृधः कस्यस्विद्धनम् ।।१।।

भावार्थः–सृष्टीमध्यें जें कांहीं भूतजात आहे तें सर्व ईश्वरानें व्यापिलेलें आहे. त्यानें दिलेल्या वस्तूनेंच उपजीवन कर. कोणाच्याहि धनाचा अभिलाष धरूं नको.

सर्व जगाचें नियमन करणारी अशी एक शक्ति मानावीच लागते. तैत्तिरीय उपनिषदामध्यें या शक्तीच्या भीतीनेंच वायु वहातो, सूर्य उगवतो, आणि अग्नि, चंद्र व मृत्यु हे आपापलीं कामें पार पाडतात, असें म्हटलें आहे.

भीषाऽस्माद्वातः पवते ।। भीषोदेतिः सूर्यः ।।
भीषाऽस्मादग्निश्चेन्द्रश्च ।। मृत्युर्धावति पञ्चम इति ।।तै.उप.

मुंडकोपनिषदामध्यें या ईशतत्त्वाचें सामर्थ्य वर्णन केलें आहे.

न तत्र सूर्यो भाति न चन्द्र तारकं ।
नेमा विद्युतो भान्ति कुतोऽयमग्निः ।
तमेव भान्तमनुभाति सर्वं
तस्य भासा सर्वमिदं विभाति ।।११।। मुं. उप. खं. २

भावार्थः–तेथें या ईशतत्त्वाच्या ठिकाणीं सूर्य, चंद्र, तारका, प्रकाश पाडूं शकत नाहींत. ह्या विजाहि प्रकाश पाडूं शकत नाहींत. मग हा अग्नि कोठून प्रकाश पाडूं शकणार? त्या स्वयंप्रकाश ईश–तत्त्वाच्या तेजानेंच हें सर्व प्रकाशित होतें; आणि त्याच्या प्रकाशामुळें हें सर्व दृग्गोचर होतें.

केनोपनिषदामध्यें एका मजेदार आख्यायिकेनें ईश्वराचें म्हणजे परब्रह्माचें वर्णन केलें आहे. एकदां देवासुर युद्धामध्यें देवांचा उत्कर्ष झाला, आणि असुर पराभूत झाले. त्यामुळें देवांच्या ठिकाणीं गर्व उत्पन्न झाला.

तो घालविण्याकरितां परब्रह्म यक्षरूपानें प्रगट झालें. हें काय विलक्षण आहे ? तें जाऊन ओळखण्याची सूचना देवांनीं अग्नीला केली. अग्नि तेथें गेला व मी अग्नि आहे, जातवेदस आहे असें म्हणाला. तुझ्या ठिकाणीं काय सामर्थ्य आहे ? असें विचारतांच मी ही पृथ्वी जाळण्यास समर्थ आहे असें तो म्हणाला. यक्षानें त्याच्यापुढें एक गवताची काडी फेंकली व जाळ म्हणून सांगितलें. परंतु त्याला यत्नेंकरूनहि काडी जाळतां आली नाहीं. अग्नि पराभूत होऊन परत आल्यावर वायु यक्षाकडे गेला. त्यानेंहि मी पृथ्वीवरील सर्व वस्तु उडवून देईन असें सांगितलें. परंतु यक्षानें पुढें केलेली काडी तो उडवूं शकला नाहीं. त्यानंतर इंद्र तेथें गेला तों तें ब्रह्म अदृश्य झालें !! इतक्यांत इंद्रानें पार्वतीसारखी स्त्री आकाशांत पाहिली. तिनें त्याला यक्षरूपी परब्रह्माचें स्वरूप सांगून गर्वपरिहार केला !

ही गोष्ट साधीच असली तरी फारच परिणामकारक अशा तऱ्हेनें सांगितली आहे.

बृहदारण्यक उपनिषदामध्यें याज्ञवल्क्य व गार्गि यांच्या संवादामध्येंहि या अक्षरसत्तेच्या जोरावर जगत् चाललेलें आहे असें म्हटलें आहे.

**एतस्य वा अक्षरस्य प्रशासने गार्गि सूर्या चंद्रमसौ विधृतौ तिष्ठत एतस्य वा अक्षरस्य प्रशासने गार्गि द्यावापृथिव्यौ विधृते तिष्ठत एतस्य वा अक्षरस्य प्रशासने गार्गि निमेषा मुहूर्ता अहोरात्राण्यर्धमासा मासा ऋतवः संवत्सरा इति विधृतास्तिष्ठन्त्येतस्य वा अक्षरस्य प्रशासने गार्गि प्राच्योऽन्यानद्यः स्यन्दन्ते श्वेतेभ्यः पर्वतेभ्यः प्रतीच्योऽन्या यां यां च दिशमन्वेतस्य वा अक्षरस्य प्रशासने गार्गि ददतो मनुष्याः प्रशंसन्ति यजमानं देवा दर्वीं पितरोऽन्वायत्ताः ॥९॥** बृ. उ. ब्रा. ८ अ. ३.

**भावार्थः**—हे गार्गि, या अक्षरतत्त्वाच्याच सत्तेखालीं सुसंघटित असे सूर्य चंद्र राहिले आहेत. हे गार्गि, या अक्षरतत्त्वाच्याच सत्तेखालीं सुसंघटित असें द्यावापृथिवी म्हणजे त्रैलोक्य राहिलें आहे. हे गार्गि, या अक्षरतत्त्वाच्याच सत्तेखालीं सुसंघटित अशीं क्षण, तास, अहोरात्र, सबंध दिवस, पंधरवडे, महिने, ऋतु व वर्षें हीं सर्व राहिलीं आहेत. हे गार्गि, या

अक्षरतत्वाच्याच सत्तेखालीं सुसंघटित अशा पूर्वेकडे उगम पावणाऱ्या निरनिराळ्या नद्या व शुभ्र पर्वतांतून पश्चिमेकडे उगम पावणाऱ्या निरनिराळ्या नद्या त्या त्या दिशेकडे वहात जातात. हे गार्गि, या अक्षरतत्त्वाच्याच सत्तेखालीं अशा दात्याची मनुष्यें प्रशंसा करतात. देव उपासना करणाऱ्या यजमानाला व पितर दर्वी होमाला अनुसरतात.

याप्रमाणें ईशस्वरूपाचें विवेचन करणारा भाग पुष्कळच देतां येण्याजोगा असला तथापि विस्तारभयास्तव हात आंखडून आतां आत्मविचाराकडे वळूं.

**(६४) आत्मज्ञानाची आवश्यकता:**—सामान्यज्ञान, विशेषज्ञान, व तत्त्वज्ञान, असे ज्ञानाचे तीन प्रकार आहेत. मनुष्य हा जिज्ञासु असल्यामुळें आत्मज्ञानाशिवाय त्याची तळमळ शांत होत नाहीं.

मनुष्याची धडपड सुखाकरितां चाललेली आहे. शारीरसुख व विषयसुख हेंच माणसाचें सर्वस्व नाहीं. शारीरसुखापलीकडे बौद्धिक, मानसिक सुख असून त्याही पलीकडील निर्विषय सुखाची इच्छा मनुष्याला असते. विषय, वित्त आणि लौकिक येवढ्यानेंच मनुष्य पूर्ण सुखी होत नाहीं. देव, ऋषी व पितर यांचीं ऋणें फेडल्यानें तो पूर्ण सुखी होत नाहीं. तीन्ही आश्रमांचीं कर्तव्यें पार पाडलीं तरी मनुष्याला संपूर्ण सुख लाभतें असें नाहीं. वैदिक मंत्रदृष्ट्या ऋषींनीं पूर्ण सुखाचा शोध लावला आणि आत्मज्ञान व आत्मसाक्षात्कार यामुळेंच मनुष्य पूर्ण सुखी होतो असें ठरविलें.

तैत्तिरीय उपनिषदांतील ब्रह्मानंदवल्लीमध्यें मानुषानंदाची कल्पना दिली आहे व त्यापेक्षां निरनिराळ्या प्रकारचे आनंद व शेवटीं ब्रह्मानंद कसा श्रेष्ठ आहे हें सांगितलें आहे:—

**युवा स्यात्साधुयुवाध्यायकः ॥ आशिष्ठो द्रढिष्ठो बलिष्ठः ॥**
**तस्येयं पृथिवी सर्वा वित्तस्य पूर्णा स्यात् ॥ स एको मानुष आनन्दः॥**

( तै. उप. अ. ८ )

**भावार्थ:**—तरणाबांड, विद्वान्, महत्त्वाकांक्षी, दृढनिश्चयी, बलवान्, असा एक पुरुष आहे. त्याला ही पृथ्वि वित्तानें परिपूर्ण अशी मिळाली म्हणजे त्याला जो आनंद होतो तो मानवी आनंद होय.

हिंदुस्थानांतील संस्थानिक आणि इतर देशांतील राजेरजवाडे जे सत्ता, संपदा व संस्कृति यांनीं युक्त असतील व पृथ्वीवर म्हणजे आपल्या हातीं असलेल्या भूभागावर स्वतंत्र राज्यें करीत असतील, तर ते संपूर्ण मानवी आनंद उपभोगीत आहेत, असें म्हणावयास हरकत नाहीं.

पण हे सर्व संपूर्ण सुखी आहेत काय ? मुळींच नाहींत. यापेक्षां शतपटीनें मनुष्यगंधर्वांचा आनंद आहे त्यापेक्षां शतपटीनें देवगंधर्वांचा आनंद आहे, तर शंभर पटीनें पितृलोकनिवासींचा आनंद आहे. त्याच्या शतपट स्वर्गांतील आनंद, त्याच्या शतपट देवांचा आनंद, त्याच्या शतपट इंद्राचा आनंद, त्याच्या शंभरपट बृहस्पतीचा आनंद व त्याच्या शतपट प्रजापतीचा आनंद आहे. प्रजापतीला जो आनंद होतो त्याच्यापेक्षां शंभरपटीनें ब्रह्मानंदाचें सुख आहे. म्हणून मनुष्यानें तें सुख प्राप्त करून घ्यावें असा उपनिषदांचा संदेश आहे.

सत्ता, संपदा आणि संस्कृति यांनीं युक्त असलेले संस्थानिक व राजे हे जसे असुखी आहेत तसेच अनेक शास्त्रें पारंगत असलेले विद्वानहि असुखीच आहेत. हें नारदांच्या उदाहरणावरून छांदोग्यामध्यें सिद्ध केलें आहे.

**(६५) नारद व सनत्कुमारः**–एकदां नारद सनत्कुमारांकडे गेले व मला उपदेश करा असें म्हणाले. 'तुझें शिक्षण काय झालें आहे ?' असें नारदाला विचारतांच नारद म्हणाले, 'महाराज! ऋग्वेद, यजुर्वेद, सामवेद, अथर्ववेद, इतिहास, पुराणें, वेदांचा वेद म्हणजे मीमांसाविद्या, पितरांची विद्या म्हणजे वंशशास्त्र, गणितशास्त्र, भूकंपादि उत्पातविद्या, आकरविद्या, म्हणजे खाणींचें शास्त्र, तर्कशास्त्र, अर्थशास्त्र, अधिदैविक विद्या, श्रौत–विद्या म्हणजे यज्ञविद्या, प्राणिशास्त्र, शासनशास्त्र, ज्योतिषशास्त्र, सर्पविद्या म्हणजे यंत्रादि शिल्पशास्त्र, देवजनविद्या म्हणजे कलाकौशल्याचें शास्त्र, हें सर्व मी शिकलों आहें.'

नारद पुढें म्हणाले, 'मी दुःखी आहें. मला आत्मविद्यासंपन्न करा.' सनत्कुमार म्हणाले, 'तूं नामाची म्हणजे वाङ्मयाची ( शब्दब्रह्माची ) उपासना केली आहेस ती अपुरी आहे.'

सनत्कुमारांनीं नारदांना वाणी, मन, संकल्प, चित्त, ध्यान, विज्ञान, बल, अन्न, आप, तेज, वायु, आकाश, स्मरणशक्ति, आशा, प्राण, अशा

श्रेष्ठश्रेष्ठ व सूक्ष्मसूक्ष्म उपासना सांगितल्या आहेत. व त्या सर्व आत्मसुखाच्या दृष्टीनें अल्प आहेत व क्षुद्र आहेत असें सांगून आत्मसुखाचें महत्त्व पटवून दिलें आहे.

**यो वै भूमा तत्सुखं नाल्पे सुखमस्ति भूमैव सुखं भूमात्वेव विजिज्ञासितव्य इति भूमानं भगवो विजिज्ञास इति ॥ १ ॥**

छां. उप. अ. ७ खंड २३॥

**भावार्थः**—जें व्यापक तत्त्व आहे तेंच सुखकारक असतें. अल्पामध्यें सुख नाहीं. भूमा व्यापक हेंच सुख होय. म्हणून व्यापक तत्त्वाचीच जिज्ञासा करावी. नारद म्हणतो, 'भगवन्! मी व्यापक तत्त्वाचीच जिज्ञासा करीत आहे.' ती त्याची जिज्ञासा पाहून पुढें सनत्कुमारांनीं नारदांना आत्मविद्या सांगितली आहे.

(६६) **आत्मज्ञानाचें फलः**—आत्मतत्त्व हें फार गूढ आहे, तें स्वतःसिध्द आहे. त्याचा अनुभव सामान्यत्वानें मनुष्याला येत असला तरी आत्मसाक्षात्कार हा क्वचित्‌च एकाद्या अधिकाऱ्याला होतो. त्याचें फल पुढीलप्रमाणें सांगितलें आहे :—

**भिद्यते हृदयग्रन्थिश्छिद्यन्ते सर्वसंशयाः ।**
**क्षीयन्ते चास्य कर्माणि तस्मिन्दृष्टे परावरे ॥०॥** मुं. उप. द्वि. खं.

**भावार्थः**—तें पर व अपर स्वरूप साक्षात् झाल्यावर ह्याच्या बुद्धीची गांठ फुटते, सर्व संशय नाहींसे होतात, आणि सर्व कर्में सुटतात.

(६७) **साक्षात्काराचीं साधनें**:—या आत्म्याचें दर्शन तपानें, सत्यानें, आणि ब्रह्मचर्यानेंच होतें. ज्यांचा पापक्षय झाला आहे, असे यति, या आत्म्याला आपल्या हृदयांत पहात असतात. आत्मसाक्षात्कार हा प्रवचनानें, विद्वत्तेनें, बहुश्रुतपणानें होत नाहीं, तर जो त्या आत्म्याच्या शोधार्थ निष्ठेनें, प्रेमानें व आत्मविश्वासानें झटत असतो, त्यालाच तो आत्मा आपलें स्वरूप दाखवितो. शरीरानें व मनानें दुर्बल असलेल्या मनुष्याला आत्मप्राप्ति होत नाहीं. त्याचप्रमाणें असावध, तपहीन अशालाहि आत्मसाक्षात्कार होत नाहीं. जो कोणी विद्वान्, विचारी, ज्ञानयुक्त, अप्रमादि असतो, तोच ब्रह्मस्वरूपांत प्रवेश करूं शकतो, असें पुढील मंत्रांत म्हटलें आहेः—

नायमात्मा प्रवचनेन लभ्यो न मेधया न बहुना श्रुतेन ।
यमेवैष वृणुते तेन लभ्यस्तस्यैष आत्मा विवृणुते तनूं स्वाम् ॥३॥

मुं. उप. खं. २

नायमात्मा बलहीनेन लभ्यो नच प्रमादात्तपसो वाप्य लिङ्गात् ।
एतैरुपायैर्यतते यस्तु विद्वांस्तस्यैष आत्मा विशते ब्रह्मधाम ॥४॥

मुं. उप. खं. २

(६८) **श्रद्धा व आस्तिक्य:**–आत्म्याची प्राप्ति इंद्रियांना होऊं शकत नाहीं. कारण तो त्यापलीकडचा आहे. आत्मतत्त्व आहेच असें मानणाऱ्याला म्हणजे आस्तिकाला त्याचें ज्ञान होतें. कारण आस्तिक मनुष्य श्रद्धेनें व तत्त्वजिज्ञासेनें आत्मतत्त्वाच्या शोधांत निमग्न होतो. तसें आत्मसंशोधन करणाऱ्याला आत्म्याचें तात्त्विक स्वरूप निर्मळपणें दिसतें, असें पुढील दोन मंत्रांत म्हटलें आहे:— ( कठ. उप. अ. २ व. ३ )

नैव वाचा न मनसा प्राप्तुं शक्यो न चक्षुषा ।
अस्तीति ब्रुवतोऽन्यत्र कथं तदुपलभ्यते ॥१२॥
अस्तीत्येवोपलब्धव्यस्तत्त्वभावेन चोभयोः ।
अस्तीत्येवोपलब्धस्य तत्त्वभावः प्रसीदति ॥१३॥

( कठोपनिषद् अ. २ व ३ )

(६९) **आत्म्याचें स्थान:**–आत्मा हा हृदयाच्या मध्यभागीं राहातो. हृदय हें त्याचें शोधण्याचें स्थान आहे. आत्म्याचा एक लहान अंश हृदयामध्यें वास करितो व तो कालाचासुद्धां नियामक असतो. अंगुष्ठप्रमाण सर्वांतर्यामीं असलेला आत्मा सर्वांच्या बुद्धीमध्यें नेहमीं असतो. मुंजा गवतांतील काड्या जशा अंतगर्भापासून वेगळ्या करतात त्याप्रमाणें इंद्रियादिकांहून आत्म्याला निराळा समजून त्याचें ज्ञान संपादन करावें.

अङ्गुष्ठमात्रः पुरुषो मध्य आत्मनि तिष्ठति ।
ईशानो भूतभव्यस्य न ततो विजुगुप्सते । एतद्वै तत् ॥१२॥
अङ्गुष्ठमात्रः पुरुषो ज्योतिरिवाधूमकः ।
ईशानो भूतभव्यस्य स एवाद्य स उ श्वः । एतद्वै तत् ॥१३॥

( कठोपनिषद् अ. २ व. १ )

अङ्गुष्ठमात्रः पुरुषोऽन्तरात्मा सदा जनानां हृदये सन्निविष्टः ।
तं स्वाच्छरिरात् प्रवृहेन्मुंजादिवेषीकां धैर्येण ।
तं विद्याच्छुक्रममृत तं विद्याच्छुक्रममृतमिति ॥१७॥
( क. उप. अ. २ व. ३ )

(७०) धैर्याचें महत्त्वः—हा आत्मसाक्षात्कार श्रद्धावान्, तपस्वी आणि सूक्ष्म बुद्धीच्या साधकालाच होऊं शकतो. कारण सर्वांतर्यामीं असलेला हा आत्मा तीक्ष्ण व सूक्ष्म बुद्धिवान् साधकाशिवाय इतरांना दिसणेंच अशक्य आहे. हा विषय धैर्य, चिकाटी व सततोद्योग यांनीं प्राप्त होण्याजोगा असल्यामुळें साधकाला प्रेमानें धैर्यहीन न होण्याचा उपदेश ठिकठिकाणीं केलेला आहेः—

पराचि खानि व्यतृणत्स्वयंभूः तस्मात् पराङ् पश्यति नांतरात्मन् ।
कश्चिद्धीरः प्रत्यगात्मानमैक्षत् आवृत्तचक्षुरमृतत्त्वमिच्छन् ॥१॥
( कठ. उप. अ. २ )

तं दुर्दर्शं गूढमनुप्रविष्टं गुहाहितं गव्हरेष्ठं पुराणम् ।
अध्यात्मयोगाधिगमेन देवं मत्वा धीरो हर्षशोकौ जहाति ॥
श्रेयश्च प्रेयश्च मनुष्यमेतः तौ संपरीत्य विविनक्ति धीरः ।
श्रेयो हि धीरो अभिप्रेयसो वृणीते प्रेयो मंदो योगक्षेमात् वृणीते ॥२॥
( कठ. उप. अ. २ )

**भावार्थः**—ब्रह्मदेवानें इंद्रियें बहिर्मुख केलीं आहेत. म्हणून मनुष्य बाहेर पहातो; अंतर्यामीं असलेल्या आत्म्यास पहात नाहीं. एकादा मोक्षेच्छु जो धैर्यानें आपलीं इंद्रियें आवरून धरील तोच अंतरात्म्याला पहातो. ज्ञात होण्यास अत्यंत कठिण अशा पुराणपरमात्म्याचें अध्यात्मयोगानें जो धीरपुरुष विषयापासून चित्त परावृत्त करून अंतर्मुख होतो, तोच सुखदुःखातीत होतो. श्रेय व प्रेय मनुष्यापुढें येतात. बुद्धिमान् मनुष्य ह्या दोहोंचा विचार करून निवड करतो. मनोनिग्रही व विवेकी मनुष्य प्रेयापेक्षां श्रेयच पसंत करतो. परंतु मंद मनुष्य प्रेय स्वीकारतो.

वरील तीन्ही मंत्रांत धीर हा शब्द फार महत्त्वाचा आहे. धैर्यवान्, बलवान्, विवेकी, दृढनिश्चयी असा साधकच अध्यात्मविद्येचा अधिकारी होय असें यावरून सिद्ध होतें.

**(७१) प्रकाश देणारी विद्याः**—हा आत्मज्ञानाचा विषय असा गहन आहे कीं ज्याला तो समजला असें वाटतें त्याला तो कांहींच समजत नाहीं व ज्याला असें वाटतें कीं हा विषय मला जाणतां येणें शक्य नाहीं, त्यालाच तो थोडाबहुत कळतो.

**यस्यामतं तस्य मतं मतं यस्य न वेद सः ।**
**अविज्ञातं विजानतां विज्ञातमविजानताम् ॥३॥** केन.उप. खं. २

पूर्ण आनंद, पूर्ण सुख, अनिष्टाचा पूर्ण परिहार हें या अध्यात्माचें फल आहे. असतापासून सताकडे नेणारी, अंधकारापासून प्रकाशाकडे नेणारी व मृत्यूपासून अमृतत्वाकडे नेणारी अशी ही विद्या आहे. म्हणूनच एका ठिकाणीं पुढील प्रार्थना आहे.

**असतो मा सद्गमय । तमसो मा ज्योतिर्गमय ।**
**मृत्योर्माऽमृतं गमय ।** ( बृहदा. १–३–२८ )

**(७२) पैतृक धनः**—उपनिषदांतील ही अध्यात्मविद्या फार उच्च व श्रेष्ठ आहे. तें आपलें पैतृकधन आहे. यावरच आचार्यांचे नि महाराष्ट्रांतील साधुसंतांचे सर्व ग्रंथ आधारलेले आहेत. जगांतील अनेक विद्वानांना या विद्येनें जीवन दिलेलें आहे. शौपेनहारला उपनिषदांचें लॅटिन भाषांतर मिळालें होतें, तें वाचून तो आनंदानें उड्या मारूं लागला. उपनिषदांच्या अभ्यासासारखा मनुष्याला उन्नत करणारा दुसरा कोणताहि अभ्यास नाहीं, उपनिषदांच्या अभ्यासानें आयुष्यभर समाधान लाभतें येवढें त्याचें महत्त्व जगांतील विद्वान सांगतात त्याचें कारण त्यांतील उदारता, आध्यात्मिक शांति, सर्वभूतहिततत्परता, व सर्वभूतात्मैक्य यांचें प्रतिपादन हें होय.

उपनिषदामध्यें अध्यात्माचा विषय सांगतांना तदनुषंगानें निरनिराळ्या विषयांचें मार्मिक विवेचन आलेलें आहे. त्यांतील कांहीं निवडक विषयांचा येथें उल्लेख करितोंः—

**(७३) दाम्यत दत्त दयध्वम्ः**—प्रजापतीकडे देव, मनुष्य व असुर असे तिघे गेले व म्हणाले, 'आम्हाला उपदेश करा.' प्रजापतीनें या तिघांना 'द,' या एकाच अक्षराचा उपदेश केला. त्याचा अर्थ मात्र

तिघांनीं निरनिराळा केला. प्रजापतीनें तिघांचे अर्थ मान्य केले. 'द' चा अर्थ देवांनीं आत्मसंयमन, मनुष्यांनीं दान, आणि असुरांनीं दया असा केला. ऐश्वर्यानें उन्मत्त न व्हावें म्हणून देवांना दमनाचा उपदेश केला. मनुष्यांना दानाचा केला आणि असुर हे जगांत रक्तपात करतात म्हणून त्यांना दयेचा उपदेश केला. मेघ 'द द द' या शब्दानें दैवी वाणीचाच म्हणजे दम, दान व दया या तत्त्वत्रयीचाच उपदेश करीत असतो. ( बृ. आ. ५।२।३ )

**(७४) स्वार्थत्यागाचें तेजः**—देव व असुर यांमध्यें चढाओढ चालू झाली. असुरांचा पराभव करण्याकरितां देवांना उद्गीथाचें साह्य घ्यावें लागलें. उद्गीथ गाण्याचें काम, वाग्देवता, घ्राणदेवता, चक्षु, श्रोत्र, मन, इत्यादि देवतांनीं केलें. परंतु यांपैकीं प्रत्येकानें स्वतःकरितां कल्याणकारक भोग, ( भाषण, वासग्रहण, रूपदर्शन, श्रवण, संकल्प करणें ) घेतल्यामुळें म्हणजे तेवढ्या स्वार्थामुळें असुरांनीं देवांचा पराभव केला. परंतु शेवटीं देवांच्या वतीनें प्राण हा जेव्हां सामगायन करूं लागला तेव्हां असुरांनीं पूर्वीप्रमाणें त्याजवरही पापरूपी शस्त्रानें हल्ला केला. परंतु प्राणाचे ठिकाणीं स्वतःकरितां कोणताच भोग नसल्यामुळें दगडावर आपटून ढेकूळ फुटावें त्याप्रमाणें असुरांचीं अस्त्रें नष्ट झालीं व ते पराभूत झाले. प्राणाच्या ठिकाणीं स्वतःकरितां कांहींच अभिलाष नसल्यामुळें समत्व, स्वार्थत्याग, निःपक्षपातीपणा, यामुळें तो विजयी झाला. ( बृहदारण्यक अ. १ ब्रा. ३ मं. ३ )

**(७५) आपत्कालीं वाटेल तें करा व जगाः**—उषस्ति चाक्रायण हा कुरुदेशांतील होता. दुष्काळामुळें त्याला अन्नाचीहि भ्रांति पडली! म्हणून तो इभ्यग्रामास म्हणजे हत्तीचे माहुत जेथें राहातात तेथें आला. कुळगे खात असलेल्या इभ्याजवळ उषस्ति ते खाण्याकरितां मागूं लागला. महात म्हणाला 'माझ्या पानांत आहेत येवढेच--तुला द्यावयाला अधिक कुळगे नाहींत. हे पानांतील कुळगे उष्टे आहेत!' 'त्यांतलेच थोडे दे' असें जेव्हां उषस्ति म्हणाला तेव्हां महातानें त्याला कुळगे दिले. ते खाल्ल्यावर 'पाणीहि घे.' असें तो म्हणाला, तेव्हां उषस्ति म्हणतो, 'पाणी वाटेल तितकें आहे. म्हणून तें मी उष्टें पिणार नाहीं. खाल्ल्याशिवाय जगलोंच नसतों, म्हणून मी हे उष्टे कुळगे खाल्ले.' उषस्तीनें त्यांतील थोडे

हुलगे आपल्या पत्नीला नेऊन दिले. पत्नि आटिकीनें थोडे हुलगे खाऊन बाकीचे बांधून ठेविले. दुसरे दिवशीं एका राजाच्या यज्ञाकडे जाण्यापूर्वी आटिकीनें पतीला ते शिळे हुलगे पुन्हां खावयास दिल्यामुळें तो मार्गक्रमण करण्यास व यज्ञ करण्यास समर्थ झाला. प्रथम चाक्रायणानें उष्टे हुलगे प्राण जगविण्याकरितां खाल्ले आणि दुसऱ्या दिवशीं मार्गक्रमण करण्यास व यज्ञांत सामगायन करण्यास अंगांत शक्ति यावी म्हणून खाल्ले. त्यामुळेंच त्याला यज्ञमंडपांत आपली विद्वत्ता दाखवितां आली. ( छां. १।१०।५–६ )

**(७६) धर्माचे तीन स्कंधः**—धर्माचे तीन स्कंध म्हणजे आधार आहेत. यज्ञ, अध्ययन व दान हा पहिला स्कंध होय. तपश्चर्या हा दुसरा स्कंध व नैष्ठिक ब्रह्मचर्य, हा तिसरा स्कंध होय. यज्ञ म्हणजे उपासना, अध्ययन म्हणजे ज्ञानार्जन आणि दान म्हणजे परोपकार होय. या तिहींवरच धर्म सुप्रतिष्ठित असतो. गृहस्थाश्रम हें या स्कंधाचें आश्रयस्थान होय. दान, अध्ययन व यज्ञ हे गृहस्थाश्रमामध्येंच होतात. तप म्हणजे कायिक, वाचिक, मानसिक उन्नति ही वानप्रस्थाश्रमामध्यें साध्य करावयाची असते. आजन्म ब्रह्मचारी राहून समाजसेवेंत आयुष्य घालविणारे निष्काम कर्मयोगी हा एक धर्माचा मोठा आधारच होय. कारण निष्काम बुद्धीनें आजन्म-कर्तव्याचरण करणारे अधिकारी पुरुष लोकसंग्रह करतात. गृहस्थाश्रमी, वानप्रस्थी व संन्यासी म्हणजे नैष्ठिक ब्रह्मचारी अशा तिघांवर धर्म हा सुप्रतिष्ठित असतो. हे तीन आश्रम म्हणजेच धर्माचे तीन भाग होत.

( छांदोग्य उप. अ. २ खं. २३ मं. १. )

**(७७) आदर्श समाजरचनाः**—आजकाल समाजरचना बदलली पाहिजे, क्रांति झाली पाहिजे, अशा घोषणा होतात. आदर्श समाजाचें स्वरूप कसें असावें हें फारसें कोणी सांगत नाहींत; पण छांदोग्य उप-निषदामध्यें केकय देशाचा राजा अश्वपति हा उद्दालिकादि ऋषींना आपल्या राज्यांतील समाजस्थिति कशी चांगली आहे हें सांगत आहे. अधिकारी ऋषींना राहण्यास माझें राज्य योग्य आहे, कारण समाज सुसंस्कृत आहे असा त्याच्या म्हणण्याचा आशय आहे.

**तेभ्यो ह प्रातेभ्यः पृथगर्हाणि कारयांचकार स ह प्रातः संजिहान उवाच न मे स्तेनो जनपदे न कदर्यो न मद्यपो नानाहिताग्निर्नाविद्वान्न स्वैरी स्वैरिणी कुतो यक्ष्यमाणो वै भगवन्तोऽहमस्मि यावदेकैकस्मा ऋत्विजे धनं दास्यामि वसन्तु भगवन्त इति ॥५॥**

( छांदोग्य. उप. अ. ५ खं. ११ )

**भावार्थः**—त्या ऋषींचा त्यानें व्यक्तिशः वेगवेगळा सत्कार करविला. प्रातःकाळीं त्यांचेकडे येऊन तो राजा त्या ऋषींना म्हणाला, ‘ माझ्या देशांत कोणी चोर नाहीं, म्हणजे कधींहि चोरी होत नाहीं, कोणी कृपण नाहीं, कोणी दारूबाज नाहीं, कोणीहि गृहस्थ अग्निहोत्रावांचून नाहीं, कोणीहि अशिक्षित नाहीं, कोणताहि पुरुष व्याभिचारी नाहीं, मग व्याभिचारिणी स्त्री कोठली ? महाराज ! सांप्रत मी यज्ञ करीत आहें. त्या यज्ञांतील प्रत्येक ऋत्विजाला जितकें धन देईन तितकें धन तुमच्यापैकीं प्रत्येकाला देईन. तर आपण येथें खुशाल रहावें. ’

अश्वपति म्हणतो, माझ्या राष्ट्रांत चोर नाहीं, म्हणजे चोरी ज्यामुळें करावी लागेल अशी सांपत्तिक विषमता नाहीं. संपन्न माणसें पैसा सांठवून ठेवूं लागली म्हणजे विषमता येते. पण माझ्या राज्यांत वित्तशाठ्य करणारे, कद्रू संपन्न गृहस्थ नाहींत. मनुष्य व्यसनामुळें चोऱ्या करतो, कारण त्याला पैसा पुरा पडत नाहीं. पण माझ्या राज्यांत कोणी मद्यपीहि नाहीं, म्हणजे व्यसनी नाहीं. कारण सर्व माणसें सुसंस्कृत, सुविद्य व विद्वान् आहेत. सुसंस्कृत मनुष्य हा शिक्षित नसला तरी नीतीमान् असूं शकतो. म्हणून माझ्या राज्यांत स्वैराचार करणारे अनीतिमान् लोक नाहींत. मग अनीतिमान स्त्रिया येणार कोठल्या ? कोणत्याहि समाजांतील पुरुषच आधीं बिघडतात व नंतर त्यांच्यामुळेंच स्त्रिया बिघडत असतात. अश्वपति राजानें वर्णन केल्याप्रमाणें जर समाजाची रचना होईल तर खरोखर हें जग सुखी होईल.

(७८) **सृष्टीची** उत्पत्तिः—तैत्तिरीय उपनिषदांत सृष्टीच्या उत्पत्तीचा विषय आला असून त्यावरून वैदिक आर्यांच्या कल्पना स्पष्ट होतात.

**तस्माद्वा एतस्मादात्मन आकाशः संभूतः आकाशाद्वायुः । वायोरग्निः अग्नेरापः । अद्भ्यः पृथिवी । पृथिव्या ओषधयः । ओषधीभ्योऽन्नम् । अन्नात्पुरुषः ॥** ( तै. उप. २।१ )

**भावार्थः**–आत्म्यापासून आकाश, आकाशापासून वायु, वायूपासून अग्नि, अग्नीपासून पाणी, पाण्यापासून पृथिवी, पृथिवीपासून वनस्पति वनस्पतीपासून, अन्न आणि अन्नापासून मनुष्य अशा क्रमानें ही सर्व सृष्टि निर्माण झाली आहे.

**(७९) आहारशुद्धिः**–अन्नाचा व मनाचा बराच संबंध आहे, आहार जसा शुद्ध असेल त्याप्रमाणें अंतःकरण शुद्ध होतें व आत्मज्ञानाच्या आसीला तें पोषक होतें.

**अन्नमशितं त्रेधा विधीयते तस्य यः स्थविष्ठो**
**धातुस्तत्पुरीषं भवति यो मध्यमस्तन्मा ँ सं**
**योऽणिष्ठस्तन्मनः ॥१॥** ( छांदोग्य उप. अ. ६ खं. ५ )

**भावार्थः**–भक्षण केलेल्या अन्नाचे पचनानंतर तीन प्रकार होतात. त्या अन्नाचा स्थूल अंश असतो त्याचा मळ बनतो; जो मध्यम अंश, त्याचें मांस होतें; व जो सूक्ष्म अंश असतो त्याचें मन बनतें.

**आहारशुद्धौ सत्त्वशुद्धिः सत्त्वशुद्धौ ध्रुवास्मृतिः स्मृतिलम्भे सर्व ग्रंथीनां विप्रमोक्षः ।** ( छांदोग्य. उप. अ. ७ खं. २६–२ )

आहारशुद्धीमुळें अंतःकरण शुद्ध होतें. त्यामुळें स्मरणशक्ति अढळ राहाते व स्मृति दृढतर झाल्यानें संशयाच्या सर्व गांठी सुटतात. आहार जेवढा पौष्टिक, सात्त्विक, स्निग्ध व पचनास हलका तेवढा तो सर्व दृष्टीनें शरिरास व बुद्धीस आरोग्यकारक होतो.

**(८०) पतित संतति व उदारताः**–जबालेचा मुलगा सत्यकाम हा आईला म्हणाला, "मी गुरुगृहीं जातों. माझें गोत्र सांग." जबाला म्हणाली, "मी अनेक तऱ्हेनें सेवा करीत असतां तरुणपणीं तूं मला झालास. तेव्हां तुझें गोत्र मला माहीत नाहीं. आईचें नांव जबाला व माझें नांव सत्यकाम आहे असें गुरूला सांग." गुरुगृहीं गेल्यावर ऋषीनें सत्यकामाला गोत्र विचारिलें. त्यानें आईनें सांगितल्याप्रमाणें नेमकें उत्तर दिलें. तें ऐकून गुरु संतुष्ट झाले. गौतम ऋषि म्हणाले, 'वत्सा, ये. तूं सत्यापासून ढळला नाहींस. म्हणून मी तुझें उपनयन करितों व तुला विद्या शिकवितों.' (छां. अ. ४ खं. ४)

**(८१) शिक्षणपद्धतिः**–पिप्पलाद ऋषींकडे सहा शिष्य ब्रह्मविद्या जाणण्याकरितां गेले. गुरूनें या शिष्यांना तुमचें शिक्षण वगैरे काय झालें आहे असें विचारिलें व सांगितलें कीं,

तान्ह स ऋषिरुवाच । भूय एव तपसा ब्रह्मचर्येण श्रद्धया संवत्सरं संवत्स्यथ । यथाकामं प्रश्नान् पृच्छत । यदि विज्ञास्यामः सर्वं ह्वो वक्ष्याम इति ॥२॥ ( प्रश्नोपनिषद्. )

**भावार्थ:**—तो ऋषि त्यांना म्हणाला कीं, ' नियमित शुद्ध वर्तनानें, ब्रह्मचर्यानें, व्रतस्थपणानें व एकनिष्ठेनें एक वर्षभर तुम्ही पुनः राहा. ह्या अवधींत तुमचे इच्छित प्रश्न विचारा, म्हणजे आम्हांला जें माहित असेल तें सर्व तुम्हांला सांगू. '

कोणीहि आला व कांहीं विचारूं लागला तर एकदम सांगू नये. येथें ऋषीनें एक वर्षभर श्रद्धेनें, शिस्तीनें, एकाग्रतेनें व आस्थेवाईकपणानें राहण्याची आज्ञा केली आहे, ती योग्यच आहे. त्यामुळें आत्मीयत्व उत्पन्न होतें. शिष्याचा अधिकार समजतो व मोकळेपणानें बोलण्यास सुलभ जातें. खरी विद्या शिकण्याचा मार्ग म्हणजे आस्था, जिज्ञासा, शिस्त, एकाग्रता व तज्ञ—सहवास हाच होय.

(८२) **गुरूपदेश:**—अलीकडे गुरूपदेशाचें, कानमंत्र देणाऱ्या भोंदू गुरूंचें खूपच बंड वाढलेलें आहे. पण उपनिषद्—कालांतील विद्वान् गुरु शिष्याला घरीं जातांना जो फार बहुमोल उपदेश करीत तो उपदेश तैत्तिरीय उपनिषदामध्यें आहे:—

सत्यं वद । धर्मं चर । स्वाध्यायान्मा प्रमदः । आचार्याय प्रियं धनमाहृत्य प्रजातन्तुं मा व्यवच्छेत्सीः । सत्यान्न प्रमदितव्यम् । धर्मान्न प्रमदितव्यम् । भूत्यै न प्रमदितव्यम् । स्वाध्यायप्रवचनाभ्यां न प्रमदितव्यम् । देवपितृकार्याभ्यां न प्रमदितव्यम् ॥ १ ॥

मातृदेवो भव । पितृदेवो भव ।
आचार्यदेवोभव । अतिथिदेवोभव ॥ २ ॥

यान्यनवद्यानि कर्माणि । तानि सेवितव्यानि । नो इतराणि ।
यान्यस्माकं सुचरितानि । तानि त्वयोपास्यानि । नो इतराणि ॥ ३ ॥

शिष्या! सत्य बोलत जा, धर्माला अनुसरून कर्तव्य आचरण कर, रोज कांहींतरी वाचीत जा. गृहस्थाश्रमाचा स्वीकार कर. वंशच्छेद होऊं देऊं नको. सत्य व धर्म यापासून च्युत होऊं नको. वैयक्तिक

स्वास्थ्य, व सामाजिक उत्कर्ष, या बाबतींत दुर्लक्ष्य करूं नकोस. समाजोत्कर्षामुळें वैयक्तिक स्वास्थ्य लाभतें; म्हणून राष्ट्रिय कुशलाची काळजी घे. अध्ययन, अध्यापन, देवकार्य, पितृकार्य, मातापिता व आचार्य, अतिथि यांच्याविषयीं सदैव दक्ष राहा. आम्हीं तुझे गुरु असलों तरी आमचें अनुकरण तूं सर्वथैव करूं नकोस. आमचीं जीं निर्दोष कर्में असतील व आमचें जें सदाचरण असेल त्याचेंच तूं अनुकरण कर. स्वतःची बुद्धि चालवून पटेल त्याप्रमाणें वाग. असा हा तर्कशुद्ध, बुद्धिस्वातंत्र्य देणारा, मानवोन्नतीला पोषक, बहुमोल आणि सर्वश्रेष्ठ उपदेश आहे. त्याचें आचरण हिंदुसमाजाकडून होवो, असें आम्ही इच्छितों.

(८१) अद्वैताचा संदेश:--वेदांताचें पर्यवसान अद्वैत साक्षात्कारामध्यें आहे. त्याचें अधिष्ठान सर्वत्र एक तत्त्व आहे हें आहे. हिंदुधर्मांत जी संग्राहकता आहे तिचें बीज अद्वैत तत्त्वज्ञानांत आहे. 'ओठीं अद्वैत आणि पोटीं द्वैत' हें शुद्ध विडंबन आहे. वैदिक ऋषींना सजीव, निर्जीव सृष्टीमध्येंसुद्धां अद्वैताचा साक्षात्कार होई. समाजाकरितां, दुसऱ्याकरितां, जगाकरितां झटणें, त्याग करणें, त्याच्याशीं तद्रूप होणें, प्राण देणें, भेद जाळून अभेदांत लीन होणें आणि पूर्ण आनंदी आणि शोकरहित होणें हें सबंध वेदांताचें सार आहे. जो कोणी सर्वत्र परमात्मस्वरूप पाहातो व परमात्मस्वरूपांत सर्व पदार्थ पहातो, ज्याचा आत्मा जगाशीं एकरूप झाला व जग ज्याच्याशीं एकरूप झालें, त्याला शोक कसला व मोह कसला ? ( ईशोपनिषद् ६–७ ) समाजांत द्वेष नसावा, तेज व वीर्य असावें, शांति असावी आणि प्रेम रहावें हीच इच्छा गुरुशिष्यांनीं म्हणावयाच्या पुढील मंत्रांत व्यक्त केली आहे.

ॐ सहनाववतु । सहनौ भुनक्तु । सहवीर्यं करवावहै ।

तेजस्वि नावधीतमस्तु । मा विद्विषावहै ।। ॐ शांतिः शांतिः शांतिः।।

---*---

## प्रकरण चौथें

# रामायणकालीन संस्कृति

**(८४) रामचंद्राचा कालः**—केवळ वैदिक वाङ्मयावरून आर्य-संस्कृतीच्या स्वरूपाची कल्पना दुसऱ्या प्रकरणांत मांडली. वैदिक संहितेनंतर आर्यसंस्कृतीचें यथार्थ स्वरूप दाखविणारा ग्रंथ म्हटला म्हणजे रामायणच होय. श्रीरामचंद्राचा काल हा भारतीय युद्धापूर्वी जातो. भारतीय युद्ध-काल शकपूर्व दीडहजार तें तीनहजारपर्यंत असावा, असें अनेक विद्वान अनेक प्रमाणांवरून प्रतिपादन करितात. श्रीरामचंद्राचा काल हा निदान पांचशें वर्षें त्या मागें जातो. म्हणजे शकपूर्व साडेतीन हजाराचे सुमारास सूर्यवंशी राजा रामचंद्र याचे वेळीं लोकसमाजाची कशी भरभराट होती हें रामायणावरूनच समजतें. श्रीरामचंद्राच्या कालची विविध अंगानें नटलेली आर्यसंस्कृति पहाण्याचा प्रदीप म्हणजे वाल्मिकी रामायण ग्रंथ होय.

**(८५) वाल्मिकी रामायणाचें स्वरूपः**— हें जगांतील आदिकाव्य असलें तरी तें ऐतिहासिक सत्यानें युक्त आहे. वाल्मिकीच्या मुखांतून सहज-स्फूर्तीनें बाहेर पडलेलें हें ऐतिहासिक काव्य आर्यसंस्कृतीच्या भालपटलावरील सौभाग्यदर्शक कुंकुमतिलक आहे, असें म्हटल्यास अतिशयोक्तीचा दोष येणार नाहीं. वाल्मिकीचा उल्लेख वाजसनेयी संहितेमध्यें सांपडतो. रामायण हा ग्रंथ मूळच्या शुद्ध स्वरूपांत आज मिळणें अशक्य आहे. आज आप-णापुढें असलेला वाल्मिकी रामायण हा ग्रंथ कालदृष्ट्या संशोधकमतें दोन हजार वर्षांपूर्वीचा असला तरी भारतीय युद्धपूर्व राजकीय, सामाजिक व धार्मिक संस्कृतीचा इतिहास त्यांत आहे. या ग्रंथाचीं काव्य, इतिहास व पुराण अशीं त्रिदलें आहेत. या ग्रंथाची चिकित्सा आधुनिक विद्वानांनीं विविधतऱ्हेनें केलेली आहे. उत्तरकांड मागाहून रचलें असें ठरलें तरी शेष ग्रंथावरून तत्कालीन संस्कृतीची कल्पना येते.

**(८६) राम परब्रह्म नव्हताः**—रामायणामध्यें देव, आर्य, वानर व राक्षस अशा चार मानवसमूहांचा संबंध येतो. देव, वानर व राक्षस

या जाति मानवांतीलच होत्या, असें म्हटल्यानें वाचकांना धक्का बसण्याचा संभव आहे. परंतु कटु सत्य हेंच आहे कीं राम हा आर्यांतील मानवच होता. आपल्या परंपरेंत प्रत्येक गोष्ट अध्यात्मपर लावण्याची प्रवृत्ति आहे. राम हा परब्रह्म, लंका लिंगदेह, कामक्रोधाधिक हे राक्षस, देहाहंकार हा रावण, मनोचांचल्य म्हणजे वानर; अशा तऱ्हेनें हें पूर्ण रूपक एका लोकप्रसिद्ध आरतींत आहे. पण त्यामुळें इतिहास, व मानवी पुरुषार्थ यांचा लोप होतो. अध्यात्मरामायण तर बोलून चालून अध्यात्मपरच आहे. तेव्हां या सर्व कल्पनांचें शोधन करून राम, रावण, मारुती, सुग्रीव हीं सर्व माणसें होतीं, भिन्नभिन्न मानवसमाजाचे हे प्रतिनिधी होते, असें समजूनच रामायणाचा विचार केला पाहिजे. हिंदुधर्माचें उच्च तत्त्वज्ञान नराला नारायण होण्याचा आदेश देतें. श्रीरामचंद्र हा आदर्श गुणसमुच्चयामुळें नराचा नारायण कसा झाला, हें पाहून तदनुसार वर्तन करणें हेंच योग्य असतें.

**(८७) रावण अनार्य नव्हे:**—रामरावण युद्ध म्हणजे आर्यानार्य युद्ध नव्हे. रावण हा पौलस्त्य ऋषीचा मुलगा होता. लंकेंत वेदघोष चालत, अग्निहोत्री असत. परंतु आर्यांपेक्षां राक्षसांची संस्कृति निराळी होती. रावण एकदां पहाटे उठला आणि अशोक वनांत सीतेसमोर उभा ठाकला, व तिला म्हणाला, “ हे सीते ! परस्त्रीशीं गमन करणें व परस्त्रीचें हरण करणें, हे राक्षसाचे धर्मच आहेत. राक्षस हीं कामें करीतच असतात; पण हे सीते ! तुझें मन मला अनुकूल झाल्याशिवाय मी मात्र तुला स्पर्शसुद्धां करणार नाहीं. मला कामविकाराचा त्रास कितीहि झाला, तरी तुझी इच्छा नसतांना मी तुला स्पर्शहि करणार नाहीं.” ( सुंदरकांड स. २० )

स्वधर्मो रक्षसां भीरु सर्वदैव न संशयः ॥
गमनं वा परस्त्रीणां हरणं संप्रमथ्य वा ॥५॥

रावणानें आपल्या अन्तःपुरांत अनुरक्त झालेल्या स्त्रियाच ठेवलेल्या होत्या. तो पापी होता तरी सीतेवर बलात्कार करण्याची त्याला बुद्धि झाली नाहीं. ( तसें केल्यास मरण येईल असा त्याला शाप होताच. ) रावणानें छलवलानें सीतेचें मन वळविण्याचा यत्न केला, तिला तो मारा-

बयालाहि धांवला. " तुझी खांडोळी करून खाईन " असेंहि तो म्हणाला, परंतु बलात्कारास प्रवृत्त झाला नाहीं. यावरून स्त्रियांवर बलात्कार करणाऱ्या आजच्या रावणापेक्षां त्याची संस्कृति फार उच्च होती, हें सिद्ध होतें. स्त्रियांवर आक्रमण करणाऱ्या व तो धर्मच आहे असें समजणाऱ्या आजच्या रावणांच्या स्त्रियाहि अन्य स्त्रियांना भ्रष्ट करण्यास सहाय्य करीत असतात. पण रावणाच्या मंदोदरीनें, इतर स्त्रियांनीं आणि रावणाच्या जिवलग इष्ट-मित्रांनींहि सीताहरणाबद्दल रावणाची सारखी निर्भत्सनाहि केलेलीच आहे. कारण त्यांना हा रावणाचा घटिंगणपणा मुळींच मान्य नव्हता. मंदोदरीनें एकदां तर असें स्वच्छ सांगितलें कीं ही सीता रूप, कुलीनपण आणि दक्षता या बाबतींत माझ्या बरोबरीची नाहीं किंवा अधिक नाहीं, पण मोहानें तूं जाणत नाहींस आणि राक्षसकुळाचा नाश करण्यास सिद्ध झाला आहेस, याला काय म्हणावें ? ( ६।१११।२८ )

**न कुलेन न रूपेण न दाक्षिण्येन मैथिली ।**
**मयाधिका वा तुल्या वा तत्तु मोहान्न बुध्यसे ॥**

यजन करणारे ते यक्ष (यक्षामः) व रक्षण करणारे राक्षस ते (रक्षामः) अशी उत्तरकांड सर्ग ४ मध्यें राक्षसांची व्याख्या केली आहे.

(८८) **वानर हे मानवचः**—वानर हेहि सुसंस्कृत वैदिक संस्कृतीचे मानवच होते. एक तऱ्हेचा पाश ते कमरेस बांधीत व त्याचें टोंक पुच्छा-सारखें सुटलेलें असें, असें कांहीं शोधक म्हणतात. वानरसमाज महापराक्रमी होता, संपन्न होता, सुसंस्कृत होता. त्यांच्या स्त्रियांनासुद्धां वेद येत असत, असें 'तारे'च्या मागें 'मंत्रवित्' हें विशेषण लावलेलें आहे त्यावरून दिसतें.

(८९) **रावणाचें आक्रमणः**—परशुरामानें आर्यावर्तांतील क्षत्रियांचा फार मोठा संहार केला. त्यामुळें पराक्रमी लढवय्ये रावणाला तोंड देण्या-जोगे आर्यावर्तांत राहिले नाहींत. परद्वीपस्थ रावण मोठा धोरणी व मुत्सद्दी होता. त्यानें बलिष्ठ असलेल्या वानरसमाजाशीं युद्ध करून पाहिलें पण बलवान् वालीनें त्याला जेर केल्यामुळें रावणाला वानरांशीं सख्य करणें भाग पडलें. आर्यावर्तांतील आर्यसमाजावर आक्रमण करण्याच्या हेतूनें त्यानें नाशिक पंचवटी येथील जनस्थानांत चौदा हजार राक्षस पाठविले आणि

त्यांनीं तेथें हळुहळु आक्रमण करण्यास प्रारंभ केला. कोणताहि प्रबळ राजा आक्रमक असतोच. नाहीं तर त्याच्या शक्तियुक्तीला क्षेत्र मिळत नाहीं. रावणाचें हें आक्रमण देवांना व आर्यांना असह्य होत होतें, परंतु उघडपणें प्रतिकार करण्याजोगी संघटना त्यांची नव्हती. दशरथाच्या अश्वमेधाच्या वेळीं देव व आर्य यांतील प्रमुख राजे व पुढारी तेथें जमले व रावणवधाचा विचार करूं लागले. पण त्या पिढीला जें शक्य झालें नाहीं तें पुढच्या रामाच्या पिढीनें वानरांच्या सहाय्यानें करून दाखविलें. ज्या वानरांशीं रावणानें सख्य केलें होतें त्यांतीलच एका पक्षाशीं रामानें सख्य केलें व दुराचारी आणि आक्रमणशील रावणाचा वध केला. राम हा अवतारी पुरुष होता. हिरण्याक्ष, हिरण्यकश्यपु, रावण, कुंभकर्ण यांना मारण्या-करितां त्याचा अवतार होता या कल्पना मागाहूनच्या आहेत. रामाला वनवास पत्करतांना सीताहरण व रावणहनन यांची कल्पना नव्हती. पण राक्षसांच्या आक्रमणाची व प्रतिकाराच्या प्रसंगाची कल्पना नव्हती असें नाहीं. तात्पर्य रामाकडे मनुष्यबुद्धीनें पहाणें चुकीचें नाहीं. फाजील चिकित्सक बुद्धीनें कवीच्या काव्याची चीरफाड करणें हें एक टोंक आणि सारासारविचार सोडून अगदीं भाबड्या बुद्धीनें रामाला परब्रह्म समजणें हें दुसरें टोंक होय! येथें सारासारविचारानें आपल्या जीवनाला रामचरित्रापासून कशी स्फूर्ति मिळते हें पहावयाचें आहे.

(९०) **सूर्यवंशी राजेः**—वाल्मिकी रामायण बालकांड सर्ग ७० श्लोक १९ ते ४४ मध्यें रामचंद्रापूर्वींच्या एकुणचाळीस पिढ्यांचा उल्लेख आहे. बेचाळीस पिढ्यांचा उद्धार करण्याची कल्पना आपल्यामध्यें फार प्राचीन काळापासून आहे. बेचाळीस पिढ्यांचा उद्धार होतो किंवा बेचा-ळीस पिढ्या नरकांत जातात अशा समजुती आहेत. मायोपाधिक ब्रह्मा-पासून वैवस्वत मनु हा पांचवा पुरुष होय. यानेंच प्रथम मानवधर्मशास्त्र सांगितलें. मानवधर्मसूत्र व त्यानंतर भृगुप्रोक्त मनुस्मृति अशीं याचीं संस्करणें आहेत. मनुप्रोक्त धर्मशास्त्र म्हणजे समाजशास्त्रच होय! हा मोठा तत्त्ववेत्ता आणि प्रतिभावान् राजा होता. त्यानें राजा व प्रजा यांच्या-करितां अशीं बंधनें घालून दिलीं कीं तीं सर्व सूर्यवंशी राजांना कल्याणप्रद वाटलीं. प्रजानुरंजन हें सूर्यवंशी राजांचें वैशिष्ट्य म्हणून सांगता

येईल, व त्याच गुणामुळें सूर्यवंशी राजांची कीर्ति अजरामर होऊन राहिली आहे. श्रीरामचंद्रापूर्वीच्या कांहीं राजांचीं नांवें ऋग्वेदामध्यें आढळतात. दिवोदास, सुदास, हर्यश्व, भरत, मांधाता, त्रिशंकु, हरिश्चंद्र, निकुंभाश्व हे सूर्यवंशी राजे ऋग्वेदकालीन असावेत. यांतील कांहींचा उल्लेख रामायणांत आहेच. इक्ष्वाकु, पृथु, त्रिशंकु, मांधाता, भरत, सगर, दिलीप, भगीरथ, रघु, अंबरीष, नहुष, नाभाग, अज इत्यादि मोठे प्रतापी राजे श्रीरामचंद्रापूर्वी होऊन गेलेले आहेत. या राजांच्या कथा, आख्यानें इतस्ततः ज्या विखुरल्या आहेत, त्यांवरून यांची कीर्ति इतिहासरूपानें अजरामर झाली आहे. या सूर्यवंशी राजांच्या राजवटींत आर्य हा शब्द सद्गुणसमुच्चयवाचक बनला होता, एवढें सांगितलें म्हणजे त्यांच्या गुणांची कल्पना येईल. रामायणकालीन संस्कृतीची कल्पना देण्यापूर्वी रामायणांतील मुख्य नायकाचा परिचय प्रथम करून देणें अवश्य वाटतें.

(९१) **दोन दृष्टि:**—अलीकडे नवीन विचारप्रवाह वाहूं लागलेले आहेत. विशेषतः जगांत जे कुचकट व टाकाऊ विचार असतात त्यांचा प्रसार हिंदुस्थानामध्यें फार त्वरित होतो. या दृष्टीनें रामायणांतील पात्रांकडे पाहिल्यास "दशरथासारख्या स्त्रैण राजाच्या शब्दाला, मग तो बाप असला तरी, रामासारख्या मुलानें मान देणें हें मूर्खपणच ठरणार आहे. "अहो म्हातारबुवा, तुमची बुद्धि भ्रष्ट झाली" असें म्हणून रामानें राज्य बळकावावयास हवें होतें. तें सोडून राम अरण्यांत गेला हें काय शहाणपण? बरें, राम अरण्यांत गेल्यानंतर सीतेनें त्याचें राज्य चालविण्यास काय हरकत होती? कारण वसिष्ठ तर तोच सल्ला देत होता. तेव्हां सीतेनें विनाकारण वनवास पत्करला, आणि पातिव्रत्याच्या खुळचट कल्पनांमुळें आपणांवर अनेक आपत्ति ओढवून मात्र घेतल्या!! लक्ष्मण हाहि एकंदरींत वेडपटच! म्हणूनच कारण नसतांना तो वनांत गेला. कसलें बंधुप्रेम व कसली रामभक्ति! चैनींत अयोध्येंत राहाण्याचें सोडून लक्ष्मणानें विनाकारण कष्टाचा मार्ग स्वीकारला! भरत तर या सर्वांहून अगदींच अडाणी दिसतो! आयतें आईनें मिळविलेलें राज्य चालविण्याचें सोडून व मनगटाच्या जोरावर सर्वांना चूप बसविण्याचें सोडून देऊन सर्वस्वावर लाथ मारणारा भरत हा खरोखर अजागळ, अरसिक व गांवढळ नाहीं काय? त्याचप्रमाणें

मारुतीचीहि निरपेक्ष सेवा म्हणजे अत्यंत अजागळपणा होय!" अशा या सदोष दृष्टीनें रामायणांतील पात्रांकडे पाहिल्यास त्यांत कांहींच तथ्य वाटणार नाहीं. परंतु आदिकवी वाल्मिकीनें या सर्व इतिहासाचें काव्याच्या नाजुक कुंचल्यानें जें चित्रण केलें आहे, तें त्याशीं सहृदय झाल्याविना नीट समजणार नाहीं. ग्रंथकार ज्या भूमिकेवरून ग्रंथांतील पात्रांचें ऐतिहासिक व इतर दृष्टीनें विश्लेषण करतो, त्या भूमिकेशीं तादात्म्य पावणाऱ्यालाच त्यांतील गम्य कळतें. प्रस्तुत या अर्वाच्य विचारप्रवाहाला मुळींच मान न देतां सहृदय दृष्टीनें आणि आर्यसंस्कृतीचे प्रतिनिधी म्हणून गाजलेले रामायणांतील जे नायक व ज्या नायिका आहेत, त्यांचा विचार आर्यत्वाच्या भूमिकेवरूनच करणें योग्य आहे.

(९२) सर्वश्रेष्ठ श्रीरामचंद्रः—रामायणामध्यें वाल्मिकीनें वैयक्तिक सद्‌गुणांची पराकाष्ठा दाखविली आहे. म्हणूनच या ग्रंथाला व्यष्टिधर्माचा उत्कृष्ट आदर्श असें नांव देतां येईल. रामायणांतील प्रत्येक व्यक्तीच्या गुणांचा परिपोष स्वतंत्र व अन्यनिरपेक्ष आहे, म्हणूनच तो परमावधीस पोंचलेला आढळेल. मार्मिक वाचकाला रामायणांत काय सांपडणार नाहीं? खरा कर्मयोगी कसा असावा? संकटाचे वेळीं थोर लोक कसे वागतात? राजानें प्रजाहितदक्ष कसें असावें? पतिपत्नीचें निर्विषयक प्रेम कसें असतें, गृहस्थाश्रमी मनुष्याचें अनुकरणीय आचरण, पितृभक्ति, बंधुप्रेम वगैरे गुण रामायणांत जसे आढळतील तसे अन्यत्र क्वचित्! रामायणाचा मुख्य नायक जो राम त्याच्या अंगीं कोणकोणते गुण होते हें पाहूं लागलें म्हणजे काय सांगावें व काय वगळावें हाच प्रश्न पडतो. आदर्श युवराज म्हणून त्याला वीर्यवान, बुद्धिमान, अदीन, कृतात्मा, महामति, प्रतिभावान, स्थिरचित्त, सांगवेदवित्, वाग्मि, प्रियवादी, सत्यवादी, धर्मज्ञ, शुचि, वृद्धसेवी, अभिविनीत, अप्रमत्त, शीलवान, मृदु, प्रजानुरक्त, वपुष्मान इत्यादि जवळजवळ शेंदोनशें गुणवाचक विशेषणें त्याला वाल्मिकीनें दिलेलीं आहेत. श्रीरामचंद्रामध्यें सर्वच गुण उत्कटतेनें दिसतात. प्रजानुरंजनी राजा, उत्कृष्ट योद्धा, संकटकालीं न डगमगणारा धीरपुरुष, कट्टा कर्मयोगी, धैर्याचा महामेरु, पितृभक्त, मातृभक्त, गुरुशुश्रूषक, एकवचनी,

एकपत्नी, एकबाणी, प्रज्ञावान, पौरुषवान एवंच जीं जीं विशेषणें लावावीत तीं तीं सर्व रामाला तंतोतंत लागूं पडतात.

**(९३) राम हा मनुष्यच होता:**—रामाचे ठिकाणीं हा एवढा गुणसमुच्चय होता म्हणूनच तो जगद्वंद्य झाला. जेथें जेथें रामनामाचा निर्देश आहे त्या त्या ग्रंथांत त्याच्या गुणांचाहि गौरव केलेला आहे. रामाचें महत्त्व त्याच्या गुणसमुच्चयांत आहे, हें केव्हांहि विसरतां कामा नये. राम स्वतःला मनुष्यच समजत होता. सीता जेव्हां अग्निदिव्य करूं लागली तेव्हां राम तेथें उपस्थित असलेल्या सर्व देवांना सांगूं लागला कीं " मी दशरथात्मज राम सामान्य मनुष्य आहे तेव्हां त्या दृष्टीनेंच मला वागलें पाहिजे. "

**आत्मानं मानुषं मन्ये रामं दशरथात्मजम् ॥१२॥** युद्धकांड स. ११७

धैर्य हा मोठा सद्‌गुण रामाच्या ठिकाणीं होता. रामचरित्र हें संकटपरंपरेनें भरलेलें आहे. सर्व संकटांना तोंड देण्याचें सामर्थ्य धैर्यामुळेंच उत्पन्न होतें व धैर्य या गुणाचा प्रभाव संकटाविना दिसून येत नाहीं. धर्मपरता हा एक सद्‌गुण रामाच्या चारित्र्यांत धैर्याशीं संमिश्र झालेला दिसतो. धर्मपरतेचें व्रत एकदां स्वीकारलें कीं त्या योगानें आपत्ति वरचेवर येतात असा सामान्य नियम आहे. पण त्या आपत्ति सहन करण्याचें सामर्थ्य धर्मनिष्ठेमुळेंच येतें. धर्मपरता हा गुण मनःसमाधान स्थिर ठेवून उत्साहाची वृद्धि करतो व समाधानामुळें मनाचा खंबीरपणा कायम राहिला कीं आत्मविश्वास उत्पन्न होतो. रामाचे ठिकाणीं आत्मविश्वास हा एक मोठा सद्‌गुण आढळतो. आत्मविश्वासाचा प्रभाव कांहीं विशेषच असतो. त्यायोगें अमुक एक कार्य हटकून आपल्याकडून होईल अशी निश्चिती असते. याच आत्मबळावर अनेक कार्यें मारून नेतां येतात. त्याग हा एक परमोच्च गुण रामचंद्राच्या ठिकाणीं होता व तो पितृभक्तीच्या वेळीं रामानें प्रगट केला. पित्याला वचनमुक्त करण्याकरितां रामानें अरण्यवास पत्करला, हा प्रसंग केवढ्या त्यागाचा व किती हृदयद्रावक होता !

**(९४) रामाचा त्याग:**—रामाचा वनवास हा अद्‌भुत कथाभाग आहे. राज्याभिषेकाचा निश्चय झालेला, प्रजेची अनुमति घेतलेली, मांडलिक राजांची मान्यता मिळालेली, दशरथ राजाची पूर्ण इच्छा असतांना व पट्टराणीचा मुलगा या नात्यानें यौवराज्याचा अधिकार असतांना राम-

चंद्रानें पितृवचन खरें व्हावें, आपसांत दुही वाढूं नये या थोर विचारानें जो अरण्यवास पत्करला, त्याला जगांत तोडच नाहीं.

कैकय राजाला दशरथानें कैकयीच्या मुलास राज्य देईन असें वचन विवाहाचे वेळीं दिलें होतें. कैकयी आपल्या मुलांकरितां खटपट करीत होती. दशरथ, कौसल्या, राम व सुमित्रा असा एक पक्ष व दुसरा कैकयीचा पक्ष असे दोन पक्ष होते. लोकांच्या व राजांच्या सहानुभूतीनें आणि स्वपक्षीयांच्या सहाय्यानें रामाला राज्यावर बसणें शक्य होतें. लक्ष्मण व इतर रामपक्षीय लोक भरतपक्षीयास ठार करून बापास कैद करून रामासच राज्य द्यावें असें म्हणत होते. पण यामुळें युद्धाचा दावानल भडकला असता, नाहक प्रजा प्राणास मुकली असती, व लोकांना अपरिमित दुःख झालें असतें!! तें सर्व टाळण्याकरितां रामानें राज्यत्यागाचें शुद्ध वातावरण उत्पन्न केलें, दुहीचा अग्नि विझविला, सूर्यवंशाचें तेज वाढविलें आणि राष्ट्रापुढें फारच उच्च ध्येय त्यानें ठेवलें. अखिल वसुंधरेचें अधिपत्य हातीं येत असतां त्यावर लाथ मारून, पित्याला सत्यवादी ठरविणें, आपसांतील दुही टाळणें आणि प्रजेला सुख देणें, एवढ्याकरितां त्यानें वनवास पत्करला. यांतच त्याच्या त्यागवृत्तीची पराकाष्ठा दिसून येते. लोकांच्या अत्युत्कट प्रेमाचा त्याला पाठिंबा होता. पण त्या जोरावर सिंहासन पटकविण्याची अपेक्षा त्यानें धरली नाहीं. तरुण भार्येचा मोह व वनवासांतील दुःखें यांनीं त्याचें हृदय विदीर्ण केलें नाहीं. राज्यवैभव—सुखलालसेनें त्याची चित्तवृत्ति क्षुब्ध झाली नाहीं, किंवा कैकयीच्या भाषणानें त्याला क्रोध आला नाहीं. अल्पवयांत, बुद्धीला स्थिरता आणण्याजोगा जगाचा अनुभव नसतांना त्यानें जी स्थितप्रज्ञता दाखवून राज्यत्याग केला, यांतच त्याच्या स्वार्थत्यागाचा कळस आहे.

वनांत जाण्याचे वेळीं राक्षसांच्या उपद्रवाची जाणीव रामाला मुळींच नव्हती असें नाहीं. विश्वामित्राच्या आश्रमांत ती त्याला कल्पना आली होती आणि राक्षसांचा संबंध कोठपर्यंत पोंचत आहेत व पुढें हा उपद्रव कसा वाढणार आहे, याची रामाला कल्पना नव्हती; असें म्हणतां येणार नाहीं. तथापि सीताहरण आणि रावणहनन इत्यादि गोष्टी संभाव्य आहेत, याची मात्र रामाला कल्पना नसावी. रामानें भाऊबंदांशीं लढण्यांत शक्ति

खर्च न करतां बाह्य शत्रंशीं लढण्यांत त्यानें आपलें सामर्थ्य खर्च केलें हेंच त्याचें थोरपण होय.

(९५) **एकपत्नीव्रतः**–परमोच्च त्याग, पितृभक्ति, बंधुप्रेम, मैत्री जोडणें, युद्धकौशल्य, व्यवहारज्ञान, राजकीय धोरण, कौटुंबिक वर्तन, मनुष्य-परीक्षा, वाक्चातुर्य वगैरे सर्व सद्गुण रामचंद्राच्या ठिकाणीं ठसठशीतपणें दिसतात. यौवराज्याभिषेकाचे वेळीं रामाचें वय अवघें अठ्ठावीस वर्षांचें होतें. एवढ्या अल्प वयांत इतके सद्गुण अंगीं असणें, विशेषतः राजपुत्रानें त्या कालांत अनेक स्त्रिया करण्याची चाल असतांना प्रत्यक्ष पिता दशरथ याच्या तीन पट्टराण्या आणि अन्य साडेतीनशे स्त्रिया असतांना अत्यंत विरुद्ध परिस्थितींत एकपत्नीव्रत पाळणें ही फारच मोठ्या निग्रहाची गोष्ट होय ! रामचरित्र या एकपत्नीव्रताच्या गुणामुळेंच उत्कटतेनें विराजत आहे.

अलीकडे एकपत्नीव्रत, ब्रह्मचर्य यांची टवाळी होत आहे व आपणा-सारखेच सर्व थोर पुरुष अधःपतित होते असें मानण्याची प्रवृत्ति वाढत आहे. त्यास अनुसरून कोणी रामाला अनेक स्त्रिया होत्या, एकपत्नीव्रत हें केवळ थोतांड होय, असे निरर्गल प्रलाप काढतात, तें कसें अयुक्त आहे हें आतां पाहूं.

राम भरद्वाजाश्रमांत गेला तेव्हां तो त्यांना सांगतो कीं, ‘ ही माझी परमकल्याणकारक भार्या अरण्यांत मजसमवेत आली आहे, हिला आशीर्वाद द्या.’ ( अयोध्याकांड. सर्ग ५४ श्लो. १४ ). पुढें राम अगस्तिऋषींच्या आश्रमांत गेला. तेथें त्यांनीं आयुधें दिलीं. अगस्तीनें सीतेची फारच प्रशंसा केली व सर्वसामान्य स्त्रियांच्या स्वभावाविरुद्ध सीतेचें आचरण आहे असें उद्गार काढले. ( अरण्य. सर्ग १३ श्लो. ५ ) अरण्यकांड सर्ग ९ श्लो. ५–६ मध्यें सीता म्हणते कीं, “ माणसाला मिथ्या भाषण, परस्त्रीसेवन व वैरावांचून क्रोधाचें अवलंबन अशीं तीन व्यसनें असतात. पण रामाला याचा गंधहि नाहीं. तो स्वदारनिरत आहे.” अरण्यांत सीताविरहानें राम जीव द्यावयालाहि तयार झालेला होता. सीतेविना त्याला सर्व जगत् शून्य भासत होतें. ‘ सीतेशिवाय मी जिवंत राहूं शकत नाहीं.’ असें तो म्हणतो.

**‘ न त्वहं तां विना सीतां जीवेयं हि कथंचन ’ ॥१६॥**

–अरण्यकांड सर्ग ६३

पंपा सरोवर पाहिल्याबरोबर रामाला आनंद वाटला आणि भोंवतालचें सृष्टिसौंदर्य पाहिल्याबरोबर त्याला सीतेचें स्मरण झालें. मनुष्याला अत्यंत आनंद झाला कीं अत्यंत प्रिय माणसाचें स्मरण होत असतें. तसें तें सीतेचें स्मरण होतांच रामाचा शोक वाढला व तो लक्ष्मणाला म्हणतो कीं, 'हे कोकिल, हे मनोहर पक्षी, हा चैत्रांतील वसंत माझें दुःखच वाढवीत आहे. सीता माझ्याशिवाय व मी तिच्याशिवाय जिवंत राहाणेंच अशक्य होय!'

**मयि भावो हि वैदेह्यास्तत्त्वतो विनिवेशितः।**

**ममापि भावः सीतायां सर्वथा विनिवेशितः ॥५२॥** किष्किंधा सर्ग १

सुग्रीवाशीं सख्य झालें, वालीचा वध झाला, पावसाळा संपल्यावर सीताशुद्ध्यर्थं यत्न करण्याचें ठरलें. परंतु रामाला सीताशुद्धि व रावणवध यांचा ध्यास सारखा लागला होता.

**मनःस्थामपि वैदेहीं चिन्तयामास राघवः ॥४॥** –किष्किंधा सर्ग ३०

अशोकवनांत मारुतीची व सीतेची भेट झाली. मारुतीनें सर्व वृत्तांत निवेदन केला. मारुती म्हणाला, 'सीते, राम तुझें सारखें स्मरण करीत आहे. रामाचें अन्तःकरण तुझे ठिकाणींच आहे. तो मद्यमांसविरहित असें भोजन करतो. पुष्पफलादि चांगली वस्तु पाहिली कीं तुझ्या शोकानें तो व्याकुळ होतो व झोंपेंतून जागा झाला कीं हाय हाय, हे सीते असेच उद्गार काढतो.'

**नित्यं ध्यानपरो रामो नित्यं शोकपरायणः।**
**नान्यच्चिन्तयते किंचित्स तु कामवशं गतः ॥४३॥**
**अनिद्रः सततं रामः सुप्तोऽपि च नरोत्तमः।**
**सीतेति मधुरां वाणीं व्याहरन्प्रतिबुध्यते ॥४४॥** –सुंदर. सर्ग ३६

रामाचें मन दुसरीकडे नाहीं, केवळ मजकडेच आहे हें ऐकून सीतेला किती धन्यता वाटली असेल! पुढें युद्ध चालू झाल्यावर इंद्रजितानें मायामय सीता करून ती ठार केली अशी बातमी उठविली. हें ऐकतांच श्रीरामचंद्र बेशुद्ध झाला व एखाद्या वृक्षाप्रमाणें जमिनीवर धाडकन् पडला, इतकें त्याचें सीतेवर प्रेम होतें. उत्तरकांडांत रामानें यज्ञ केल्याचें वर्णन

आहे. त्यापूर्वी सीता भूमिविवरामध्यें प्रविष्ट झाल्यामुळें रामानें सुवर्णमय सीतेला जवळ घेऊन यज्ञ केले असे उल्लेख आहेत.

**न सीतायाः परां भार्यां वव्रे स रघुनंदनः ।**
**यज्ञे यज्ञे च पत्न्यर्थं जानकी काञ्चनी भवत् ॥७॥** उत्तर. सर्ग ९९

या सर्व उल्लेखांवरून रामाच्या एकपत्नीव्रताची निश्चिति होतें, व आक्षेपकांचें म्हणणें निर्मूल ठरतें.

**(९६) सीतेची तेजस्विता व पातिव्रत्यः**—रामपत्नी सीता हिची योग्यता रामापेक्षां कांकणभर अधिकच आहे. सीतेचें पतिव्रतापंचकांत स्मरण करण्याचा परिपाठ तिच्या पातिव्रत्य या गुणामुळेंच पडलेला आहे. रामाची पत्नी म्हणून सीतेवर विपत्तीचा भार एकंदरींत अधिक पडला व तो तिनें सहन केला. रामापेक्षां सीतेच्या त्यागाची पायरी वरची आहे. रामाला पित्याला वचनमुक्त करण्याकरितां वनवास पत्करणें भागच होतें. परंतु सीतेची तशी स्थिति नसतांना पातिव्रत्याच्या परमोच्च कल्पनेनें तिनें रामाबरोबर अरण्यांत जाण्याची सिद्धता केली. राम वनांत जाणार हें समजतांच त्याजबरोबर वनांत जावें कां न जावें या शंकेला तिनें अंतःकरणांत स्थान दिलें नाहीं.

राम वनाला निघाला तेव्हां सीतेला सांगतो कीं, "राजाज्ञा म्हणून मी वनांत जात आहे. तूं कैकयी व भरत यांच्या मर्जीप्रमाणें वाग. त्यांच्याविरुद्ध एकहि शब्द बोलूं नकोस. राजे लोक मर्जीप्रमाणें वागलें असतां संतुष्ट होतात." हें भाषण ऐकतांच सीता चवताळली व आपल्या बापाला असला स्त्रीसारखा जांवई मिळाला म्हणून रागावली. "स्त्रीवर उपजीविका करणाऱ्या हीन माणसाप्रमाणें मला दुसऱ्याजवळ राहाण्यास सांगतां ही किती शरमेची गोष्ट आहे? तें मजकडून मुळींच होणार नाहीं. रामा, ध्यानांत ठेवा कीं मी तुमच्याबरोबरच येणार. मला वनवासांतील दुःखाची पर्वा नाहीं. मी तुमच्यापुढें निर्जन गहन वनांत जाईन. अनेक श्वापदांसमवेत राहीन. ब्रह्मचारिणी राहून तुमची सेवा करीन. कंदमुळें खाईन, वाटेल त्या हालअपेष्टा सोसेन. पण रामा, मी तुमचेबरोबरच येईन." असें ती म्हणाली.

कौसल्या जेव्हां सीतेला आलिंगन देऊन उपदेश करून निरोप देते, त्यावेळीं सीतेचें उत्तर पुढीलप्रमाणें आहे; ती म्हणते, "मी पतिव्रताधर्मानें वागेन. सासूबाई, मी धर्ममार्गावरून भ्रष्ट होणार नाहीं. स्त्रीला शंभर पुत्र असले तरी पतीशिवाय सुख नाहीं. अमित सुख देणारा पति हेंच स्त्रीचें दैवत होय! मीं त्याच्या मर्जीविरुद्ध कधीं वागणार नाहीं. दासी, सखी, भार्या, या सर्व नात्यानें मी त्याची सेवा करीन. पतीचें भाग्य भोगणारी एक स्त्रीच असते. पति हाच तिचा आश्रय आहे. पतीच्या प्रेमाच्या छायेंतच स्त्रीला सुख वाटतें. तात्पर्य, सासूबाई, मी आपल्या उपदेशाप्रमाणें अक्षरशः वागेन." ( अयोध्याकांड सर्ग ३९ )

वनवासांतील दुःखद व कष्टमय राहाणीची तिला जाणीव असतांना पतिविरहदुःख तिला असह्य वाटून राम नको म्हणत असतांना तिनें अरण्यांत येण्याचा आग्रह धरला. संकट आलें कीं तें टाळण्यासाठीं हरप्रयत्न करणें हा मनुष्यस्वभाव आहे. या दृष्टीनें सीतेनें यावेळीं कैकयीच्या वरप्रदानाचे बाबतींत असतील तेवढ्या पळवाटा व निघतील तेवढे श्लेष सुचवून अरण्यवास चुकविण्याचा प्रयत्न करावयास पाहिजे होता. परंतु सीतेच्या भाषणांत तसा मुळींच ध्वनी नाहीं. उलट रामानें नको म्हटलें असतांना तिनें अरण्यवासाचा हट्ट घेतला. रामानें राज्यत्याग करून प्रतिज्ञापालन करण्याचें ठरविलें, त्यासहि तिनें असंमति दर्शविली नाहीं. यापेक्षां तिच्या मोठ्या मनाची आणखी साक्ष कोणती? रामाप्रमाणें सीतेचे ठिकाणीं धैर्य व निर्भयता हे गुण फार उत्कट रीतीनें दिसतात. या गुणांच्या सहाय्यानेंच तिनें रामचंद्राचें पुनर्दर्शन होईपर्यंत रावणाशीं बाणेदारपणाचें वर्तन केलें. रावणाशीं बोलण्याचे सीतेला जेव्हां प्रसंग आले तेव्हां ती म्हणते, "नीचा, मी सिंही आहे, तूं जंबुक आहेस. सर्पाच्या तोंडांतील दाढ काढण्याचें, कालकूट विष भक्षण करण्याचें, वस्त्रामध्यें अग्नि बांधण्याचें तूं साहस करीत आहेस, हें लक्षांत ठेव. राम हा तुझ्या म्हणण्याप्रमाणें राज्यभ्रष्ट, दुर्बल, शौर्यहीन व गयाळ असला तरी तोच माझें दैवत आहे, हें ध्यानांत ठेव."

**दीनो वा राज्यहीनो वा यो मे भर्ता स मे गुरुः ॥**

रावणानें सीतेला लंकेंत नेलें. तिची इच्छा नसतांना रावणानें आपलें ऐश्वर्य दाखवून तिला दिपविण्याचा यत्न केला. शत्रूच्या कचाट्यांत सांपडली

असतांहि तृण आड भरून सीता निर्भयपणानें म्हणते, ' धर्मात्मा राम हाच माझा पति आहे, मीच त्याची धर्मपत्नी आहे, तो माझा देव आहे. राक्षसाधमा, तुझ्यासारख्याला मी मुळींच वश होणें शक्य नाहीं. '

**रामो नाम स धर्मात्मा त्रिषु लोकेषु विश्रुतः ।**
**दीर्घबाहुर्विशालाक्षो दैवतं स पतिर्मम ॥३॥**
**तथाऽहं धर्मनित्यस्य धर्मपत्नी दृढव्रता ।**
**त्वया स्प्रष्टुं न शक्याऽहं राक्षसाधम पापिना ॥१९॥**

—अरण्यकांड सर्ग ५६

रावणानें सीतेला वश करण्याकरितां बलात्काराशिवाय सर्व यत्न केले. धमक्या दिल्या, छळ केला, मला वश न झालीस तर माझे आचारी न्याहारीकरितां तुझे तुकडे तुकडे करतील, असेंहि शेवटीं त्यानें सांगितलें. अनेक राक्षसींनीं सीतेला दटावलें, भीति घातली आणि नाहीं नाहीं ते प्रकार केले. तथापि तिनें खडसावून असें सांगितलें कीं, "तुम्ही मला खुशाल खा, मी तुमचें कांहींहि ऐकणार नाहीं. मी रावणाला डाव्या पायानेंहि शिवणार नाहीं. तुम्ही मला कापलें, तोडलें, जाळलें तरी मी रावणाकडे ढुंकून बघणार नाहीं. मग तीच बडबड कशाला करतां?" —सुंदरकांड सर्ग २५

**कामं खादत मां सर्वा न करिष्यामि वो वचः ॥३॥**
**चरणेनापि सव्येन न स्पृशेयं निशाचरम् ।**
**रावणं किं पुनरहं कामयेयं निशाचरम् ॥८॥**
**छिन्ना भिन्ना प्रभिन्ना वा दीप्ता वाग्नौ प्रदीपिता ।**
**रावणं नोपतिष्ठेयं किं प्रलापेन वश्चिरम् ॥१०॥**

—सुंदरकांड सर्ग २६

रावणानें सीतेला एकदां मारण्याचाहि यत्न केला. तथापि सीतेनें न डगमगतां तोहि प्रसंग पार पाडला.

इतक्या हालअपेष्टांमध्यें, छळामध्यें आणि जाचामध्यें असतांना सीतेचें प्रेम रामावर अत्यंत दृढ होतें. मारुतीच्या दृष्टीस शोध करितां करितां सीता जेव्हां पडली, त्यावेळीं तिचें तेज पाहिल्यावर आणि तिची सर्व वागणूक अवलोकन केल्यावर सीता ही कशी पतिनिष्ठ आहे हें त्याच्या ध्यानीं आलें.

नैषा पश्यति राक्षस्यो नेमान्पुष्पफलद्रुमान् ।
एकस्थहृदया नूनं राममेवानुपश्यति ॥२५॥ –सुंदरकांड सर्ग १७

सीता राक्षसी, पुष्पें, फलें यांतील कांहीं पहात नसून अगदीं एकतान्तेनें ती रामाचाच ध्यास घेऊन बसली आहे. सीता त्यावेळीं दीना, उपवासकृश्या, अश्रुपूर्णमुखी, मलिनवासा अशीच त्याला दिसली.

(९७) **सीतेचा स्वाभिमानः**–मारुतीची व सीतेची भेट झाली, मारुतीनें रामाची खुशाली कळविली. सीता म्हणते, "कपींद्रा, कसें तरी करून रामाची व माझी एकदां भेट कर. मी त्याच्या विरहानें अगदीं व्याकुळ झालेली आहें." त्यावेळीं मारुती म्हणतो कीं, "बैस माझ्या खांद्यावर, मी तुला घेऊन जातों व रामदर्शन घडवितों." लंकादहनानंतरहि मारुती निरोप घेण्यास आला तेव्हांहि तो म्हणतो कीं, "चल, माझ्या खांद्यावर बैस." तेव्हां सीता म्हणते, "वानरा, भर्त्याशिवाय अन्याचा स्पर्श करण्याची माझी इच्छा नाहीं. रावणाचा स्पर्श मी अनाथ, असमर्थ व पराधीन म्हणून माझ्या इच्छेविरुद्ध झाला. त्यावेळीं माझा नाइलाज होता. राम स्वतः येऊन रावणाला मारून मला घेऊन जाईल, त्याच वेळीं तें उचित होईल."

भर्तुर्भक्ति पुरस्कृत्य रामादन्यस्य वानर ।
नाहं स्प्रष्टुं स्वतो गात्रमिच्छेयं वानरोत्तम ॥६२॥
यदहं गात्रसंस्पर्शं रावणस्य गता बलात् ।
अनीशा किं करिष्यामि विनाथा विवशा सती ॥६३॥
यदि रामो दशग्रीवमिह हत्वा सराक्षसम् ।
मामितो गृह्य गच्छेत तत्तस्य सदृशं भवेत् ॥६४॥

–सुंदरकांड सर्ग ३८

सीतेचे हे स्वाभिमानाचे उद्गार ऐकून मारुती चकित झाला असल्यास नवल नाहीं.

रावणाच्या बंदिवासांत असतांना सीतेवर दुःखाचे अकल्पित प्रसंग आले. पण त्या सर्वांवर ताण करणारा प्रसंग म्हणजे युद्धानंतर श्रीरामाच्या भेटीचा प्रसंग होय! एक वर्षभर पतिविरहानें झुरत असलेली सीता

रामाच्या भेटीस येते, तोंच त्यानें सर्वांसमक्ष सीतेच्या वर्तनासंबंधानें शंका घेऊन तिचा अपमान केला ! तें पाहून लक्ष्मण व मारुतीसुद्धां संतप्त झाले. अशा बिकट प्रसंगीं अग्निदिव्याचा अवलंब तिनें केला. परपुरुषस्पर्शाबद्दल तिनें तें प्रायश्चित्तच घेतलें. पण त्यावेळीं ती रामाला असें स्पष्ट सांगत आहे कीं, "सामान्य स्त्रीप्रमाणें माझ्याविषयीं आपण शंका घेतां ती सोडून द्या. दुर्दैवानें पराधीनतेमुळें मला परपुरुषस्पर्श झाला. परंतु माझ्या स्वाधीन असलेलें माझें मन हें तुमच्या ठिकाणींच स्थिर आहे. क्षुद्र मनुष्याप्रमाणें क्रोधवश होऊन माझ्यासंबंधाचा विचार सोडून द्या."

यदहं गात्रसंस्पर्शं गतास्मि विवशा प्रभो ।
कामकारो न मे तत्र दैवं तत्रापराध्यति ॥८॥
मदधीनं तु यत्तन्मे हृदयं त्वयि वर्तते ।
पराधीनेषु गात्रेषु किं करिष्याम्यनीश्वरी ॥९॥

—युद्धकांड सर्ग ११६

या सणसणीत उत्तरानंतर सीतेनें लक्ष्मणाला चिता रचण्यास सांगितली. चितेमध्यें ती प्रविष्ट झाली. अग्नीनें 'रामा, ही शुद्ध आहे, हिचा स्वीकार कर', असें सांगितल्यावर रामाचे नेत्र आनंदाश्रूंनीं भरून आले. राम म्हणाला, 'सीतेविषयीं माझी खात्री होती, परंतु लोकापवाद टाळण्याकरितां मला असें करावें लागलें. मारुतीचे तोंडून सीतेनें बाणेदार वर्तन केल्याची हकीगत रामाला समजलीच होती, व त्यामुळें तो आंतून निःशंक व आनंदी होता. तथापि रामाच्या या शंकेमुळें सीतेच्या हृदयाला किती धक्का बसला असेल याची कल्पनाच करवत नाहीं.

वनांतून घरीं आल्यानंतर क्षुद्र लोकापवादाच्या भयानें रामानें सीतेचा त्याग केला, तो प्रसंगहि दुःखद व भयंकर होता. कारण यावेळीं पतीनें तिचा त्याग केल्यामुळें तिला शारीरिक व मानसिक क्लेश अतिशय झाले. पण ते सर्व सहन करून तिनें लक्ष्मणाबरोबर श्रीरामाला प्रजावात्सल्याविषयीं जो निरोप पाठविला तो वाचला कीं तिच्या धैर्यशाली मूर्तीपुढें लोटांगण घालावेसें वाटतें आणि तिचें व्यावहारिक धोरण व मनाचें औदार्य पाहून अत्यंत आदर वाटतो.

जानासि च यथा शुद्धा सीता तत्त्वेन राघव ।
भक्त्या च परया युक्ता हिता च तव नित्यशः ॥१२॥
अहं त्यक्ता च ते वीर अयशोभीरुणा जने ॥ १३ ॥
यच्च ते वचनीयं स्यादपवादः समुत्थितः ।
मया च परिहर्तव्यं त्वं हि मे परमा गतिः ॥ १४ ॥

उत्तरकांड सर्ग ४८

सीता कशी शुद्ध आहे हें तूं जाणतोस. तुझ्याविषयीं तिचें प्रेम कसें आहे हेंहि तुला विदित आहे. वीरा, लोकापवादाला भिऊन तूं माझा त्याग केला आहेस. माझ्यामुळें तुझी निंदा होत असेल तर तिचा परिहार मलाच केला पाहिजे. कारण तूंच माझा आश्रय आहेस.

पतिपत्नीमधील वैषयिक प्रेम संयुक्त स्थितींत अबाधित असतें. परंतु खऱ्या प्रेमाची परीक्षा वियुक्त स्थितींतच होते. रामानें सीतात्याग करण्यांत कठोरपणा दाखविला खरा, परंतु विषयलंपट मनुष्याकडून हें झालें असतें काय? रामसीतेमध्यें जे विरहाचे प्रसंग आले, त्यावेळीं रामाला सीतेचा व सीतेला रामाचा ध्यास लागला होता. हें परस्पर प्रेमाचें द्योतक होय.

लोकापवादास्तव लक्ष्मणानें सीतेला अरण्यांत सोडलें. ती रडूं लागली, इतक्यांत वाल्मिकी तेथें आले व त्यांनीं तुझें स्वागत असो, तूं शुद्ध आहेस, तूं माझ्या आश्रमांत राहा, असें म्हणून तिचें सांत्वन केलें. वाल्मिकींनें मुनिपत्न्यांनाहि सीता पूज्य आहे म्हणून तुम्ही तिला चांगल्या तऱ्हेनें वागवा अशी आज्ञा केली. उत्तरकांड सर्ग ४९

अपापां वेद्मि सीते ते तपोलब्धेन चक्षुषा ।
गौरवात् मम वाक्याच्च पूज्या वोऽस्तु विशेषतः ॥१८॥

(९८) **लक्ष्मणाचा स्वार्थत्यागः**—लक्ष्मणाचा स्वार्थत्याग या दोघांच्यापेक्षां उच्च कोटीचा ठरतो. कारण पित्याचें वचन खरें करण्याकरितां रामाला व सहधर्मचारिणी म्हणून सीतेला वनांत जाणें प्राप्तच होतें. परंतु लक्ष्मणाचा तसा संबंध नसतांना तो अनन्य मातृप्रेमानें व दशरथानें केलेल्या अन्यायाच्या चिडीनें दंडकारण्यांत जावयास सिद्ध झाला हें अपूर्व होय! खरी आत्मस्फूर्ति लक्ष्मणाच्या वागणुकींतच दिसून येते. नवलाची

गोष्ट ही कीं चौदा वर्षांच्या दीर्घकालीन अवधींत लक्ष्मणाच्या तोंडून त्यागवृत्तीला कमीपणा आणणारे उद्गार पश्चात्तापानें चुकूनहि निघालेले नाहींत. त्यानें भ्रातृसेवेचें जें असिधाराव्रत स्वीकारलें तें आजन्म शेवटास नेलें !

लक्ष्मण हा उघड्या अन्तःकरणाचा, तडफदार व तडकाफडकी निकाल लावून टाकणारा होता. रामाला वनवासांत धाडण्याची चाललेली उलाढाल त्यानें जेव्हां पाहिली तेव्हां तो चवताळून रामाला म्हणाला, " आपला बाप हा स्त्रैण, विषयांध, विपरीतमति, कृपण व बुद्धिभ्रष्ट असा झालेला आहे. याला कैद करून राज्य मिळविण्यांत कांहींहि अधर्म नाहीं." लक्ष्मणाचें म्हणणें हें सत्य होतें तरी व कौसल्येस तें पसंत पडलें तरी रामानें त्याला चूप बसविलें. रामाबरोबर लक्ष्मण अरण्यांत निघाला, त्यावेळीं सुमित्रेनें जो त्याला बोध केला तो एकुलता एक पुत्र जिला आहे, अशी कोणतीहि माता करणार नाहीं असाच आहे:—

रामं दशरथं विद्धि मां विद्धि जनकात्मजाम् ।
अयोध्यामटवीं विद्धि गच्छ तात यथा सुखम् ॥२।४०।९॥

लक्ष्मणाला राज्यलोभ नव्हताच. पण दशरथानें रामावर केलेल्या अन्यायामुळें तो चिडला हें अगदीं उघड दिसतें. लक्ष्मण हा रामाचा सहचर होता म्हणून वनवासांत सीतारक्षण व इतर कार्यें यांची व्यवस्था करणें हीं कामें लक्ष्मण व्यवस्थित करी. त्यामुळें रामाला पुष्कळ सुख झालें. लक्ष्मणाचें रामावर अकृत्रिम प्रेम होतें म्हणूनच पहिल्या मुक्कामावर रामानें परत जाण्याविषयीं सांगतांच लक्ष्मणानें " उदकाबाहेर काढलेला मत्स्य जसा जिवंत राहात नाहीं तसें माझें होईल " असें उत्तर दिलें. रामाला चार दोन प्रसंगीं लक्ष्मणानें बोधहि केलेला आहे. सीताहरणानंतर राम क्रुद्ध होऊन 'जग जाळतो' असें म्हणाला. पंपासरोवरावर एकदां राम अगदीं निराश होऊन विषण्ण होऊन बसला. युद्धप्रसंगींहि एकदां राम निराश झाला होता अशा वेळीं लक्ष्मणानें बुद्धिवाद करून त्याला धीर देण्याचें कार्य केलें.

सीतारक्षणार्थ आश्रमांत राहाण्याची रामाची आज्ञा व त्या विरुद्ध सीतेनें रामाकडे जा म्हणून केलेली आज्ञा, अशा कचाट्यांत लक्ष्मण

सांपडला, तो प्रसंग आणीबाणीचा होता. हा मृग मायामय आहे हें त्यानें धोरणानें ओळखलें, सीतेची समजूत तो घालूं लागला. पण ती जेव्हां भलते आरोप त्याचेवर करूं लागली त्यावेळीं पुढील संकटाविषयीं अनुमान करून तो आश्रमांतून बाहेर पडून जवळच आसपास राहिला असता तर तें ठीक होतें. त्यानें तसें केलें नाहीं म्हणून रामानें त्याला दोष दिला; पण लक्ष्मण जर आसपास उपस्थित असता तर रावणवध होऊन तेथेंच रामायणाची इतिश्री झाली असती.

(९९) **लक्ष्मणाचा निग्रहः**–राम व लक्ष्मण पंपातीरीं आल्यावर सीतेनें मोठ्या धोरणानें उत्तरीय वस्त्रांत बांधून टाकलेले अलंकार वानरांनीं राखून ठेवले होते. ते त्यांनीं राम–लक्ष्मणापुढें आणून ठेवले. रामाला तर शोकामुळें ते ओळखतांच आले नाहींत. लक्ष्मणाला विचारतांच तो असें म्हणाला– कि. कां. सर्ग ७

नाहं जानामि केयूरे नाहं जानामि कुंडले ।
नूपुरे त्वभिजानामि नित्यं पादाभिवन्दनात् ॥ २३ ॥

सीतेचीं बाहुभूषणें मला ठाऊक नाहींत, कुंडलेंहि माहीत नाहींत, परंतु नित्य पादाभिवन्दनाचा प्रसंग येत असल्यामुळें तोरड्यांची मात्र ओळख मला पटत आहे. हे उद्गार अत्यंत व्रतस्थ असलेल्या लक्ष्मणानेंच काढावेत! म्हणूनच त्याचें तप व सामर्थ्य प्रखर होतें. रामाकडून जो इंद्रजिताचा वध होणें अशक्य होतें, तो वध लक्ष्मणानें केला. लक्ष्मणावर रामाचेंहि प्रेम दृढ होतें. इंद्रजित युद्धप्रसंगीं एकदां लक्ष्मण बद्ध झाला व मूर्च्छा येऊन समरभूमीवर पडला; तेव्हां राम म्हणतो कीं, " शोधूं गेलें असतां या मृत्युलोकांत सीतेसारखी स्त्री मिळणें शक्य आहे, परंतु युद्ध-निपुण व मंत्र्याचें काम करणारा लक्ष्मणासारखा बंधु मिळणें अशक्य आहे."

शक्या सीता समा नारी मर्त्यलोके विचिन्वता ।
न लक्ष्मण समो भ्राता सचिवः सांपरायिकः ॥ ६।४९।६ ॥

लक्ष्मणाचें भ्रातृप्रेम संकटसमयीं टिकलें, किंबहुना वृद्धिंगत झालें; यांतच त्याच्या चरित्रांतील स्वारस्य आहे. मितभाषी, पवित्राचरणी, मृदु-स्वभाववान्, व्यवहारज्ञ अशीं विशेषणें स्वयंसेवक लक्ष्मणाला लाविलेलीं आहेत.

(१००) **भरताचें निरुपम वैराग्यः**—राम, सीता व लक्ष्मण यांचे स्वार्थत्याग परमावधीचे आहेत; परंतु भरताचा स्वार्थत्याग त्या सर्वांच्यावर झळकतो. कारण वरील तीन व्यक्तींवर साक्षात् वा परंपरेनें कर्तव्याचें बंधन होतें; परंतु भयंकर लोकापवाद सोसून पतीच्या प्राणाची पर्वा न करतां त्यास वचनांत पकडून जें राज्य कैकयीनें मिळविलें त्याचा क्षणभरहि उपभोग न घेण्यांत भरतानें जें वैराग्य प्रगट केलें, त्यास जगांत तोड क्वचितच आढळेल! राम—सीताप्रभृतींनीं कर्तव्य करण्यांत जर कुचराई केली असती तर त्यांच्याकडे थोडें तरी गौणत्व आलें असतें; परंतु कर्तव्याविषयीं तसा दूरान्वित संबंध नसतांना भरतानें राज्यलक्ष्मीचा त्याग केला, याचें महत्त्व रामापेक्षां अधिक आहे. मातेनें राज्यवैभवाचें ताट त्याच्यापुढें वाढून ठेवलें होतें; परंतु तें अधर्म व अपकीर्ति यांच्या भयानें त्यानें लाथाडलें व राम येईपर्यंत तो व्रतस्थ राहिला. भरतानें त्यावेळीं राज्याचा स्वीकार केला असता तर प्रजाजनांनीं अडथळा केला नसता; कारण त्याचें वर्तन लोकांशीं रामाप्रमाणेंच होतें; पण राज्यस्वीकाराबरोबरच रामायणाचा शेवट झाला असता !

राम वनांत गेल्यावर भरत अयोध्येंत आला व ससैन्य सर्व राज्य अर्पण करण्याकरितां रामाकडे गेला. जाबाली व वसिष्ठ यांनींहि राज्य स्वीकारण्याविषयीं रामाची मध्यस्थी केली. भरत म्हणाला, " रामावांचून हें राज्य मला शोभणार नाहीं व शोभलें तरी धर्मविरुद्ध, म्हणून मी त्याचा स्वीकार करणार नाहीं. मी येथेंच रामाचे पायापाशीं धरणें धरून बसतों." त्यावर रामानें भरताला निक्षून सांगितलें कीं, " माझा निश्चय बदलणें अशक्य आहे."

**लक्ष्मीश्चन्द्रादपेयाद्वा हिमवान् वा हिमं त्यजेत् ।**
**अतीयात् सागरो वेलां न प्रतिज्ञामहं पितुः ॥**
**कामाद्वा तातलोभाद्वा मात्रा तुभ्यमिदं कृतम् ।**
**न तन्मनसि कर्तव्यं वर्तितव्यं च मातृवत् ॥**

इतकें झाल्यावर भरतानें रामाच्या पादुका घेतल्या आणि रामाला सांगितलें कीं, " मी ह्या पादुकांच्या नांवानें राज्य चालवीन. वनवासांत

असणाऱ्या तुझ्याप्रमाणें जटावल्कलादि धारण करीन. फलमूलांशिवाय दुसरें कांहीं खाणार नाहीं. चौदा वर्षेपर्यंत तुझी वाट पहात गांवाच्या बाहेर राहीन. चौदा वर्षे संपल्यावर जर तुम्ही आला नाहीं तर मी अग्नींत प्रवेश करीन." इतकें सांगून रामाची आज्ञा घेऊन भरत आला व रामाच्या पादुका घेऊन गांवाबाहेर नन्दिग्रामांत राहिला. रामाची ठेव म्हणून त्यानें राज्यकारभार चालविला. छत्र, चामरें, नजराणे वगैरे सर्व पादुकांनाच अर्पण केले जात असत. भरताचें हें असें निरतिशय प्रेम पाहूनच बिभीषणसंग्रहप्रसंगीं रामानें भरताबद्दल फारच थोर उद्गार काढलेले आहेत. ( युद्धकांड स. १८ )

न सर्वे भ्रातरस्तात भवन्ति भरतोपमाः ॥
मद्विधा वा पितुः पुत्राः सुहृदो वा भवद्विधाः ॥ १५ ॥

भरतानें राज्याचा त्याग करून आपलें व रामाचें चरित्र जगापुढें ठेविलें हे त्याचे महदुपकार आहेत. रामाचा राज्यत्याग सकारण होता, परंतु भरताचा त्याग निष्कारण अतएव अत्यंत महत्त्वाचा आहे. अंगांत तारुण्य, माता, पिता व प्रजाजन यांची अनुकूलता असतांना सार्वभौम सत्तेवर पाणी सोडण्यांत भरताची धर्मपरता, भ्रातृवात्सल्य व धैर्य या गुणांची कसोटी लागते. या दोन्ही गुणांत भरतानें रामाची बरोबरी केलेली आहे. दोघांवरहि अकल्पित प्रसंग आले व दोघांनीं आपले निश्चय आश्चर्य वाटण्याजोगे एकदम व्यक्त केले. रामाची स्वार्थनिरभिलाषा जशी उज्ज्वल होती तशीच भरतानेंहि दाखविली. भरत हा नेहमीं साधेपणानें राही म्हणून त्याला चौदा वर्षे व्रतस्थ काढणें मुळींच जड गेलें नाहीं. सूर्यवंशांतील सर्व राजबिंड्यांना साध्या राहाणीचा बाळपणापासून अभ्यास असे. हे सर्व राजपुत्र शरयु नदीवर दररोज स्नानास जात असत असें त्यांचें वर्णन आहे. एकंदरींत भरत हा धैर्यवान्, धर्मवेत्ता, सत्यवादी, निर्भीड, जितेंद्रिय, गोड बोलणारा, पराक्रमी, असा होता म्हणूनच त्याची कीर्ति रामाच्या बरोबरीनें झाली आहे.

भरतबंधु शत्रुघ्नाचा रामायणांत विशेष लक्षांत भरण्याजोगा संबंध नाहीं. आमच्या मतें रामपंचायतन म्हणजे राम, सीता, लक्ष्मण, भरत व मारुति

हें होय! मारुति सोडून वरील चार व्यक्तींच्या चारित्र्याची, त्यागाची व मनःसंस्कृतीची आतांपर्यंत चर्चा केली. या चार व्यक्ति रक्तसंबंधानें एका कुटुंबांतीलच होत्या. पण ज्याविषें रामायणरस रसिकाला कवि मोरोपंत यांच्या उक्तीप्रमाणें 'अळणी' लागतो, त्या मारुतीचें चरित्र आतां देतों.

(१०१) मारुतीची निर्व्याज सेवाः--रामायणांतील अतुल पराक्रमी व्यक्ति श्रीमारुतिराय ही होय! रामाची निर्व्याज सेवा मोठ्या मुत्सद्दी-पणानें करण्याचें कार्य मारुतीनें केलें म्हणूनच राम विजयी झाला. मारुति हा सुग्रीवाचा सेवक म्हणून त्यानें सुग्रीवाची व रामलक्ष्मणाची मैत्री जमवून दिली. मारुतीचें सर्व चरित्र रामाच्या श्रेष्ठ सेवेनें भरलेलें आहे. मारुतीनें एकदां रामाचें सेवकत्व पत्करल्यावर आलेल्या प्रत्येक संकटास त्यानें धैर्यानें तोंड दिलें. सीताशुद्धीकरितां शेंकडों वानर गेले; त्यांत एक मारुति होता; परंतु इतरांप्रमाणें सुग्रीवाचा बोल न लागेल अशी तात्पुरती कामगिरी करावी, असली संकुचित कल्पना मारुतीच्या मनाला शिवली नाहीं. दक्षिण समुद्रापर्यंत शोध करीत करीत सर्व वानर गेले; पण समुद्रोल्लंघनाचे वेळीं सर्वांनीं हातपाय गाळले. अशा वेळीं केवळ स्वामिभक्तीनें प्रेरित होऊन समुद्रोल्लंघनाचें धाडस मारुतीनें केलें, व रावणाच्या लंकेंत जाऊन त्यानें आपले प्राण संकटांत घातले.

समुद्रोल्लंघन करीत असतांना मैनाक पर्वतावरील लोकांनीं वाटेंत त्याच्या आदराची मोठी सिद्धता केली. मैनाक (मैनाकावरील लोक) म्हणाला, "हे रामकार्यतत्पर मारुते, थोडी विश्रांति घे व नंतर जा." त्यावर मारुति म्हणाला, "मी संतुष्ट झालों आहे व मी तुझा सत्कार स्वीकारला आहे, पण मला वेळ मोडतां येत नाहीं, याबद्दल रागावूं नको. माझी कार्य करण्याची वेळ थोडी आहे, दिवसहि जात चालला आहे व मध्यंतरीं थांबावयाचें नाहीं म्हणून मी प्रतिज्ञा केली आहे." (सुंदर. स. १)

त्वरते कार्यकालो मे अहश्चाप्यतिवर्तते ।
प्रतिज्ञा च मया दत्ता न स्थातव्यमिहान्तरा ॥ १२५ ॥

मारुति हा दूतकर्मामध्यें फारच निपुण होता. घमेंडखोर दूत स्वामि-कार्य बिघडवीत असतात; म्हणून तो लंकेंत गेल्यावर 'ज्या योगानें कार्यहानि

होणार नाहीं, माझे श्रम व्यर्थ जाणार नाहींत व समुद्रोल्लंघन केल्याचें सार्थक होईल, याच तऱ्हेनें कार्य केलें पाहिजे' असें म्हणतो. त्यावरून त्याची दूरदृष्टि दिसून येते. (सुंदरकांड सर्ग २ श्लो. ३९)

सीताशुद्ध्यर्थ रावणाच्या अन्तःपुरांत मारुतीनें प्रवेश केला. कारण सीता ही स्त्रियांच्या घोळक्यांत कुठें तरी असणार असा त्याचा अचुक अंदाज होता. अन्तःपुरांत मारुतीनें रावणाच्या हजारों स्त्रिया विवस्त्र आणि अस्ताव्यस्त अशा स्थितींत पाहिल्या. त्याला शंका आली कीं माझ्यासारख्या ब्रह्मचाऱ्यानें अशा स्त्रिया पहाणें अनिष्ट होय व त्यामुळें माझें कार्य बिघडणार तर नाहीं ना? पण तो लगेच म्हणतो, "परस्त्रियांकडे पाहाण्याची माझी दृष्टि पापी नाहीं. माझ्या मनांत त्यामुळें विकृति उत्पन्न झालेली नाहीं. फार काय, पण बऱ्यावाईट स्थितीमध्यें कोणत्याहि इंद्रियाची प्रवृत्ति होण्याचें मन हेंच कारण आहे व तें माझें मन अगदीं स्वस्थ आहे." (सुंदर. सर्ग ११)

न हि मे परदाराणां दृष्टिर्विषयवर्तिनी ॥४०॥
न तु मे मनसा किंचिद्वैकृत्यमुपपद्यते ॥४२॥
मनो हि हेतुः सर्वेषां इंद्रियाणां प्रवर्तने ।
शुभाशुभास्ववस्थासु तच्च मे सुव्यवस्थितम् ॥४३॥

सीतेचा शोध करतां करतां मारुति थकला, पण 'अनिर्वेदः श्रियो मूलं' उत्साह हेंच यशाचें मूळ असें म्हणून फिरून यत्न करूं लागला. अशोकवनांत मारुतीनें सीतेची मोठ्या युक्तीनें भेट घेतली. योग्य वेळीं झाडावरून खालीं उतरून नमस्कार करून, रामाचें क्षेम कळविलें, खूण पटविली व मोठ्या चतुराईनें तिला आश्वासन दिलें.

मारुतीची व रावणाची जेव्हां प्रथम भेट झाली तेव्हां मारुतीनें रावणाला असें मर्मभेदक भाषणांनीं खडसावलें कीं सांगून सोय नाहीं. "रावणा, चौदा हजार राक्षसांचा ज्या रामानें वध केला, ज्याच्या बंदिवासांत तूं होतास, त्या वालीचा वध करून ज्यानें सुग्रीवाशीं सख्य जोडलें, असा राम लौकरच येणार हा निरोप मी तुला सांगतों." हें मर्मभेदक भाषण ऐकतांच रावण चिडला व त्याला ठार करण्यास उद्युक्त झाला. पण

बिभीषणाच्या मध्यस्थीनें दूताला मारूं नये या धर्माची त्याला आठवण दिली, म्हणून रावणानें मारुतीच्या शेपटीला वस्त्रें गुंडाळून तीं पेटविलीं. रावणानें आधीं आगळिक केली असल्यामुळें मारुतीनें लंकादहन करून अकालीं युद्धास प्रारंभ कां केला, असा आक्षेप घेतां येत नाहीं.

सीतेचा शोध लागतांच मारुतीला परत येण्यास आडकाठी नव्हती. परंतु तसा सांगकामेपणा न स्वीकारतां सीतेचें कुशल, तिचा निरोप, लंकेंतील स्थिति, रावणाचें बल, या सर्वांचा कयास मारुतीनें घेतला, आणि अशोकवनिकेचा विध्वंस करून, लंका जाळून राक्षसांच्या हृदयांत वानरांच्या पराक्रमाविषयीं चांगली दहशत बसविली. मारुतीनें रामाकडे येऊन एकदम " पाहिली सीता ! " असें अमृततुल्य वाक्य उच्चारून त्याचा आनंद वाढविला.

दृष्टा देवीति हनुमद्वदनादमृतोपमम् ॥
आकर्ण्य वचनं रामो हर्षमाप सलक्ष्मणः ॥

मारुतीनें युद्धामध्यें स्वतः अखेरपर्यंत पुढाकार घेऊन निरपेक्षपणें रामाची उत्कृष्ट सेवा केली. मारुतीच्या या निर्हेतुक सेवेनिमित्त जो त्याचा रामपंचायतनामध्यें जयजयकार होत आहे तो सर्वथा उचित होय.

(१०२) **मारुतीचें शहाणपणः**—मारुतीनें रामाला वेळोवेळीं फारच योग्य सल्लाहि दिलेला आहे. बिभीषण रावणाशीं भांडून जेव्हां रामाकडे आला तेव्हां त्याचा संग्रह करावा कीं न करावा यासंबंधीं अंगदप्रमुख वानरांशीं रामचंद्रानें चर्चा केली. सर्वांनीं आपापलीं मतें सांगितलीं. मारुति म्हणाला, " एकंदरींत बिभीषणाची वृत्ति मला ठीक दिसते. शिवाय तो राज्याच्या आशेनें समजून-उमजून आलेला आहे, म्हणून त्याचा संग्रह करणें उचित आहे. " शेवटीं हाच विचार रामाला पटला व त्यानें बिभीषणाचा संग्रह केला. ( युद्धकांड सर्ग १७ श्लो. ६७ )

(१०३) **मारुतीचें सामर्थ्यः**—मारुतीची सेवा व तपश्चर्या फारच मोठी आहे. त्याचा त्यागहि दांडगा म्हणूनच लक्ष्मणाला वांचविण्याचें कार्य त्याचें हातून घडलें. इंद्रजिताच्या शक्तीनें लक्ष्मणाला मूर्च्छा आली असतांना, त्याला वांचविण्याकरितां मृतसंजीवनी, विशल्यकर्णी, सुवर्णकर्णी

व संधानी या चार औषधी आणण्याचें काम मारुतीनेंच केलें. त्यामुळें लक्ष्मण वांचला. मारुतीच्या सामर्थ्याविषयीं सर्व वानरांमध्यें मोठा आत्मविश्वास होता. एका प्रसंगीं सर्व वानर रामलक्ष्मणांसह मृतप्राय होऊन पडले असतांना प्रथम जांबवान सावध झाला आणि जवळ आलेल्या बिभीषणाला म्हणाला, " कोणाची काळजी करूं नकोस. तो हनुमान जिवंत आहे ना ? " त्यावर बिभीषण म्हणाला, " अरे, तूं रामलक्ष्मणांची किंवा सुग्रीव–अंगदांची चौकशी न करितां मारुति खुशाल आहे ना असें काय विचारतोस ? " त्यावर तो म्हणाला, " बिभीषणा, हा वीर जिवंत असतांना सर्व सैन्याचा नाश झाला तरी तो न झाल्यासारखा आहे. आणि या युद्धांत हनुमानानें प्राणत्याग केला तर आम्ही जिवंत असूनही मेल्यासारखे आहोंत असें समज. " ( युद्धकांड सर्ग ७४ )

अस्मिन् जीवति वीरे तु हतमप्यहतं बलम् ।
हनूमत्युज्झितप्राणे जीवन्तोऽपि मृता वयम् ॥ २२ ॥

ही प्रशंसा मारुति–समकालीन जांबवानानें केली आहे. त्यावरून त्याच्या सामर्थ्याची कल्पना येते. रावणवधानंतर भरताचें मन पहाण्या-करितां रामानें मारुतीला मनुष्यरूप घेऊन जाण्यास सांगितलें. कारण पुष्कळ दिवस राज्यसूत्रें हातीं घेतल्यामुळें त्याचें अन्तःकरण किती आसक्त झालें आहे हें पहाण्याकरितां रामानें ही युक्ति केली. मारुतीनें भरताला जाऊन सांगितलें कीं रावणाला ठार करून राम सीता व लक्ष्मण यांसह लौकर येत आहे. तें ऐकल्याबरोबर चौदा वर्षें ज्या इष्ट गोष्टीचा भरताला निदिध्यास लागलेला होता ती लौकरच घडणार म्हणून त्याला हर्षाचा उन्माद झाला, तो मूर्च्छित पडला व देहभानावर आल्यावर मारुतीला आलिंगन देऊन म्हणाला, " तूं देव, का मनुष्य, का स्वर्गातील कोणी श्रेष्ठ शक्ति, मला कळत नाहीं. तूं मला अत्यंत प्रिय वार्ता सांगितलीस म्हणून मी तुला एक लक्ष गायी, शंभर उत्कृष्ट गांवें व वस्त्रालंकारयुक्त अशा सोळा मुली भार्या म्हणून देतों. " ( युद्धकांड सर्ग १२५ श्लो. ४५ )

भरत या देणग्या हर्षातिरेकानें उच्चारत आहे. मारुतीनें त्या घेतल्या नाहींत, त्या नाकारल्याहि नाहींत. कारण त्या पुढें आणून ठेवल्या नव्हत्या.

शिवाय त्याला इतक्यांत ' रामदूत मी आहे ' असें सुचवावयाचेंहि नव्हते. भरतानें या वस्तु त्याला दान म्हणून दिल्या नव्हत्या तर आनंदाच्या अतिरेकानें खुशाली म्हणून उभारल्या होत्या इतकेंच ! पण त्यावरून मारुति हा ब्रह्मचारी नव्हता असें अनुमान काढणें हें मारुतीच्या पूर्वचरित्राशीं अत्यंत विसंगतच होय !

(१०४) इतर व्यक्तिः—रामायणांतील मुख्य पंचायतनाचा वरीलप्रमाणें परिचय झाल्यावर त्याभोंवतीं असलेला परिवार संस्कृतीनें कसा होता हें पाहिलें पाहिजे. सुमित्रा ही नांवाप्रमाणें खरोखर सर्वांची मित्र होती. कौसल्या ही शहाणी, धूर्त, सज्जन अशी होती, पण जहांबाज कैकयीपुढें तिचें कांहीं चालत नसे. दशरथ हा पराक्रमी, मानी पण वृद्ध व स्त्रैण असल्यामुळेंच हा सर्व प्रसंग ओढवला. रामायणांतील आर्य, वानर व देवसमाजाची संस्कृति कशी होती, हें रामपंचायतनाच्या प्रतिबिंबित्वावरून सिद्ध होतें. पार्श्वभूमिका जितकी उठावदार तितकें चित्रहि चांगलें खुलतें. ही स्थिति समाजाचीहि आहे. कर्ता व्यक्ति ज्या समाजांतून पुढें येतात त्याची पूर्वपरंपरा उज्ज्वलच असावी लागते. रामायणांत वर्णिलेले नायक उच्च कोटीचे आहेत म्हणून तत्कालीन समाजहि हीन संस्कृतीचा नव्हता, हें सहज सिद्ध होतें. राक्षस, वानरसुद्धां रानटी नव्हते.

(१०५) सूर्यवंशी राजे व त्यांची प्रजाः—एकंदरीत सूर्यवंशी राजांच्या राजवटीमध्यें प्रजेला फार सुख झालें. कारण त्या वेळीं प्रजेचें मत विचारांत घेऊन राज्य करण्याची सर्वोत्कृष्ट पद्धति अयोध्येंत रूढ होती. अयोध्येच्या राज्यपद्धतींत सर्वसंमत गोष्ट अंमलांत आणावयाचें कार्य राजाकडे ठेविलें होतें. अयोध्येच्या राज्यांत जी परिषद भरे तिला मांडलिक राजे, प्रजेचे पुढारी व ऋषी उपस्थित रहात असत. अशी एक परिषद रामाला यौवराज्याभिषेक करण्याचे वेळीं बोलावली होती. अयोध्येची राज्यपद्धति खरीखुरी राजप्रजासत्ताक होती, म्हणून राजाला मंत्र्यांच्या सल्ल्याशिवाय कांहीं करतां येत नसे. सूर्यवंशी राजे हे मोठे प्रजावत्सल होते. प्रजेचें प्रेम संपादन करण्याकरितां ते स्त्रीपुत्रादिकांचा मोह आडवा आला तरी तो बाजूला सारीत. म्हणूनच राम म्हणतोः—

स्नेहं दयां च सौख्यं च यदि वा जानकीमपि ।
आराधनाय लोकानां मुंचतो नास्ति मे व्यथा ॥

राजा कसा असावा, त्याचे अधिकार काय, त्याचीं कर्तव्यें कोणतीं, त्यानें कुणाशीं मसलती कराव्या यासंबंधीं निबंध बनलेले होते. लोकांचा स्वभाव सात्त्विक व कर्तव्यनिष्ठ राहावा व राजानें नेहमीं प्रजावत्सल राहावें म्हणून राजा व प्रजा यांना एका धर्मतत्त्वांत गोविलें होतें. रामानें महाप्रस्थान केलें तेव्हां सर्व प्रजा धाय मोकलत त्याचेमागें लागली. या उदाहरणावरून त्यांचे संबंध कसे होते याची कल्पना येते. राजा व प्रजा यांचा संबंध गर्भ व गर्भवती स्त्रीप्रमाणें असल्यामुळें अराजक स्थितीचा लोकांना कंटाळा वाटे. अराजक स्थितींत समाजस्वास्थ्य बिघडून धर्महानी होते, ती न व्हावी म्हणून राजाची स्थापना त्वरित करीत.

(१०६) **सांपत्तिक स्थिति:**–रामायणामध्यें रामाच्या राजवाड्याचें तसेंच सुग्रीव, रावण यांच्याहि वाड्यांचीं जीं वर्णनें दिसतात त्यावरून वास्तुशास्त्र, शिल्पशास्त्र, यांची व तत्कालिन सांपत्तिक स्थितीची कल्पना येते. सात-सात मजली हे वाडे उंच असत. वराहमिहिर व बृहत्संहिता या ग्रंथांतून राजमहालांचें मोजमाप दिलेलें आहे तें अक्षरशः या वाड्यांना लागू पडतें. वाडे भव्य, उंच, शुभ्र व चुना लावलेले म्हणजे सौध असत. दशरथाचा वाडा कैलास शिखरासारखा उंच होता. बहुतेक वाड्यांना तीन किंवा चार चौक असत. वाड्यांना रथ जाण्याजोगे मोठे दरवाजेहि असत. सर्व वाडे चुनेगच्ची असत. कौसल्येच्या वाड्याला अनेक चौक होते. पहिल्या चौकांत भालदार चोपदार, दुसऱ्या चौकांत अन्य सेवक, तिसऱ्या चौकांत कारागीर व चौथ्यांत ब्राह्मण वसत असत. किष्किंधेंतील वानरांचे वाडे व लंकेंतील राक्षसांचे वाडे प्रशस्त, गगनचुंबित, शुभ्र, चुनेगच्ची, बहुमोल उपकरणांनीं, वस्त्रांनीं आणि ऐश्वर्यानें भरलेले होतें.

वनें, उपवनें, तटिका, बागा या वाड्याच्या मध्यभागीं असत. लतागृहें, क्रीडास्थानें, कारंजीं आणि पोपट, मैना, क्रौंच, मयूर, हंसादि पक्षी यांनीं हे वाडे गजबजलेले असत.

सर्वसामान्य समाजहि दरिद्री नव्हता. ना किरीट, ना कुंडल, ना गळ्यांत माळ, ना अंगाला चंदन, ना बाहुभूषणें, अशी दीन, हीन, क्षीण,

मलिन माणसें अयोध्येंत दिसत नसत. रस्ते स्वच्छ, घरें स्वच्छ, घरोघरीं रांगोळ्या काढलेल्या, रस्त्यावर मधून मधून दीपस्तंभ उभारलेले, चोहोंकडे मंगलवाद्यांचा ध्वनि, पुष्पमालांनीं सजविलेलीं घरें असें अयोध्येचें वर्णन आहे.

क्रोधागार, शय्यागार, अग्निशाला, सूपशाला, नर्तनशाला, क्रीडामंदिर, देवघरें, देवायतनें असे घराचे भाग असत. सार्वजनिक देवालयांतून उपासना, हवन, जपजाप्य, स्नानसंध्यादि कर्मे चालत. देवपूजेचीं साधनें, राज्याभिषेकाचा संभार हीं आजच्यापेक्षां किती तरी श्रेष्ठ प्रतीचीं होतीं. रस्त्यावर खूप गर्दी जमली कीं धूप जाळीत.

राम ज्यावेळीं वनाला निघाला त्यावेळीं त्यानें आपल्याजवळ असलेल्या ज्या संपत्तीचें दान केलें तिची किंमत आज कोट्यवधि रुपये होईल. सुवर्णकुंडलें, सुवर्णमाला, कडीं, आंगठ्या, हार, कमरपट्टा, चांदीचीं भांडीं, रेशमी वस्त्रें, बहुमोल रत्नखचितें, पर्यंक वगैरे जें जें कांहीं रामाजवळ होतें तें सर्व त्यानें वसिष्ठ पुत्र सुयश, तसेंच ऋषी अगस्त्य व कौशिक, कठकलाप शाखेचे व तैत्तिरीय शाखेचे अध्ययन करणारे आचार्य, ब्रह्मचारी, बाल, वृद्ध, आणि विद्वान् इत्यादींना वांटून टाकलें.

वनवासांत रामाबरोबर जें सामान दिलें, त्यांत वसिष्ठाच्या व दशरथाच्या आज्ञेमुळें सीतेस उत्तम वस्त्रें, बहुमूल्य भूषणें, चौदा वर्षें पुरतील इतकीं लुगडीं वगैरे दिल्याचें वर्णन आहे.

लंकेचें वर्णन, रावणाच्या अपार संपत्तीचें वर्णन हेंहि सांपत्तिक स्थितीची कल्पना देतें.

कौसल्येला हजार गांवांचें उत्पन्न होतें. या गांवांतील राज्यव्यवस्थेचे अधिकार तिला नसले तरी खर्चवेच जाऊन तिला दहा लक्ष रुपये उत्पन्न येत होतें, असें म्हणण्यास हरकत नाहीं. राजपुत्रांचें ऐश्वर्य त्यांच्या योग्यतेस साजेसेंच होतें. दशरथ राजा सार्वभौम होता. अनेक मांडलिक राजे त्याला करभार देत. त्यामुळें त्याचें ऐश्वर्य कुबेराला लाजवीत असे.

(१०७) **शिक्षण**:-सूर्यवंशी राजांच्या राजवटींत धार्मिक, सामाजिक व शैक्षणिक स्थिति उत्तम होती. यज्ञसंस्थेच्या द्वारें बहुजनसमाजाला शिक्षण मिळे. लोकशिक्षणाची ती एक मोठी संस्था होती. यज्ञानिमित्त विद्वान

एकत्र जमत. धर्म, आचार, नीति, तत्त्वज्ञान व शिक्षण यांवर चर्चा होत असे. पूर्वोत्तर पक्षाची पद्धत त्याकाळीं होती. त्यामुळें श्रोत्यांना दोन्ही बाजू चांगल्या कळत. वर्णाश्रमव्यवस्था, संस्कार, व्यवहारधर्म, सामान्यधर्म, विशेषधर्म, आपद्धर्म यांना या कालांत चांगलें स्वरूप आलेलें होतें. विवाह-संस्था, शिक्षणसंस्था, गुरुगृहवास, शिष्टाचार, सदाचार यांची वाढहि चांगली झाली होती. शिक्षणाचें पवित्र कार्य हजारों ऋषींच्या आश्रमांत निस्पृहतेनें होई. आश्रमांतील वातावरण पवित्र, प्रसन्न व मनाला सुसंस्कृत-पणा आणणारें असें असे. या आश्रमांत अध्ययनाकरितां नाना देशाचे छात्रगण येत असत. राजपुत्र व सामान्य लोकांचीं मुलें यांचें शिक्षण कडक शिस्तीनें एकत्र होत असे. आश्रमांत सर्ववर्णीय विद्यार्थी एकाच गुरूजवळ अध्ययन करीत. गुरुसेवा करणें व समावर्तनानंतर गुरुदक्षिणा देणें अशी रूढि होती; तथापि विद्यादानाची कल्पना प्रबळ होती. कठोर जातिबंधनें त्या कालीं नव्हती. त्रैवर्णिकांचें सहाध्ययन तर होतच असे, असे स्पष्ट उल्लेख आहेत. निस्पृह ऋषींच्या बाणेदारपणामुळें विद्यार्जन चांगलें होई. या आश्रमवासी कुलगुरूंची राजावर एक प्रकारची कदर असे. शिक्षणाला शिस्त होती तरी विचारस्वातंत्र्याला पूर्ण वाव होता. ज्या विचार-स्वातंत्र्याच्यासंबंधीं आज लोक प्रौढीनें बोलतात, ते विचारस्वातंत्र्य रामायण-कालीं होतें; हें सीतेसंबंधीं लोक काय चर्चा करतात, हें जाणण्याची रामाची इच्छा असे, यावरून उघड होतें.

(१०८) **राजनीतिः**—राजानें आत्मसंयम करावा, प्रधानांचा संतोष करावा, अधिकारी आपलें काम नीट करीत आहेत कीं नाहीं हें पहावें, खजिना भरलेला ठेवावा, रत्नादिकांचा संग्रह वाढवावा, धान्यांचीं कोठारें भरलेलीं असावीं, म्हणजे त्यांचा दुष्काळादि आपत्ति आणि युद्ध अशा प्रसंगीं उपयोग होतो. राजानें निर्व्यसनी असावें. व्यसनाधीन राजाचा गैरफायदा जवळचे लोक घेतात. त्यामुळें राज्यनाश होतो. राजानें प्रजेचें कल्याण व प्रजेचा संतोष हें साध्य समजावें. सैन्य, खजिना, किल्ले, राज्यव्यवस्था यासंबंधीं राजानें दक्ष असावें. या चार प्रकारांमध्यें अल्पप्रमाद घडल्यास राज्यनाश होतो. निरपराध्याला दंड होऊं नये व अपराधी मोकळा सुटूं नये.

अन्याय, अधर्म व दुष्टप्रवृत्ति यांना राजानें निर्बीज करावें. सूर्यवंशीय राजांच्या राजनीतीचें हें संक्षेपतः तात्पर्य आहे.

(१०९) **लोकस्थितिः**—या कालांत राजसत्ता व धर्मसत्ता निराळी नव्हती. राजसत्ता हीच धर्मरक्षणाचें कार्य करी. चातुर्वर्ण्य ही संस्था व क्षत्रिय राजा असल्यामुळें धर्मांचें प्रतिपालन यथायोग्य होई. सर्वच ब्राह्मण तपस्वी व विद्वान नव्हते. पुष्कळ ब्राह्मण कृषि, पौरोहित्य यांसारखे व्यवसाय करीत. आचार, संस्कार, प्रायश्चित्त यांचें यथासांग अनुष्ठान होई. आदरातिथ्य उत्तम होत असे. ब्राह्मविधीनें अग्नीच्या साक्षीनें विवाह होई. पतिपत्नीसंबंध दृढ करण्याला अग्नीची साक्ष लागे. वनस्पत्याहार व मांसाहार हे दोन्ही रूढ होते. शिल्प, ज्योतिष, आयुर्वेद, वनस्पतीशास्त्र, हस्तिशिक्षा, धनुर्वेद, चित्रकला, रथचर्या, अश्वारोहण, गजारोहण, गायन, विमानविद्या यांमध्यें बरीच प्रगति झालेली होती. शिबिका, शकट, रथ व नावा हीं वाहतुकीचीं साधनें होतीं. उंट, घोडे, बैल, हत्ती, यांचा वहातुकीस उपयोग होई. या साधनानें दूरदूरच्या देशांशीं व्यापार चाले. हत्ती व घोडे यांचा युद्धास व मिरवणुकीस उपयोग होई.

रामायणामध्यें अनेक कारागिरांचे उल्लेख आलेले आहेत. त्यावरून सुतार, सूत्रधार, ज्योतिषी, नट, सारथी, पुराणिक, द्वारपाल, गवई, बजवय्ये, व्यापारी, ताल धरणारा, गवंडी, आचारी, बुरूड, मजूर, कुंभार, जवाहिऱ्या, बहुरूपी, अर्कस काम करणारा, रत्नांना पैलू पाडणारा, कांचेच्या कुप्या व हस्तिदंती काम करणारा, वैद्य, धोबी, कलाल, न्हावी, नावाडी, कोष्टी, सणगर, सोनार इत्यादि धंदेवाले लोक त्यावेळीं होते. यांतच राज्यव्यवस्था, लष्कर, दिवाणी व फौजदारी अधिकारसंबद्ध असलेल्या व्यवसायांची भर घातली कीं ही यादी मोठीच होते. राज्याची भरभराट होती म्हणून हरहुन्नर व कौशल्य यांची वाढ झाली. वस्त्रें विणण्याची विद्या पूर्णत्वास गेली होती. सुतापेक्षां रेशमी तलम वस्त्रें राजे लोक वापरीत. रेशमी वस्त्रांस जरीचे कांठ असत. पागोटें व दोन वस्त्रें हा पुरुषांचा पोषाख असे. स्त्रिया व पुरुष उत्तरीय वस्त्र वापरीत. सोनें, चांदी व रत्नें यांचे बाजूबंद, तोरड्या, कुंडलें, मुकुट, बाहुभूषणें, उरोभूषणें, रत्नमाला हेमसूत्र, कमरपट्टा, आंगठ्या इत्यादि अलंकार होते. निष्क या नांवाचें नाणें प्रचारांत होतें. फलज्योतिष,

शकुन, नवस, शुभाशुभ, स्वप्नें व शपथ यांच्या कल्पना रामायणांत आढळतात. सामान्य माणसाचेंसुद्धां ज्योतिष व वैद्यकाचें ज्ञान बरेंच असावें असें दिसतें.

खेटक, ग्राम, पुरी, नगर अशा चार श्रेणी होत्या. पुरी व नगर यांच्या-जवळ दुर्ग असत. नगरामध्यें तळीं, विहिरी, पुष्करणी, सरोवरें असत. पिण्याच्या पाण्याची सोय काळजीपूर्वक केली जाई. मेंढ्या, बकरीं, गाई, बैल व इतर पशु यांचा व्यापार नगरांत व परदेशामध्यें होई. नगरांमध्यें मंत्री, बल, कोश, सैन्य यासंबंधीं कार्यालयें असत व न्यायालयेंहि असत. चतुरंग सैन्य हें युद्धशास्त्रांत मुख्य असें. युद्धाचें मुख्य शस्त्र बाण हें होतें. शैव, शूलवत्, ऐषिक, ब्राह्म, पैनाक, नारायण, आग्नेय अशीं अनेकविध अस्त्रांचीं नांवें आहेत. विविध बाण मंत्रांनीं अभिमंत्रित करून सोडले कीं त्यांना अस्त्रें अशी संज्ञा प्राप्त होई. मोठमोठे पाषाण फेंकण्याचीं यंत्रें किल्ल्यांच्या तटावर ठेवीत. शतघ्नी नांवाच्या तोफाहि होत्या. रामायणांतील अग्न्यस्त्रांची आजच्या अस्त्रांशीं तुलना करून त्या कालीं ही विद्या कशी प्रगत झाली होती हें ग्वाल्हेरच्या रा. पंडितांनीं अलीकडे लोकांपुढें मांडलें आहे. सर्व प्रकारची युद्धसामुग्री रथांतून नेण्यांत येई. मोठीं आयुधें, तोफा इत्यादि ठेवण्याचे रथ निराळे असत. युद्धप्रसंगाचें चिन्ह म्हणून रथावर ध्वजा असत. त्या ध्वजां-वर कांहीं खूण असे. त्यावरून रथी कोण हें कळे. बाहुयुद्धाची पद्धति होती.

(११०) **स्त्रीशिक्षणः**—अहिल्या, सीता, तारा, मंदोदरी या स्त्री-पंचकांतील स्त्रिया रामायणांत आलेल्या आहेत. यांच्याच जोडीच्या कौसल्या, सुमित्रा, अनुसूया इत्यादि स्त्रिया होत्या. कैकयीसारखी एखादी जहांबाज स्त्री सोडून दिल्यास अन्य सर्व स्त्रियांचें चारित्र्य आदर्शभूत आढळतें. सीता हा पातिव्रत्याचा उत्कृष्ट आदर्श आहे. अन्य स्त्रियांचे जे उल्लेख रामायणांत आले आहेत त्यांवरून तत्कालीन स्त्रिया सुसंस्कृत व महान पतिव्रता होत्या असें म्हणतां येतें.

ऋषींच्या आश्रमांत मुलांप्रमाणें मुलींच्या शिक्षणाची सोय नव्हती. तथापि घरगुती पद्धतीनें स्त्रियांना शिक्षण मिळे. त्या अशिक्षित व अडाणी नसत. स्त्रिया त्या कालीं वेदाध्ययन करीत व संध्याहि करीत, असें पुढील उल्लेखावरून सिद्ध होतें.

**संध्याकालमनाः श्यामा ध्रुवमेष्यति जानकी ।**
**नदी चेमां शुभजलां संध्यार्थे वरवर्णिनी ॥ ५।१४।१९ ॥**

'संध्या करावयाची वेळ झाली आहे, हें मनांत आणून ती श्रेष्ठ स्त्री जानकी संध्या करण्यासाठीं या निर्मल पाण्यानें युक्त असलेल्या नदीवर खात्रीनें येईल.'

**ततः स्वस्त्ययनं कृत्वा मंत्रवित् विजयैषिणी ॥ ४।१६।१२ ॥**

'आपला पति जो वाली त्याला जय प्राप्त व्हावा म्हणून त्या मंत्र-वेत्त्या तारेनें त्याचें स्वस्त्ययन केलें.' यावरून स्त्रियांचीं उपनयनें होत व त्या वेदवेत्त्या असत असें सिद्ध होतें.

(१११) **सहगमन:**– रामायणकालीं स्त्रियांना पडदा होता असें दिसत नाहीं, व त्या उघडपणें वावरत असेंहि नाहीं. युद्ध, संकट, विपत्ति, उत्सव, समारंभ व यज्ञ इत्यादि प्रसंगीं स्त्रिया समाजांत मोकळेपणें वावरत असत. कारण यावेळीं स्त्रीपुरुष समाज एकत्र जमत असे. पतीच्या पश्चात् जिवंत राहाणें अशक्य व अनुचित अशी स्त्रियांची समजूत होती म्हणून पुष्कळ स्त्रिया सहगमन करीत. पतीचे पश्चात् उर्वरित आयुष्य परोपकारार्थ व ईशसेवेंत घालविण्याचा दुसरा मार्ग त्या काळीं धर्मसंमत होता. परंतु या मार्गापेक्षां पतिव्रतांना सहगमनच प्रिय वाटे. पांडूबरोबर माद्री सती गेली. श्रीकृष्णाच्या कित्येक स्त्रिया इंद्रप्रस्थांत सती गेल्या या उल्लेखांवरून ही चाल पुढें भारतकालींहि होती. इंग्रजी अमदानींतहि कायदा होईपर्यंत ही चाल रूढ होती.

(११२) **दासीची चाल:**– सांप्रत रूढ नसलेली दास व दासी यांच्या दानाची चाल त्यावेळीं होती. रामानें वनांत निघते वेळीं जीं अनेक दानें केलीं, त्यांत कित्येक ब्राह्मणांना दास व दासी यांचीं दानें केल्याचें वर्णन आहे. यजमानाचें हितरक्षण करण्यांत हा दासदासींचा वर्ग कसा तत्पर असे, हें मंथरेच्या चरित्रावरून उघड होतें. दासीचें दान म्हणजे तिला पोसणारा यजमान बदलणें येवढाच अर्थ दिसतो. अशा कांहीं चाली असल्या तरी स्त्रियांची योग्यता पुरुषाबरोबरीची आहे, असा समज रूढ होता. राम वनांत निघते वेळीं रामाचे अभावीं त्याचा आत्मा स्त्री म्हणजे सीता हिला राज्याभिषेक करावा अशी कल्पना वसिष्ठांनीं सुचविली आहे.

आत्मा हि दाराः सर्वेषां दारसंग्रहवर्तिनाम् ।
आत्मेयमिति रामस्य पालयिष्यति मेदिनीम् ॥२।३७।२४॥

इत्यादि कल्पनांवरून रामायणकालीं स्त्रियांचें स्थान तत्कालीन समाजांत फार वरच्या तऱ्हेचें होतें, असें म्हणण्यास अडचण वाटत नाहीं.

(११३) **रामायणापासून बोध:**– प्रत्येक हिंदूनें रामायणापासून उच्च तऱ्हेचा त्याग, धर्मपरता, धैर्य, एकपत्नीव्रत, बंधुप्रेम, पातिव्रत्य, निर्भयता, आत्मविश्वास वगैरे सद्गुणांचा स्वतःचें ठिकाणीं विकास कसा करावा हा बोध अवश्य घ्यावा. एकवचनी, एकपत्नी व एकबाणी हें व्रत जितक्या निष्ठेनें पाळतां येईल तितकें पाळावें आणि स्त्रीचा, विशेषतः विवाहित पत्नीचा उपमर्द करणाऱ्यास चांगलेंच शासन करण्याचा यत्न करावा. श्रीरामचंद्रानें रावणहननानें हाच संदेश दिला आहे कीं रावणासारख्या वृत्तीच्या लोकांना या जगांत जगण्याचा अधिकार नाहीं. कारण ते समाजाचें स्वास्थ्य बिघडवितात. समाजकंटक, दुष्ट प्रवृत्तीचे आणि स्त्रियांवर आक्रमण करणारे जे आततायी असतात त्यांचा वधच करावा असेंच शास्त्र आहे.

बलात् संदूषयेद्यस्तु परभार्यां नरः क्वचित् ।
वधो दण्डो भवेत्तस्य नापराधो भवेत्स्त्रियः ॥ –मत्स्य. २२७.१२६
पुमांसं दाहयेत्पापं शयने तप्त आयसे ।
अभ्यादध्युश्च काष्ठानि तत्र दह्येत पापकृत् ॥ –मनु. ८.३७२

“ दुसऱ्याच्या स्त्रीवर जबरी करणाऱ्याचा वध करावा व अशा वेळीं या असहाय्य स्त्रीचा अपराध मानूं नये. परस्त्रीशीं संबंध ठेवणाऱ्या पुरुषास तापलेल्या लोखंडावर घालून जाळावा. ”

स्त्रीवर तिच्या इच्छेविरुद्ध आक्रमण झालें असल्यास ती मनानें शुद्ध आहे म्हणून अशाहि स्त्रीचा संग्रह करावा. स्त्रीच्या चारित्र्याविषयीं शंका येतांच तिचा त्याग करणें हें शास्त्रविरुद्ध आहे. तसें केल्यास तिजकडून होणारें पातक तिच्या नवऱ्याला व बांधवांना लागतें. स्त्रीच्या वर्तनासंबंधीं शंका येतांच तिचा त्याग करणें हा रामायणांतील बोध नसून स्त्रियांवर आक्रमण करणाऱ्यांचा वध करणें हाच रामायणांतील बोध आहे.

—*—

प्रकरण पांचवें

# भारतकालीन संस्कृति

**(११४) भारताची योग्यता:**-गेल्या प्रकरणांत रामायणकालीन आर्यसंस्कृतीचें स्वरूप आपण पाहिलें. आतां महाभारतावरून आर्यसंस्कृतीचें स्वरूप पाहूं. महाभारत हा ग्रंथ व्यास महर्षींनीं फार परिश्रमपूर्वक संस्कृत भाषेमध्यें जगदुद्धारार्थ लिहिला. या ग्रंथाची संस्कृत भाषा सोपी असून तिचें जिवंत स्वरूप या ग्रंथांत आढळतें. याचें पहिलें नांव 'जय' असें होतें. 'जय'ग्रंथाचें 'भारत' वैशंपायनांनीं बनविलें व भारताचें 'महाभारत' पुढें सौतीनें केलें, असा इतिहास आहे. एक लक्ष श्लोकांचा एवढा मोठा ग्रंथ जगांतील अन्य भाषेंत दुर्मीळ, म्हणूनच तो मूळच्या शुद्ध स्वरूपांत पहावयास मिळणेंहि कठीण! या ग्रंथांतील बराचसा भाग प्रक्षिप्त असण्याचा संभव आहे. तथापि खिस्तपूर्व दोन हजार ते खिस्तोत्तर हजारपर्यंतच्या काळांतील संस्कृतीचें स्वरूप या ग्रंथांत आहे.

चतुर्विध पुरुषार्थांचें प्रतिपादन या ग्रंथांत असून स्त्रीपुरुषांच्या कर्तव्याचा मार्ग निश्चित व सुस्पष्ट दाखविला आहे. वेदाच्या खालोखाल महाभारताची धर्मशास्त्र व इतिहासदृष्ट्या योग्यता आहे. धर्म, तत्त्वज्ञान, व्यवहार, राजनीति, नीतिशास्त्र, अध्यात्म, धनुर्वेद, राजकारण, शिष्टाचारादि समाजजीवनोपयुक्त विविध अंगांचें इतकें विस्तृत विवेचन या ग्रंथांत आहे कीं, त्यावरून 'व्यासोच्छिष्टं जगत्त्रयं' अशी म्हण पडलेली आहे. मानवी स्वभावाचा परिपोष, अंतःकरणांतील निरनिराळ्या दुर्दम्य वृत्ति आणि भावना यांचें चित्रण महाभारतांत इतक्या कुशलतेनें केलें आहे, कीं तसें जगांत कोठेंहि आढळणार नाहीं. व्यास स्वतःच म्हणतात,

**'यदिहास्ति तदन्यत्र यन्नेहास्ति न तत् क्वचित्।'**

'जें महाभारतांत नाहीं तें जगांत नाहीं व जें येथें आहे तेंच जगांत आहे.' अशा या श्रेष्ठ ग्रंथाबद्दल प्रत्येक हिंदूची पूज्यबुद्धि कां बरें असणार नाहीं?

(११५) **सोमवंशी राजेः**—सूर्यवंशांतील कांहीं राजांचीं नांवें जशीं ऋग्वेदांत आढळतात तशींच सोमवंशीय राजांचींहि नांवें आढळतात. त्यावरून चंद्रवंशांतील कांहीं राजे वेदकालीन असावेत असें दिसतें. भारतकालीं कुरुक्षेत्रांत कौरव, गंगेच्या किनारीं पंचाल, यमुनेच्या किनारीं यदु, शूरसेनी व भोज, यमुनेच्या दक्षिणेस चेदी, अवंती भागांत भोज अशीं सोमवंशी क्षत्रिय घराणीं अस्तित्वांत होतीं. या सर्व क्षत्रिय घराण्यांतील कर्त्या पुरुषांच्या उलाढालींचा आणि हालचालींचा इतिहास म्हणजे महाभारत ग्रंथ होय.

(११६) **भारतीय युद्धाचा कालः**—भारतीय युद्ध शकपूर्व ३१०० च्या सुमारास झालें, असें एक मत आहे. तर दुसरें शकपूर्व दीडहजाराच्या सुमारास झालें असें आहे. विद्वद्वर्य दप्तरी व विद्वद्वर्य करंदीकर यांच्या चर्चेंत हा काल खिस्तपूर्व दीडहजारच असा ठरला आहे. व्याकरणकार पाणिनीचा काल खिस्तपूर्व आठशें वर्षें हा असून ऋग्वेद संहितेचा काल खिस्तपूर्व चार हजार वर्षांपलीकडचा आहे. ऋग्वेद संहितेपासून पाणिनीपर्यंतच्या कालाचे बरोबर दोन खंड पाडणारा भारतीय युद्धकाल असावा. भारतीय युद्धानंतर थोडक्याच दिवसांत हा ग्रंथ लिहिला गेला. भारतीय युद्धकाल म्हणजे आर्यसंस्कृतीच्या वैभवाचा व उत्कर्षाचा माध्यान्हकाल होय. वेदकालापासून भारतीय युद्धापर्यंत व भारतीय युद्धापासून पाणिनीकालापर्यंत आर्यसंस्कृतीचा सारखा उत्कर्ष दिसतो.

(११७) **रामायण व भारत यांची तुलनाः**—रामायण व भारत हे दोन्ही ग्रंथ भारतीय आर्यांना सूर्यचंद्राप्रमाणें पूज्य आहेत. हे ग्रंथ ऐतिहासिक आहेत. तथापि वाल्मिकी व व्यास या दोन ग्रंथकर्त्यांची भूमिका अगदीं भिन्न भिन्न आहे. वाल्मिकीचें उद्दिष्ट वैयक्तिक सद्गुणांचा सर्वोत्कृष्ट आदर्श वाचकांपुढें ठेवणें हें आहे. म्हणून तेथें प्रत्येक व्यक्तीच्या गुणांची पराकाष्ठा अन्यनिरपेक्ष अशीच दाखविली आहे. परंतु व्यासांना भारतांत हें दाखवावयाचें नव्हतें. समाजसापेक्ष, कुटुंबसापेक्ष अर्थात् अन्यसापेक्ष तत्त्वनिष्ठा साक्षात् व्यवहारांत किती राहूं शकेल हें व्यासांना दाखवावयाचें होतें. म्हणून महाभारतांतील नायकांच्या भूमिका व्यासांनीं तशा रंगविल्या आहेत. धर्म, द्रौपदी, भीम, अर्जुन, कुंती यांची धर्मनिष्ठा व धर्मपरता, राम, सीता, लक्ष्मण, भरत, सुमित्रा यांच्यापेक्षां कमी होती असें आपणांस

केव्हांहि म्हणतां येणार नाहीं. धर्मराजाला स्वतःपुरतें सत्त्वगुणाचें व सत्यनिष्ठेचें कितीहि प्रेम असलें तरी त्याचा परिणाम माता, पत्नी, बंधु व पुत्र यांच्यावर काय होईल याचा विचार टाळणें अशक्य होतें. म्हणून त्याच्या वर्तनाला मर्यादा येऊन बसली. अशी मर्यादा आंखून दिल्यावर कोणत्याहि सद्गुणाची मजल त्या मर्यादेच्या पलीकडे जाऊं शकत नाहीं. समाजांत वावरणाऱ्या व्यक्तीला आपलें वर्तन अन्यसापेक्ष ठेवावें लागतें. सामाजिक व व्यावहारिक बंधनें पाळून आपला व्यवहार किती नमुनेदार व किती उच्च कोटीचा करतां येईल, हें महाभारत ग्रंथांत दाखविलेलें आहे. हा ग्रंथ व्यवहार, समाज व नीति यांचा बोध करणारा असल्यामुळें त्यांत अनेक प्रसंग असे वर्णिले आहेत कीं, एका वेळीं एका कर्तव्याचा दुसऱ्या कर्तव्याशीं विरोध यावा, आणि कर्माकर्मविचिकित्सा उत्पन्न होऊन एखाद्या व्यक्तीकडून घडलेल्या आचरणाबद्दल संशय उत्पन्न व्हावा. परंतु रामायणांत त्या तऱ्हेचे प्रसंग फारसे नाहींत. त्याचें कारण त्या ग्रंथाचा हेतु भिन्न आहे. रामायण व भारत या ग्रंथांच्या हेतूंमध्यें फरक असल्यामुळें रामाची सत्यनिष्ठा धर्माच्या सत्यनिष्ठेपेक्षां जाज्वल्य दिसते. याचें कारण धर्माला आपल्या सत्यनिष्ठेचा परिणाम समाजावर काय होईल याचा विचार करावयाचा होता. पण रामाला याविषयीं कांहींच कर्तव्य नव्हतें. द्रौपदी व सीता या दोघींची पतिनिष्ठा सारखीच होती. परंतु एकीला आपलें व्रतच पाळावयाचें होतें, तर दुसरीला पतीबद्दल आदर ठेवून त्याच्या असावधपणानें झालेल्या चुकांबद्दल त्याला सावध करून, दुर्धर प्रसंगांतून बाहेर पडण्याबद्दल सारखी टोंचणी करावयाची होती. लक्ष्मणाला भ्रातृआज्ञा प्रमाण होती, तशीच ती भीमालाहि होती. पण आपण होऊन ओढवून घेतलेल्या आपत्तीचें मूळ धर्मराजाच्या भोळसटपणांत आहे, हें पाहून भीम धर्माचे हात जाळण्यास तयार झाला. सारांश, भारताचा उद्देश व पर्यवसान हीं रामायणाहून भिन्न असल्यामुळें त्यांत अनेक कथा, उपकथा, आख्यानें, उपाख्यानें ग्रंथकर्त्यानें सांगितलेलीं आहेत; व त्याद्वारें राजकारण, धर्मकारण, समाजकारण, धूर्तपणा, सावधानता यांचीं दृश्यें दाखविलीं आहेत.

(११८) **गीतेचा अल्प परिचयः**—महाभारतांतील अन्यसापेक्ष कृत्यांची शास्त्रशुद्ध संगति सांगण्याकरितां गीता या ग्रंथाचा अवतार

झाला आहे. गीता हें कर्मयोगाचें, कार्याकार्यविचिकित्सेचें शास्त्र आहे. हें शास्त्र महाभारतांत उत्पन्न झालें, त्यावरून त्यावेळचा व्यवहार किती जटिल व गुंतागुंतीचा होता याची कल्पना येते. श्रीमत् भगवद्गीता हा संस्कृत वाङ्मयांतील कोहिनूर हिरा आहे. सोप्या, स्फूर्तिदायक व संवादात्मक भाषेत हा ग्रंथ असल्यामुळें तो प्रगल्भ व प्रासादिक झाला आहे. युद्धाच्या प्रारंभीं हा संवाद झाला, हेंच गीतेचें वैशिष्ट्य होय. योगेश्वर कृष्ण व धनुर्धारी पार्थ या उभयतांमधील हा संवाद आहे. या संवादाचे उपक्रम, उपसंहार आणि महाभारतांतील श्रीकृष्णाचीं वेळोवेळचीं भाषणें नि वागणूक हीं पाहिलीं म्हणजे हा ग्रंथ निष्काम वृत्तीनें व ईश्वरार्पण बुद्धीनें कर्तव्य करण्यास सांगणारा आहे, असें सिद्ध होतें. गीता ही तत्त्वनिष्ठ आहे. अमुक एक ग्रंथ, अमुक एक देव, अमुक एक साधु मानावा असें गीता सांगत नसून भक्तींत अहेतुकता, कर्मात निष्कामता व मनांत उदारता पाहिजे असें गीता सांगते. वाटेल त्या देवतेची निर्हेतुक उपासना करण्यास सांगणारा, जें समाजाच्या धारणेस पोषक व असें जें उत्तम कर्म करतां येईल तें करण्यास सांगणारा, विचारस्वातंत्र्य, पूजास्वातंत्र्य व कर्मस्वातंत्र्य देणारा जगांतील एकमेव ग्रंथ गीताच होय! गीतेंत धैर्य व निर्भयतेचें आणि दैवी संपत्तीचें महत्त्व पटविलेलें आहे. आसुरी गुणांचा त्याग प्रतिपादला आहे. तर्कशुद्ध, बुद्धिनिष्ठ असा हा कर्मयोगशास्त्रावरील ग्रंथ अखिल जगतांत अद्वितीय आहे.

गीतेंतील तत्त्वज्ञान वैदिक तत्त्वज्ञान असल्यामुळें गीतेनें द्वैताद्वैताचा उत्तम मेळ घातला असून निर्द्वंद्वाचें विवेचनहि केलें आहे. गृहस्थाश्रमाला गौण न ठरवितां अनासक्तीनें फलाशानिरपेक्ष कर्म करण्यांतच कसा संन्यास व योग साधतो हें गीतेनें दाखविलें आहे. कर्मठाला ज्ञान व ज्ञानठाला कर्म लावण्याचें काम गीतेनें केलें व त्याकरितां ज्ञान व कर्म यांचा सांधा साधणारी भक्ति उत्पन्न केली. गीतेची शिकवण ही म्हणूनच युक्तिशुद्ध व न्यायशुद्ध आहे. अहिंसा, सत्य, अस्तेय इत्यादि सद्‌गुणांच्या अतिरेकानें धर्मापेक्षां अधर्मच कसा घडतो, अनेक कर्तव्यें एका कालीं दत्त म्हणून पुढें उभीं राहिलीं असतां त्यांतील समष्टीला हितकर असेंच कर्म कां करावें, व्यष्टिधर्मापेक्षां समष्टिधर्माला अधिक मान कां द्यावा, हें सर्व गीतेवरून चांगलें समजतें. गीतेची शिकवण जोंवर समाजांत मुरली होती, तोंवर आर्य-

संस्कृतीचा उत्कर्ष होता. गीतोपदिष्ट मार्गाकडे दुर्लक्ष्य हें एक आर्यसंस्कृतीच्या ऱ्हासाचें कारण आहे.

(११९) **राजकीय स्थितिः**—महाभारतकालीं कुरु, कंबोज, पांचाल, कौसल, गांधार, मद्र, अवंति, उत्कल, कलिंग, आंध्र, चोल, द्रविड, केरल व कर्नाटकादि लहानमोठीं राष्ट्रें होतीं. राजसत्ता हीच मुख्य होती. तथापि प्रजेच्या मताला मान होता. युधिष्ठिरानें ब्राह्मण व राजेलोक यांच्या अनुमतीनें व आग्रहानेंच राज्याभिषेक करून घेतला. इतर राजांना जिंकून त्यांना मांडलिक करून आपलें साम्राज्य स्थापन करण्याची कल्पना व महत्त्वाकांक्षा क्षत्रियांना असे. राजसूय यज्ञ करणारास सम्राट् ही पदवी मिळे. मांडलिकांचीं राज्यें मुलगा नसेल तर मुलीला किंवा तिच्या मुलाला देण्यांत येत. त्यांना राज्याभिषेक होई. पण पुत्राभावीं तीं खालसा करण्यांत येत नसत. प्रजेनें एक-षष्ठांश कर राजास द्यावा व राजानें प्रजेचें संरक्षण करावें असा दंडक होता. राजा हा धर्मसंस्थेचा व समाजसंस्थेचा एक सेवक अशी समजूत असे. त्यामुळें त्याला अनियंत्रित अधिकार गाजवतां येत नसत. महाभारतांत बृहस्पतिनीतिशास्त्र, भारद्वाजनीति, कणिकनीति असे विषय आलेले आहेत. त्यांत धर्म, नीति, दंड, वाक्पारुष्य, साम, दान, भेद, अमात्य, राष्ट्र, दुर्ग, बल, कोष, रथ, गज, अश्व, पदाति, नौका, शत्रू, मित्र, उदासीन, युद्ध, परशत्रूशीं वागणूक, विश्वास, व्यवहारज्ञता, धोरण, दूरदर्शीपणा, देशकाल-समयज्ञता, प्रसंगावधान, धूर्तपणा वगैरे विषयांचें इतकें सांगोपांग विवेचन आहे कीं तें अर्वाचीन सुधारलेल्या राजकारणशास्त्रालाहि चिंतनीय असें आहे. सभापर्वांतील कच्चित् प्रश्नावरून राजा व प्रजा यांचे संबंध आणि राज्यकारभार इत्यादींची माहिती मिळते. जमिनीची मोजणी, अरण्य, अबकारी, वेठ, बिगार, दिव्य, कर यांसंबंधाचे नियम होते. ग्रामसंस्था अस्तित्वांत होत्या. तंटे आपसांत तोडीत. पण निष्क, दिनार अशीं नाणीं व्यवहारांत होतीं. पर-राष्ट्राशीं वागण्याचे नियमहि ठरलेले होते. लोकांचें राजावर अकृत्रिम प्रेम असे.

(१२०) **समाजव्यवस्थाः**—महाभारतकालीं ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य व शूद्र असे चार वर्ण असून त्यांचे धंदेहि ठरलेले होते. अनुलोम विवाह होत. प्रतिलोमसंकराबद्दल कडक निर्बंध होते. कारण आर्यांना त्याची भीति वाटे.

शांति, दया, दान, सत्य, तप हीं ब्राह्मणांचीं लक्षणें सांगण्यांत येत. पठण-पाठण, तप, त्याग व इंद्रियदमन यांमुळें ब्राह्मणांना मान असे. कण्वऋषीच्या आश्रमाचें जें आदिपर्वांत वर्णन आहे, त्यावरून ब्राह्मणसमाजाच्या राहाणीची कल्पना येते. वसिष्ठाचें ब्रह्मतेज पाहून विश्वामित्रानें "**धिग्बलं क्षत्रियबलं ब्रह्मतेजो बलं बलम्।**" असे उद्गार काढले. ब्राह्मणांचा मुख्य धंदा अध्ययनअध्यापनाचा होता. ब्राह्मण वेदांबरोबर इतर विद्या, कला व शास्त्रें यांचाहि व्यासंग करीत. निरनिराळ्या वर्णांच्या धंद्यास लागणाऱ्या सर्व विद्या ब्राह्मण शिकत व त्या सर्व वर्णांना शिकवीत. द्रोणाचार्य कौरवांना धनुर्विद्या शिकवीत. विद्यादानाचें महत्त्वाचें काम ब्राह्मणांनीं आपल्या शिरावर घेतलें होतें. पुजारी, ज्योतिषी, पुरोहित, मंत्री, दूत, वार्ताहर, इत्यादि धंदेहि ब्राह्मण करीत. आपत्कालीं वरचे वर्ण खालच्या वर्णांचे धंदे करीत. क्षत्रियाचें मुख्य काम युद्ध व प्रजापालन असें जरी होतें, तथापि प्रसंगीं सर्व जातींनीं शस्त्रग्रहण करावें अशी शास्त्राज्ञा होती. कोणत्याहि प्रसंगीं क्षत्रिय याचना करीत नसत. राजे बहुतेक क्षत्रियच असत. कृषि, गौरक्ष्य, वाणिज्य हे वैश्यांचे धंदे होते. धंद्यामुळें वैश्य विद्येंत मागें होते. त्रैवर्णिकांची सेवा व शिल्पकला हें शूद्रांचें काम असें.

(१२१) **नागलोक व इतर जाति:**—नागांचा व आर्यांचा भारतांत संबंध आलेला आहे. त्यांचें व आर्यांचें वितुष्ट होतें. नागांची वसाहत खांडव वनांत होती. तें जाळून त्यांचें उच्चाटण करण्याचा अर्जुनानें यत्न केल्यामुळें तक्षकाचें व त्याचें वांकडें पडलें. तक्षकाचें पारिपत्य अर्जुन करूं शकला नाहीं. भारतीय युद्धांत अर्जुनाला मारण्याकरितां अश्वसेन नाग कर्णाकडे गेला; पण त्याच्या मदतीचा उपयोग विशेष झाला नाहीं. हे नागलोक सर्पांप्रमाणें दावा धरीत. म्हणूनच तक्षकानें परीक्षितीच्या महालांत शिरून त्याचा खून केला. त्याचा सूड घेण्याकरितां जनमेजयानें नाग राजधानी तक्षशीला जिंकली व तेथें सर्पसत्र आरंभलें. तेव्हां भयाभीत होऊन तक्षक इंद्राचें आश्रयास गेला. जनमेजयाचा क्रोधानल आस्तिक ऋषीनें शांत केला. जरत्कारूला नागकन्येपासून हा आस्तिक ऋषी झाला होता. नाग व आर्य यांचे विवाह होत. तथापि सर्पसत्रानंतर उत्तरेकडून हे नागलोक दक्षिणेंत आले. त्यांच्यामध्यें

चातुर्वर्ण्य असावें. शिदनाक, रामनाक हीं नांवें नागांतीलच आहेत असें कांहीं विद्वान् म्हणतात.

भारतकालीं चार वर्णांशिवाय अधिरथ, अंबष्ट, उग्र, वैदेह, श्वपाक, पुक्कस, स्तेन, निषाद, सूत, मागध, आयोगव, कर्ण, व्रात्य, चंडालादि जाति अस्तित्वांत होत्या. या सर्वांना धंदे लावून दिले होते. हीन जातींना हीन कर्में सांगितलीं होतीं. उच्च जाति हीनकर्मी असेल तर ती हीनत्वाप्रत जाते व हीन जाति उच्चकर्मी असेल तर तिची उच्च जातींत गणना होते, असे विचार आढळतात. जन्मापेक्षां गुणाला, शीलाला व कर्माला महत्त्व आहे, असे उल्लेख भारतांत तीन चार ठिकाणीं आहेत. तथापि वर्ण जन्मसिद्ध आहेत, अशा समजुतीनें जातिनिर्बंध कडक होते. जातिबाहेर लग्न व जातीच्या बाहेरचा धंदा करूं नये असा दंडक होता.

(१२२) **सामाजिक परिस्थितिः**—श्रीमंत लोक मांसान्न भक्षण करीत. मध्यम वर्गांत गोरसाचें भोजनांत प्राधान्य असे. सामान्य जनांच्या भोजनांत तेल पुष्कळ असे. यज्ञीय व मृगयेंतील हिंसा मान्य होती. ब्राह्मण कोणत्याहि प्रकारची दारू पीत नसत. क्षत्रिय दारू पीत, तथापि सुरेचा निषेध होता. तांदूळ, गहूं, मसूर, हरभरा हीं धान्यें खाण्यांत येत. दुधातुपाची चंगळ असे. गोरसप्रधान पक्वान्नें असत. शिकार व द्यूत यांचा लोकांना विशेष नाद होता. उष्णीय म्हणजे पागोटें, उपरणें व नेसणेचें धोतर हा सामान्य पोषाख होता. चामड्याच्या व लाकडाच्या वहाणा वापरीत. अग्निहोत्री मिशा काढीत. मिशा हा एक अलंकार मानला जाई. मोती, हिरे, माणिकें, रत्नें यांचे अलंकार धारण करीत. चौरंग, मंचक, सिंहासन, सुवर्णासन अशीं विविध आसनें असत. चोरी, चहाडी, विश्वासघात फार थोड्या प्रमाणांत होत. हत्ती, घोडे, उंट, गाढवें, रथ, गाड्या हीं वाहनें असत. बागा, वनें, उपवनें यांचा लोकांना फार शोक होता. गायनाची अभिरुचि लोकांना असे.

(१२३) **व्यवहार व उद्योगः**—मजुरांच्या व व्यापाऱ्यांच्या श्रेणी व संघ असत. ते जमीन व समुद्र या दोन्ही मार्गांनीं व्यापार करीत. वजनें व मापें रूढ होतीं. लिखावट, हिशेब–ठिशेब यांच्या चोपड्या असत. कापड, जडजवाहिर, रत्नें, मसाल्याचे पदार्थ यांचा मोठा व्यापार असे.

रत्नांचाहि व्यापार चाले. सोनें, तांबें, रुपें, लोखंड, पोलाद या धातु होत्या. कापूस, रेशीम, लोंकर, यांचीं तलम वस्त्रें विणलीं जात असत. हरीण, बोकड, मांजर व खोकड यांच्या अंगावरची लोंकर फार नामी असे. भडोच, पांड्य, चोल येथील कापूस फार प्रसिद्ध होता. वनस्पतीपासून निरनिराळे रंग काढीत. कारागिरांना राजाश्रय मिळे. शेती हा सर्वांत मोठा धंदा होता. कालवे, तलाव यांची व्यवस्था शेतीकरितां केलेली असे. व्याजाचा दर शेंकडा एक रुपाया होता. शिल्पशास्त्रांत पार्शियन अथवा असुर लोक फारच तज्ज्ञ होते. मयासूर हा त्यापैकींच एक होता.

(१२४) **शिक्षण:**—वर्णव्यवस्थेप्रमाणें आश्रमव्यवस्था ही एक सामाजिक महत्त्वाची बाब होती. ब्रह्मचर्य, गार्हस्थ्य, वानप्रस्थ व संन्यास ह्यांत गृहस्थाश्रम मुख्य असे. कारण अध्यापन, अग्निसेवा, अतिथिपूजा हीं कर्में गृहस्थाश्रमांत चालत. ब्रह्मचर्याश्रमांत त्रैवर्णिकांचीं मुलें विद्यार्जनार्थ गुरुगृहीं जात. त्रैवर्णिकांचीं मुलें बहुतेक शिकत असत. गुरुगृहांत राहून, गुरुसेवा करून, भिक्षा मागून विद्यार्जन करावें लागे. उपनयन व समावर्तन हे गंभीर व उदात्त संस्कार असत. गुरुकृपेवांचून विद्या नाहीं, या समजामुळें गुरु हे शिष्यांची चांगली कसोटी पहात. विद्यादान मोफत असे. वेदाशिवाय अन्य विद्या शिकण्याकरितां शूद्रादि विद्यार्थीहि गुरुगृहीं जात. अध्ययन संपल्यावर गुरुदक्षिणा सामान्यतः दोन गायी देण्यांत येत असे. एका गुरूच्या घरीं निदान पांचपंचवीस विद्यार्थी असत. पण कण्वकुलपतीच्या आश्रमाचे ठिकाणीं पुष्कळच विद्यार्थी असले पाहिजेत असें दिसतें. कलाकौशल्याचें शिक्षण व धंदेशिक्षण परंपरेनें व राजाश्रयानें मिळत असे.

(१२५) **सैन्य व युद्ध:**—सैन्यांतील शिपायांना पगार किंवा धान्य नक्त देत असत. रणांत मेलेल्यांच्या कुटुंबपोषणाची व्यवस्था राजाकडून होई. रथ, हत्ती, घोडदळ व पायदळ अशी चतुरंग सेना असे. हातघाईच्या युद्धांत घोडेस्वार एकमेकांस घोड्यावरून खालीं पाडीत. हिमालयाच्या आसपासचे लोक हत्तीच्या युद्धांत, मथुरेकडील लोक बाहुयुद्धांत व दक्षिणेंतील लोक तलवार चालविण्यांत कुशल असत. कांहीं मल्ल हत्तीच्या

पोटाखालीं चपलतेनें घुसून त्यास बुक्क्या मारून त्याचा प्राण घाबरा करीत. कांहीं हत्तीशीं झुंजही खेळत. त्यावेळचा रथी म्हणजे हल्लींचा मुख्य सेनापती होय. शस्त्रास्त्रांत धनुष्य व बाण यांचा नंबर पहिला होता. धनुर्विद्येचा अभ्यास फार काळजीनें होई. अर्जुनानें रात्रंदिवस धनुर्विद्येचा अभ्यास केला होता. अस्त्रें व शक्ति हीं अभिमंत्रित करून शत्रूंवर फेकीत. अस्त्रांचा उपसंहार करण्याचें सामर्थ्य अस्त्र टाकणाराचें ठिकाणीं असे. हल्लीं रथाचीं चाकें चित्रामध्यें चार दाखवितात. परंतु रथास त्यावेळीं दोनच चाकें असत. विमानांतूनहि शत्रूवर स्वाऱ्या करीत. सैन्याची रचना निरनिराळ्या व्यूहांमध्यें करीत. पत्ति, सेनामुख, गुल्म, वाहिनी, पृतना, चमु, अनीकिनी, अक्षौहिणी असे चढत्या चढत्या संख्येचे सेनावाचक शब्द होते. सैन्याबरोबर बाजारबुणगेहि असत. धर्मयुद्धाचे नियम सांप्रत काळींहि वाखाणण्यासारखे होते.

(१२६) **स्त्रियांचें स्थानः**—भारतकालीं स्त्रियांचें समाजांत उच्च स्थान होतें हें समजण्यास द्रौपदी, दमयंती, सावित्री, कुंती, विदुला, गांधारी यांचीं चरित्रें प्रमाण होत. द्रौपदी व सत्यभामा यांचा वनपर्वांतील संवाद तत्कालीन परिस्थितीचा आदर्शच होय! द्रौपदी सत्यभामेला सांगते कीं "मी घरांतील सर्व कारभार पहातें, उपकरणी भांडीं घासतें, चांगला स्वैपाक करतें. वेळचे वेळीं पतींना जेवावयास वाढतें. गोपाल, मेंढपालादि सर्व लहानमोठ्या नोकरांवर देखरेख करतें. पतींचा खासगी जमाखर्च (आयव्यय व संचय) मीच पहातें. देवधर्म, हव्यकव्य व कुलाचारादि कृत्यें उपाध्यायाकडून मी करवून घेतें." यावरून गृहांत गृहपत्नीचें वर्चस्व किती होतें, ती गृहाची स्वामिनी कशी होती, तिच्यावांचून गृह नाहीं, हें कसें सत्य होतें याचें प्रत्यंतर येतें. माता, गृहिणी व पतिव्रता या नात्यांनीं स्त्रियांचें घरामध्यें व समाजामध्यें श्रेष्ठ स्थान होतें.

(१२७) **पातिव्रत्यः**—अनेक कथा व आख्यानांवरून आर्यस्त्रियांच्या पातिव्रत्याविषयीं उत्कट कल्पना आढळतात. "स्त्रीणामार्यस्वभावानां पतिरेको हि दैवतम्" (आर्य स्त्रियांचें पति हेंच दैवत) अशी समजूत होती. सावित्रीचें आख्यान म्हणजे पातिव्रत्यधर्माचा मूर्तिमंत आदर्श होय! या कल्पनेमुळेंच नियोगाची व विधवाविवाहाची चाल बंद पडली असावी.

त्रैवर्णिकांशिवाय इतरांमध्यें विधवाविवाह रूढ होता. भारतांत नियोगाचीं अनेक उदाहरणें आहेत. ती चाल मागाहूनच बंद पडली असावी. स्त्रिया विवाहकालीं प्रौढ असत. विवाहाचे दिवशीं पतिपत्नींचा समागम होई.

(१२८) **एकपत्निव्रताचा अभावः**—पातिव्रत्याच्या कल्पनेला पोषक अशी एकपत्निव्रताची कल्पना नव्हती. एका पुरुषास अनेक स्त्रिया असत. धर्माशिवाय इतर चार पांडवांना द्रौपदीव्यतिरिक्त कित्येक स्त्रिया होत्या. श्रीकृष्णाला आठ पट्टराण्यांशिवाय नरकासुराच्या वधामुळें अनेक स्त्रियांशीं लग्न करावें लागलें. दुर्योधनदुःशासनादिकांना अनेक स्त्रिया असत. अनेकपत्नीकत्व हें भूषण समजत असत. विवाहाचे ब्राह्म, क्षात्र, दैव, प्राजापत्य, गांधर्व, आसुर, राक्षस, पैशाच्च असे आठ प्रकार रूढ होते.

(१२९) **अनेक पति करणें**:—एका पुरुषानें अनेक स्त्रिया करण्याची चाल भारतकालीं होती. परंतु एका स्त्रीनें अनेक पति करण्याची चाल असावी असें द्रौपदीच्या उदाहरणावरून म्हणतां येतें. ही चाल अद्याप हिमालयांतील पहाडी लोकांत रूढ आहे. या चालीचा विशेष असा कीं अनेक पति एकाच कुटुंबांतील सख्खे भाऊ असत. द्रौपदीनें पांच पति कसे केले, याचें उत्तर धर्माचें तोंडून पूर्वकालीं असे विवाह होत असत असें दिलें आहे व त्याचें तोंडीं दोन तीन तशीं उदाहरणेंहि घातलेलीं आहेत. कौरवांचा पांडवांशीं उभा दावा होताच, तथापि त्यांनाहि एक बायको व पांच नवरे हा प्रकार अमान्य होता. म्हणूनच वेळीं अवेळीं कौरवांनीं द्रौपदीसंबंधीं उपहासपूर्वक उद्गार काढलेले आहेत.

(१३०) **स्त्रीशिक्षणः**—भारतकालीं त्रैवर्णिकांच्या स्त्रियांना घरगुती पद्धतीनें शिक्षण देण्याची वहिवाट होती. त्यांना लिहितां वाचतां येत होतें. द्रौपदीचें वर्णन '**प्रिया च दर्शनीया च पंडिता च पतिव्रता**' असें वनपर्व अ. २७ मध्यें केलेलें आहे. स्त्रियांकरितां शिक्षणाची स्वतंत्र सोय नसावी. पितृगृहीं असतांना एका ऋषीकडून मी अमुक ऐकलें, तमुक ऐकलें असें द्रौपदी संवादप्रसंगीं म्हणते. वृद्ध, आप्त, येणारे—जाणारे, अतिथि यांच्याकडून संभाषणद्वारां शिक्षण मिळत असे. स्त्रियांना सह—

धर्मचारिणी या नात्यानें वैदिक कर्मांचा अधिकार होता. परंतु त्यांना वेदपाठ येत असत, असा स्पष्ट उल्लेख नाहीं. लिहिणें, वाचणें, पाठ करणें, गोष्टी सांगणें, धर्मकृत्यांची माहिती असणें, याशिवाय गायन, वादन, नर्तन या विद्या श्रीमंत लोक आपल्या मुलींना शिकवीत. श्रीमंत व राजेरजवाडे आपल्या कन्यांना हें शिक्षण देण्याकरितां क्लीब नेमत असत. विराटकन्या उत्तरा हिला या विद्या शिकविण्याकरितां बृहन्नडेला नेमलें होतें.

(१३१) **स्त्रियांचे पोषाख व अलंकारः**—स्त्रिया उंची उंची दोन वस्त्रें वापरीत. एक नेसावयाचें वस्त्र असें व दुसरें खांद्यावरून पांघरण्याचें वस्त्र असें. चोळी व कासोटा घालण्याची चाल नसावी. उत्तरेकडील लहंग्याच्या पद्धतीचें नेसणें असें. डोक्यावर पदर घेण्याची चाल होती. स्त्रिया वेणी घालीत व भांग काढीत असत. विशिष्ट तऱ्हेच्या केशांच्या रचनेला ‘ सीमंत ’ म्हणत असत. विधवावपनाची चाल नव्हती. विधवा स्त्रिया केशरंजनादि वर्ज्य करीत. एकंदरींत स्त्रियांचा पोषाख सुबक, नीटस, व्यवस्थित व साधा असे. भारतीय स्त्रिया अंगावर विविध तऱ्हेचे बहुमोल अलंकार घालीत असत. सुवर्ण, मोतीं, रत्नें यांचें वैपुल्य त्या काळीं होतें. मोतीं व रत्नें यांचे हार गळ्याभोंवतीं घालीत. केयूर व अंगद हीं बाहुभूषणें होतीं. पट्टराणीचे अलंकार सामान्य स्त्रियांपेक्षां निराळे असत. पायांत नूपुरें, कंबरेंत पट्टा व गळ्यांत हार इतके अलंकार अगदीं सामान्य स्त्रीसुद्धां वापरीत असे. कानामध्यें कांहीं लोंबते दागिने असत. परंतु नथेचा उल्लेख मिळत नाहीं. पडद्याची पद्धत नसावी.

(१३२) **भूगोल व ज्योतिषः**—महाभारतांत सप्तद्वीपांचें वर्णन आलेलें आहे. जंबुद्वीपांतील अनेक देशांची माहिती आणि धर्मराजाचे चार बंधू दिग्विजयार्थ चोहों दिशांना गेले असतांना त्यांना लागलेल्या विविध देशांची, नगरांची, तीर्थांची जी माहिती दिली आहे, तीवरून तत्कालीन भूगोलाची कल्पना येते. भीष्मपर्व अ. ९ मध्यें सुमारें १६० नद्यांचीं नांवें दिलेलीं आहेत. तसेंच सुमारें ३०० देशांच्या नांवांचा उल्लेख महाभारतांत आहे. ज्योतिष शास्त्राची वाढ बरीच झालेली होती. नक्षत्रें, महिने, वार, अयनें, ऋतु, युग, कल्प, मन्वंतर इत्यादि विषयांवरील विचार निश्चित झालेले होते. ग्रहकल्पना व त्यांचीं फळें यांचेहि ठोकताळे

लोक ठरवीत असत. भारतकालीं प्राकृत भाषांचा उद्भव झालेला नव्हता. संस्कृत हीच भाषा बोलली जात होती. सभोंवतालच्या, अनार्यांच्या म्लेंच्छ भाषाही बोलण्यांत येऊन त्या भाषांतील शब्द संस्कृत भाषेनें आत्मसात केलेले होते. विदुरानें युधिष्ठिराला लाक्षागृहाविषयीं म्लेंच्छ भाषेंत भाषण करूनच सुचविलें आहे. जनक, अगस्ति, जाजली, काशीराजा, धन्वंतरी यांच्यासारखे राजे आयुर्वेदांत चांगले निष्णात होते. पुढील काळच्या ग्रंथामध्यें वरील आयुर्वेदवेत्त्यांचीं नांवें आलेलीं आहेत. कांहीं ऋषीहि या शास्त्रांत चांगले तज्ज्ञ असावेत.

(१३३) **तत्त्वज्ञान व मतमतांतरें**:–भारतकालीं धर्म, नीति व तत्त्वज्ञान यांची वाढ बरीच झाली होती. नित्य नैमित्तिक कर्में, पंचमहायज्ञ, देवतापूजन, श्राद्धपक्ष, हव्यकव्य, व्रतेंवैकल्यें, संस्कार, आचार, व्यवहार व प्रायश्चित्त वगैरे विषय लोकांच्या दैनंदिन व्यवहारांत होते. शिवाय वेदांत तत्त्वज्ञानाचीहि वाढ झालेली होती. जीव, जगत्, आत्मा, पंचमहाभूतें, ईश्वर, पुनर्जन्म, लिंगदेह, कर्मवाद, आत्मस्वातंत्र्य, साक्षात्कार, इत्यादि गहन विषयांची विचिकित्सा पुष्कळच चालू असे. वेदांत तत्त्वज्ञान व तदनुषंगिक विषय याशिवाय सांख्य तत्त्वज्ञान, पातंजल योग, पांचरात्रमत, चतुर्व्यूहकल्पना, पाशुपतमत इत्यादींची चर्चा महाभारतांत आलेली आहे. नरनारायण, शंकर, विष्णु, दत्तात्रय, दुर्गा या देवता, कैलास, वैकुंठ यांचें वर्णन भारतांत आलेलें आहे.

महाभारताचा काल म्हणजे आर्यांच्या भरभराटीचा काल होय. नर्मदेपलीकडचा सर्व प्रांत आर्यांनीं व्यापला होता. दक्षिणेंत माहिष्मती, करवीर, वनवासी व रत्नपूर इकडेहि आर्यांनीं राज्यें स्थापिलीं होतीं. देश सुपीक होता, अन्न रुचकर व सकस होतें, हवा निरोगी व उत्साहवर्धक होती, आणि अनेक स्त्रिया करण्याच्या चालीमुळें जोमदार प्रजाहि पुष्कळच वाढली. ही प्रजा आपापसांतच यादवी करूं लागली. पृथ्वीला भार झाला. तो नष्ट करण्याकरितां भारतीय युद्ध उत्पन्न झालें. भारतीय युद्ध कसें अपरिहार्य होतें, कौरवपांडवांचे संबंध कसे बिघडले होते, याची कल्पना येण्याकरितां महाभारतांतील प्रमुख नायकांचें थोडें स्वभाववर्णन येथें देतों.

# महाभारतांतील नायक व नायिका

(१३४) धर्मराजः—हा पांडवांतील सर्वांत वडील. हा धर्मनिष्ठ पण व्यवहारशून्य होता. धर्माच्या मंत्रचळेपणामुळें व व्यवहारशून्यत्वामुळेंच द्रौपदीला व पांडवांना अनेक कष्ट सहन करावे लागले. धर्मानें हें स्वतः (भीष्मपर्वांत) मान्य केलेलें आहे. धर्माच्या आज्ञेंत सर्व पांडव असत. पांचांची बायको द्रौपदी या सर्वांशीं चांगल्या तऱ्हेनें संसार करी.

पांडवांचा उत्कर्ष दुर्योधनादिकांना प्रथमपासूनच सहन होत नसे. खेळतांना, विद्या शिकतांनासुद्धां भीम हा कौरवांची फजिती करी. तेव्हांपासून त्यांचा नायनाट करण्याकरितां कौरवांनीं अनेक कारस्थानें केलीं पण तीं फसलीं. पुढें जेव्हां धर्माच्या चार भावांनीं चोहों दिशांवर दिग्विजय मिळविला, धर्मानें राजसूय यज्ञ करून, अपार संपत्तीचा दानधर्म केला, व लक्षावधी लोकांना मिष्टान्न भोजन दिलें, तेव्हां या सर्व प्रचंड ऐश्वर्यामुळें दुर्योधन अगदीं दिपून गेला व आंतून जळूं लागला.

धर्मानें आलेले करभार मोजून जमा करून घेण्याचें काम जर दुर्योधनाकडे सोंपविलें नसतें, आणि दुर्योधनास मयसभा दाखविण्याकरितां जर माहितगार माणसें दिलीं असतीं तर त्याची फजिती झाली नसती आणि मत्सराग्नि इतका भडकला नसता ! पण मयसभेंत दुर्योधनाचें डोकें दारावर आपटलें, तो तोंडघशीं पडला, आसपासचे लोक हांसले, व भीमानें मर्मभेदक भाषण केलें ! द्रौपदीहि हंसली, असें गाऱ्हाणें दुर्योधनानें धृतराष्ट्राला खोटेंच सांगितलें. या अपमानानें मेल्यापेक्षांहि अधिक दुःख दुर्योधनाला झालें व त्यानें शकुनीच्या सहाय्यानें द्यूतप्रिय अशा धर्मास द्यूताला बोलावून कपटानें त्याचें सर्वस्व नागवलें.

धर्मानें द्यूताला मोडता घालण्याचे प्रथमपासून आटोकाट प्रयत्न केले. त्याला द्यूत आवडे, पण कपटद्यूताचा तो द्वेष्टा होता व तो " हॅबी-च्युअल गॅंबलर " म्हणजे द्यूतव्यसनप्रिय नव्हता. अखेरच्या क्षणापर्यंत त्यानें द्यूत टाळण्याचा यत्न केला पण त्याची ही प्रतिज्ञाच (द्यूताला आव्हान केलें कीं 'नाहीं' म्हणावयाचें नाहीं) त्याच्या आड आली. द्यूत खेळतांना हा कपटव्यूह आहे, हें सर्व लबाडीचें कारस्थान आहे, हें सर्व त्याच्या ध्यानांत

आलें असतांहि आपल्या प्रतिज्ञेत कांहीं तारतम्य ठेविलें पाहिजे, एवढें धोरणहि त्याला राहिलें नाहीं. द्यूतांत त्यानें हिरीरीनें सर्वस्व पणाला लावलें व शेवटीं बायकोहि पणाला लावली. याचा व्हावयाचा तोच परिणाम झाला. धर्मानें ही चुकी पुढें वनपर्व अ. ३४ श्लो. ५ मध्यें मान्य केली आहे; पण तिचा उपयोग काय ? धर्माच्या व्यवहारशून्यपणामुळें ही आपत्ति ओढवली !!

वनवासांत धर्माची खरडपट्टी भीम, अर्जुन, द्रौपदी यांनीं काढण्यास कमी केलें नाहीं. धर्म जेथें तेथें त्यांना क्षमा, शांति यांचेंच पुराण सांगत आहे. दुस्तर अज्ञातवासानंतर अर्धें राज्य परत मिळविण्याकरितां जो यत्न अभिनिवेशानें करावयास पाहिजे तोहि धर्म करीना ! पण इतर सर्वांच्या आग्रहामुळें शेवटीं पांच गांवें तरी द्या, आम्ही सामास तयार आहों, असा निरोप कृष्णाजवळ धर्म सांगता झाला.

भीष्मवधाचे पूर्वी धर्माला कांहीं सुचेना म्हणून तो पुन्हां वनांत जावयाची भाषा बोलूं लागला. द्रोणवधप्रसंगींहि त्याच्या मनाची फारच चलबिचल झाली. अश्वत्थामा मेला असें चापून सांग, असें त्याला श्रीकृष्णानें सांगितल्यावर मग तो कसाबसा सिद्ध झाला. युद्धांतील मुख्य भाग जो दुर्योधनवध त्याहि प्रसंगीं आम्हां पांचांपैकीं वाटेल त्याशीं तूं लढ, असें म्हणून पुन्हां दुर्योधनाशीं त्यानें जुगारच मांडली ! ती निस्तरण्याचें काम झाल्यामुळें युद्धांत जय झाला. पण त्या जयानंतर धर्माला पुन्हां वनवासाची अवदसा आठवली ! खोटें बोलून, अनेक कारस्थानें करून मिळविलेलें राज्य हें आतां नको असें तो म्हणूं लागला आणि सर्वांनीं सर्व तऱ्हेनें त्याचें समाधान केल्यावर कसाबसा त्यानें राज्याभिषेक करून घेतला. युधिष्ठिर हा धर्मप्रिय, धर्मनिष्ठ, मंत्रचळा, संशयी, सत्यवादी, विवेकी, शांत, धिम्या दिलाचा, गुरुभक्त, हळुवार अन्तःकरणाचा असा होता. त्याच्या अनेक सद्गुणांचें चीज व्यवहारज्ञान आणि तारतम्य यांच्या अभावीं झालें नाहीं.

(१३५) **भीमसेनः**—हा महापराक्रमी, महाबलवान, सडेतोड, स्पष्ट वक्ता व एक घाव दोन तुकडे अशा स्वभावाचा होता. लहानपणापासून तो आपल्या बलानें दुर्योधन दुःशासनादिकांना अगदीं जेर करीत असे-

राजसूययज्ञापूर्वीं त्यानें मोठा पराक्रम करून अपार संपत्ति आणली. कपट-द्यूत चाललें असतांना हा गाढवपणा पुरे करा असें त्यानेंच बजावलें !! एकदां तर तो परीघ उचलून मारावयालाहि धांवला ! द्रौपदीची ती विटं-बना पाहून संतापानें सर्व कौरवांना मारण्यास आणि धर्मांचे फासे खेळणारे हातही जाळण्यास तो सिद्ध झाला. पण त्यावेळीं त्याला अर्जुनानें गप्प बसविलें ! पुढें धर्मानें वनपर्व अ. ३४ श्लो. १७ मध्यें 'भीमा, तूं त्यावेळीं जर तें दुष्कर कृत्य केलें असतेंस तर बरें झालें असतें.' असेंच म्हटलें आहे. पण मागाहून उपयोग काय ?

वनपर्व अ. ३३ मध्यें भीमानें धर्माला अर्थ व काम या पुरुषार्थांचें फार चांगल्या तऱ्हेनें महत्त्व पटविलें आहे. जगांत अर्थ व सत्ता यांमुळेंच जगतां येतें, निर्धनाला व निःसत्वाला कोणी विचारीत नाहीं, शठाशीं शाठ्य करणें हाच धर्म होय, क्षत्रियानें वाटेल तें करून राज्य संपादन करावें, राज्यसंपादनानंतर विपुल दानधर्म करावा, पण शत्रूंना चूप बसवावें, असा भीमाचा अभिप्राय आहे.

धर्माच्या अहिंसावृत्तीचा, क्षमेचा, दुर्बलत्वाचा भीमानें ठिकठिकाणीं निषेध केलेला आहे. भीमाच्या भाषणांत कुठेंहि अस्पष्टपणा व नरमपणा नाहीं. त्यानें पुनःपुन्हां क्रोधाचें व पराक्रमाचें महत्त्व युधिष्ठिराला पटवून देण्याचा यत्न केला आहे. नाहीं म्हणावयाला श्रीकृष्णशिष्टाईला जेव्हां निघाला तेव्हां अ. ७४ मध्यें भीम थोडा भागुबाईसारखा बोलला. पण श्रीकृष्णानें त्याला चेतावणी देतांच पुन्हां प्रकृतिस्वभावानुसार पौरुषाच्या गोष्टी तो बोलूं लागला.

युद्धामध्यें भीमाचा पराक्रम तर मुख्यच आहे. कोणताहि पराक्रमाचा प्रसंग त्यानें दवडला नाहीं व त्यानें कधीं कच खाल्ली नाहीं. दुःशासनवध व दुर्योधनवध हें जेव्हां त्यानें आपल्या प्रतिज्ञेप्रमाणें बरोबर केलें त्यावेळीं तो आनंदानें उड्या मारूं लागला. बकवध, कीचकवध आणि अशाच प्रसंगीं त्यानें फारच पराक्रम दाखविला; त्या पराक्रमाच्या समा-धानामुळेंच द्रौपदीला ते कष्टाचे दिवस पार पाडतां आले. द्रौपदीच्या वरचेवर उसळणाऱ्या दुःखोद्रेकाचें समाधान भीमानेंच केलेलें आहे. शेवटीं जय मिळाल्यावरहि धर्म जेव्हां संन्यासाच्या गोष्टी बोलूं लागला तेव्हां

भीमानें त्याला सांगितलें कीं " तूं वेदाभ्यासी जडबुद्धि आहेस. आळशी आहेस. क्षत्रियांत तूं चुकून जन्मला आहेस. तुझ्या नेभळटाच्या नादानें आम्ही फसलों. संन्यास हा दुबळ्यांचा आहे व पराक्रमानें राज्य करणें हें क्षत्रियकर्म आहे. अरण्यांत जाऊन काय मिळणार आहे ? डोंगर, पर्वत, वृक्ष हे अरण्यांत आहेतच. अरण्यांत. पशूहि आहेतच. तेव्हां ही बुद्धि टाकून दे व मिळविलेलें राज्य थाटानें, ऐटीनें, पराक्रमानें भोग व प्रजेला सुखकारक असें कर. "

एकंदरींत भीम हा गृहस्थाश्रमाचा, प्रवृत्तिधर्माचा, क्षात्रवृत्तीचा भोक्ता होता. त्याला अन्यायाची फार चीड होती. ज्यांनीं त्याची आगळिक केली होती त्यांना नाहींसे करण्याकरतां तो सारखा तडफडत असे. ठोशास ठोसा देणारा, शठाशीं शाठ्य करणारा, शाठ्य करण्यांत मुळींच अधर्म नाहीं असें समजणारा असा हा बाणेदार शिपाई गडी होता.

(१३६) अर्जुनः–अर्जुन हा मोठा धनुर्धारी, अनेकअस्त्रविशारद, महापराक्रमी, धर्मनिष्ठ आणि थोडासा युधिष्ठिराच्या मताप्रमाणेंच कल असणारा असा होता. यानें तपश्चर्या करून वेळोवेळीं अनेक अस्त्रें संपादन केलीं, म्हणूनच पांडवांचा जय झाला. राजसूय यज्ञापूर्वी अर्जुनानें दिग्विजय करून अनेक राजांकडून करभार वसूल केला होता. द्यूतप्रसंगीं धर्मराजाचा कल पाहून हा वागला. भीमाप्रमाणें उसळून गेला नाहीं. फक्त एकदां त्यानें विकर्णाचे भाषणास "द्रौपदी अजिता आहे " असें म्हणून मान्यता दिली !

वनपर्वांत अर्जुनानें भीम व द्रौपदी यांच्याप्रमाणें धर्माची हजेरी घेतली नाहीं; तर प्राप्त परिस्थितीचा विचार करून धर्माच्या उपदेशाप्रमाणें तो अस्त्रविद्येच्या प्राप्तीकरितां गेला. अर्जुन हा धर्माप्रमाणेंच थंड्या प्रवृत्तीचा होता. श्रीकृष्णशिष्टाईला निघाला तेव्हां अर्जुनानें धर्माप्रमाणें अगदीं पडखाऊपणाचा निरोप त्याला सांगितला नाहीं. तर " फारसा विचार करीत न बसतां मागचे सर्व अन्याय आठवून जें झटपट करावयाचें तें कर " असेंच त्यानें सांगितलें.

अर्जुन हाहि धर्माप्रमाणेंच व्यवहारशून्य होता. धर्मापेक्षां हा पराक्रमी होता यांत शंकाच नाहीं. पण धर्माप्रमाणें याचे मंत्र सदा चळत

असत. युद्धाच्या प्रारंभीं, शिखंडीला पुढें करून भीष्मावर बाण टाकीत असतांना व कर्णवधप्रसंगीं अर्जुनाला अवदसा आठवली होती; पण त्या बयेच्या फेऱ्यांतून तो वांचला ! गांडीव धनुष्याची निंदा करणाऱ्याचा वध करणें, ही त्याची प्रतिज्ञा कशी चुकीची होती, द्रोणवधानंतर त्याचे ठिकाणीं उत्पन्न झालेलें वैराग्य कसें अस्थानीं होतें हें त्याला मागाहून समजलें. युद्धांत जय मिळाल्यानंतर धर्म जेव्हां शोक करूं लागला व पुन्हां त्याला भिकेचे डोहाळे आठवले, तेव्हां अर्जुन म्हणतो, 'धर्मा, शत्रु-संहार करून तूं ही पृथ्वी मिळविलीस, तिचा उपभोग घे. अरे, क्लीबाला कधीं राज्य मिळत नाहीं. ही वसुंधरा वीरभोग्या आहे. भिक्षा मागणें हें क्षत्रियाला उचित नाहीं. अर्थ व सत्ता यांशिवाय जगांत कोणी विचारीत नाहीं. आजपर्यंत देव–असुरांनीं या पृथ्वीच्या प्राप्तीकरितां अनेक यत्न केले आहेत. आपणहि तसेच यत्न केलेले आहेत. तेव्हां मेलेल्यांबद्दल हळहळ न मानतां राज्याचा उपभोग घे.'

अर्जुन हा एकंदरींत धर्मापेक्षां अधिक प्रवृत्तिवान्, गृहस्थधर्माची आस्था बाळगणारा, व्यवहार जाणणारा, पराक्रमी, श्रीकृष्णाचा मित्र, धर्मनिष्ठ पण कधीं कधीं धर्माच्या व प्रतिज्ञेच्या अव्यवहार्य कल्पनेमुळें आपल्या पायावर धोंडा पाडून घेणारा असा होता.

(१३७) **नकुल, सहदेवः**–महाभारतांत धर्म, भीम व अर्जुन यांप्रमाणें नकुल, सहदेव या नायकांचे प्रसंग फारसे आलेले नाहींत. तथापि जे आले आहेत त्यांवरून हे दोघे महापराक्रमी, शिस्तीचे भोक्ते, अन्यायाचा प्रतिकार करणारे, व्यवहारज्ञ असे होते. या उभयतांनीं राजसूययज्ञापूर्वीं नेमून दिलेल्या भागावर स्वाऱ्या करून अनेक राजांकडून करभार वसूल केले. द्यूताच्या अनिष्ट प्रसंगीं केवळ शिस्त म्हणूनच त्यांनीं संयम दाखविला. वनवासांत व अज्ञातवासांत यांनीं ठरीव कार्यक्रमापेक्षां इकडे तिकडे लक्ष्य दिलें नाहीं. श्रीकृष्ण शिष्टाईला निघाला तेव्हां नकुल म्हणाला, 'कृष्णा, माणसानें वेळेचा रंग पाहून वागावें. जो मनुष्य परिस्थितिसापेक्ष वागतो तोच जगतो. माणसाची मतीहि बदलतच असते. म्हणून दुर्योधनाचीं गरिबीचें किंवा रागाचें भाषण धोरण पाहून कर व आमचें कार्य सिद्धीस ने.'

सहदेव म्हणाला, “ कृष्णा, मला संधि वगैरे आतां नको. कोणी-कडून युद्ध जुंपेल असेंच कर. कौरव सामाला अनुकूल असले तरी मला युद्ध हवें आहे. इतर पांडव ‘ धर्म धर्म ’ म्हणत बसले तरी दुर्योधनाला मारण्याचा धर्म एवढाच मला माहीत आहे. तेव्हां कसेंहि करून युद्ध होऊं द्या. ”

युद्धप्रसंगीं नकुलसहदेवांनीं आपापल्या पराक्रमाचा वांटा योग्य तऱ्हेनें उचलला आणि ज्यांचे ज्यांचे बळी घ्यावयाचे होते ते घेण्यास त्यांनीं कमी केलें नाहीं. पराक्रमांत त्यांनीं कधींहि माघार घेतली नाहीं. युद्धानंतर शांतिपर्वामध्यें धर्माशीं या दोघांनीं बुद्धिवादहि मोठा मार्मिक केला आहे. नकुलानें धर्माला गृहस्थाश्रमाचें महत्त्व सर्व दृष्टीनें पटवून दिलें. यज्ञ, अध्ययन व दान यांची थोरवी सांगितली. गृहस्थाश्रमावरच जग कसें चाललें आहे याचीहि कल्पना देऊन गृहत्याग करून अरण्यांत जाण्यापेक्षां आसक्ति सोडून व अभिमान त्यागून कर्में करणें हाच त्याग होय, असें कर्मयोगाचें सार सांगितलें. सहदेवानेंहि धर्माच्या डोक्यांतलें वनवासाचें वेड जाईल असाच उपदेश त्याला केला. बाह्य वस्तूचा त्याग करून मोक्ष मिळत नाहीं, वासनेचा त्याग केला पाहिजे; मम व न मम हेच बंध व मोक्ष आहेत; विरक्तालासुद्धां आसक्ति उत्पन्न होते, म्हणून हें खूळ सोडून दे ! असें सांगितलें.

नकुल व सहदेव हे प्रवृत्तिपर, कर्मयोगी, पराक्रमी, धैर्यवान, शिस्तीचे भोक्ते व संयमशील असे होते.

(१३८) द्रौपदीः—द्रौपदी ही भारतांतील मुख्य नायिका होय. महा-पंडित, धोरणी, स्वाभिमानी, कर्तृत्ववान्, सुस्वरूप अशी ही पतिव्रता होती. विवाहकालीं ती प्रौढ होती. स्वयंवराचे वेळीं ती निर्भयपणें वागली. राजसूय-यज्ञामध्यें हजारों राजांनीं आणलेल्या पवित्र कलशांनीं जिच्या केशांना अवभृथ स्नान घातलें ते केश दुःशासनानें धरून त्यांना हिसके देत द्रौपदीला भर-सभेंत फरफरा ओढत आणावी यासारखा संतापाचा, त्वेषाचा आणि दैव-दुर्विलासाचा प्रसंग कोणता ? पांच भावांची बायको झाल्यामुळें त्या कालाच्या विशिष्ट एका रूढीस तिला मान देणें भाग पडलें. भरसभेंत नवऱ्यांसमक्ष होत असलेल्या अपमानामुळें तिच्या अंगाची कशी लाही लाही झाली

असेल याची कल्पनाच करवत नाहीं. तिचें तें केशग्रहण, वस्त्रहरण हे प्रसंग म्हणजे जगांतील मानवी इतिहासांत अपवादभूत म्हणून घडणारे भयंकर प्रसंगच होत. पण तेही प्रसंग केवळ पातिव्रत्यार्थ धैर्य खचूं न देतां तिनें सहन केले. 'जिता कीं अजिता' हा तिचा प्रश्न पेंचप्रसंग उत्पन्न करणाराच होता. पण धर्माचें मौन, भीष्माचा दुबळेपणा पाहून तिला काय वाटलें असेल ? पतींबरोबर निःशंकपणें ती वनांत गेली. वनांत गेल्यावर पांडवांची ती दुःस्थिति पाहून तिच्या अंगाचा तिळपापड झाला. वनवासांतील सर्व कष्ट धर्म हा निमुटपणें सहन करीत आहे असें पाहून संतापानें तिनें 'धर्मा, तुझा राग गेला काय ? अरे, क्रोधाशिवाय मनुष्य जगत नाहीं. ज्याला क्रोध नाहीं तो क्षत्रिय नव्हे. क्षमा व क्रोध हीं दोन्ही असावीं लागतात. यांत तारतम्य पाहिजे' असें सांगून धर्माला प्रल्हाद व बली यांचा संवाद सांगितला. धर्म जेव्हां पुन्हां क्षमेचा व अहिंसेचा पुरस्कार करूं लागला, त्यावेळीं तिनें त्याला योग्य तऱ्हेनें प्रत्युत्तर दिलेलें आहे. 'धर्मा, तूं जर धर्माचा एवढा भोक्ता, तर तुला ही दुर्बुद्धि आठवली कशी ? तूं जर सत्कर्मरत आहेस तर ईश्वरानें तुझ्यावर हा दारुण प्रसंग कां आणावा ? क्रूर, लोभी, दुष्ट दुर्योधन ऐश्वर्याला चढतो व तूं वनांत वल्कलें धारण करून बसतोस; यावरून कसला धर्म आणि कसला ईश्वर ? काय घेऊन बसला आहेस ? मी धर्माची आणि ईश्वराची निंदा करीत नाहीं. पण लक्षांत ठेव कीं जग हें कर्मानें चाललेलें आहे, त्यामुळेंच प्राणी जगतात; योग्य कर्मानें सर्वांचा उत्कर्ष होतो. प्रयत्नाला दैवाचें साहाय्य पाहिजे. पण प्रयत्न केल्याविना दैव अनुकूल आहे कीं नाहीं, हें कसें समजणार ? प्रयत्नशीलासच फलप्राप्ति होते. पर्जन्याचा उपयोग मेहनती शेतकऱ्यासच होतो. तात्पर्य, योग्य यत्न, अचुक यत्न करून गेलेलें राज्य मिळव."

वनपर्वांतील द्रौपदी व युद्धिष्ठिर यांचा संवाद हा द्रौपदीच्या सुशिक्षणाचा, सुसंस्कृतीचा व स्वाभिमानाचा निदर्शकच आहे.

वनवासांत श्रीकृष्णाची प्रथम भेट झाली तेव्हां तिनें आपलें अंतःकरण श्रीकृष्णाजवळ अगदीं उघडें करून दाखविलें आहे आणि झालेल्या छळाबद्दल ती संतापानें सूड कसा घ्यावा याची करुणा भाकीत आहे.

श्रीकृष्ण जेव्हां शिष्टाईला निघाला तेव्हां ज्यानें त्यानें श्रीकृष्णाला आपलें म्हणणें सांगितलें. पण त्या सर्वांचा सामाचा आग्रह पाहून ती चवताळली व कृष्णाला म्हणाली, 'हें पहा, द्रुपद राजाची नंदिनी, धृष्टद्युम्नाची भगिनी, पांडवांची पट्टराणी व श्रीकृष्णाची प्रियसखी अशी जी मी त्या मजवर असा प्रसंग यावा काय? कृष्णा, त्या पांडवांना त्यावेळीं मींच वांचविलें. त्यांना मीं अदास केल्यावर त्यांनीं पुन्हां अजागळपणें वनवासच ओढवून घेतला. जोंवर दुःशासनाचा हात उखडून धुळींत पडलेला नाहीं तोंपर्यंत मला शांती नाहीं हें पक्कें समज. हे पांडव जरी संधिकामुक असले तरी माझा वृद्ध बाप, माझा अभिमन्यु व इतर मुलें लढाईला सिद्ध आहेत असें समज. कृष्णा, तूं शिष्टाईला जातो आहेस, तेव्हां इतर कशाचेंहि स्मरण न ठेवतां माझ्या केशग्रहणाचें स्मरण ठेव म्हणजे झालें.'

अयं ते पुंडरीकाक्ष दुःशासनकरो धृतः ॥
स्मर्तव्यः सर्वकार्येषु परेषां संधिमिच्छिता ॥३६॥–उद्यो. प. अ. ८२

द्रौपदी ही तिच्या झालेल्या छळामुळें, कष्टामुळें व राज्यविहीन झाल्यामुळें सारखी क्रोधाग्नीनें धुमसतच होती. पुढें भीष्म, द्रोण व कर्ण यांच्या वधानंतर तिला किती आनंद झाला असेल! आणि विशेषतः दुःशासनाला ठार करून त्याच्या रक्तानें भरलेल्या हातांनीं भीम जेव्हां द्रौपदीच्या मोकळ्या केसांची वेणी घालावयास आला असेल, तेव्हां तिच्या हृदयांतील आनंदाची कल्पना तसा प्रसंग ज्यांच्यावर आला असेल त्यांनाच करतां येईल. दुर्योधनवधानंतर भीमाच्या गदेनें दुर्योधनाची मांडी मोडली ही वार्ता जेव्हां तिला समजली तेव्हां तिचा आनंद गगनांत मावेना. याप्रमाणें सर्व कौरवपक्षीयांचा निःपात करून मिळविलेलें राज्य उपभोगण्यास जेव्हां धर्म कचरूं लागला तेव्हां ती संतापानें म्हणते, 'धर्मा, नेभळ्या माणसाला पृथ्वी मिळत नाहीं. ज्याच्या हातीं सत्ता नाहीं तो क्षत्रिय नव्हे. अरे, सज्जनांचें पालन, धर्मसंस्थापना यांकरितां हातांत सत्ता पाहिजे. तूं पराक्रमानें पृथ्वी मिळविली आहेस. युधिष्ठिरा, तूं आजवर फार वेडपटपणा केलास. त्यामुळें येऊं नये ते प्रसंग आले. सर्वांत वडील बंधु तूं वेडा व तुझें अनुकरण करणारे हे भाऊहि वेडे, म्हणूनच त्यांनीं हें सर्व सहन केलें. ते जर वेडे नसते तर त्यांनीं तुला बांधून टाकून पृथ्वीचें

राज्य केलें असतें. जो मूर्ख असें वेड्यासारखें वर्तन करतो त्याचें कल्याण कधींहि होत नाहीं. हातीं आलेल्या पृथ्वीचा त्याग करून विपत्ति भोगण्याची इच्छा करणारा जगांत तूंच एक मूर्ख दिसतोस!'

याप्रमाणें द्रौपदीनें धर्माची चांगली कानउघाडणी केलेली आहे. भारतांतील तिचीं भाषणें पाहिलीं म्हणजे तिचा त्वेष, स्वाभिमान, चातुर्य, पातिव्रत्य, तेजस्विता, मानीपणा हे गुण दृष्टोत्पत्तीस येतात.

(१३९) धृतराष्ट्रः-पांच पांडव व द्रौपदी यांचे स्वभावधर्म येथवर सांगितले. आतां कौरवपक्षीयांकडील मुख्य नायकाकडे वळूं. धृतराष्ट्र हा महाधोरणी, बलवान्, बहुश्रुत, कारस्थानी व सत्प्रवृत्तहि होता. पुष्कळ वेळां त्याचा विवेक जागृत होई. पांडवांवर अन्याय करूं नये असें त्याला वाटे. विदुरादिकांच्या शब्दास तो मान देई. पण दुर्योधन पुढें आला कीं पुत्रप्रेमामुळें तो मोहित होई. शिवाय दुर्योधनापुढें त्याचें कांहीं चालतहि नसे. आपल्या पुत्रांचा उत्कर्ष व पांडवांचा अपकर्ष पाहून त्याला आंतून गुदगुल्या होत असत. घडघडीत एखाद्या अनिष्ट गोष्टीला हा मान्यता देई व होणारासारखी बुद्धि होते, दैव हें अटळ आहे, असें म्हणून आपल्या कृत्याचें हा समर्थन करी. द्यूताला अनुज्ञा देतांना, दुर्योधनाची समजूत घालतांना व अनेक प्रसंगीं त्यानें हाच प्रकार केला आहे. हा वृद्ध होता तरी महाबलवान होता. भारतीय युद्धानंतर भीमाला आलिंगन देऊन दाबून ठार मारण्याचा त्याचा विचार होता. पण श्रीकृष्णाच्या युक्तीमुळें भीमाच्या लोखंडी पुतळ्याचा धृतराष्ट्रानें चक्काचूर उडविला म्हणूनच भीम वांचला. वार्धक्यामध्यें मनुष्याला उपरति होते, त्याला धृतराष्ट्र अपवादच होता. संजय त्याला गीता अगदीं जुलमानेंच ऐकवीत होता, पण त्याला युद्धवार्ताच हवी होती.

(१४०) दुर्योधन, दुःशासनः-हे पांडवांचे प्रतिपक्षी आणि भारतांतील खलपुरुष होत. यांचा साहाय्यकर्ता शकुनी हा तर अगदीं कपट्यांतील कपटी व लबाडांतील लबाड होता. कर्ण हा महापराक्रमी, उदार पण अपमानित व दलित झाल्यामुळें अत्यंत दुखावलेला होता. दुर्योधनानें त्याची मनःस्थिति जाणून त्याला आपलासा केला. तेव्हांपासून दुर्योधन,

दुःशासन, कर्ण व शकुनी अशी ही चांडाळचौकडी झाली. दुर्योधन, दुःशासन हे फार मानी, गर्विष्ठ, पराक्रमी, खुनशी, आढ्य, सत्तेची हांव असणारे असे होते. पांडवांशीं वितुष्ट आल्यामुळें यांच्या मत्सरी वृत्तीचा प्रभाव संपूर्ण भारतांत आढळतो. पांडवांशीं हाडवैर सोडून दिल्यास या दोघांचें प्रजेशीं, इतरांशीं, स्वपक्षीयांशीं, आप्तेष्टांशीं वागणें चांगल्या तऱ्हेचें होतें. दुर्योधनाइतका मानी, हट्टी व दुराग्रही जगांत सांपडणार नाहीं. पित्यानें, मातेनें, आप्तेष्टांनीं, भीष्मद्रोणादिकांनीं जवळ जवळ सर्वांनीं त्याला " पांडवांशीं सख्य कर, त्यांचें राज्य त्यांना दे, दुराग्रह सोड " असें परोपरीनें सांगितलें तरी हा एक रेसभरहि वळला नाहीं. गदायुद्धप्रसंगीं साक्षात् मृत्यु जवळ आलेला असतांनाहि यानें धर्माला मानीपणानें असें सांगितलें, ' धर्मा, जन्माला येऊन जें करावयाचें तें मीं केलें. दानें दिलीं, भोग भोगले, राज्य केलें, मित्रांवर उपकार केले, आणि शत्रूंच्या डोक्यावरहि नाचलों. मला मरतांना आनंद होत आहे. आम्हां सर्वांच्या संहारानंतर तुझें हें राज्यवैभव म्हणजे स्मशानांतीलच विलास होत. '

दुःशासन हाहि असाच मानी होता. त्यानें भीमाला अंतिम क्षणीं याच तऱ्हेचें उत्तर दिलेलें आहे.

(१४१) **भीष्म, द्रोणः**–हे मोठे विद्वान, निःस्पृह व सर्वांचे गुरु खरे, पण त्यांनीं व कृपाचार्य आणि शल्य यांनीहि युधिष्ठिराला युद्धारंभीं आपलें दैन्य सांगितलें आहे. द्रोणाचार्यांना दारिद्र्यामुळें नोकरी पत्करावी लागली म्हणून " अर्थस्य पुरुषो दासः " हें त्यांनीं सांगितलें, तें बरोबर. पण भीष्मांना इतका मिंधेपणा स्वीकारण्याचें काय कारण असावें तें समजत नाहीं. कृपाचार्य व शल्य यांनीं ' आम्ही अन्नाचे ओशाळेले आहोंत, ' असें म्हटलें तेंहि क्षम्य आहे. भीष्म त्याच वंशांतले, ब्रह्मचारी, अपरिग्रही असतांनासुद्धां धृतराष्ट्रानें त्यांची व्यवस्था, मानमरातब, आदरसत्कार सर्व उत्तम ठेवल्यामुळें ते बोटचेपे झाले कीं काय असा भ्रम पडतो. एकंदरींत मोठीं माणसेंसुद्धां कशीं शरमिंधीं होतात याचेंच हें उदाहरण होय.

(१४२) **कुंती, माद्री व गांधारीः**–कुंतीचा सर्व जन्म विपत्तींत गेला. ही साध्वी, तपस्वी, मनस्वी अशी स्त्री होती. कोणत्याहि प्रसंगीं

आपल्या पुत्रांनीं अपमानानें जगावें असें तिला वाटलें नाहीं. आपल्या पुत्रांवर झालेल्या अन्यायाचें परिमार्जन झालेंच पाहिजे, असा तिचा आग्रह होता व वेळोवेळीं तिनें पांडवांना उत्तेजन दिलें होतें. भारतीय युद्धानंतर धर्मराजाच्या ऐश्वर्याचा सुखसोहाळा पाहाण्यास ती राहिली नाहीं. ती म्हणाली, 'माझी इच्छा पुरी झाली. मी आतां तपश्चर्येला जातें.' शेवटचा निरोप तिनें आपल्या पुत्रांना हाच दिला कीं, 'बाबांनो, तुमची बुद्धि धर्माच्या ठिकाणीं अढळ असो व तुमचें मन मोठें व उदात्त असो!' मुलांना असा उदात्त उपदेश करणाऱ्या माता धन्य नव्हेत काय?

माद्री व गांधारी या दोघी स्त्रिया सुसंस्कृत, व्यवहारदक्ष, स्वाभिमानी व मनुष्यस्वभाव जाणणाऱ्या होत्या. माद्रीचा संबंध फारसा दिसत नाहीं. पण जेथें तो आलेला आहे, तेथें तिनें आपलें चातुर्य दाखविलें आहे. गांधारीची स्थिति तर एका बाजूस धृतराष्ट्र व दुसऱ्या बाजूस दुर्योधन यांमुळें अगदींच केविलवाणी झाली होती. हट्टी मुलगा व त्याचे लाड पुरविणारा नवरा या उभयतांच्यापुढें तिचें काय चालणार? तथापि कृष्णशिष्टाईचे वेळीं धृतराष्ट्राच्या सांगण्यावरून तिनें दुर्योधनाची चांगली कानउघाडणी केली आणि दुराग्रह सोड असें परोपरीनें सांगितलें.

(१४३) कर्णः—हा मोठा स्वाभिमानी होता. दुर्योधनाचा पक्ष सोडावा म्हणून श्रीकृष्ण व कुंती यांनीं त्याचें मन वळविण्याचा आटोकाट प्रयत्न केला. परंतु कर्णानें तें अशक्य आहे असें उत्तर दिलें व अगदीं अखेरपर्यंत दुर्योधनाशीं इमान राखलें.

पांडव व कौरव यांचे स्वभावधर्म पाहिल्यावर भारतांतील मुख्य सूत्रचालक जो श्रीकृष्ण त्याचें चरित्र आतां देतों.

(१४४) श्रीकृष्णः—पांडवांचा सहकारी, कौरवांचाहि नातलग, न्यायनिष्ठुर, मुत्सद्दी, तत्त्ववेत्ता, असामान्य बुद्धीचा योगेश्वर श्रीकृष्ण हा महाभारतांतील मुख्य नायक आहे. कर्माकर्मविवेक प्रतिपादन करणारा, दुष्टांचा शास्ता, सुष्टांचा साहाय्यकारी, स्त्री, शूद्र, अंत्यजादिकांस मोक्ष दाखविणारा, स्वसुखनिरभिलाषानें जगास स्वार्थत्यागाचा धडा घालून देणारा, व्यवहारांत उत्पन्न झालेल्या प्रसंगांवरून तात्त्विक सिद्धांत

मांडणारा असा हा जगद्वंद्य आर्यवीर होय! दुर्योधनप्रभृति कौरवांची दुष्ट महत्त्वाकांक्षा, लोभी, मानी व दुराग्रही वृत्ति पाहूनच बुद्धि, पराक्रम, क्षिप्रकारित्व, आणि जशास तसें वागून सत्याची बाजू संभाळण्यास पांडवांच्या वतीनें श्रीकृष्ण पुढें आला. केवळ प्रवृत्तिपरायण झालेल्या दुर्योधनप्रभृतींना निवृत्तीचा, संयमाचा व सत्याचा धडा देणें, आणि निवृत्तीच्या पुरांत सर्वस्वीं वाहून जाणाऱ्या धर्मादिकांना प्रवृत्तीची योग्य दिशा दाखविणें असें दुहेरी काम श्रीकृष्णानें केलें. समाज हा नेहमीं प्रवृत्तिनिवृत्तींचे हेलकावे खातच असतो. भारतीय युद्धकाळीं श्रीकृष्णानें समाजाला योग्य मार्ग दाखवून मध्यबिंदूंत आणून सोडलें. श्रीकृष्णाला पूर्णावतार असें म्हणतात. याचा अर्थ तो तत्त्ववेत्ता, मुत्सद्दी व पराक्रमी असा होता. भारतीय युद्धप्रसंगीं त्यानें जीं व्यवहार्य राजकारणें केलीं त्यामुळेंच पांडवांचा निभाव लागला! वयाच्या आठव्या वर्षी यानें कंसवध केला, कोणी म्हणतात अठरावे वर्षी केला. पंचविसाव्या वर्षी रुक्मिणीशीं विवाह केला आणि अडुसष्ठावे वर्षी राजसूययज्ञाचेवेळीं अग्रपूजेचा मान मिळविला.

महाभारतांत भगवान् श्रीकृष्णाचा जेथें जेथें प्रसंग आला आहे तेथें तेथें तो देव, ईश्वर, अतिमानुषशक्ति या दृष्टीनें स्वतः बोलत नाहीं. भगवद्गीतेमध्यें अर्जुनाशीं बोलतांना त्यानें ईश्वराची भूमिका धारण केली आहे. गीतेंतील विश्वरूपदर्शन व उद्योगपर्वांतीलहि तशाच प्रकारचा एक प्रसंग सोडल्यास श्रीकृष्ण अन्यत्र अगदीं माणसासारखें बोलत आहे.

द्यूताच्या महाप्रसंगीं श्रीकृष्ण उपस्थित नव्हता. पांडव वनांत गेल्यावर श्रीकृष्णाची भेट झाली. तो म्हणाला, " युधिष्ठिरा, मी जर त्यावेळीं द्वारकेंत असतों, तर तुजवर हा प्रसंग ओढवला नसता. मी त्यावेळीं आनर्त देशामध्यें लांब गेलों होतों. शाल्वराजाचा वध मला करावयाचा होता. तिकडून आल्यावर मला ही बातमी कळतांच मी आलों. मी आधीं आलों असतों तर हें द्यूत होऊं दिलें नसतें. धर्मा, जो आपणाशीं कपटाचें वर्तन करील त्याशीं ' जशास तसें ' या न्यायानें वागून त्याला ठार करणें हा कायमचा धर्म आहे. "

निकृत्योपचरन् वध्य एष धर्मः सनातनः ।।७।। —वनपर्व अ. १२

द्रौपदीनें जेव्हां आपणावर कोसळलेल्यां दारुण विटंबनेची, हृदयाचें पाणी करून सोडणारी वार्ता श्रीकृष्णास सांगितली, त्यावेळीं त्यानें वस्त्रें नेसविण्याच्या स्वतः केलेल्या चमत्काराचा उल्लेख केलेला नाहीं. द्रौपदीच्या भाषणांतहि त्याचा उल्लेख नाहीं. श्रीकृष्णानें तिला " पाहून घेईन, कांहीं काळजी करूं नको. " असें आश्वासन दिलें.

वनवास व अज्ञातवास यांतून पांडव पार पडल्यावर युद्धाकरितां उद्योग चालू झाला. धर्म जेव्हां प्रथमारंभींच गयावया करून पांच गांवें मिळालीं तरी पुरेत पण युद्ध नको असें म्हणूं लागला, त्यावेळीं त्याला असल्या मऊपणानें कांहीं साध्य होणार नाहीं असें श्रीकृष्णानें बजावलें. दुर्योधन पापी आहे, मानी आहे, तो आपल्या शब्दाला मान देणार नाहीं, हें सर्व त्याला ठाऊक होतें; पण लोकदृष्टीनें आपला पक्ष न्यायाचा ठरेल, लोकापवाद टळेल व कर्तव्य केल्याचें स्वतःस समाधान लाभेल असें दूरदर्शी माणसाप्रमाणेंच तो बोलला व शिष्टाईस जाण्याचें त्यानें ठरविलें.

धर्माला असें वाटलें कीं हे दुष्ट कौरव कृष्णाला कांहीं अपाय करतील. तेव्हां श्रीकृष्णानें सांगितलें कीं, ' तूं कांहीं काळजी करूं नकोस. सर्वांना पुरून उरण्याजोगा मी समर्थ आहें. ' यावरून त्याचा आत्मविश्वास व सामर्थ्य यांची कल्पना येते.

संजय जेव्हां मानभावीपणानें धर्माला निवृत्तिपरतेचा, शमाचा व युद्ध टाळण्याचा उपदेश करण्यास आला, त्यावेळीं श्रीकृष्णानें त्याला खडसावून दिलेलें कर्ममार्गप्रवर्तक पुढील उत्तर फारच महत्त्वाचें आहे. " कर्मापेक्षां संन्यास श्रेष्ठ समजणारे अत्यंत दुर्बल होत. संजया, धर्माला राज्य मिळालेंच पाहिजे हें ध्यानांत ठेव. "

श्रीकृष्ण शिष्टाईला निघाला तेव्हां प्रथम त्यानें आपल्या रथावर शस्त्रें, अस्त्रें, गदा, बाण, भाते इत्यादि सर्व आहेत कीं नाहींत हें काळजीपूर्वक पाहिलें. शत्रू दुर्बल असला तरी उपेक्षा करणें अयोग्य असें सांगून श्रीकृष्ण सिद्धतेनें निघाला. दुर्योधनादिकांनीं त्याला बांधण्याचा यत्न केला, पण तो फसला. ( याच प्रसंगीं विश्वरूपहि दाखविल्याचा उल्लेख आहे. )

सभेमध्यें पांडवांचा निरोप श्रीकृष्णानें धृतराष्ट्रास व दुर्योधनास योग्य तऱ्हेनें सांगितला, आणि स्वतःचें मत सांगितलें. श्रीकृष्णाचें सर्वच

भाषण मुत्सद्दीपणा, दूरदर्शीपणा, सावधानता यांनीं युक्त असें आहे. त्यानें दुर्योधनाचाहि अनुनय जितका पडखाऊपणा करून करतां येईल तितका केला, व दुर्योधन जेव्हां सुईच्या अग्रावरीलहि माती देत नाहीं असें म्हणाला, त्यावेळीं त्याला 'तुझा मृत्यु जवळ आलेला आहे, युद्धास तयार हो,' असेंहि सांगण्यास त्यानें कमी केलें नाहीं. धृतराष्ट्राला शेवटीं असें बजावलें कीं, 'पांडव तुझी सेवा करण्यास व तुझ्याशीं लढण्यासहि सिद्ध आहेत. त्यांतील इष्ट असेल तें पत्कर.'

अर्जुन व दुर्योधन श्रीकृष्णाकडे साहाय्यार्थ विनंतीकरितां एकाच वेळीं गेले असतांना श्रीकृष्णानें दोघांना मोठ्या युक्तीनें मार्गास लावलें. युद्धाच्या प्रारंभीं धर्मानें सर्वांकडे जाऊन वंदन करून सहानुभूति संपादन केली. भीष्माचा पराक्रम पाहून धर्म हताश झाला, वनवासाच्या गोष्टी पुनः बोलूं लागला. त्यावेळीं श्रीकृष्णानेंच त्याला भीष्मांचा वधोपाय त्यांनाच विचारण्याची युक्ति सांगितली. भीष्माकडून ती कळतांच शिखंडीला पुढें करून अर्जुनाला बाणांचा मारा करण्यास सांगून भीष्मवध श्रीकृष्णानें घडविला.

महापराक्रमी द्रोणाचार्य सर्व सैन्य जेव्हां भाजून काढूं लागले, तेव्हां हा म्हातारा आतां कसा मरणार असा पेंचप्रसंग पडला. त्याचें मर्म सांगून धर्माला "अश्वत्थामा मेला, असें बेशक खोटें बोल, कांहीं हरकत नाहीं," असें सांगितलें. धर्मराज खोटें बोलण्यास पुष्कळच आढेवेढे घेऊं लागला. शेवटीं श्रीकृष्णाच्या प्रेरणेनें, जगण्याकरितां खोटें बोलणें हें पाप नव्हे, असें त्याला पटल्यामुळें तो असत्य बोलला, व त्यामुळें द्रोणवध झाला.

अनृतं जीवितस्यार्थे वदन्न स्पृश्यतेऽनृतैः ॥४७॥ –द्रोणपर्व अ. १९०

कर्णयुद्धप्रसंगींहि कर्णाच्या रथाचें चाक जेव्हां चिखलांत रुतलें तेव्हां तो अर्जुनाला गयावया करून जरा थांब, धर्मयुद्ध करूं असें म्हणाला. अर्जुनाची ती कार्पण्यवृत्ति पाहून आणि कर्णाचा धर्मयुद्ध कर, हा मानभावी उपदेश ऐकून श्रीकृष्ण चवताळला. कर्णाचीं आजवरचीं पापें त्याच्या पदरांत घालून त्याला अगदीं त्यानें उलटासुलटा घेतला; आणि अर्जुनाला बजावलें कीं हीच वेळ आहे. शत्रू अडचणींत असतांनाच त्याचा घात केला पाहिजे.

तो उपदेश त्याला पटला म्हणूनच कर्णवध झाला. जयद्रथवधाचे वेळींहि श्रीकृष्णानें अजब्र युक्ति करून अंधेर पाडला व सूर्यास्तापूर्वी त्याचा वध घडवून अर्जुनाला प्रतिज्ञेंतून मोकळें केलें.

जरासंधवध, शिशुपालवध हे प्रसंग घ्या, किंवा दुर्योधन–दुःशासन यांच्या वधाचे प्रसंग घ्या. प्रत्येक प्रसंगीं श्रीकृष्णाच्या युक्तीनें व बुद्धीनेंच पांडवांना यश आलें आहे असें स्पष्ट दिसतें. श्रीकृष्णाचें चातुर्य व मुत्सद्देगिरी पांडवांच्या बाजूस नसती तर या कौरवांनीं पांडवांची चटणी उडविण्यास कमी केलें नसतें.

दुःशासनवधाच्या प्रसंगीं रक्त पिऊन थयथय नाचत येणाऱ्या भीमाचें श्रीकृष्णानेंच स्वागत केलें. इतरांना तें कृत्य अमानुष वाटलें. दुर्योधनवधाचे वेळीं तर धर्मानें पुन्हां अजागळपणा केला. डोहांतून बाहेर आल्यावर दुर्योधनाला धर्म म्हणाला कीं, ' तूं आम्हा पांचापैकीं कोणाशींहि गदायुद्ध कर, व राज्य मिळीव. ' तें ऐकून श्रीकृष्णाला राग आला. कारण दुर्योधनानें लोखंडी गदेवर गदायुद्धाचा फारच चांगला अभ्यास केला होता. अशा दुर्योधनाला, ' एकट्याशीं लढा, ' असें म्हणणें म्हणजे पुन्हां शेवटच्या क्षणीं जुगारच खेळणें होतें. श्रीकृष्णानें रागानें असे उद्गार काढले कीं ' खरोखर ही कुंती व पांडु यांची संतति राज्योपभोगाला अयोग्यच होय ! वनवास व भिक्षा याचकरितां हिचा जन्म दिसतो ! '

**नूनं न राज्यभागेषा पांडोः कुंत्याश्च संततिः ।**
**अत्यंतवनवासाय सृष्टा भैक्ष्याय वा पुनः ॥ १७ ॥**–गदापर्व अ. ३३

श्रीकृष्णाला दुर्योधनाला मारण्याकरितां बेंबीच्या खालीं मांडीवर गदा मारण्याची युक्तीच करावी लागली !! बलरामाचा कोपही श्रीकृष्णानें युक्तीनें घालविला. युद्धानंतर धर्माला वैराग्य उत्पन्न झालें त्यावेळीं निरनिराळ्या ऋषींनीं, ज्ञान्यांनीं त्याची समजूत घातल्यावर धर्माला राज्याभिषेक श्रीकृष्णानेंच केला.

श्रीकृष्णानें भारतीय युद्ध घडवून आणलें व राष्ट्राची अत्यंत हानि केली असा एक आक्षेप आहे. परंतु हें युद्ध टळावें म्हणून श्रीकृष्णानें किती यत्न केले, किती पड खाल्ली, हें उद्योगपर्वातील त्याचें भाषण वाचल्यानें

समजतें. माणुसकी व स्वाभिमान हीं संभाळून पांडवांना राहाणें जेव्हां अशक्य झालें व सुईच्या अग्रावरची मातीहि मिळणार नाहीं असा जेव्हां जबाब मिळाला त्यावेळीं युद्ध करणें भागच होतें म्हणून श्रीकृष्णावर हा आक्षेप येऊं शकत नाहीं.

गोकुळांतील श्रीकृष्णलीला हा एक मोठा वादग्रस्त प्रश्न आहे. पण त्या लीला चौदा वर्षांच्या पोराच्या होत्या हें ध्यानांत घेतलें म्हणजे व्यभिचारादि आरोप निर्मूल होतात. त्या कालीं अनेक स्त्रिया करण्याची चाल होती. नरकासुराचा वध करून श्रीकृष्णानें अनेक स्त्रियांना बंधमुक्त केलें. त्या स्त्रियांशीं चारित्र्याच्या संशयानें विवाहबद्ध होण्यास कोणी सिद्ध होईना म्हणून त्यांनीं श्रीकृष्णाला "आम्ही तुला मनानेंच वरलें आहे," अशी विनंति केली व श्रीकृष्णानें त्यांच्याशीं लग्नें लावलीं. हा इतिहास ध्यानीं घेतला म्हणजे त्यानें अनेक स्त्रिया कशा केल्या हा आक्षेप निर्मूल ठरतो.

(१४५) श्रीकृष्णोपदेशाचें सारः—श्रीकृष्णाचे महाभारतांतील चातुर्याचे अनेक प्रसंग, धोरण, दूरदर्शीपणा हीं पाहिलीं आणि गीतेंत त्यानें अर्जुनाला केलेला उपदेश पाहिला म्हणजे श्रीकृष्णाच्या चरित्राचें रहस्य व उपदेशाचें सार पुढील दोन श्लोकांतच सांगतां येईलः—

**यो यथा वर्तते यस्मिन् तस्मिन्नेवं प्रवर्तयन् ।**
**नाधर्मं समवाप्नोति न चाश्रेयश्च विंदति ॥** म.भा.उद्यो. प.१७९–३०

**यस्मिन् यथा वर्तते यो मनुष्यः ।**
**तस्मिंस्तथा वर्तितव्यं स धर्मः ॥**
**मायाचारो मायया बाधितव्यः ।**
**साध्वाचारः साधुना प्रत्युपेयः ॥** म. भा. शांति.प.१०९–२९

आपल्याबरोबर जो जसा वागतो तसें त्याच्याशीं आपण वर्तन केल्यानें अधर्म घडत नाहीं आणि अकल्याणही होत नाहीं. आपल्याशीं जो जसें वर्तन ठेवतो तसें त्याच्याशीं वर्तन ठेवणें हा धर्म होय ! मायावी पुरुषाशीं मायावीपणानें व साधुपुरुषाशीं साधुपणानेंच व्यवहार केला पाहिजे.

जगांत वर्तनसापेक्ष करावें लागतें. जग हें स्वार्थी आहे, हें ध्यानांत घेऊन आक्रमक, हिंसक, महत्त्वाकांक्षी, संघटित, शास्त्रसंपन्न अशांचें भक्ष्य होण्यांत अर्थ नाहीं. अशा या जगांत जगावयाचें असेल तर शेरास सव्वाशेर, जशास तसें, तंतोतंत, नेमकें, बिनचुक वर्तन करावें.

(१४६) **भारताचा संदेशः**—एक लक्ष भारतग्रंथाचा संदेश सांगावयाचा म्हणजे मोठें कठीणच आहे. तथापि तें कार्य व्यासांनीं केलें असल्यामुळें सोपें झालें आहे. घोषयात्राप्रसंगीं धर्म म्हणतो—

**परैः परिभवे प्राप्ते वयं पञ्चोत्तरं शतम् ।**
**परस्परविरोधे तु वयं पञ्चैव ते शतम् ॥**

दुसऱ्याशीं तंटा असेल तेव्हां आपण एकशेंपांच आहोंत असें समजून वागावें. आपसांत तंटा असला म्हणजे ते शंभर व आपण पांच असें समजून चालावें. तात्पर्य तिऱ्हाईताशीं, परक्याशीं, आक्रमकाशीं जेव्हां विग्रह असेल तेव्हां राष्ट्रांतील सर्व घटकांनीं आपापले मतभेद व आपसांतील कलह बाजूस ठेवून आलेल्या राष्ट्रीय आपत्तीच्या प्रतिकारार्थ सज्ज असावें. हिंदुस्थानासारख्या परतंत्र राष्ट्राला याच उपदेशाची आवश्यकता नाहीं काय ?

(१४७) **नवा हिंदुधर्म हा ग्रंथ पाहाः**—महाभारतानंतर धर्मसूत्रकार व स्मृतिकार यांचा काल येतो. खिस्तपूर्व आठशें ते खिस्तोत्तर साडेसहाशें हा काल बौद्धधर्माच्या उत्कर्षाचा आणि अपकर्षाचा होय. आपस्तंब, गौतम, बौधायन, वसिष्ठ, विष्णु, शंख, लिखित, मनु, याज्ञवल्क्य, पाराशर, अत्रि, संवर्त, व्यास, दक्ष, देवलकालीन वर्णव्यवस्था, जातिसंस्था, अस्पृश्यता, व्यवसाय वगैरेसंबंधीं ऐतिहासिक दृष्ट्या व सांस्कृतिक दृष्ट्या विवेचन करणें अत्यवश्य आहे. तें नवा हिंदुधर्म प्रकरणें ११ ते १६ मध्यें विस्तृत केलें आहे म्हणून वाचकांनीं तें तेथें अवश्य वाचावें अशी विस्तारभयास्तव सूचना देतों. आतां पाणिनीच्या कालापर्यंत ओझरतें पाहूं.

हा काल कांहीं नाहीं तरी दीड दोन हजार वर्षांचा आहे. या कालांत सूर्य, सोम व अग्नि यांच्या वंशांतील क्षत्रिय राजे पंजाब, मध्यदेश, अयोध्या, सौराष्ट्र या भागांत राज्यें करीत होते. या विविध राजांच्या राजवटींत मोठे राजकीय व सामाजिक विग्रह झाल्याचे आढळत नसले तरी

क्षत्रियांमध्यें परस्पर स्पर्धा असे. कोणीहि एका क्षत्रियानें सार्वभौम सम्राट् होण्याची खटपट करावी, एकानें दुसऱ्या राजास जिंकण्याचा उपक्रम करावा, असा प्रकार चालू होता. त्यामुळें राष्ट्रांत सारखी उलथापालथ होत असे. या कालांत संस्कृत पंडितांच्या विद्यांचा ओघ अप्रतिहत चालू होता. श्रौत धर्माखेरीज इतर पारमार्थिक विचारांची उचल याच वेळीं झाली, विद्या व शास्त्रें या क्षेत्रांत पंडितांनीं करामत दाखविली. काशी, काश्मीर, कनोज, तक्षशिला, अयोध्या व मिथिला इत्यादि विद्यापीठांत हजारो विद्यार्थी अध्ययन करीत असत. यांतूनच पुढें पाणिनीसारखे जगन्मान्य हिरे बाहेर पडले. पाणिनीच्या अष्टाध्यायीमध्यें शाकल्य, गार्ग्य, शाकटायन अशा कित्येक वैय्याकरणांचे उल्लेख आलेले आहेत; त्यांवरून भाषाशास्त्राची अभिवृद्धि व्यक्त होते. वेदवेदांगें यांचें वाङ्मय पाणिनीकालीं चांगलेंच निर्माण झालेलें होतें. तात्पर्य, भारतीय युद्धापासून पाणिनिपर्यंतचा आर्यावर्तांतील समाज विद्या, वैभव, संस्कृति, शक्ति, युक्ति, भुक्ति अशा सर्व गुणांनीं विभूषित होता.

(१४८) निवृत्तीचें बीजः—भारतकालीं आर्यांमध्यें क्षात्रतेज, सत्ता, स्वामिभाव, ईश्वरभाव वगैरे गुणांचा चांगला विकास झाला होता. उत्तम हवा, पौष्टिक अन्न, रुचकर व पाचक पाणी, स्वादिष्ट पेयें, नैतिक सदाचार यामुळें समाज वैभवाच्या पूर्ण शिखरावर विराजमान झाला होता. अशा पूर्ण वैभवाच्या काळीं दुर्योधनादींच्या दुष्ट व आग्रही वृत्तींमुळें भारतीय युद्ध उत्पन्न झालें. त्यांत तरुण पिढीचा संहार झाल्यामुळें स्वाभाविकच नैराश्य पसरलें. ऐहिक जीवनाचा कंटाळा आला कीं परमार्थाचा विचार मनांत येतो. भारतीय युद्धानंतर जे अनेक निवृत्तीपर संप्रदाय उत्पन्न झाले व ज्यांचा प्रभाव हिंदुसमाजावर अद्यापहि आहे, त्यांची माहिती पुढील दोन प्रकरणांत देतों.

—*—

प्रकरण सहावें

# * यज्ञीयहिंसा व जैनधर्म

वेदकालापासून चालत आलेल्या हिंदुसंस्कृतीवर पहिला मोठा आघात जैन व बौद्ध या संस्कृतींनीं केला. त्यामुळें हिंदुसंस्कृतीमध्यें दुःखवादाचें मिश्रण होऊन तिला निवृत्तीची मरगळ आली. वैदिक यज्ञयागाविरुद्ध उपनिषत्कालींच विचार चालू होते. यास्तव प्रस्तुत प्रकरणांत कापिलसांख्यमत, चार्वाकमत यांची थोडी ओळख देऊन यज्ञीयहिंसेविरुद्ध ज्या धर्मानें प्रथम जोराचे आघात केले, त्या जैन धर्मांची माहिती द्यावयाची आहे.

(१४९) उपनिषदांतील यज्ञनिंदाः—उपनिषद्कालीं यज्ञयागावरील विश्वास डळमळूं लागला होता. यज्ञांचा विस्तार, त्यांतील प्राणिहिंसा, त्यांतील खटाटोप, प्रायश्चित्तें, होणारा खर्च व ऋत्विजांमध्यें वरचेवर होणारीं भांडणें यांमुळें ते लोकांना नको झाले होते. अशा वेळीं तत्त्वज्ञानाच्या विचारानें ब्रह्मवेत्त्यांनीं लोकांच्या मनाची पकड घेतली. जगांत अतींद्रिय सुख श्रेष्ठ आहे, तें मिळविणें हें मानवाचें ध्येय आहे, त्याकरितां पराविद्येचा आश्रय केला पाहिजे, अपराविद्या म्हणजे यज्ञ या फुटलेल्या नावा होत. त्यांच्या आश्रयानें पंडितंमन्य कृतार्थ होऊं असें मानत असले तरी तें चुकीचें आहे, असे टोले या याज्ञिकांना दिलेले आहेत !

---

* टीप—गेल्या प्रकरणामध्यें महाभारतकालीन संस्कृतीचें स्वरूप पाहिलें. यापुढें क्रमप्राप्त म्हणून श्रौतसूत्रें, धर्मसूत्रें व स्मृति यांचे काल देऊन तत्कालीन संस्कृतीचें पर्यालोचन करणें अवश्य होतें. परंतु हा सर्व विषय "नवा हिंदुधर्म" आवृत्ति दुसरी प्रकरणें ११।१२।१३ मध्यें मोठ्या विस्तारानें व साधार विवेचिला असल्यामुळें त्याची पुनरुक्ति येथें करीत नाहीं. वाचकांनीं तीं प्रकरणें अवश्य पाहावीं. त्यावरून चातुर्वर्ण्य, जातिसंस्था व सामाजिक परिस्थिति यांची बरोबर कल्पना येईल व जैन व बुद्ध या धर्मांना पुढें येण्यास कोणती सामाजिक परिस्थिति कारणीभूत झाली, आणि अन्य कारणेंहि कोणतीं घडलीं याचें अनुमान करितां येईल.

प्लवा ह्येते अदृढा यज्ञरूपा अष्टादशोक्तमवरं येषु कर्म ॥
एतच्छ्रेयो येऽभिनन्दति मूढा जरामृत्युं ते पुनरेवापि यंति ॥ १ ॥
अविद्यायामन्तरे वर्तमानाः स्वयं धीराः पंडितंमन्यमानाः । जङ्घन्यमानाः परियन्ति मूढा अन्धेनैव नीयमाना यथान्धाः ॥ २ ॥ अविद्यायां बहुधा वर्तमाना वयं कृतार्था इत्यभिमन्यन्ति बालाः ॥ यत्कर्मिणो न प्रवेदयन्ति रागात्तेनातुराः क्षीणलोकाच्यवन्ते ॥ ३ ॥

भावार्थः-ज्यांच्यामध्यें निकृष्टकर्म सांगितलें आहे ते हे अठरा यज्ञरूप अदृढप्लव विनाशी आहेत, पण जे मूढ हेंच श्रेय आहे असें म्हणून त्याचें अभिनंदन करतात ते पुनरपि जरा व मृत्यु यास प्राप्त होतात. (१) अविद्येमध्यें राहणारे व स्वतःला मोठे बुद्धिमान् पंडित मानणारे मूढ अंधाकडून नेल्या जाणाऱ्या अंधाप्रमाणें पीडित होत्साते भ्रमण करतात. (२) अविद्येमध्यें बहुधा असणारे ते मूढ आम्ही कृतार्थ आहों, असा अभिमान धरतात. ज्या अर्थी अशा रीतीनें कर्मठ लोक कर्मफलाविषयींच्या कामनेमुळें तत्त्व जाणत नाहींत, त्या अर्थी ते दुःखार्त होऊन ज्यांचें कर्मफल क्षीण झालें आहे, असे होत्साते स्वर्गातून च्युत होतात.

(१५०) संन्यास हेंच सुखाचें साधनः-प्रवृत्तिपर यज्ञकर्माची अशी निंदा होऊं लागल्यावर सर्वसंगपरित्यागपूर्वक शांतपणें तत्त्वचिंतन करीत अरण्यांत बसणें हेंच योग्य असें वाटूं लागलें. कर्में सदोष म्हणून सर्व कर्मांचा संन्यास करून आत्मज्ञानजन्य शाश्वतसुख मिळविण्याकरितां एकाकी, अपरिग्रही आणि संन्यासी असावे असे विचार पुढें येऊं लागले. वित्त, विषय, लौकिक यांच्या इच्छा सर्वस्वी मारून भिक्षाचर्याचा अवलंब करून जगापलीकडील वस्तूच्या शोधांत काल घालविण्याचा उपक्रम विचारी लोकांना पसंत पडूं लागला. अतींद्रिय वस्तूचा शोध हें ध्येय, त्याचें साधन सर्वसंगपरित्याग; अतएव जगांतील ऐहिक पुरुषार्थाकडे पूर्ण दुर्लक्ष्य करून संन्यास व भिक्षाचर्य यांचा अवलंब करावा, या विचारानें जनमनावर प्रभाव पाडला. बृहदारण्यक अ. ३ ब्रा. ४ व ५ मध्यें 'या ब्रह्मलोकाची इच्छा करणारे लोक संन्यास घेतात. ते म्हणतात, ज्यांत आत्मप्राप्ति नाहीं व आत्मलोक नाहीं अशी प्रजा घेऊन काय कामाची? म्हणूनच ब्रह्मवेत्ते

लोक पुत्र, वित्त व लौकिक यांच्या वासनांचा त्याग करून भिक्षावृत्तीनें राहतात.' असें म्हटलें आहे.

" तमात्मानं विदित्वा ब्राह्मणाः पुत्रैषणायाश्च वित्तैषणायाश्च लोकैषणायाश्च व्युत्थायाथ भिक्षाचर्यं चरंति । या ह्येव पुत्रैषणा सा वित्तैषणा या वित्तैषणा सा लोकैषणोभे ह्येते एषणे एव भवतस्तस्माद् ब्राह्मणः पांडित्यं निर्विद्य बाल्येन तिष्ठासेत् ।–" बृ. आ. अ. ३ ब्रा. ५.

" एतमेव प्रव्राजिनो लोकमिच्छंतः प्रव्रजन्ति एतध्द स्म वैतत्पूर्वे विद्वांसः प्रजां न कामयन्ते । किं प्रजया करिष्यामो येषां नोऽयमात्मायं लोक इति ते ह स्म पुत्रैषणायाश्च वित्तैषणायाश्च लोकैषणायाश्च व्युत्थायाथ भिक्षाचर्यं चरन्ति । "–बृ. आ. अ. ४ ब्रा. ४

(१५१) **तत्त्वज्ञानाचे विविधपंथः**–जगापलीकडील वस्तूचा शोध करण्याची प्रवृत्ति जी समाजांत सुरू झाली ती कांहीं काल वेदप्रामाण्यावर अधिष्ठित होती. पुढें बुद्धि व तर्क यांच्या अधिष्ठानावर तत्त्वशोधाची परंपरा सुरू होणें स्वाभाविक होतें. यामुळेंच पुढें आस्तिक–नास्तिक, वैदिक–अवैदिक, सेश्वर–निरीश्वर असे भेद पडले. यामध्यें मुंडक, तापस, परिव्राजक, श्रमण आणि ब्राह्मण यांचा समावेश झाला ! आत्म्याचें स्वरूप काय, जग, आत्मा, मृत्यु, ईश्वर यांच्या परस्पर संबंधाच्या शोधार्थ जे अनेक पंथ निघाले, त्यांना कालवादी, ईश्वरवादी, आत्मवादी, नियतिवादी, स्वभाववादी अशीं नांवें देण्यांत येत. बुद्धि व तर्क यांच्या सहाय्यानें स्वतंत्र विचार करण्याच्या पद्धतीमुळें तत्त्वज्ञानमूलक भिन्न भिन्न अनेक मतें अस्तित्वांत आलीं. कांहीं मतें वैदिक परंपरेचीं होतीं तर कांहीं अवैदिक होतीं. ज्याचा श्वेताश्वतरोपनिषदामध्यें **ऋषिं प्रसूतं कपिलं यस्तमग्रे ज्ञानैर्बिभर्ति जायमानं च पश्येत्** (अ. ५.) असा उल्लेख आला आहे, तो पहिला बुद्धिवादी, तर्कनिष्ठ, बंडखोर आचार्य दिसतो. सांख्यतत्त्वज्ञानाचा कपिल हा आचार्य होय. सांख्य तत्त्वज्ञानांत आस्तिक व नास्तिक असे भेद पुढें पडले. आस्तिक सांख्य–तत्त्वज्ञानाची छाप जशी गीतेवर पडली आहे तशीच नास्तिक सांख्यतत्त्वज्ञानाची छाप जिन व बुद्ध यांवर पडलेली असावी. कपिल सांख्याची तर्कपरंपरा पुढें कणाद व गौतम यांनीं अनुक्रमें

वैशेषिक व न्याय या शास्त्रांचे आधारें चालविली. पाणिनीनंतर शेंदोनशें वर्षांत सुमारें तीनशें त्रेसष्ठ मतें अस्तित्वांत आलीं असें जैन ग्रंथांवरून म्हणतां येतें. यांपैकीं १८० क्रियावादी, ८४ अक्रियावादी, ६७ अज्ञानवादी, ३२ विनयवादी असें वर्गीकरण नंदीसूत्रांत केलेलें आहे. बुद्धाच्या ब्रह्मजाल-सूत्रांतहि एकंदर ६२ मतें दिलीं असून त्यांचें वर्गीकरण अवांतर अष्ट विभागांमध्यें केलेलें आहे. उपनिषद्कालींच वैदिक कर्मांवरील श्रद्धा आणि परंपरा यांना ओहोटी लागली आणि तर्क व बुद्धि यांना भरती येऊं लागली. जगापलीकडील वस्तु शोधण्याचा यत्न एकदां तर्क व बुद्धि यांच्या आश्रयानें सुरू झाला म्हणजे मग त्याला निर्बंध घालणें अशक्य असतें. त्याचा परिणाम मतभिन्नत्व आणि पंथभेद यामध्यें होतो. महावीरापूर्वी २३ तीर्थंकर झाले असा समज आहे. हा समज अतिशयोक्तीचा असला तरी जिन व बुद्ध यांच्यापूर्वी तत्त्वज्ञानमूलक अनेक पंथ अस्तित्वांत आलेले होते आणि तत्त्वज्ञानाच्या क्षेत्रांत प्रचंड वैचारिक खळबळ चालू होती, असें म्हणणें भाग पडतें. जिन व बुद्ध यांनीं जी क्रांति केली तिचीं बीजें कपिलसांख्य आणि चार्वाक यांनीं नुसतीं पेरलीं असें नसून तीं चांगलीं रुजविलेलीं होतीं. यास्तव पुढील दोन परिच्छेदांत कपिलसांख्य व चार्वाक यांच्या मताची थोडी कल्पना देतों.

(१५२) **कपिलसांख्यमतः**—कपिल ऋषी सांख्य-तत्त्वज्ञानाचा जनक होय. यज्ञयागादि साधनें मनुष्याच्या उन्नतीला उपयोगी पडणारीं नसून त्याकरितां ज्ञानाची व चित्ताच्या एकाग्रतेची आवश्यकता आहे, असें त्याचें मत होतें. सांख्यांचा सत्कार्यवाद प्रसिद्ध आहे. कार्य हें कारणांत कोणत्या-तरी रूपानें असतें. अगदीं नवें असें कार्य निर्माण होत नाहीं. याला सत्कार्यवाद म्हणतात. ज्या अर्थी कार्याला कारण हें आवश्यक आहे, त्या अर्थी त्रिगुणात्मक व जड जगताचें जें कारण त्याला प्रकृति असें म्हणतात. हिचेंच प्रधान असें दुसरें नांव आहे. यामध्यें प्रलयकालीं तिन्ही गुणांचें साम्य असतें. प्रकृतीहून पुरुष हा निराळा, निर्गुण, उदासीन व अकर्ता आहे. प्रकृति ही कर्त्री असून पुरुषाच्या भोगाकरितां सृष्टीचा पसारा निर्माण करते. सांख्यांमध्यें सेश्वर व निरीश्वर असे दोन भेद आहेत. सांख्यांच्या तत्त्वज्ञानानें आणि त्याग व

संन्यास यांच्या प्रचारानें जैन व बुद्ध या धर्मांची पूर्वतयारी करून ठेविली होती, असें म्हणण्यास हरकत नाहीं.

(१५३) **चार्वाकाचा हल्लाः**–प्राचीनकाळीं यज्ञयागांतील हिंसेविरुद्ध उपनिषदांतील ब्रह्मवेत्ते आणि सांख्य यांनीं आघात केलेच होते. त्यानंतर चार्वाकानें जोराचा आघात केला. त्यानें आपलें चारु वाक् ( बोलावयाला व ऐकावयाला गोड ) मत सामान्य लोकांत पसरविण्यास प्रारंभ केला. लोकायत म्हणजे सामान्य लोकांच्या मताप्रमाणें चालणारें व बहु मतावर अवलंबून असणारें असें मत होय. त्यानें ब्राह्मणांची थट्टा व यज्ञकर्माचा उपहास करून कुल, जाति, समाज, धर्म, वेद, पितर व ब्राह्मण अशीं जीं वैदिकांचीं अभिमानस्थानें त्यांवर आघात केला. त्यामुळें सामान्यजन स्वैराचारी व उन्मत्त झाले, अभिजनांचा तेजोभंग झाला, वेदांची ओळख बुजूं लागली, यज्ञयाग बंद पडले, व आस्तिक्य लयास गेलें. त्याचे कोटिक्रम पुढीलप्रमाणें होतेः—

**पशुश्चेन्निहतः स्वर्गं ज्योतिष्टोमे गमिष्यति ।**
**स्वपिता यजमानेन तत्र कस्मान्न हिंस्यते ॥**
**न स्वर्गो नापवर्गो वा नैवात्मा पारलौकिकः ।**
**नैव वर्णाश्रमादीनां क्रियाश्च फलदायकाः ॥**
**अग्निहोत्रं त्रयो वेदास्त्रिदंडं भस्मगुंठनं ।**
**बुद्धिपौरुषहीनानां जीविकेति बृहस्पतिः ॥**

**भावार्थः**–ज्योतिष्टोमांत मारलेला पशु जर स्वर्गांत जात असेल तर यजमान आपल्या बापाला ठार करून स्वर्गाला कां पाठवत नाहीं ? ना स्वर्ग ना मोक्ष, ना आत्मा ना परलोक, हें सर्व झूट आहे, वर्णाश्रमादि क्रियाकलाप हे सर्व निष्फल होत. अग्निहोत्र, वेद, भस्मधारण वगैरे गोष्टी म्हणजे बुद्धि हीन आणि पौरुष हीन यांचे जगण्याचे धंदे होत.

चार्वाकाच्या या विध्वंसक चळवळीनें जैन व बुद्ध या धर्मांच्या उभारणीचा पाया घातला. कारण पुढें या दोन्ही धर्मांनीं वेद, यज्ञयाग, चातुर्वर्ण्य यांवर टीकास्त्र उचललें.

(१५४) **पार्श्वनाथः**–जैनधर्माचा पहिला तीर्थंकर ऋषभदेव होय. त्याचा उल्लेख भागवतामध्यें आहे. त्यालाच आदिनाथ असें म्हणतात.

श्रीकृष्ण व नेमिनाथ हे चुलतभाऊ होते. नेमिनाथ हा श्रीकृष्णाचा गुरु होता. नेमिनाथ व आंगिरस हे एकच असें कोणी मानतात. ऋषभदेवापासून नेमिनाथापर्यंत बावीस तीर्थंकर होतात. त्यांचीं चरित्रें जैनग्रंथांत दिलीं आहेत. पार्श्वनाथ अथवा पारिसनाथ हा जैनांचा तेविसावा तीर्थंकर असून तो ऐतिहासिक आहे. वर्धमान अर्थात् महावीर हा चोविसावा तीर्थंकर बुद्धसमकालीन होता. महावीराचा काल खिस्तपूर्व ५९९ ते ५२७ असा समजतात. कुंडग्राम येथें सिद्धार्थाच्या पोटीं त्याचा जन्म झाला. बुद्धाचा जन्म महावीराच्या जन्मानंतर कमींत कमी पंधरा वर्षांनीं झाला असावा. महावीरापूर्वीं पार्श्वनाथ सुमारें २५० वर्षें होऊन गेला असावा. पार्श्वांचा जन्म अश्वसेन राजाच्या वामा नामक राणीच्या उदरीं वाराणसी नगरींत झाला. त्याचा जो अगदीं साधा उपदेश तोच जैनधर्म या नांवानें पुढें आला. जि—जये—जयति जो विकारांना जिंकतो तो जैन, जो आत्म्याला जाणतो तो बुद्ध आणि धर्माचा अथवा मोक्षाचा घाट जो बांधतो तो तीर्थंकर, अशी या शब्दांची व्युत्पत्ति आहे.

(१५५) **दोन अनादि संप्रदायः**—प्राचीन कालापासून अग्निहोत्र, यज्ञयाग, वैदिक कर्मकांड या गोष्टी आत्मकल्याणासाठीं करणारा एक ब्राह्मणांचा संप्रदाय व त्याविरुद्ध अहिंसा, सत्य, अस्तेय, अपरिग्रह या चार तत्त्वांचा आत्मकल्याणार्थ अवलंब करणारा श्रमणांचा संप्रदाय, असे दोन संप्रदाय हिंदुस्थानांत आहेत. श्रमणामध्यें जैन व बौद्ध साधूंचा समावेश होतो. या संप्रदायाला योगसंप्रदाय असेंहि म्हणतात. जैन व बौद्ध साधूंना आचारभेदावरून निर्ग्रंथ, शाक्य, आजीवक, तापस, गेरुक अशीं पांच नांवें आहेत. कुमारिलभट्टाच्या वाङ्मयामध्यें आर्हत, निर्ग्रंथ असे उल्लेख आहेत. अर्हत् म्हणजे पूजार्ह मनुष्य होय. ब्राह्मण यज्ञीयहिंसेचे प्रवर्तक, तर श्रमण हे त्या हिंसेचे प्रतिकारक असें स्वरूप दिसें. वैदिक अग्निहोत्री ब्राह्मण यज्ञांमध्यें जें पशुहनन करीत, त्या पशुहत्त्येविरुद्ध प्रतिक्रिया म्हणजे जैनधर्म होय. हा संप्रदाय सांख्य तत्त्वज्ञानाला जवळचा आहे. आत्मकल्याणासाठीं अहिंसक वृत्ति आवश्यक आहे. प्रत्येक प्राण्यावर दया करावी हें तत्त्व आदिनाथ, ऋषभदेव यांनीं मांडलें व त्याचाच पुरस्कार पुढें पार्श्वनाथ व महावीर यांनीं केला. पार्श्वनाथानें

जगांत खऱ्याखुऱ्या अहिंसाधर्माचें प्रतिपादन केलें. अहिंसेची सांगड सत्य, अस्तेय, अपरिग्रह, या तीन नियमांशीं घालून तिला व्यावहारिक स्वरूप दिलें. आपल्या मताच्या प्रचारासाठीं संघ बनविले. पार्श्वापूर्वींचे तपस्वी नुसते जंगलांत राहात असत. त्यांना पार्श्वानें उपदेश करण्यास शिकविलें. अशा या तपस्व्यांतून पुढें बुद्धाला पहिले शिष्य लाभले. पार्श्वाच्या अहिंसा, सत्य, अस्तेय व अपरिग्रह या चार तत्त्वांना चार याम असें म्हणतात. महावीरस्वामीनें यांत ब्रह्मचर्याची भर घातली. बुद्धाच्या अष्टांगिक मार्गामध्यें याचा समावेश होतो.

(१५६) **जैनधर्माचा विशेष:**—न्याय व वैशेषिक शास्त्रें यांमध्यें तत्त्वविचिकित्सा आहे, पण आचारधर्माचें प्रतिपादन नाहीं. मीमांसा मत हें आचारप्रधान आहे, त्यांत तत्त्वज्ञान असलें तरी कर्मावर अधिक भर, म्हणून तें पुढें आलें नाहीं. वेदांतामध्यें तत्त्वज्ञान आहे, पण वैदिक आणि लौकिक आचार, यज्ञयागादि कर्में चित्तशुद्ध्यर्थ परंपरेप्रमाणें करण्यास मान्यता आहे. योगमार्ग विशिष्ट शारीरआचारप्रधान आहे. तेथें अन्य मनुष्यें व इतर प्राणी यांचा संबंध नाहीं. सांख्यमार्ग आचारप्रधान असला तरी तो निवृत्तिमूलक आहे. जैनमतामध्यें पूर्ण अहिंसाप्रधान आचार आणि तत्त्वज्ञानहि आहे. आत्मा व्यक्तिगत आहे. त्याला आदि, अंत नाहीं. जगत् हें अनादि व अनंत आहे. कर्मविमुक्त आत्मा झाला कीं तो पूर्ण आत्मा होतो, तोच परम आत्मा किंवा ईश्वर असें जैन तत्त्वज्ञान आहे. जैन धर्म निवृत्तिप्रधान आहे, म्हणून तो संसाराविषयीं व व्यवहारा-विषयीं उदासीन आहे.

(१५७) **जैनमत व समानता:**—जैनामध्येंहि अनेक जाति आहेत. विसा, दशा, बनिया, शेतकरी असले पोटभेद जैनांमध्येंहि आहेत. तत्त्वदृष्ट्या जैनधर्मांत उच्चनीचता नाहीं, म्हणजे चंडाळालाहि संन्यास घेतां येतो. कोणालाहि दुःख न देतां अहिंसायुक्त आत्मकल्याणाचा मार्ग जैनधर्मा-प्रमाणें मनुष्यमात्राला मोकळा आहे. त्या दृष्टीनें जैनधर्म हा विश्वधर्म होतो. पुरुषाप्रमाणें स्त्रियांनाहि त्याग व संन्यास साध्य आहे व त्याहि मोक्षाधिकारी आहेत असें जैनधर्म मानतो. श्रावक—श्राविका, साधु—साध्वी असे वर्ग जैनांमध्यें आहेत. श्रावक—श्राविकांना पंचअणुव्रतें आणि साधु—

साध्वींना पंचमहाव्रतें सांगितलीं आहेत. श्वेतांबरमतें स्त्रिया महाव्रतें धारण करून या जन्मीं मुक्त होऊं शकतात. पण दिगंबरमतें स्त्रियांमध्यें तें सामर्थ्य नाहीं. त्या फार तर या जन्मीं स्त्रीत्व छेदूं शकतात व पुढच्या जन्मीं पुरुष होऊन मुक्त होतात.

(१५८) अधिकाराप्रमाणें उपदेशः—परिग्रहाची उपाधि नको म्हणून संसार सोडावा व कर्मबंधांतून मुक्त होण्याकरितां गृहस्थाश्रमहि सोडावा असा या धर्माचा उपदेश आहे. कारण संन्यासदीक्षा हें धर्माचरणाचें श्रेष्ठ अंग आहे. निर्वाणप्राप्ति म्हणजे मोक्ष होय ! तोच परम पुरुषार्थ. जैनधर्म हा निवृत्तिमार्गाप्रमाणें कर्मयोगाचाहि पुरस्कर्ता आहे. संसारत्याग म्हणजे स्वार्थी संसाराचा त्याग होय. श्रमणानें यतिधर्मानें वागून तपश्चर्या करून विकारावर विजय मिळवावा व पूर्ण ज्ञानी होऊन देहावसान होईपर्यंत अखंड परोपदेश व परोपकार करावा, असा ज्ञानोत्तर कर्मयोग जैनधर्मांतहि आहे. सर्व जीवांत जीव आहे म्हणून प्राण्यावर दया करावी. अहिंसा, सत्य, अस्तेय, ब्रह्मचर्य व अपरिग्रह हीं महाव्रतें अधिकारी श्रमणाकरितां आहेत. संसारी लोकांकरितां स्वदाररति, अर्थलोभाचें नियमन, नीतियुक्त वर्तन, इंद्रियनिग्रह, प्रमाणित प्रतिग्रह असा अणुव्रताचा मार्ग सांगितला आहे.

(१५९) तारतम्यानें अहिंसोपदेशः—जैनधर्मांत अहिंसेवर जोर दिला असला तरी एकांगी निरपेक्ष अहिंसा सांगितलेली नाहीं. क्षत्रियांना युद्ध करण्यास म्हणजे युद्धांत हिंसा करण्यास धर्माची अनुज्ञा आहे. देवदेवतांना उद्देशून यज्ञांत जी पशुहिंसा होते त्याविरुद्धच केवळ जैनधर्म आहे. सरसकट समाजधारणेला आवश्यक जी हिंसा तिच्या विरुद्ध जैनधर्म नाहीं. जैनाचार्यांनीं तारतम्यानें ( १ ) संकल्पिनी, ( २ ) औद्योगिक, (३) आरंभिनी व (४) विरोधिनी असे हिंसेचे चार प्रकार सांगितले आहेत. गृहस्थी अहिंसा निराळी आणि श्रावकांची अहिंसा निराळी आहे. अन्यायी, दुराचारी, आततायी, दुर्जन, दुःशील अशा समाजकंटकाच्या निःपातास आणि समरांगणांतील रक्तपातास जैनधर्माची अनुज्ञा आहे. अहिंसेविरुद्ध जैनधर्माची कोणतीहि आज्ञा नाहीं. तथापि ज्यामुळें जीवन

शक्य होईल असें कर्म आपापल्या जातिधर्मानुरूप करणें भाग आहे. स्वार्थमूलक हिंसेचा जैनधर्मात निषेध आहे. प्रजापालन हें राजाचें कर्तव्य, यास्तव आततायी, दुष्ट, अन्यायी, दुर्जनापासून प्रजेची हिंसा होते, ती वांचावी म्हणून अनासक्ति व अनहंकारवृत्तीनें आततायिवध केल्यास तो राजा पापभाक् होत नाहीं. अपरिहार्य हिंसा अनासक्तीनें केल्यास ती अहिंसाच होय. ज्यामुळें जीवन अशक्य होईल ती हिंसा अहिंसा होय. गृहस्थांची अहिंसा त्यांचें दौर्बल्य जाणून अणुव्रतामध्यें सांगितली आहे; आणि श्रमणाची अहिंसा महाव्रताला अनुसरून आहे.

(१६०) **श्वेतांबर व दिगंबरः**—पार्श्वनाथ हे सवस्त्र असत. महावीरानें वस्त्रहि टाकलें. त्यावरून श्वेतांबर व दिगंबर असे पंथ झाले. सर्वसंगपरित्यागार्थ वस्त्रहि टाकावें असें दिगंबर मत आहे, तर लज्जारक्षणार्थ वस्त्र धारण केल्यानें महाव्रतास बाध येत नाहीं असें श्वेतांबर मत आहे. महाराष्ट्रांत बहुतेक दिगंबरपंथी जैन शेतकरी आहेत. गुजराथेंतील व राजपुतान्यांतील बहुतेक जैन बनिया वर्गांतील असून ते श्वेतांबर आहेत.

(१६१) **जैन हे हिंदूचः**—जैन हे हिंदूच आहेत; कारण त्यांचें निराळें समाजधर्मशास्त्र नाहीं. जैनाचे सर्व संस्कार व पौरोहित्यहि पुष्कळ ठिकाणीं ब्राह्मणच करतात. कांहीं ठिकाणीं जैन पुरोहितहि आहेत. तीर्थें, देवळें, देवता, पूजाविधि इत्यादि बाबतींत जैनांचें हिंदूंशीं साम्य आहे. जैन व वैष्णव यांचे परस्पर विवाहसंबंधहि होतात. एकाच कुटुंबांत एक भाऊ जैन व एक भाऊ हिंदु असे एकत्र नांदू शकतात. जैनमंदिरांत जैनच पुजारी असतात. पण जैन लोकांच्या घरचे पुजारी क्वचित् ब्राह्मणहि आहेत. जैनधर्मानें हिंदुसंस्कृतींत भर घातली आहे; म्हणून जैनांना सांस्कृतिकदृष्ट्या हिंदुजातीचा व संस्कृतीचा अभिमान आहे. हिंदुसमाजाप्रमाणें जैन समाजांतहि अनेक धार्मिक व सामाजिक अनिष्ट रूढि, बंधनें व समजुती आहेत. तीं सर्व नष्ट करून हिंदुसमाजाला अखंड एकजिनसी असें स्वरूप देण्यांतच जैनांचा तरणोपाय आहे. हिंदुस्थानांत उत्पन्न झालेल्या बुद्ध—धर्माच्या अनुयायांची संख्या फारच अल्प आहे. पण जैन धर्माचे अनुयायी बारा लक्षांपेक्षां अधिक आहेत, याचें कारण काय हें पाहिलें पाहिजे. वेदांचें प्रामाण्य न मानणें व यज्ञीयहिंसेस विरोध करणें येवढ्या दोन गोष्टी

वगळल्यास जैनधर्म सनातन वैदिक धर्माशीं समन्वय करणारा आहे. जैनांमध्यें चातुर्वर्ण्य आहे, होमहवन आहे, कर्मविधि आहे, संस्कार आहेत व वेदमंत्र नसले तरी त्यासारखेच प्राकृत संस्कृत मंत्र आहेत. जैनसमाज हा निवृत्त-मांस असल्यामुळें त्याबद्दल दुजेपणा वाटत नाहीं. जैनधर्म समाजधारणा, सामाजिक चाली, रूढी, यांविषयीं उदासीन आहे. जैनसमाजामध्यें जातिसंस्था आहे व अस्पृश्यता आहे. जैनपंडितांनीं केवळ न्याय, व्याकरण, वेदांत व तत्त्वज्ञान याच विषयांवर स्वतंत्र ग्रंथ लिहिले आहेत असें नसून साहित्य, व्याकरण, वैद्यक, ज्योतिष व अर्थशास्त्र इत्यादि विषयांवर विद्वत्ता, बुद्धिमत्ता व पांडित्य यांनीं परिपूर्ण असे ग्रंथ लिहिले आहेत. पुष्कळ ब्राह्मण पंडितांनीं जैनधर्माची दीक्षा घेऊन बहुमोल ग्रंथसंपत्ति निर्माण केली आहे, अशी माहिती मिळते. चाणक्याच्या अर्थशास्त्राप्रमाणें सोमदेवसूरीनें ' नीति–वाक्यामृतं ' या नांवाचा अर्थशास्त्रावर ग्रंथ लिहिलेला आहे. त्यामध्यें त्रिविध पुरुषार्थ, आन्विक्षिकी, वार्ता, दंडनीति, मंत्री, पुरोहित, सेना, कोश, विवाह, व्यवहार, सदाचार इत्यादि बत्तीस विषयांचा ऊहापोह केलेला आहे. त्यावरून आणि यांसारखे आणखीहि कांहीं ग्रंथ आहेत ते पाहिले म्हणजे जैनधर्मानें सनातन वैदिक धर्माशीं समन्वय करून आपलें अस्तित्व कसें टिकविलें हें समजतें. मुसलमानांच्या कत्तलीपासून जैन हे शेती व व्यापार यांत मग्न झाले व विद्या व पराक्रम यांकडे त्यांचें दुर्लक्ष झालें असावें. सांप्रत तर जैनांमध्यें जुन्या पद्धीक विद्वानांची फारच वाण आहे. ब्राह्मण पंडितांचाच आश्रय त्यांना करावा लागतो.

(१६२) **जैनधर्म व प्रपंचः**–प्रत्येक जैनानें ज्या बारा भावना किंवा अनुप्रेक्षा ध्यानांत ठेवावयाच्या त्यांपैकीं कांहीं देतों:–(१) अनित्य-भावना म्हणजे नित्य कांहीं नाहीं. (२) अशरणभावना म्हणजे आसरा कशाचाहि नाहीं. (३) संसृतिभावना म्हणजे इहपरजन्मीं दुःखच आहे. (४) एकत्वभावना म्हणजे आपण एकटे आहोंत. (५) अशुचिभावना म्हणजे हें शरीर अपवित्र आहे; इत्यादि. बौद्धांचें व जैनांचें दुःखवाद, अहिंसा, संन्यास, निरीश्वरवाद व वेदांचें अप्रामाण्य या बाबतींत साम्य आहे. जैनतत्त्वज्ञानांत (१) जीव, (२) अजीव, (३) पुण्य, (४) पाप, (५) आस्रव, (६) संवर, (७) बंध, (८) निर्जर, (९) मोक्ष असे नऊ पदार्थ मानलेले आहेत.

जैनांचे मुख्यतः अकरा अंगग्रंथ, बारा उपांगग्रंथ, सहा छेदग्रंथ, चार मूल-ग्रंथ व दहा प्रकीर्ण ग्रंथ इतकें वाङ्मय प्रमाण मानलें जातें. बहुतेक सर्व वाङ्मय अर्धमागधीमध्यें आहे. जैन हे मोठे तार्किक होते. त्यांच्या मतें इंद्रियार्थसंनिकर्षानें जें ज्ञान होतें, त्याच्या पांच पायऱ्या आहेत, त्या अशाः–(१) व्यंजनाग्रह, (२) अर्थावग्रह, (३) इहावग्रह, (४) अवयग्रह, (५) धारणा. हरभद्रसूरीनें 'षट्दर्शन समुच्चय' या नांवाचा ग्रंथ लिहिला आहे. त्यांत बौद्ध, नैय्यायिक, सांख्य, जैन, वैशेषिक व जैमिनीय अशा सहा दर्शनांचा विचार केलेला आहे.

**(१६३) प्रो. ह्यूमचें मतः—** 'जगांतील विद्यमान धर्म' या पुस्तकाचा कर्ता प्रो. ह्यूम याचे मतें जैन धर्मांत त्याग, वैराग्य, जीवस्वातंत्र्य, आत्मोद्धार, पारमार्थिक समता इत्यादि जशीं उच्च तत्त्वें आहेत, तशींच देहनिंदा, शरीरदंडन, बलात्कारानें इंद्रियदमन, जगांतील आनंद व सौंदर्य याविषयीं पराङ्मुखता, कुटुंबसंस्था व स्त्रिया यांविषयीं अनुदारता, मानवी जीविताची तुच्छता आणि समाजसंघटनेविषयीं औदासिन्य, हीं हीन तत्त्वें आहेत. हिंदुसंस्कृतीचें सूक्ष्म निरीक्षण केल्यास जैन धर्मांतील या दोन्ही बऱ्या व वाईट तत्त्वांचे संस्कार हिंदुसमाजाचे मनावर फार खोलपर्यंत झालेले आहेत व ते हिंदुसमाजाच्या दौर्बल्याला बरेचसे कारणीभूत झालेले आहेत, असें दिसून येतें.

**(१६४) श्रमण व मांसाहारः–** महावीरस्वामीनीं आपल्या शिष्याला सांगितलें कीं, 'एका गांवांत रेवतीनामक बाईकडे जा व तिला सांग कीं मजसाठीं शिजवलेलीं दोन कबुतरें मला नकोत. कोंबडीचें मांस तेवढेंच दे.' यावरून महावीर मांसाहार करीत हें उघड आहे. हे श्रमण रस्त्यांतून जातांना मिळालेली भिक्षा घेत. त्या भिक्षेंत कोणी मांसहि घालीत. गौतमबुद्धहि मांसान्न सेवन करी. आपल्यासाठीं प्राणिवध केलेला आपण पाहिला, ऐकिला किंवा तशी शंका आली तर तें अन्न निषिद्ध असें बुद्धाचें मत असे. बुद्धकालीं व महावीरकालीं समाजांत मांसाहार होता. लोकभिक्षेवर अवलंबून असणाऱ्यांना निर्मांस भिक्षा मिळणें अशक्य असे. म्हणून श्रमणांनीं व बुद्धभिक्षूनीं मांसान्न सेवन केलें, तर त्यांत दोष नाहीं.

गौतमबुद्ध सूकरमांस खात होता याबद्दल आधार आहे. सर्वच तपस्वी मांस-भिक्षा घेत असें नाहीं."
—भगवान बुद्ध—उत्तरार्ध प्रकरण ११.

कांहींचे मतें हे उल्लेख वादग्रस्त आहेत. कारण अहिंसा व मांसाहार यांचा तीव्र विरोध आहे. बौद्धधर्मांत भिक्षेंत जें मिळेल तें खावें असें असलें तरी जैनधर्मात मांसाहाराचा तीव्र निषेधच आहे असें दिसतें.



## प्रकरण सातवें

# बुद्धाचा दुःखवाद

गेल्या प्रकरणांत जैनसंस्कृतीचें स्वरूप सांगितलें. जैनसंस्कृति-पेक्षां हिंदुसंस्कृतीवर जोराचें आक्रमण बौद्धसंस्कृतीनें केलेलें आहे. त्यामुळें हिंदुसंस्कृतींत दुःखवाद, निवृत्तिपरता आणि अहिंसेचा अतिरेक यांचें मिश्रण कसें झालेलें आहे त्याचें विवेचन या प्रकरणांत करावयाचें आहे.

(१६५) **बुद्धपूर्वकालीन श्रमण पंथः**—भारतीय युद्धामुळें नैराश्य प्राप्त झालें. उपनिषदांतील तत्त्वज्ञानानें उचल केली. तत्त्वज्ञानविषयक विविध पंथ उदयास येऊं लागले. सांख्यांनीं दुःखवाद आणि संन्यास यांचें प्रथम प्रतिपादन केलें. यज्ञीयहिंसेविरुद्ध प्रथम चार्वाकानें व नंतर जैनधर्मानें बराच प्रचार केला. बुद्धपूर्वकालीं कांहीं किरकोळ आणि कांहीं प्रमुख मिळून ६३ श्रमणपंथ अस्तित्वांत होते. यांतूनच पुढें बुद्धाचें मत उत्पन्न झालें. त्यांतील प्रमुख अशा सहा पंथांची प्रथम माहिती देतों.

ज्यांच्या विचाराची आणि आचाराची बुद्धावर छाप पडली असे आचार्य म्हटले म्हणजे १ पूरणकश्यप, २ मक्खली गोसाल, ३ अजित केसकंबली, ४ पकुध कात्यायन, ५ निगण्ठ नाथपुत्र व संजय वेलठ्ठपुत्र हे

होत. यांच्यां सांप्रदायांचीं नांवें अक्रियवाद, संसारशुद्धिवाद, उच्छेदवाद, अन्योन्यवाद, चातुर्यामसंवरवाद व निक्षेपवाद अशीं आहेत. हे आचार्य नग्न असत. ज्यानें पाप केलें असेल त्याला लाज वाटते, व लाज झांकण्याकरितां वस्त्र लागतें. ज्यानें पापच केलें नाहीं त्याला वस्त्र कशाला हवें? थंड पाणी पिणें ही हिंसा आहे, कारण त्यांत आत्म्याचे सूक्ष्म कण असतात. केशलुंचन, धूम्रपान व पंचाग्निसाधन हीच खरी तपश्चर्या, अशीं यांचीं मतें होतीं. कोणी कांहीं केलें तरी पाप नाहीं व पुण्य नाहीं असें पूर्ण काश्यपाच्या अक्रियवादाचें तत्त्व होतें. जगांत सर्व कांहीं कारणाशिवाय होतें कशाच्याहि मागें हेतु नसतो, सर्व कांहीं नियतीनें म्हणजे नशिबानें होतें; असा मक्खलि गोसालाच्या नीतिवादाचा सिद्धांत होता. जगांत इह नाहीं, पर नाहीं, दान नाहीं, धर्म नाहीं, आस्तिकवाद म्हणजे बडबड, मृत्यूनंतर कांहीं रहात नाहीं, सर्वांचा उच्छेद होतो, असें केसकंबलीच्या उच्छेदवादाचें सार आहे. पृथ्वी, अप, तेज, वायु, सुख, दुःख व जीव हे सात पदार्थ होत. ते अचल व स्वयंभू आहेत. त्यांचा निर्माता कोणी नाहीं. मरणारा, मारणारा, ऐकणारा, सांगणारा वगेरे कांहीं नाहीं. खून करणें म्हणजे सात पदार्थांच्या अवकाशांत शस्त्र घालणें होय, असें पकुध कात्यायनाच्या अन्योन्यवादाचें म्हणणें आहे. जैनसंघाचा पुढारी व जैनधर्माचा तीर्थंकर महावीरस्वामी हाच निघंटनाथपुत्र होय, असें कांहीं विद्वानांचें म्हणणें आहे. हा अहिंसा, सत्य, अस्तेय व अपरिग्रह या चार यामांचा उपदेश करी. चातुर्यामसंवरवादाचा भर या चार यामांवर आहे. परलोक आहे व नाहीं, चांगलें वाईट आहे व नाहीं, मरणोत्तर कांहीं असतें व नसतें अशीं अस्ति व नास्तिपक्षीं द्विधा उत्तरें संजयबेलठ्ठपुत्राच्या विक्षेपवादामध्यें आहेत.

(१६६) **आजीवक पंथः**—याशिवाय आजीवक या नांवाचा एक पंथ अस्तित्वांत होता. त्यांतील भिक्षु गोवत्सांचें शेण खात, शरीरें धुळीनें माखीत. केव्हां केव्हां तांदळाची कांजी पिऊन सदा नग्नस्थितींत असत व रानोमाळांत कोठेंतरी भटकत. या पंथाचा परिणाम बुद्धावर बराच झाला असावा. आजीवक या संप्रदायांत वैचारिक तत्त्वज्ञान नाहीं. तो सोडल्यास वरील सहाही संप्रदायांत सांख्य मताचा उल्लेख नाहीं, तथापि

त्या मताची छाया या संप्रदायावर पडलेली असावी. अक्रियवाद व नियतिवाद हे नष्ट झाले असावे. विक्षेपवादाचें स्यादवादांत रूपांतर झालें असावें व उच्छेदवाद हा चार्वाक मताचा अनुवाद असल्यामुळें तो निराधार झाला असावा. अनोन्यवादाचें परिणत स्वरूप म्हणजे वैशेषिक दर्शन होय ! या सर्व वादांच्या निवृत्तिपर परंपरेतून बौद्ध तत्त्वज्ञान निर्माण झालेलें आहे.

(१६७) **बुद्धपूर्वकालीन यज्ञ व उपासना**:—यज्ञ–संस्था बुद्धपूर्व-कालीं जोरांत होती. यज्ञामध्यें शेतीचीं जनावरें आणून त्यांचें बलिदान होत असे. कोसलराजाच्या यज्ञांत पांचपांचशे बैल, गोह्रे, कालवडी, बकरे, मेंढे यूपाला आणून बांधले होते. राजदूत केवळ दंडभयानें आंसवें गाळीत गाळीत, रडत रडत यज्ञांतील कामें नाइलाजानें करीत असत ( हिंदी संस्कृति आणि अहिंसा पा. ८२ ) हें वर्णन जरी पूर्ण अतिशयोक्तीचें वाटलें, तथापि त्यावरून सामान्य जनता यज्ञयागाला कशी कंटाळलेली होती, यज्ञयागादि कर्में खर्चाचीं, खटाटोपाचीं व कंटाळवाणीं होऊं लागल्या-मुळें हीं कर्में सदोषच आहेत, यास्तव त्यांचा त्याग करावा, सर्वसंगपरित्यागपूर्वक आत्मवस्तूचा शोध करावा, अशी विचारपरंपरा वाढली आणि उपासना-मार्गहि बळावले. पाणिनीनंतर अवैदिक आणि वैदिक असे उपासनासंप्रदाय निघाले. प्रत्येकानें उपनिषदांतील ईश्वरविषयक कल्पनेचा आधार घेतला. याच कल्पनेंतून पुढें भागवत धर्माचा उदय झाला. त्याचें मूळचें नांव नारायणीय धर्म किंवा सात्वतधर्म असें आहे. या तऱ्हेच्या सर्व उपासना-संप्रदायांनीं वैदिक प्रवृत्तिपर धर्माचें महत्त्व पुष्कळच कमी केलें होतें. या भूमिकेचा लाभ बुद्धाला मिळाला. जिन व बुद्ध यांनीं सामान्य जनतेला सुलभ असा नैतिक मार्ग दाखवून दिला.

(१६८) **व्रात्य–क्षत्रिय–वैश्यांचा इतिहास**:—वर बुद्ध व जिन यांच्या मतांचा उल्लेख केला, त्याचा अर्थ समजण्याकरितां त्या काळच्या सामाजिक परिस्थितीचा थोडा विचार करूं. इतिहाससंशोधक राजवाड्यांच्या रा. मा. वि. चंपूच्या प्रस्तावनेमध्यें ख्रिस्तपूर्व सहाव्या शतकांतील सामाजिक स्थितीचें फार चांगलें विवेचन केलेलें आहे, तें असें:—

"पाणिनीच्या काळीं चातुर्वर्ण्यसंस्था होती, पण ती सैल असल्यामुळें अनुलोमविवाहपद्धति त्या काळीं होती. स्त्री कोणत्याहि वर्णांतील असली तरी तिच्यापासून झालेलें अपत्य पितृजातीय समजण्याची जी पुरातन चाल होती ती यावेळीं अस्तित्वांत होती. पित्याच्या वर्णानें अपत्य मोजण्याची ही चाल शूद्रेपासून झालेल्या संततीला त्रैवर्णिकांनीं लावल्यामुळें तिचा परिणाम समाजांत फार विलक्षण झाला! त्रैवर्णिकांच्या घरीं शूद्राजन्य बरीच संतती झाली. त्या मुलांना माहेरच्या शूद्रसंगतीनें शूद्रांचेच आचार, उच्चार व संस्कार जडूं लागले. त्रैवर्णिक संसर्गामुळें जरी त्या मुलांत थोडा फरक पडला, तथापि शूद्रास्त्रीपासून झालेल्या संततीचा काळा वर्ण कांहीं केल्या बदलत नसे. म्हणून त्रैवर्णिकांमध्यें शुक्लभास्करवर्ण संतति व कृष्णवर्ण संतति असे दोन ठळक विभाग पडले. कालांतरानें या दोन वर्गांत मत्सर, प्रतिकार व स्पर्धा उत्पन्न झाली. या स्पर्धेचें सर्वप्रसिद्ध उदाहरण म्हणजे वैशंपायन व याज्ञवल्क्य यांचें होय. वैशंपायन हा कृष्णवर्णी त्रैवर्णिकांचा पक्षपाती होता, व याज्ञवल्क्य शुक्लवर्ण त्रैवर्णिकांचा पक्षपाती होता. पाणिनीपूर्वकालीं हा तंटा विकोपास जाऊन या दोन पक्षांत शरीरसंबंध होतनासे झाले. शुक्लभास्करवर्णी त्रैवर्णिक हे कृष्णवर्णी त्रैवर्णिकांची शूद्रोत्पन्न म्हणून थट्टा करीत, ती सहन न होऊन कृष्णवर्णी त्रैवर्णिकांनीं शुक्लवर्णी त्रैवर्णिकांच्या धर्माची, आचाराची, यज्ञाची, श्राद्धाची, संस्कृत भाषेची, वेदाची आणि देवाची निंदा करण्यास प्रारंभ केला. इतकेंच नव्हे, तर हजारों कृष्णपक्षाभिमानी त्रैवर्णिकांनीं शुक्लपक्षाचा द्वेष करतां करतां मूळच्या सनातन वैदिक धर्माचा द्वेष आरंभिला आणि उपनयनादि संस्कार करण्याचें सोडून देऊन ते व्रात्य बनले. असले सावित्रीपतित व्रात्य ब्राह्मण, भूर्जकंटक, अवंति, वाटधान इत्यादि देशांत बहुत झाले. तसेंच सावित्रीपतित व्रात्य क्षत्रिय, झल्ल, मल्ल, निच्छिवी, नट, करण, खस, द्रविड, पौंड्रक, औड्र, कांबोज, यवन, शक, पारद, प्रल्हव, चीन, किराद, दरद इत्यादि त्या त्या देशांत झाले आणि व्रात्य, वैश्य, करुष, सात्वत इत्यादि देशपरत्वें झाले. या लोकांची सावित्रीपतनापर्यंत म्हणजे संस्कारच्युत होऊन गायत्रीमंत्राचेंहि ज्ञान नाहीं येथपर्यंत प्रगति झाल्यावर ह्यांच्यापैकीं नटनामक व्रात्य क्षत्रियांत जिन व शकनामक

ब्रात्य क्षत्रियांत गौतमबुद्ध ऊर्फ शाक्यमुनि ह्या दोघांनीं स्वतंत्र अशा वेदबाह्य व चातुर्वर्ण्यविरोधी मताची स्थापना करून; व देशांतील बहुतम ब्रात्यांना व शूद्रांना एकजुटींत आणून शुद्ध त्रैवर्णिकांचा अथवा शुद्ध चातुर्वर्णिकांचा बींमोड करण्याचा उद्योग आरंभिला. ”

(१६९) **बुद्धाचें अल्प चरित्रः**–बुद्धासंबंधीं ललितविस्तारादि ग्रंथांत अवतारी पुरुषाप्रमाणें माहिती दिली आहे. बुद्धाचा काल खिस्तपूर्व ६२३ ते ५४३ असा मानतात. निर्वाणाचे वेळीं त्याचें वय ८० वर्षांचें होतें. वयाच्या २९ व्या वर्षीं निर्वाणाच्या शोधार्थ तो घराबाहेर पडला. सुमारें ५० वर्षें त्यानें आपल्या धर्माचा प्रचार केला. मातृवंशाकडून ८० हजार व पितृवंशाकडून ८० हजार कुलें गौतम बुद्धाच्या कुलाशीं संबद्ध होतीं. शाक्य कुलाशिवाय झल्ल, मल्ल, मौर्य, लिच्छवी, विदेह, कोलीयम् अशीं कुलेंहि आसपास असत. कांहीं कुलांच्या समुदायांना गण म्हणत, प्रत्येक गणाकडून राजा निवडण्यांत येई. तो राजा त्या कुलावर म्हणजे गणावर राज्य करी, त्याला गणराज्य असें म्हणत. बुद्धाचा बाप शुद्धोदन हा एक गणराजाच होता. कांहीं ठिकाणीं ललितविस्तरा–उलट माहिती दिली आहे ती अशीः— शाक्यांची नीतिमत्ता चांगली नव्हती, जातिबाह्य विवाह टाळण्याकरितां भावाबहिणींचीं लग्नें लावीत. बुद्धाचा मनोनिग्रह बेताचा व नैतिक वर्तनहि सामान्यच होतें. तो अविद्वान व असंस्कृतज्ञ होता तो वादविवादांत पडत नसे. बुद्धाची माहिती **हिंदी संस्कृति** आणि **अहिंसा** ( ले. कौसांबी ) या ग्रंथांत दिली आहे तिचा सारांश असाः–

“ कोसल देशाच्या उत्तरेला शाक्य नांवाच्या क्षत्रियांचें एक लहानसें गणसत्ताक राज्य होतें. बुद्धजन्मापूर्वीं कपिलवस्तूच्या शाक्यांचें स्वातंत्र्य संपुष्टांत येत चाललें होतें. मगध देशाच्या पूर्वेकडील अंगराजांचीही हीच स्थिति होती. त्यांचा अंतर्भाव मगध देशांतच होत होता. कोसल देशांत व मगध देशांत सार्वभौम राज्यपद्धति होती. कपिलवस्तूपासून चौदा पंधरा मैलांच्या अंतरावर असलेल्या शुद्धोदन नामक (जमिनदाराप्रमाणें असलेल्या) राजाच्या मायादेवी नांवाच्या राणीच्या उदरीं बुद्धाचा जन्म झाला. गौतमबुद्ध, बोधिसत्व अशीं निरनिराळीं नांवें त्याला दिलेलीं आहेत.

शुद्धोधन राजा सधन असल्यामुळें त्यानें आपल्या मुलाला तीन ऋतूंत राहण्याकरितां तीन उत्तम वाडे बांधले होते. तेथें सर्व तऱ्हेचे ऐषआराम होते. गायन, वादन, नृत्य, दासदासी, आणि इतर सुखसोयी यांनीं ते वाडे समृद्ध होते. त्या ठिकाणीं बुद्ध हा कालक्रमणा करीत असे. त्याला वैराग्य उत्पन्न होण्याचीं कारणें झालीं तीं अशीं:—

(१७०) **वैराग्याचीं कारणें**— " अविद्वान् सामान्यजन स्वतः जरेच्या तडाक्यांत सांपडणारा असून, जराग्रस्त म्हाताऱ्या माणसाकडे पाहून कंटाळतो व त्याचा तिरस्कार करतो ! परंतु मी स्वतः जरेच्या तडाक्यांत सांपडणारा असून त्या सामान्य माणसाप्रमाणें जराग्रस्ताला कंटाळलों किंवा त्याचा तिरस्कार केला, तर तें मला शोभणार नाहीं.

" अविद्वान् सामान्यजन स्वतः व्याधीच्या तडाक्यांत सांपडणारा असून व्याधिग्रस्त माणसाला पाहून कंटाळतो व त्याचा तिरस्कार करतो ! परंतु मी स्वतः व्याधीच्या तडाक्यांतून सुटलों नसतां त्या सामान्यजनाप्रमाणें व्याधिग्रस्ताला कंटाळलों किंवा त्याचा तिरस्कार केला, तर तें मला शोभणार नाहीं.

" अविद्वान् सामान्यजन स्वतः मरणधर्मी असून मृत शरीर पाहून कंटाळतो व त्याचा तिरस्कार करतो ! परंतु मी स्वतः मरणधर्मी असून त्या सामान्यजनाप्रमाणें प्रेताला कंटाळलों किंवा त्याचा तिरस्कार केला, तर तें मला शोभणार नाहीं. "

या तीन कारणांमुळें आपला जीवित—मद नष्ट झाला असें बुद्धानें स्वतः म्हटलें आहे.

जरा, व्याधि व मरण यांनीं बद्ध झालेली व परस्पराशीं द्वेष करणारी जनता पाहून बुद्धाला वैराग्य प्राप्त झालें. अपुऱ्या पाण्यांत जसे मासे तडफडतात तशी परस्पर विरोध करणारी जनता पाहून बुद्धाला जग हें असार वाटलें. बुद्धाचे पहिले गुरु आडार कालाम व उद्रक रामपुत्र हे देखील क्षत्रियच होते. या क्षत्रियांच्या परंपरेंतच त्याला निर्भयस्थान सांपडलें. बुद्धानें आडार कालामाच्या श्रमण संप्रदायांत कपिलवस्तु येथें प्रवेश केला. जन्मजरादिकांनीं होणारी हानी पाहून अजात, अजर, अव्याधि, अमर आणि अशोक असें परमश्रेष्ठ पद मिळविण्याचा त्यानें यत्न केला.

(१७१) बुद्धाचा तत्त्वबोध–आडार कालामाची कीर्ति काशी व कोसल इत्यादि देशीं पसरली होती. त्याच्याजवळ त्यानें योगमार्गाचा अभ्यास केला. उद्रक रामपुत्रानें त्याला आणखी एक योगमार्गातील पायरी शिकविली. त्यामुळें त्याचें समाधान झालें नाहीं. म्हणून बुद्ध तपश्चर्येकरितां गयेस गेला. तेथें भेटलेल्या पांच तपस्वी भिक्षूंसह त्यानें तपश्चर्येस प्रारंभ केला. परंतु त्याला खरा मार्ग सांपडला नाहीं. बापाबरोबर शेतांत असतांना जंबू वृक्षाच्या छायेंत समाधि साधल्याची त्याला आठवण झाली, व तें सुख दुर्बल देहानें साध्य होणार नाहीं, असें पाहून देहाचें संरक्षण होण्यापुरतें अन्न खाल्लें पाहिजे असें त्यानें ठरविलें. आहारसेवनानें समाधिसुखाचा अनुभव त्याला घेतां येऊं लागला.

याप्रमाणें समाधीचा अनुभव घेत असतांना बुद्धाला तत्त्वबोध झाला, व तोच खरा मार्ग आहे असें त्याला वाटलें. व आपल्याबरोबरीच्या पांच भिक्षूंची त्यानें खात्री करून दिली. बुद्धानें पांच भिक्षूंना उपदेश केला तो असाः–कामोपभोगांत सुख मानणें हा एक अंत व देहदंडन हा दुसरा अंत होय. हे दोन अंत अनार्य व अनर्थावह आहेत. म्हणून निर्वाणाला कारणीभूत होणारा आर्य अष्टांगिक मार्ग म्हणजे (१) सम्यक् दृष्टि, (२) सम्यक् संकल्प, (३) सम्यक् वाचा, (४) सम्यक् कर्मान्त (५) सम्यक् आजीव, (६) सम्यक् व्यायाम, (७) सम्यक् स्मृति, (८) सम्यक् समाधि, हा होय.

(१७२) चार आर्यसत्यें–बुद्धानें चार आर्यसत्यें सांगितलीं. तीं अशीं:—(१) दुःख नांवाचें पहिलें आर्यसत्य. (२) तृष्णा नांवाचें दुसरें आर्यसत्य होय. (३) तृष्णेचा वैराग्यानें पूर्ण निरोध करणें हें तिसरें आर्यसत्य. आणि (४) वरील आर्य अष्टांगिक मार्ग हें चवथें आर्यसत्य होय. यालाच संक्षेपानें दुःख, समुदय, निरोध व मार्ग असें म्हणतात. जगांत सर्वत्र दुःखच दुःख आहे. जन्म, जरा, मरण, शोक, प्रियवस्तूचा अलाभ व अप्रियाची प्राप्ति या सर्वच गोष्टी दुःखकारक आहेत. जगांतील दुःख (दुःखाचे पांच उपादानस्कंध) कोणी उत्पन्न केलेलें नसून मनुष्याच्या तृष्णेनें उत्पन्न झालेलें आहे. तृष्णेचा सर्वथैव त्याग हाच मोक्ष, व तो त्याग इतराशीं समत्वानें वागल्यानें होतो; व समत्वानें कसें वागावें हें अष्टांगिक मार्ग शिकवितो, असें याचें स्पष्टीकरण आहे.

पार्श्वांच्या चातुर्यामांत आणि बुद्धाच्या अष्टांगिक मार्गांत पुष्कळच साम्य आहे. अहिंसा, सत्य, अस्तेय, ब्रह्मचर्य, अपरिग्रह यांचा अंतर्भाव बुद्धाच्या सम्यक् कर्मांत होतो; व अपरिग्रहाचा समावेश सम्यक् आजीवांत होतो. पार्श्वांचे चार नियम निषेधात्मक आहेत तर बुद्धाचे नियम विधायक आहेत. दोन्हींचें पर्यवसान निवृत्तींतच होतें.

(१७३) **बुद्ध तत्त्वज्ञानः**—बुद्ध दर्शनाचीं चार सूत्रें आहेत. 'दुःखं दुःखं, स्वलक्षणं स्वलक्षणं, क्षणिकं क्षणिकं, शून्यं शून्यं,' हीं तीं चार सूत्रें होत. (१) जिकडे तिकडे दुःख पसरलें आहे. (२) जगांतील प्रत्येक वस्तु स्वयंप्रकाश आहे. (३) प्रत्येक वस्तु क्षणभंगुर आहे, कारण परिमाणु प्रतिक्षणीं बदलतात. (४) मोक्ष म्हणजे शून्यावस्था हेंच सर्वांचें परमसाध्य आहे. जीवरूपी दिवा मालवणें हेंच परम निर्वाण होय. तेथें आत्मा, ज्ञान, सुख, दुःख, पाप, पुण्य, वगैरे कांहीं नाहीं.

कामवासना, प्रपंचवासना, वैभववासना, या माणसास दुःखाच्या गर्तेत लोटतात. संसारदावाग्नींत जीवपक्षी होरपळून जातो. दुःखानें दाही दिशा भडकलेल्या आहेत, मोहरूपी काळसर्प प्राण्यांना दंश करतो, हें सर्व पाहून बुद्धाला अत्यंत दुःख झालें. त्याला ईश्वर दिसला नाहीं किंव आत्माहि कळला नाहीं; पण दुःखाचें मूळ जें तृष्णा तें त्याला कळलें आणि दुःख व दुःखनाश याचा कार्यकारणभावहि कळला.

(—हिंदी संस्कृति व अहिंसा.)

(१७४) **शिष्यगणः**—बुद्धाचें चरित्र व तत्त्वज्ञान हें वरीलप्रमाणें आहे. ईश्वर व जगाचें मूल कारण यांच्या शोधाच्या भानगडींत न पडतां सत्य, अहिंसा, ब्रह्मचर्य, मिताहार, जीवनाची क्षणभंगुरता, तृष्णाक्षय, मद्यादिकांचें असेवन, दुसऱ्याला दुःख न देणें, कपट न करणें, परस्त्रीगमन, निंदा, विश्वासघात न करणें, दयाशील असणें इत्यादि नीतितत्त्वांचा उपदेश लोकांच्या बोलभाषेंत मगध व कोसल देशांतील प्राकृत भाषेंत करण्यास त्यानें प्रारंभ केला. त्यामुळें त्याच्या शिष्यगणांत सारिपुत्र व मोग्गलान हे ब्राह्मण, आनंद व देवदत्त हे क्षत्रिय, सुनीत हा भंगी, तपुस्स व भल्लिक हे वैश्य, उपाली हा न्हावी, काश्यपबंधु हा जटिल, अंबपाली ही वेश्या, चूंद हा लोहार, अजातशत्रु हा राजा असे सर्व समाविष्ट झाले.

(१७५) **बुद्ध व ब्राह्मण**:-बुद्धाचा मोठा कटाक्ष ब्राह्मणांवर असे. ब्राह्मणांचीं शास्त्रें शिकाल तर अधोगतीस जाल, कारण तीं शास्त्रें अनुभवावर रचलीं आहेत, अनुभव म्हणजे पदार्थ व इंद्रियें यांचा संनिकर्ष होय, पण या संनिकर्षानेंच वासना उत्पन्न होते व ती सर्व अधोगतीचें मूळ आहे, म्हणून वासना उत्पन्न करणारीं शास्त्रें शिकूं नयेत असा त्याचा कोटिक्रम असे. तो क्षत्रिय जात सर्वांत श्रेष्ठ आहे असें म्हणे. त्यानें जातिभेद मोडण्याविषयीं प्रयत्न केला नाहीं, तर क्षत्रिय जात उच्च ठरविण्याचा त्यानें मोठा प्रयत्न केला. ब्राह्मणांच्या यज्ञयागांची निंदा बुद्धपूर्वकालींच चालू झाली होती, तिचा फायदा बुद्धानें घेतला. हिंसाप्रधान यज्ञ करूं नका, ते यज्ञ-विधि ज्यांत सांगितले आहेत ते वेद व त्या वेदांतील देव मानूं नका, निर-निराळ्या देवतांच्या उपासनेंत काळ घालवूं नका, तर दुःखमय व क्षणिक जगतांतील विषयांपासून निवृत्त होऊन मन शांत, वासनाशून्य करून निर्वाण-पदाची प्राप्ति करून घ्या असा तो उपदेश करी. (ज्ञानकोशाधारें)

(१७६) **उपदेशसार**:-बुद्ध हा बुद्धि हाच आत्मा म्हणे. तथापि मन शांत, विरक्त व निष्काम करणें, हें जसें मोक्षप्राप्तीला आवश्यक म्हणून सांगितलें आहे, तसेंच तें निर्वाणप्राप्तीलाहि पाहिजे. संन्यास घेतलेल्या मनुष्याला निर्वाणपदाची प्राप्ति होते. म्हणून प्रत्येकानें संन्यास घ्यावा हें बरें. ज्या गृहस्थांना हें शक्य नाहीं, त्यांनीं अहिंसा, अस्तेय, सत्य हीं नीति-तत्त्वें पाळावींत. बुद्ध भिक्षूंस दानधर्म करावा व बुद्धाला, त्याच्या धर्माला आणि त्याच्या संघाला शरण जावें म्हणजे चित्तशुद्धि होईल असें त्याचें मत होतें. बुद्धाच्या शिष्य-प्रशिष्यांनीं परस्परविरोधी अशीं अनेक भाष्यें त्याच्या उपदेशावर केलीं असल्यामुळें त्यांचें संकलन थोडक्यांत सांगणें कठीण आहे. तथापि बुद्धधर्माचा भर नीतितत्त्वावर आहे, अशी जी समजूत आहे ती यथार्थ आहे. संन्यास किंवा गृहत्याग यावर त्याचा भर नसे. गृहस्थाश्रमाला गौण न लेखतां भिक्षुस्थिति ही उच्च असें तो मानी. बुद्धानें यज्ञीयपशुहिंसेविरुद्ध प्रतिक्रियात्मक अहिंसा प्रति-पादिली. पण त्यानें क्षत्रियांना राजधर्माचा त्याग सांगितला नाहीं. संसाराच्या क्षणभंगुरतेचा व दुःखमयत्वाचा सिद्धांत त्यानें प्रतिपादन केला, तो बुद्धो-त्तर कालांत हिंदुधर्मांत घुसला.

(१७७) तर्कतीर्थमतपरामर्श-"यज्ञामुळें गवादि पशूंची हत्या होई, क्षत्रिय आपआपसांत भांडत असत. एक साम्राज्य नव्हतें. म्हणून कृषि, शिल्प, वाणिज्य इत्यादि व्यवसायांना उत्तेजन नसे. कारागिरांची हीन स्थिति होती. साथीचे रोग, दुष्काळ व अतिवृष्टि यांमुळें समाज दुरवस्थेंत होता. श्रौतस्मार्त समाजरचना निरुपयोगी ठरली होती. नवी समाजरचना उत्पन्न करण्याचें ज्ञान समाजाला नव्हतें. अशा वेळीं तीव्र बंधनांनीं व्यथित झालेल्या सामाजिक आत्म्याला बुद्ध व जिन यांच्या द्वारा 'दुःखं दुःखं' दुःखच दुःख अशी वाचा फुटली. जीवनविषयक तत्त्वज्ञान विशिष्ट सामाजिक परिस्थितीचा परिपाक असतें. त्याप्रमाणें बुद्ध-तत्त्वज्ञान हें वरील स्थितीचा परिपाक होय. (हिंदुधर्म-समीक्षण पान. १९७-२००)

(१७८) तत्त्वज्ञानदृष्ट्या खंडनः-हिंदुधर्मसमीक्षाकारांनीं बुद्धाच्या दुःखवादाची जी वर उपपत्ति दिली आणि एका दृष्टीनें जें समर्थन केलें आहे तें तर्कदुष्ट आहे. बुद्धाच्या दुःखवादाला तत्त्वज्ञान म्हणतांच येणार नाहीं. सर्व शास्त्रांचे जे निष्कर्षभूत परमसिद्धांत असतात, त्यांचा साकल्यानें विचार करून तत्त्वज्ञान उदित होतें. तत्त्वज्ञान म्हणजे अनुभवांचा, प्रयत्नांचा, सुखदुःखांचा शेवटचा निर्णय. तत्त्वज्ञान म्हणजे परिस्थिति-सापेक्ष घोषणा नव्हे ! परिस्थितीचा पडसाद नव्हे ! तर अनुभवांचें व विचारांचें एकीकरण म्हणजे तत्त्वज्ञान होय.

"जडस्य चेतनस्य वा वस्तुनः भावः मूलस्वरूपं तत्त्वं इति तत्त्वशब्दव्युत्पत्तिः । मूलस्वरूपज्ञानं हि मोक्षोपयोगि भवति । तथा च यस्य ज्ञानं मोक्षोपयोगि भवति तत् तत्त्वं इति तत्त्वलक्षणं पर्यवसन्नम्"

भावार्थः-जड वा चेतन वस्तूचें मूलस्वरूप म्हणजे तत्त्व. त्याचें ज्ञान मोक्षोपयोगी असतें. जें ज्ञान मोक्षास उपयुक्त तेंच तत्त्वज्ञान होय.

बुद्धाला सर्व परिस्थिति अनुकूल होती. तत्कालीन समाजरचनेनें त्याला मुळींच अडथळा केला नव्हता. समाजरचना जर अनिष्ट होती तर ती बदलून घेण्याचा मार्ग दुःखवाद हा नव्हे.

बुद्धपूर्वकालांत सांख्यांनीं संन्यासी व नैष्ठिक ब्रह्मचारी अशा साधकांकरितां सोपा म्हणून दुःखवाद मांडला. सांख्य यतींनीं परमार्थमार्गांत अड-

चणी येऊं नयेत व विश्वाबद्दल वैराग्य उत्पन्न व्हावें म्हणून यतींकरितां जो दुःखवाद सांगितला, तोच बुद्धानें सर्वांच्या बोकांडीं बसवला.

बुद्ध म्हणतो-' जग हें इतकें दुःखमय आहे कीं सर्व महासागरांचें पाणी एकत्र घेतलें तरी त्याच्यानें, सृष्टि निर्माण झाल्यापासून जीवांच्या डोळ्यांतून वाहवलेल्या अश्रूंची बरोबरी करवणार नाहीं.' बुद्धानें जगांत दुःखच दुःख आहे असें सांगितलें. त्याच्या प्रचारार्थ संघ स्थापन करून सर्व समाजाला त्याच्या पकडींत आणण्याचा यत्न केला. ' दुःखं, शून्यं आणि क्षणिकं ' हें तत्वज्ञानच असंबद्ध आहे. जगांत दुःख आहे आणि जर तें क्षणिक आहे, तर आक्रोश कशाला ? आणि सर्वत्र जर शून्य आहे, तर मग दुःख तरी आहे कोठें ? असे अनेक आक्षेप घेतां येण्याजोगे आहेत.

बुद्धाचा दुःखवाद हा तत्कालीन सामाजिक स्थितीचा मुळींच परिपाक नव्हता. तर तो एक मनुष्यस्वभावाचें व जगाचें पूर्ण ज्ञान नसलेल्या अज्ञान माणसाचा टाहो होता. जरा, व्याधि व मृत्यु, आणि माणसांतील कलह पाहून त्याला वैराग्य प्राप्त झालें. कोणत्या समाजरचनेंत या गोष्टी नष्ट करितां येतील ? समाज कितीहि सुधारला, अगदीं गरजेप्रमाणें दाम, व शक्तीप्रमाणें काम असें जरी ठरवलें तरी जरा, व्याधि व मृत्यु आणि परस्पर कलह हे नष्ट करतां येतील काय ?

संन्यासी, यति, गोसावी, यांनीं गृहस्थाश्रमाचें महत्त्व कमी करण्याकरितां ज्या वादाचा आश्रय केला, साधुसंतांनीं भगवद्भक्ति वाढविण्याकरितां ज्याला हाताशीं धरलें, पौराणिकांनीं नीतितत्त्वें खुलवून सांगण्याकरितां ज्याचा उपयोग केला तोच दुःखवाद बुद्धानें शून्यामध्यें विलीन होण्याकरितां मांडला. निर्वाणप्राप्ति म्हणजे शून्यस्थिति, हें बुद्धाचें ध्येय होतें. म्हणजे त्याच्या दृष्टीनें कांहीं काल्पनिक आनंदाकरितां त्यानें दुःखवाद मांडला. दुःखवादाचा वैराग्याशीं, वैराग्याचा नीतीशीं संबंध जोडून अहिंसादि तत्त्वांचा नैतिक उपदेश बुद्धानें केला. तत्त्वदृष्ट्या नीतीची उपपत्ति वैराग्यानें वा दुःखवादानें लागत नाहीं. पूर्ण नीतीची स्थापना प्रपंचतिरस्कारानें शक्य नाहीं. दुःखवाद व प्रवृत्तिमार्ग यांचा मेळ बसणार नाहीं. कारण नीतीमध्यें प्रवृत्तीचें शुद्ध स्वरूप प्रगट व्हावयाचें असतें. मनुष्यमात्राच्या हिताशीं संबद्ध असलेलें आचरण म्हणजे नीति होय.

सांख्यांनीं परमार्थाला साधक म्हणून दुःखवाद सांगितला, पण सांख्य हे कांहीं सामाजिक परिस्थितीच्या जुलमामुळें पीडित झाले नव्हते. उपनिषत्कालानंतर सांख्य यति पुढें आले. त्यांनीं कोणत्या भूमिकेवरून दुःखवाद सांगितला हेंहि ज्याला समजलें नाहीं, त्याचें दुःखवादात्मक तत्त्वज्ञान परिस्थिति-सापेक्ष व सामाजिक जीवनाचें परिणत फल होतें असें म्हणणें तर्कदुष्ट आहे.

(१७९) **अन्यमतपरामर्शः**–कांहीं विद्वान 'बुद्धानें दुःखवाद मांडला म्हणून त्याला दोष देतां येणार नाहीं' असें प्रतिपादन करतात. कारण जगांत पुष्कळांच्या वांट्यास दुःखच आलेलें असतें आणि कांहींनाच सुखानुभव येतो. पण यावरून जग हें फार तर सुखदुःखमिश्रित आहे, असें म्हणतां येईल. तत्त्वज्ञान हें त्रिकालाबाधित असतें. अन्वय-व्यतिरेकानें तें सिद्ध होतें. म्हणून जगांत सुखापेक्षां दुःखच अधिक आहे, असें दुःखवादात्मक तत्त्वज्ञान मांडतां येणार नाहीं. मनुष्य सुख विसरतो व दुःख विसरत नाहीं येवढेंच.

बुद्धानें सर्वं दुःखं, सर्वं क्षणिकं या सिद्धांताबरोबर सर्वं शून्यं असा सिद्धांत मांडला. त्यामुळें त्याचें तत्त्वज्ञान निराधार व ध्येयशून्य झालें. हें जग दुःखमय असलें तरी त्याच्या बुडाशीं नित्य, चिरंतन, अविनाशी, आनंदात्मक असें जर कांहीं तत्त्व असेल तर त्याच्या प्राप्तीकरतां मनुष्य दुःखी जगताचा त्याग करून तत्त्वप्रवण होईल. परंतु बुद्धाच्या शून्यवादांत तो आनंद नाहीं हें स्पष्ट आहे. दुःखवादाच्या प्रचारार्थ अहिंसा व संन्यास अशा दोन तत्त्वांची जोड बुद्धानें दिल्यामुळें त्यांचाहि अतिरेक झाला व त्यांचे अनर्थ समाजाला इतके भोंवले कीं अद्याप त्याचा परिहार होत नाहीं.

(१८०) **बुद्धतत्त्वज्ञानाची छापः**–गौतमबुद्धाच्या 'दुखं, शून्यं, क्षणिकं' या तत्त्वज्ञानानें लोकांच्या मनाची पकड घेतली. वैदिक कर्ममार्गांतील कठोरता, यज्ञाचें अवडंबर आणि वर्णविषयक जाचक बंधनें यांमुळें त्रस्त झालेले लोक बुद्धधर्मामुळें आनंदी झाले. ते भराभर या धर्मांत शिरले. क्षत्रियांची जात, विशेषतः व्रात्य क्षत्रियांची जात सर्वांत श्रेष्ठ ठरल्यामुळें त्या समूहाला मोठा अभिनिवेश चढला. बुद्धाच्या नवीन धर्माचा प्रसार व्रात्य क्षत्रिय वैश्यांमध्यें आणि इतरांमध्येंहि फार त्वरित

झाला. एक लक्ष शाक्य कुलें व इतर कित्येक शाक्येतर कुलें हीं भराभर बुद्धानुयायी झाल्यावर इतर क्षत्रियवैश्यांनाहि बुद्धधर्मदीक्षा घ्यावीशी वाटली. बुद्धपूर्व तत्त्वज्ञानाच्या परंपरेचा परिणाम क्षत्रियांवर झालाच होता. पुष्कळ क्षत्रिय राजे ब्रह्मवेत्ते होण्याकरितां यत्न करीत, चर्चा घडवीत, तशांना बुद्धोपदेश म्हणजे एक अमूल्य देणगी वाटली आणि बुद्धानुयायी होण्यांत त्यांनीं कृतार्थता मानली. बुद्धासारख्या राज्यवैभवावर लाथ मारलेल्या धर्मोपदेशकाचा परिणाम सामान्य जनांवर तर विलक्षण झालाच, पण सर्व त्रैवर्णिकांवरहि त्याची विलक्षण छाप पडली. त्यामुळें वैदिक कर्म आणि चातुर्वर्ण्यादि संस्था यांविषयीं अनादर व तिरस्कार उत्पन्न झाला. ब्राह्मण हे वैदिक तत्त्वविचार व वैदिक कर्ममार्ग यांमध्यें अपवादभूत म्हणूनच शिल्लक राहिले. पण सर्वसामान्य सर्व समाज 'दुःखं, शून्यं, क्षणिकं,' या तत्त्वज्ञानाला भाळला जाऊन भिक्षु होण्याच्या मार्गास लागला. बुद्धधर्माचा प्रसार तो जिवंत असतांनाच कोसल, मागध इत्यादि देशांत चांगला झाला. ब्रह्मावर्ताच्या पश्चिमेस त्यानें संचार केल्यामुळें तिकडेहि व्रात्यसमूहांमध्यें त्याच्या धर्माचा प्रसार हां हां म्हणतां झाला.

(१८१) **बौद्धधर्माच्या प्रसाराचीं कारणें**:-या धर्माचा प्रसार व्रात्यक्षत्रियवैश्यांमध्यें प्रथम झाला. तथापि सार्वत्रिक प्रसार होण्यास जीं कारणें घडलीं तीं अशीं:-(१) वैदिक धर्मामध्यें अतींद्रिय प्रश्नासंबंधीं सारखी वाटाघाट चालत असे. ही वाटाघाट सामान्य जनांच्या आवांक्याबाहेरची असल्यामुळें गौतमबुद्धानें ती टाळली आहे. (२) वैदिक धर्माचा सर्व भर तर्कापेक्षां श्रद्धेवर होता. वेदांच्या अपौरुषेयत्वावर व प्रामाण्यावर त्याची सर्व भिस्त होती. बौद्धधर्माची उभारणी सामान्य जनांना समजेल अशा तऱ्हेच्या विचारांवर केली गेल्यामुळें प्रत्येक माणसाला स्वतःच्या बुद्धीनें धर्मातील गुणावगुण कळून घेण्याची सवड आहे. (३) अहिंसा, प्रेम आणि मैत्री ( सर्व भूतांविषयीं अनुकंपा ), त्याचप्रमाणें सर्व प्राण्यांविषयीं बंधुभाव या बौद्ध धर्मातील तत्त्वांची छाप, ज्यांची यज्ञयागादिकांवरची श्रद्धा डळमळीत झाली होती त्यांवर सहज पडली. (४) वैदिक धर्मविधींची भाषा संस्कृत असल्यामुळें आणि शास्त्रग्रंथहि त्याच भाषेमध्यें असल्यामुळें ते सामान्य जनांना दुर्बोध होते. बौद्धधर्मातील विधि,

उपदेश व धर्मग्रंथ हे लोकांना जी भाषा समजत असे त्याच भार्षेत लिहिलेले असत.

(१८२) **महायानपंथाचा उदय:**–बुद्धानें आपल्या धर्माच्या तत्त्वज्ञानांत, नीतितत्त्वांत व आचारधर्मांत वरीलप्रमाणें सौलभ्य आणलें व बहुजनसमाजाला आकर्षून घेतलें. तथापि बुद्धिमान समाजांत त्याच्या तत्त्वज्ञानाबद्दल लौकरच संशय उत्पन्न झाले. कारण त्या तत्त्वज्ञानांत युक्तिसिद्धता नव्हती. बौद्धधर्माचें मूळचें स्वरूप शुद्ध निरात्मवादी व निवृत्तिपर होतें. पण पुढें तें तसें राहिलें नाहीं. बुद्धाच्या बुद्धिमान अनुयायांमध्यें मतभेद होऊन वैभाषिक, सौत्रांतिक, योगाचार व माध्यमिक असे पंथ उत्पन्न झाले. पुढें पुढें तर बुद्धाच्या धर्मोपदेशाला हीनयान असें नांव ठेवून स्वतः महायान असें नांव धारण करणारा एक पंथ अस्तित्वांत आला. या पंथांतील विचारसरणी वैदिकधर्माच्या अगदीं जवळची अशी होती. बुद्धाचें तत्त्वज्ञान तर्काला न पटणारें कसें आहे हें समजण्याकरितां बौद्ध व वैदिक यांच्या तत्त्वज्ञानांतील कांहीं फरक येथें नमूद करतों:—(१) सृष्टीच्या बुडाशीं नामरूपाव्यतिरिक्त आत्मस्वरूपी परब्रह्मासारखी एक नित्य वस्तु असून ती सर्वव्यापक अशी आहे हें म्हणणें बुद्धाला मान्य नव्हतें. (२) आत्मानात्मविवेक किंवा ब्रह्मचिंतनांत काळ घालविणें हें मूर्खपणाचें आहे असें तो म्हणे; कारण त्याला ब्रह्मभूयत्व मान्य नव्हतें. (३) कर्मशास्त्रानुसार आत्म्याला (बुद्धि हाच आत्मा) पुनर्जन्म प्राप्त होतो. (४) हा दुःखमय पुनर्जन्म जर चुकवावयाचा असेल तर तृष्णाबीजाचा विध्वंस संन्यास घेऊन केला पाहिजे. (५) वैराग्यानें तृष्णाक्षय करून बौद्ध भिक्षु बनणें हाच शाश्वत शांतिसुखाचा खरा मार्ग आहे.

(१८३) **महायानपंथाचा प्रसार:**–वर ज्या महायान पंथाचा उल्लेख केला तो पंथ सम्राट अशोक याच्या कारकीर्दीत उदयास आला. हिंदुस्थानांतील बौद्धसंप्रदायाच्या इतिहासांत अशोकाच्या कालाला सुवर्णयुग म्हणतात. अशोक बुद्धधर्माचा अनुयायी झाला. या बलाढ्य राजाच्या पाठिंब्यामुळें हिंदुस्थानांत या विचारांचा प्रसार फार जोरानें झाला. कोणत्याहि धर्माच्या प्रसाराला राजकीय सत्तेचें मोठें साहाय्य लागतें. त्यामुळें बुद्धधर्माचे प्रचारक हिंदुस्थानाबाहेर गेले. काश्यप मातंग हा पहिला बुद्धधर्मप्रचारक चीनमध्यें प्रवासांतील अनेक अडचणी

सोसून गेला. चिनी भाषेमध्यें त्यानें जन्मभर धर्मप्रचार केला. काश्यप-मातंगाचे मागून धर्मरक्ष, आर्यकाल, सुविनिय हेहि चीनमध्यें गेले. तिबेटांतहि कांहीं धर्मप्रचारक गेले. काश्मीरचा राजा गुणवर्मा हा सिलोन व जावा या बेटामध्यें धर्मप्रचारार्थ गेला. त्याच्यामागून धर्मरुचि, रत्नमति, बुद्धशांत इत्यादि सुमारें पन्नास साठ उपदेशक ब्रह्मदेशापासून जपानपर्यंतच्या प्रदेशांत गेले, असें विद्वानांचें मत आहे. अशोकाचा मुलगा व त्याचा भाऊ हेहि धर्मप्रचारक बनले. पश्चिमेकडील देशांत कोणी उपदेशक गेले कीं नाहीं हें अद्याप पुढें आलेलें नाहीं.

(१८४) **बौद्ध तत्त्वज्ञान व आक्रमकः**–बौद्ध तत्त्वज्ञानाच्या प्रसारामुळें परकीयांना या देशावर स्वाऱ्या करण्याचा मोह उत्पन्न झाला कीं काय असा प्रश्न उपस्थित होतो. कारण 'दुःख, शून्य, क्षणिक' हें निवृत्तिपर तत्त्वज्ञान जगाकडे दुर्लक्ष्य करण्यास सांगतें. अहिंसा म्हणजे प्रतिकारशून्यता असा समज साहजिकच होतो आणि बौद्ध भिक्षूंच्या वर्तनानें त्याची सत्यता परक्यांना पटली असावी. हिंदुस्थानासारख्या संपन्न देशांत ऐहिक वैभवाकडे तें दुःखमय म्हणून दुर्लक्ष्य करावें आणि अहिंसा तत्त्वाच्या अंगिकारानें अप्रतिकारी व्हावें असें प्रतिपादन करणारें तत्त्वज्ञान आहे असें कळतांच कांहीं धूर्तांनीं या देशावर स्वाऱ्या करून तेथें धडगंच लूट मिळविण्यास पूर्ण अवसर आहे असा कयास केला असेलच. शिकंदरापासून तों अब्दालीपर्यंत जे जे परकी लोक इकडे आले त्यांच्या पथ्यावर हें बुद्ध तत्त्वज्ञान पडलें असावें, असें अनुमान करण्यास जागा आहे. हिंदुस्थानाबाहेर गेलेल्या प्रचारकांनीं हिंदुस्थान कसें आहे, याची कल्पना दिली आणि हिंदुस्थानांतील प्रचारकांनीं राजाश्रयानें बौद्ध भिक्षु तयार करणारीं पाटणा, नालंदा, तक्षशिला इत्यादि फार मोठमोठीं विद्यापीठें स्थापिलीं.

(१८५) **तिपिटकाचें संशोधनः**–अशोकाच्या वेळीं निरनिराळ्या ठिकाणीं निरनिराळे बौद्ध संप्रदाय होते. त्यांचें एकीकरण करण्याकरितां त्यानें खिस्तपूर्व २५३ चे सुमारास एक धर्मसमिति बोलाविली. तिचा अध्यक्ष मोग्गलीपुत्र तिष्य होता. सुमारें हजार भिक्षूंनीं नऊ महिने खपून तिपिटक नांवाच्या ग्रंथाचें संशोधन केलें आणि त्याचा प्रसार राजसत्तेच्या

आश्रयानें हिंदुस्थानभर व बाहेरहि केला. अशोकानंतर बौद्ध तत्त्वज्ञानाचा प्रसार करणारा दुसरा सम्राट कनिष्क हा होय. यानें महायान पंथाची दीक्षा घेतली होती. कनिष्कानें बौद्ध धर्मांचा अभ्यास सुरू केल्यावर त्याला परस्पर विरोध दिसून आला. त्याची एकवाक्यता करण्याकरितां त्यानें अशोकाप्रमाणें एक मोठी धर्मसमिति भरविली. वसुमित्र हा अध्यक्ष व अश्वघोष हा त्या सभेचा उपाध्यक्ष होता. या सभेमध्यें सुत्त, विनय व अभिधम्म या पिटकत्रयावर भाष्यें लिहिलीं गेलीं. त्यांचा प्रसार कनिष्कानें केला.

—*—

## प्रकरण आठवें

# बौद्धसंस्कृतीचें आर्यसंस्कृतीवर आक्रमण

गेल्या प्रकरणांत बुद्धाच्या दुःखवादाची उत्पत्ति, प्रभाव आणि प्रसार यांची त्याच्या चरित्रासह माहिती दिली. प्रस्तुत प्रकरणामध्यें बौद्ध-संस्कृतीनें आर्यसंस्कृतीवर आक्रमण करून कोणकोणते अनिष्ट संस्कार केले याचें विवेचन करावयाचें आहे.

(१८६) दुःखवादाचें बंड:—बौद्धसंस्कृति म्हणजे आर्यसंस्कृती-विरुद्ध एक बंड होतें. बौद्धक्रांति म्हणजे भयंकर सामाजिक क्रांति होती. फार काय, पण बौद्ध तत्त्वज्ञान म्हणजे विनाशाचें तत्त्वज्ञान होतें. उपनिषदामध्यें जो तत्त्वविचार आहे, जी निवृत्ति आहे, ती ऐश्वर्यसंपन्न समाजाची स्वाभाविक मनोवृत्ति होती. ऐश्वर्याची रेलचेल झाल्यावर निरतिशय सुखाची ती जिज्ञासा होती किंवा धर्मार्थकामप्राप्तीच्या पूर्ण तृप्तीची ती ढेकर होती! पण, बुद्धपूर्वकालापासून तिचें स्वरूप पालटलें. जी ज्ञानाची सहजवृत्ति, जी त्यागाची स्वाभाविक प्रवृत्ति ती जाऊन तिजमध्यें कृत्रिमता आली. सहजत्याग गेला व कृत्रिम

त्याग आला व त्याचें महत्त्व वाढविण्याकरितां जगांत दुःख आहे, या तत्त्वाची मीमांसा उत्पन्न झाली. आनंद, ऐश्वर्य, सत्ता, स्वामिभाव यांची वैदिक मीमांसा कुणीकडे व बुद्धाची दुःखमीमांसा कुणीकडे ? कुठें इंद्राचा ऐरावत व कुठें शामभटजीची तट्टाणी ! दोहोंमध्यें जमीन-अस्मानाचें अंतर ! पण हेंच तत्त्वज्ञान जगापुढें आलें व ऋग्वेद व यजुर्वेद संहितेंतील जिवंत विचार पूर्ण लोपले. वैदिकवृत्ति मारण्याकरितां वासनाक्षयाचे पाठ दिले गेले. उपनिषदांमध्यें विशेषतः सांहितिक वाङ्मयामध्यें जगत् दुःखमय आहे, तें शून्य आहे, क्षणिक आहे हें तत्त्वज्ञान नाहीं. तेथें आनंद, सुख, ऐश्वर्य यांचें तत्त्वज्ञान आहे. बुद्धाला सर्वत्र पाप, दुःख व अपावित्र्य हीं दिसत होतीं. परंतु वेदांमध्यें याच्या उलट विचार आहेत. जगांत सर्व 'पाप पाप' म्हणून बुद्ध त्या पापी जगापासून अलिप्त राहाण्याचा व शुद्ध राहाण्याचा उपदेश करतो तर, वेद हे शरीराच्या सर्व इंद्रियशक्तींमध्यें व जगामध्यें देवतांचें अधिष्ठान आहे असें सांगून, त्या देवतांच्या साह्यानें देवांचें यजन करण्याची अनुज्ञा देतात ! देवाच्या प्रेरणेनें सर्व होत आहे, त्याच्या शक्तीनें मी हें कृत्य करतों असा भाव वेद उत्पन्न करतात व जगांत देवतांचें अस्तित्व भासवितात.

(१८७) **वैदिक आनंदवादः**–सामान्य कर्मांपासून तों प्रधान वैदिक यज्ञकर्मांपर्यंत इंद्रियांच्या ठिकाणीं देवता कल्पून वैदिककर्मांचा विचार केलेला आहे. नारायणोपनिषदामध्यें एक सुंदर रूपक आहे तें त्रिसुपर्णाच्या पाठांत येतें. "**तस्यैवं विदुषो यज्ञस्यात्मा यजमानः श्रद्धा पत्नी शरीरमिध्ममुरो वेदिर्लोमानि बर्हिर्वेदः शिखा हृदयं यूपः कामः आज्यं मन्युः पशुस्तपोऽग्निः**" या मंत्राचा अर्थ 'आत्मा हाच कोणी यजमान, श्रद्धा ही पत्नी, शरीर हें इंधन, वक्षःस्थल ही वेदि, केस हे दर्भ दर्भमुष्टि शेंडी, हृदय हें यूप, वासना ह्या हवि, क्रोध हा पशु, व तप हा अग्नि अशा भावनेनें जो वागतो त्याला यज्ञ केल्याचें फळ मिळतें,' असा आहे. सर्व जग भावनेनें चाललें आहे. सुख व दुःख या दोन्ही भावनाच आहेत. परंतु, वेदाची दृष्टि सुख व आनंद या भावना वाढविण्याकडे आहे. अल्पावर महदाची भावना म्हणजेच उपासना होय ! क्षुद्र विचार, क्षुद्र कल्पना सोडून उच्च विचार, उच्च भावना

यांमध्यें मानवी जीवितार्चे अस्तित्व आहे व साफल्य आहे; असाच वेदाचा सिद्धांत आहे. कोणतेंहि कर्म देवता घडवून आणतात, त्यांचीच प्रेरणा सर्वत्र कार्यकारी होते हें पुरुषसूक्ताच्या शेवटच्या मंत्रावरूनहि समजण्याजोगें आहे.

'**देवस्य त्वा सवितुः प्रसवेऽश्विनोर्बाहुभ्यां पूष्णो हस्ताभ्यामग्नेस्तेजसा सूर्यस्य वर्चसेंद्रस्येंद्रियेणाभिषिंचामि।**' सविता देवाच्या प्रेरणेमुळें अश्विन देवाचे बाहु, पूषन् देवाचे हात, अग्नीचें तेज, सूर्याचें ओज, इंद्राचीं इंद्रियें ह्यांच्या साह्यानें मी अभिषेक करतों, असा या मंत्राचा भावार्थ आहे. यांत पाप, दुःख, घाण यांची वार्ताहि नाहीं. अशा तऱ्हेचे कितीतरी मंत्र सांहितिक वाङ्मयांतून देतां येण्याजोगे आहेत. बुद्धाचा दुःखवाद पुढें आला व त्यानें जगांत दुःखच दुःख भरलें आहे असें सांगितलें. पण जगांत सर्वत्र दुःखच आहे तर माणसें जगतात कशीं? सृष्टि चालते कशी? व्यवहार घडतात कसे? हा मोठाच प्रश्न आहे. त्याचें उत्तर बुद्ध देत नाहीं. अत्यंत दुःखरूपी जगांत माणसांनीं पटापट आत्महत्त्या करून घेतल्या असत्या व सुखाचा मार्ग स्वीकारला असता. तैत्तिरीयोपनिषदांत असा प्रश्नच केला आहे कीं, '**को ह्येवान्यात् कः प्राण्यात्। यदेष आकाश आनंदो न स्यात्॥**' जर हें आकाश किंवा ही पोकळी आनंदरूप नसती तर यांमध्यें कोणी तरी अपानक्रिया किंवा प्राणक्रिया म्हणजे श्वासोच्छ्वास कधीं केला असता काय? अर्थात् कुणीतरी जिवंत राहिला असता काय? ज्याअर्थीं मनुष्य जगांत जिवंत राहातो त्याअर्थीं "**एष ह्येवाऽऽनन्दयाति**" हें सर्व जगत् आनंदस्वरूप आहे. उपनिषदांचें पर्यवसान आनंदमीमांसा करण्यामध्यें झालेलें आहे. सत्, चित्, आनंदस्वरूपाची प्राप्ति कशी करून घ्यावी असा तेथें विचार आहे. तैत्तिरीय व बृहदारण्यक उपनिषदांमध्यें आनंदमीमांसा केली आहे, ती अशी—'तरुण मनुष्य अगदीं तरणाबांड, विद्वान मनुष्य हा चांगला भोक्ता आहे, सुदृढ आहे व बलवान् आहे. त्याच्या स्वाधीन ही सर्व पृथ्वी ( वित्तानें परिपूर्ण अशी ) केली तर, त्याला या पृथ्वीचा जो उपभोग घेतां येईल तो एक मानुष आनंद समजावा! असे शंभर मानुष आनंद म्हणजे एक मनुष्यगंधर्वाचा आनंद; त्याच्या शतपट देवगंधर्वाचा आनंद; त्याच्या शतपट चिरलोक

लोकांत राहणाऱ्या पितरांचा आनंद; त्याच्या शतपट अजानजान देवांचा आनंद; त्याच्या शतपट कर्मदेवानंद; त्याच्या शतपट इंद्रानंद; त्याच्या शतपट बृहस्पतीचा आनंद; त्याच्या शतपट प्रजापतीचा आनंद व त्याच्याहि शतपट परब्रह्माचा आनंद आहे इत्यादि. ही मीमांसा मानुषानंदापासून सुरू झाली व ती परब्रह्मापर्यंत गेली. हा मानुष आनंद तरी सामान्य आहे काय ? तोहि असामान्य कोटींतीलच आहे.

**पृथिवी रत्नसंपूर्णा हिरण्यं पशवस्त्रियः ।**
**नालमेकस्य पर्याप्तमिति मत्वा शमं व्रजेत् ॥**

हें जें तत्त्व भारत व भागवतांत सांगितलें आहे, तेंच वरील आनंदमीमांसेंतहि आहे. रत्नानें भरलेली पृथ्वी, द्रव्याच्या राशी, स्त्रिया, पशु, इतर उपभोग्य वस्तु हीं सर्व मिळवूनहि मनुष्याला पुरेशी तृप्ति लाभत नाहीं असा विचार करून शमाचा स्वीकार करणें हेंच योग्य आहे. मानुषानंदाची तृप्ति होऊन ढेकर आली म्हणजे मग पुढें जाणें उचित आहे. पण बुद्धाच्या दुःखवादामध्यें तृप्तीचा ढेकर नसून तेथें पित्ताच्या ढेकरा उत्पन्न झालेल्या दिसतात! भोगानंतर त्याग, पांडित्य संपादन केल्यावर मग ' पांडित्यं निर्विद्य ', मिळविल्यानंतर दान हें तत्त्व तेथें नाहीं तर, मुळापासूनच वासना मारण्याची शिकवण आहे. बुद्धाला सर्वत्र अपवित्रता दिसत होती, तर वेदांना सर्वत्र सुख, पावित्र्य व पौरुषाला पूर्ण अनुकूल असें जग दिसत होतें. " हे वायु मधु आहेत, हे समुद्र मधु आहेत, या औषधी, या वनस्पति, हे दिवस, ह्या रात्री सर्व कांहीं मधुमधु आहेत; गोड आहेत, अनुकूल आहेत, " असा भाव पुढील मंत्रांत सांगितला आहेः—

**मधु वाता ऋतायते मधु क्षरन्ति सिंधवः माध्वीर्नः सन्त्वोषधीः ॥ १ ॥ मधु नक्तमुतोषसि मधुमत्पार्थिवं रजः । मधु द्यौरस्तु नः पिता ॥ २ ॥ मधुमान्नो वनस्पतिर्मधु मां अस्तु सूर्यः माध्वीर्गावो भवन्तु नः ॥ ३ ॥**
—ऋ. १।९०।६ ते ८.

अथर्ववेदामध्यें एक मधुसूक्त आहे. त्यांत सर्व कांहीं मधुच आहे असें विवेचन केलें आहे. बृहदारण्यक उपनिषदामध्यें एक मधुब्राह्मण भाग

आहे. येथें पृथ्वी भूतांना मधु, भूतें पृथ्वीला मधु, आपांना भूतें मधु, भूतांना आप ( पाणी ) मधु, त्याचप्रमाणें वायु, अग्नि, आदित्य, दिशा, चंद्र, विद्युत्, आकाश, धर्म, मनुष्यलोक, आत्मा हे सर्व या भूतांना मधु असून भूतें या सर्वांना मधु आहेत असें सांगितलें आहे. म्हणजे जगांत अन्योन्य उपकारता व उपयोगिता आहे. परस्पर मारकता नाहीं. ती नाहीं म्हणून जगांत सुख, पावित्र्य, उत्साह हीं आहेत. भृगुवल्लीमध्यें तर आनंदापासूनच भूतांची उत्पत्ति सांगितली आहे. "**आनन्देन जातानि जीवन्ति आनन्दं प्रयन्त्यभिसंविशन्तीति ॥**" अशी भार्गवी वारुणी विद्या आहे व ती वरुणानें आपल्या भृगुपुत्राला सांगितली आहे.

(१८८) **वैदिक व बौद्ध तत्त्वज्ञान**-वैदिक आर्यांचें तत्त्वज्ञान प्रवर्तक होतें तर बुद्धतत्त्वज्ञान निवर्तक होतें. आर्यतत्त्वज्ञानांत उत्साह-शक्ति निर्माण करून सर्व क्रिया परिपूर्ण, सुसंगत व सुफलित करण्याची शक्ति होती, तर बुद्धाच्या दुःखवादांत विषाद व औदासिन्य उत्पन्न करून प्रयत्न थांबविला जात असे. वैदिक आर्य हे गृहस्थाश्रमी, कर्मकांडी व ज्ञान-कांडी होते. गृहस्थाश्रम ही त्यांची मुख्य संस्था होती. ते आक्रमणशील व महत्त्वाकांक्षी होते. म्हणूनच त्यांच्या बुद्धींत आनंदवाद निर्माण झाला. सुखाचें मूळ आत्म्यांत आहे. आत्मानंदावर सर्व आनंद अधिष्ठित आहेत म्हणूनच धर्मशास्त्र, समाजशास्त्र, नीतिशास्त्र व उपासनाशास्त्र इत्यादि सर्व शास्त्रें अवश्य आहेत.

वैदिक ऋषींच्या विचारांत जयिष्णुता व महत्त्वाकांक्षा हीं प्रतिबिंबित झालीं आहेत. त्यांचा समाज गतिशील होता. म्हणून तप, पराक्रम, यश, कीर्ति, प्रताप, आशावाद, उत्साह व प्रयत्न हे सीमा ओलांडीत आहेत. वैदिक वाङ्मय आशावादानें फुलून गेलें आहे. वैदिक वाङ्मयांतील आशावादाच्या पाठीमागें सत्कर्म, सामर्थ्य, सत्य, ज्ञान आणि तप यांचें अधिष्ठान आहे! शुद्ध सौंदर्याचा ऋषींना वीट नाहीं! वैदिक वाङ्मयांतून आनंदाचीं कारंजीं बाहेर पडत आहेत. अध्यात्मिक आनंद व आधिभौतिक आनंद यांचें वैदिक वाङ्मयांत संगनमत झालेलें आहे. प्रपंच व परमार्थ गुण्यागोविंदानें एकत्र नांदत आहेत!

(१८९) **दुःखवाद संन्याशांना इष्टः**–दुःखवाद हा संन्याशांना इष्ट असतो. षंढ, रोगी, करंटे, दरिद्री, पौरुषहीन यांनीं दुःखवादाचें भडक चित्र रंगविलेलें आहे, असें शां. प. अ. १० मध्यें भीमानें धर्माला सांगितलें आहे. दुःखवाद नेटका प्रपंच करावयास शिकवीत नाहीं. दुःखवाद्याला गृहस्थाश्रम अडगळीसारखा वाटतो. दुःखवादी मनुष्य या जगांत धर्मशाळेंतील पांथस्थाप्रमाणें वागतो. दुःखवादामुळें '**इदं च नास्ति परं न लभ्यते**' असें होतें. प्रपंच चालवितां येत नाहीं व परमार्थ पचत नाहीं. दंभ व मिथ्याचार यांचें स्तोम माजतें. कोणताच व्यवहार नेटानें व महत्त्वाकांक्षेनें होत नाहीं. त्यामुळें दैववादाला जोर येतो. प्रापंचिक सुख, धंदा, व्यवसाय, कर्तव्य अर्थोत्पादन याकडे दुःखवादानें दुर्लक्ष्य होतें. घरापेक्षां वन प्रिय वाटतें. सभा, समाज, संस्था या ऐवजीं मठांच्या खटपटी सुरू होतात. दुःखवादानें समाजाची व राष्ट्राची अनास्था होते. प्रपंच व परमार्थ यांत विरोध आहे, असा ग्रह बुद्धिमानांमध्यें रूढ होतो. शास्त्रसंपन्न लोक प्रपंचाला तुच्छ मानतात. आणि ब्रह्मर्षींनीं व राजर्षींनीं प्रतिपादलेले सिद्धांत डावलतात. भिक्षु, यति, संन्यासी, साधुसंत यांनीं गेलीं दोन हजार वर्षें दुःखवादाचा पुरस्कार केला. दुःखवादानें अहिंसा, इंद्रियनिग्रह, संयम यांची वाढ होते, पण समाजाची शक्ति खुरडते. दुःखवादामुळें परमार्थप्रवणता उत्पन्न होते, पण प्रपंचाची दैना होते. आनंदवादानें प्रपंच वाढीला लागतो व त्यांतच परमार्थाची सिद्धि होते.

(१९०) **तत्त्वज्ञान व प्रपंचः**–जसें ज्याचें तत्त्वज्ञान तसा त्याचा प्रपंच हा सिद्धांत आहे. कोणत्याहि समाजांत कोणतें तत्त्वज्ञान नांदत आहे येवढें कळलें म्हणजे त्याचा प्रपंच कोणत्या स्वरूपाचा होईल याची अटकळ बांधतां येते. तत्त्वज्ञान व प्रपंच यांचा संबंध बिंबप्रतिबिंबरूप आहे. जें तात्त्विक बिंब मनांत उत्पन्न झालें असेल, त्याचें प्रतिबिंब समाजांत प्रतिफलित होतें. उदाहरणार्थ हिंदु समाजच घ्याः–(१) ऋक्संहितेंत भोग्य वस्तूंची प्राप्ति करून देणाऱ्या व शत्रूंचा नाश करणाऱ्या देवतांचें म्हणजे कल्पनांचें स्तवन केलेलें आहे. त्यावरून तत्कालीन समाजांत ऐश्वर्य-प्राप्ति व शत्रुनाश हीं दोन तत्त्वज्ञानाचीं अंगें होतीं, असें दिसतें. (२) बुद्धाच्या

तत्त्वज्ञानांत भूतदया व निर्वाण हे दोन मुख्य सिद्धांत आहेत. त्यांचें पर्यवसान संन्यास व दौर्बल्य या दोन रूपांनीं समाजांत प्रतिबिंबित झालें. दुष्टांवरहि दया करण्याचा जेथें निश्चय झाला व मरणोत्तर शून्यप्राप्ति होणार अशी जेथें खात्री उत्पन्न झाली, तेथें शकयवनकिरातादि रानटी परंतु बुभुक्षु लोकांनीं निरिच्छ, भिक्षु व श्रमण बनून समाजाच्या प्रपंचाचा चुथडा करावा हें ओघासच येतें. (३) भगवद्गीतेंत बुद्धभिक्षूप्रमाणें कर्मांचा न्यास करणें म्हणजे संन्यास नव्हे व क्लैब्याचा अवलंब करून रानटी शत्रूंचा पगडा बसवून घेणें म्हणजे भूतदया उर्फ शांति नव्हे, असा सिद्धांत केलेला आहे. ह्या सिद्धांताचें प्रतिबिंब तत्कालीन आर्यसमाजावर पडून शकयवनादि म्लेंच्छराजांना आर्यांनीं हांकून देऊन हिंदु राज्याची स्थापना केली.

-( राजवाडे-ऐ.-प्रस्तावना भाग १ पान ३७५ )

(१९१) **दुःखवादाची प्रक्रिया व दार्शनिक वाङ्मय**-बुद्धानें वैदिक कर्मप्रवृत्ति समूळ बंद करून निवृत्ति आणली, वैदिक विचारपरंपरा बदलली, आनंदमीमांसा घालविली व दुःखमीमांसा स्थापन केली. याचें प्रत्यंतर दार्शनिक वाङ्मयावरूनहि चांगलें येतें. एकंदर संस्कृत वाङ्मयांपैकीं जवळजवळ निम्में वाङ्मय दार्शनिक आहे. या आस्तिक व नास्तिक षट्दर्शनांमध्यें दुःखवाद भरलेला आहे व बुद्धोत्तर कालांतील संस्कृत वाङ्मयांमध्येंहि त्याची घोषणा सर्वत्र झालेली आहे. सांख्य, योग, न्याय, वैशेषिक व वेदान्तादि शास्त्रांतील मूळ सूत्रवाङ्मय बुद्धपूर्वकालीन असलें तरी टीका व भाष्यवाङ्मय बुद्धोत्तर कालांतच निर्माण झालेलें आहे. अर्थात् या वाङ्मयांत बुद्धप्रक्रिया पूर्णपणें स्वीकारलेली दिसते.

सांख्यकारिकाः-दुःखत्रयाभिघाताज्जिज्ञासा तदपघातके हेतौ । दृष्टे साऽपार्था चेन्नैकान्तात्यन्ततो भावात् ॥१॥

न्यायसूत्रः-आत्मशरीरेंद्रियार्थबुद्धिमनःप्रेत्यभावफलदुःखापवर्गास्तु प्रमेयम् ॥ १।१।९

न्यायभाष्यः-सुखसाधनस्य दुःखानुषङ्गाद् दुःखेनाविप्रयोगाद्विविधबाधनायोगाद् दुःखमिति समाधिभावनमुपदिश्यते ॥१।१।९

वात्स्यायन न्यायभाष्यांत याचाच अनुवाद आहे. न्यायवार्तिकांत जगांतील एकवीस तऱ्हेच्या दुःखांचें वर्णन केलेलें आहे.

**योगसूत्रः–परिणामतापसंस्कारदुःखैर्गुणवृत्तिविरोधाच्च दुःखमेव सर्वं विवेकिनः ॥२।१५**

ब्रह्मसूत्रांनीं उपनिषदांतील वाक्यांचा समन्वय केल्यामुळें त्यांत दुःखाचा स्पष्ट उल्लेख नाहीं. पण भाष्यकार आचार्य जगत् दुःखमय आहे या मताचेच आहेत. त्यांनीं ऐतरेयोपनिषदांतील "**अस्मिन् महत्यर्णवे**" या पदावरील भाष्यांत संसारदुःखाचें वर्णन मोठ्या बहारीचें केलें आहे.

**"अस्मिन् संसारार्णवे अविद्याकामकर्मप्रभवदुःखोदके तीव्ररोगजरामृत्युमहाग्राहे अनादौ अनंते अपारे निरालंबे विषयेंद्रियजनितसुखलवलक्षणविश्रामे पञ्चेन्द्रियार्थतृष्मारुतविक्षोभोत्थितानर्थशतमहोर्मौ महारौरवाद्यनेकनिरयगतहाहेत्यादिआकूजिताक्रोशनोद्भूतमहारवे सत्यार्जवदानदयाहिंसाशमदमधृत्याद्यात्मगुणपाथेयपूर्णज्ञानोडुपे संसर्गसर्वत्यागमार्गे मोक्षतीरे एतस्मिन् महत्यर्णवे पतितवत्यः ।** ( ऐ. उ. शां. भा. २।१ )

**भावार्थ**–( सांख्यकारिका )–दुःखत्रयांच्या आघातांनीं पीडलेल्या जीवाचा तत्त्वज्ञान हा एकच तरणोपाय आहे. दुःखाची पूर्ण निवृत्ति करण्यास इतर साधनें असमर्थ आहेत. ( न्या. सू. ) आत्मा, शरीर, इंद्रिय, विषय, बुद्धि, मन, पुनर्जन्म, फल, दुःख व मोक्ष असे मोक्षशास्त्राचे विषय आहेत. यांतील दुःख शब्दावर ( न्याय भाष्यांत ) असें म्हटलें आहे 'जगांतील सुखसाधनें दुःखाशीं निरंतर संबद्ध असतात. सुखाला दुःख हें सारखें चिकटलेलें असतें. नानाविध दोषांनीं सुखसाधनें युक्त असल्यामुळें सुखसाधनें हीं मूर्तिमंत दुःख होत. म्हणून एकाग्रचित्तानें समाधिभावाचा उपदेश दुःखशब्दानें केला आहे. ( योगसूत्र ). प्रपंचांतील सर्व सुखें परिणामीं दुःखजनक असतात, त्यांच्या उपार्जनांतहि अत्यंत ताप होत असतो, त्यामुळें वासना पुनःपुनः उत्पन्न होऊन मनाला अत्यंत ताप देतात, म्हणून विवेकी पुरुषांच्या दृष्टीनें प्रापंचिक सुखें मूर्तिमंत दुःख होत. ( शंकराचार्य ).–संसार हा एक मोठा सागर, अविद्या, कर्म, कामनाजन्य जें दुःख तें यांतील अगाध पाणी; भयंकर रोग, जरा व मरण हीं या जलांतील भयंकर जलचरें; अनंत, अपार अशा या समुद्रांत विषयेंद्रियजन्य

जीं क्षणिक सुखें तींच जणूं विश्रामस्थानें असतात. या समुद्रांत विषयतृष्णेच्या महावायूनें क्षोभ होऊन शेंकडों लाटा उत्पन्न होत असतात; रौरवादि नरकांत पडलेल्या दुःखित जीवांच्या किंकाळ्या ही त्या समुद्राची गर्जना होय; ज्ञान ही या समुद्रांतून तरून जाण्याची होडी असून सत्य, अहिंसा, शम, दम, धैर्य इत्यादि सद्गुण ही या नावेंतील शिदोरी होय. सत्संगति व संन्यास हा या होडीचा मार्ग असून मोक्ष हें या समुद्राचें पैलतीर आहे !

महाभारतांतील स्त्रीपर्वामध्यें दुःखमय संसाररूपकाचा एक स्वतंत्र अध्याय आहे. पूर्वमीमांसक हे जगाकडे फारसें लक्ष देत नाहींत. त्यांच्यामतें अभ्युदय म्हणजे स्वर्ग आहे व तो परलोकसंबद्ध आहे. त्यांनीं जगाचा फारसा विचारहि केलेला नाहीं. उत्तरमीमांसेच्या सिद्धान्तामध्यें दुःखनिवृत्ति व परमानंदप्राप्ति हे दोन अंश आहेत. तें शास्त्रच मुळीं इष्टप्राप्ति व अनिष्टपरिहारोपायांकरितां प्रवृत्त झालें आहे. पण या शास्त्रालाहि दुःखवादानें सोडलें नाहीं. शंकराचार्यांनंतर जेवढें निवृत्तिपर संस्कृत, आणि साधुसंतांचें प्राकृत वाङ्मय उत्पन्न झालें त्यांत जन्मापासून मरेपर्यंत दुःखच दुःख भरल्याचे विचार आहेत.

मायावाद व दुःखवाद यांची पक्कड महाराष्ट्राबाहेरच्या समाजावर नाहीं. शंकराचार्यांच्या नंतर झालेले आचार्य आणि चैतन्य वगैरेनीं दुःखवाद व निवृत्ति यांचा स्वीकार केला नसून त्यांच्या तत्त्वज्ञानाची बैठक प्रवृत्तीपर होती असें कांहीं विद्वान मानीत असले व चाणक्यप्रणीत अर्थशास्त्रासारखे ग्रंथहि मधून मधून लिहून मुरड घालण्याचा जरी यत्न केला गेला, तरी हिंदुस्थानांतील बहुसंख्य लोक शांकरमताचेच अनुयायी आहेत. बुद्धाच्या दुःखवादाचे संस्कार हिंदुसमाजाचे मनावर इतके दृढ झाले आहेत कीं सबंध हिंदुसमाज बुद्धाळलेला आहे, असें म्हणणें उचित दिसतें. जैनधर्मानें सनातन वैदिक धर्माशीं बऱ्याच बाबतींत समन्वय केला. बुद्धधर्मानें तसें कांहीं केलें नाहीं. बौद्धांच्या कत्तली मुसलमानांनीं केल्या हें खरें असलें तरी त्यामुळें सर्व बौद्ध हिंदुस्थानाबाहेर गेले असें नाहीं. धर्मोपदेशाच्या निमित्तानें कांहीं बाहेर गेले. कांहीं मुसलमानांच्या धर्मवेडास बळी पडले. पण

बहुसंख्य बौद्ध समाज हिंदु समाजांतच गडप झालेला आहे. निवृत्तीपर नाना पंथ, नाना मतें, परिव्राटांचे निरनिराळे तीस संप्रदाय, भिक्षेकऱ्यांचे वर्ग, हे सर्व बौद्धधर्मनिदर्शकच आहेत. बौद्धधर्माच्या अवनत काळामध्यें अनेक निवृत्तीपर पंथांचें पेव फुटलें. बुद्धानें विकृत मनानें वैदिक धर्माविरुद्ध बंड उभारलें म्हणून त्याचें खंडन अनेक विद्वानांनीं केलें. तथापि सामान्य जनांच्या मनावरील पक्कड कोणालाहि नाहींशी करतां आली नाहीं. अर्थात् तो प्रचंड समाज हिंदुसमाजांत अंतर्भूत झाल्यामुळें हिंदुसमाज बुद्धाळलेला आहे.

(१९२) **बौद्धक्रांतीचें स्वरूप**-(१) बुद्धापूर्वीं चार्वाकानें आपलीं लोकायतिक मतें शूद्रांत व संकरजातींत पसरवून ठेवल्यामुळें आर्यसंस्कृतीविषयीं कुत्सितबुद्धि उत्पन्न झाली होती, तीच बुद्धानें वाढविली.

(२) चातुर्वर्ण्यव्यवस्था मोडून सर्वांमध्यें समता व एकजिनसीपणा आणण्याचा उद्योग व उपदेश बुद्धानें सुरू केला. ( ज्ञानकोशांतील माहितीवरून असें दिसतें कीं, बुद्धानें जाति मोडण्याचा उद्योग न करतां फक्त क्षत्रिय जात ही सर्वश्रेष्ठ आहे असें ठरविण्याचा यत्न केला. त्याची शिकवण ब्राह्मणांविरुद्ध होती. )

(३) बुद्धानें प्राकृत भाषांमध्यें लिहिण्याचा, बोलण्याचा उपक्रम केल्यामुळेंच त्याच्या धर्माचा प्रसार झाला; पण संस्कृत व वैदिक भाषांना काट दिल्यामुळें वैदिक परंपरेचें आयतेंच उच्चाटण झालें !

(४) अहिंसेच्या पुरस्कारानें यज्ञयागादि प्रवृत्तिपर वैदिक कर्में दुष्ट ठरलीं व तिच्या अतिरेकानें समाज निवृत्तमांस, व क्षात्रवृत्तिविहीन असा बनला. समाजांतील क्रौर्य व शौर्य या वृत्ति मारल्या गेल्या. क्षत्रिय राजे हे तत्त्वज्ञानाचे मागें लागून विहारांतील प्रभुत्वाविषयीं धडपड करूं लागले. अशा मेषपात्र समाजाला मुसलमानांनीं जिंकलें हें सर्वश्रुत आहे !

(५) बीज–क्षेत्रशुद्धि हा त्रैवर्णिकांचा विशेष होता. तो मारण्याकरितां पितृपूजामूलक श्राद्धादि कर्में बालिश ठरवून बुद्धानें वैदिक परंपरेला लत्ताप्रहार केला. पूर्वपरंपरेचें विस्मरण होऊं लागलें कीं, संकर सौलभ्यानें होईल हें त्यांचें धोरण होतें.

(६) एकजात सर्वांना संन्यासधर्माची दीक्षा देऊन गृहस्थाश्रम व आश्रमधर्म यांचा धुव्वा उडविला. बौद्धभिक्षु व भिक्षुणी होण्यामध्यें मोठेपणा वाटूं लागल्यामुळें क्षात्रवृत्ति, व्यापार, शेती हे धंदे करणाऱ्या जातींपैकीं पुष्कळ लोक भिक्षु झाले. एकट्या ब्राह्मणांनाच–विशेषतः संन्याशाला भिक्षा मागण्याचा अधिकार असतां तो सर्वांना मिळाल्यामुळें फुकटखाऊ व ऐदी अब्राह्मण भिक्षेकऱ्यांचा सुळसुळाट झाला. गोसावी, बैरागी, जोगी, वाघ्यामुरळी, जोगत्याजोगाप्पा असा फुकटखाऊ बेजबाबदार वर्ग अतोनात वाढला. या सर्वांनीं प्रवृत्तिपर गृहस्थाश्रमाचें महत्त्व नष्ट केलें. मोक्षाकरितां ब्रह्मचर्याश्रमांतच संन्यास घेतला पाहिजे, येथपर्यंत विचारांची मजल गेली.

(७) बौद्धसंस्कृतीच्या प्रसारामुळें शुद्ध त्रैवर्णिक स्त्रियांमध्यें प्राकृत भाषा आल्या. त्यांची संस्कृति त्यामुळें बदलली. गृहपति वैदिक प्रवृत्तीचा व गृहपत्नी प्राकृत व बौद्ध संस्कृतीची असा दूरीभाव उत्पन्न झाला.

(८) स्याद्वाद, बहिःशून्यवाद, अंतःशून्यवाद, सर्वक्षणिकवाद इत्यादि मानसशास्त्रीय व अध्यात्मशास्त्रीयवाद पुढें आल्यामुळें औपनिषद् अध्यात्मविद्या हिणकस वाटूं लागली.

(९) नवीन ऐतिह्य, नवीन दैवतें, नवीन नीतितत्त्वें, नवीन प्रव्रज्या प्रचलित करून अल्पायासानें महत् फल प्राप्त करून देण्याचा नाद सामान्य जनाला लाविला. या दिशाभुलीमुळें शुद्ध त्रैवर्णिक व प्राकृत जनता यांची फाटाफूट झाली.

(१०) वैदिक प्रवृत्तिपर धर्मग्रंथ सर्वस्वीं मागें पडले. हिरण्यकेशी ब्राह्मणांच्या तर्पणांत वेदावर पदवृत्ति किंवा पदभाष्य करणाऱ्या आत्रेयाचा व वेदावर वृत्तिभाष्य किंवा वार्तिकें करणाऱ्या कौंडिण्याचा उल्लेख आहे. हे व अशासारखे ग्रंथ या कालांत जे एकदां मागें पडले ते पुढेंच आले नाहींत.

(११) बौद्धयतिधर्मांतील केशलुंचनादि विधि भिक्षुणींमध्यें आला. भिक्षुणीस्त्रियांचें अनुकरण त्रैवर्णिक विधवा करूं लागल्या. पतिनिधनानंतर निर्वाणप्राप्तीकरितां त्या विहारांत जात, तेव्हां वपन करीत. अर्थात् त्यामुळें अवैदिक अशी वपनाची चाल त्रैवर्णिक विधवास्त्रियांमध्यें रूढ झाली.

(१२) स्त्रियांविषयींचे वैदिक उदात्त विचार नष्ट झाले. स्त्रिया या उपभोग्य, त्यांच्या ठिकाणीं "अनृतं, साहसं, माया, मूर्खत्वं" हे दोष स्वाभाविक असतात असें वाटूं लागलें व त्यांच्याशीं तशी वर्तणूक होऊं लागली.

(१३) बुद्धाच्या पश्चात् त्याच्या त्यक्तावशेषांची मठांमध्यें व विहारांमध्यें स्थापना झाली. तेथें अद्भुत चमत्कार होतात अशा कल्पना आल्या. पुढें याच अद्भुत सामर्थ्याच्या कल्पना मूर्तींविषयीं होऊन समाज मूर्तींवर विश्वास ठेवून स्वस्थ बसूं लागला ! ( रा. मा. वि. चंपूचे आधारें )

(१९३) **दोन इष्ट परिणामः**-बौद्धसंस्कृतीनें आर्यसंस्कृतीवर बहुतक अनिष्ट संस्कार करून तिचा घात केला, हें सर्वस्वीं खरें आहे. तथापि, वाईट होत असतां कांहीं चांगलेंहि होतें असें म्हणतात. त्या दृष्टीनें झालेले दोन इष्ट परिणामहि येथें अवश्य सांगितले पाहिजेत.

(१) वैदिक तत्त्वज्ञान आणि वैदिक आचार यांमध्यें नीतितत्त्वें गुंफलेलीं आहेतच. बौद्ध संस्कृतीनें मुळांतच असलेल्या या नैतिक कल्पनांवर असा कांहीं जोर दिला कीं तीं नीतितत्त्वें लोकांना नवीन वाटलीं. वैदिक कर्मकांडाच्या खटाटोपामुळें आणि तत्त्वज्ञानाच्या सूक्ष्म व कर्कश विचारसरणीमुळें नीतितत्त्वांना पुढें येण्यास यापूर्वीं फारसा वावच नव्हता. गौतमबुद्धानें हीं नीतितत्त्वें लोकांपुढें इतक्या सुरेख तऱ्हेनें मांडलीं कीं, त्यामुळें बहुजनसमाजाला बौद्ध धर्माचें श्रेष्ठत्व वाटूं लागलें. सामान्य जनांना तत्त्वज्ञानाचें आकलन होत नव्हतें. म्हणून निष्पाप आचरण, उत्कृष्ट नीति, अप्रतिम पावित्र्य, जाज्वल्य त्याग, परोपकार, दया, प्रेम वगैरे सद्गुणसंवर्धन करणाऱ्या नीतितत्त्वांकडे लोकांचें लक्ष वेधलें.

(२) बुद्धसंस्कृतीचा आर्यसंस्कृतीवर शिल्पशास्त्राच्या दृष्टीनें दुसरा एक स्वाभाविक सुपरिणाम झाला. बौद्ध भिक्षूंचें जसजसें प्राबल्य वाढूं लागलें, तसतशीं त्यांना राहण्याकरितां, आणि प्रार्थनेकरितां मोठमोठे विहार व देवळें बांधण्याची किंवा दगडांमध्यें अशा जागा कोरण्याची अधिक आवश्यकता भासूं लागली. बौद्ध धर्माच्या अमदानीमध्यें असलीं कोरीव कामें पुष्कळ झालीं आहेत. बुद्ध गया, भरहूत, ( प्रयाग आणि जबलपूर

यांमधील ठिकाण ) येथील उंचउंच दगडी शिखरें; यांच्या सभोंवार कोरलेले सुबक व नक्षीदार कठडे; त्या कठड्यांवर कोरलेले हत्ती, सिंह, सुसरी यांच्या रांगा; झाडांच्या आकृति आणि इतर प्रेक्षणीय देखावे पाहून मन आश्चर्यचकित होतें. ओरिसा प्रांतांतील व्याघ्रगुहा, अजिंठ्याच्या गुहांतील चितारकाम, नाशीकच्या आसपास असणारे मठ हे सर्व प्रेक्षणीय असून त्यांत नक्षीच्या खांबांचा सुबकपणा तर अत्युत्तम साधला आहे. सांची आणि अमरावती ( कृष्णा नदीचे मुखाजवळील एक प्राचीन शहर ) या ठिकाणचीं कोरींव कामें अत्यंत प्रेक्षणीय असून त्यांत परकीय शिल्पकलेची किंचितहि छटा दिसून येत नाहीं. शिल्पशास्त्रां-तील ज्या बारीक सारीक खांचाखोंचा असतात त्यासुद्धां वरील ठिकाणीं इतक्या सफाईनें आणि टापटिपीनें कोरलेल्या आहेत कीं, त्याबद्दल जगांतील सर्व शिल्पशास्त्रज्ञांनीं प्रशंसापर उद्गार काढले आहेत. पुण्याजवळील कार्ल्यांच्या लेण्यासारखीं लेणीं पुष्कळ असून तीं याच कालांतील आहेत.

बौद्धसंस्कृतीनें आर्यसंस्कृतीवर केलेल्या या दोन सुपरिणामांशिवाय इतर दुष्टपरिणामांची यादी वरीलपेक्षां वाढवितां येण्याजोगी आहे. येथें फक्त प्रमुख बाबींचा नामनिर्देश केला आहे. त्यावरून स्पष्ट दिसतें कीं, बौद्धसंस्कृतीनें आर्यसंस्कृतीचा पूर्ण पाडाव करून विजय मिळविला; व इस्लामच्या उग्र, क्रूर व रानदांडग्या अनुयायांना येथें राज्य स्थापण्याची पूर्वतयारी करून दिली ! आमचें असें स्पष्ट मत आहे कीं, बौद्धसंस्कृति जर येथें बद्धमूल झाली नसती व समाजामध्यें वैदिक आर्यांची वृत्ति व संस्कृतीच जर शाश्वत असती तर, इस्लामला पहिल्या एकदोन स्वाऱ्यांनंतर थपडा खाऊन पुनश्च इकडे न येण्याचाच निश्चय करावा लागला असता !

(१९४) **चीन, जपान व बौद्धसंस्कृतिः**—बौद्धसंस्कृतीचा प्रभाव आर्यसंस्कृतीवर पडल्यामुळें ती निस्तेज व निर्वीर्य होऊन राष्ट्राचें व समाजाचें अपरिमित नुकसान झालें हें खरें आहे. परंतु चीन, जपान, तिबेट, इत्यादि देशांतहि बौद्धसंस्कृति गेली होती, तीमुळें या देशांचें नुकसान कितीसें झालें असा येणारा प्रश्नहि विचारार्ह आहे. या प्रश्नाचें सरळ उत्तर हेंच आहे कीं, ही संस्कृति जेथें जेथें गेली ते देश सहिष्णुच झाले.

त्या समाजांमध्यें व देशांमध्यें आज जी जयिष्णु वृत्ति आली आहे तिचें कारण त्यांनीं या संस्कृतीला मुरड घालून तिला व्यावहारिक स्वरूप दिलें व जेथें तें जमेना तेथें निराळी पाश्चात्य संस्कृति स्वीकारली हें होय! चीन, जपान देशांतील लोकांनीं अहिंसेच्या वेडानें झुरळें, बेडक्या, मासे खाण्याचें सोडून दिलें नाहीं. किंवा तेथील एखाद्या राजानें प्राणिहत्येच्या बंदीचा निर्बंधहि केला नाहीं. उलट जेव्हां बौद्ध भिक्षूंचें प्रस्थ अधिक वाढलें तेव्हां त्यांनीं त्यांचा छळ केला व भिक्षु-भिक्षुणींचे विवाह कायदा करून लावले, अशीं उदाहरणें चीन जपानच्या इतिहासांत सांपडतात. तिबेट व ब्रह्मदेश यांसारखे जे देश आहेत त्यांनीं बौद्धसंस्कृति पूर्ण उचलली आहे असें स्पष्टच दिसत आहे! पण चीन जपानादि उदयोन्मुख राष्ट्रें हीं सारसंग्राहक आहेत. त्यांनीं भलत्या क्षेत्रांत भलत्या तत्त्वांचें महत्त्व केव्हांच वाढविलें नाहीं. हिंदुस्थानांत मात्र हें तारतम्य पुष्कळ दिवसांपासून सुटलेलें आहे. बौद्धसंस्कृतिविषयीं चिनी जपानी वृत्ति कशी आहे याविषयीं प्रो. प. ल. वैद्य यांच्या ग्रंथांतील एक मार्मिक उतारा येथें देतों:—

" चिनी मनुष्याप्रमाणें आजचा जपानी मनुष्यहि एक प्रकारें (Eclectic) म्हणजे सारसंग्राहक बनला आहे. स्वदेशभक्तीचा धडा त्यानें शिंतोपासून उचलला आहे. व्यावहारिक आणि सामाजिक नीतिमत्ता कान्फ्यूशिअसपासून त्यानें घेतली आहे, आणि परलोक व निर्वाणकल्पना त्यानें बौद्ध धर्मांतून घेतल्या आहेत. काऊंट ओकुमा यानें गेल्या पन्नास वर्षांचा जपानचा इतिहास लिहिला आहे. त्यांत ' राष्ट्रीय उत्सवासाठीं मी शिंतो धर्माच्या उपाध्यायांची मदत घेतों तर मृत्युशय्येवर असतां बौद्ध भिक्षूंस बोलावितों, आणि स्वतःचे वर्तणुकीच्या बाबतींत कान्फ्युशिअस आणि खिस्ती धर्मांतील सुभाषितें यांना मान देतों, असें वाक्य प्रोफेसर कूमे यांच्या तोंडीं घातलें आहे. हें वस्तुस्थितिनिदर्शक आहे.

( -बौद्धधर्माचा अभ्युदय आणि प्रसार, पा. १२८.)

(१९५) बौद्धधर्मांतील बरीं वाईट तत्त्वें:-नीतितत्त्वांची उदात्तता मोक्षाची मनःसामर्थ्याधीनता, कर्मविपाक, जन्मजात उच्चनीचतेचें उच्चाटण, अहिंसा, सत्य, अस्तेयादि पांच आज्ञा इत्यादि तत्त्वें बौद्धधर्मानें उच्च

प्रतीची सांगितली असली तथापि हिंदु संस्कृतीमध्यें बौद्ध संस्कृतीमुळेंच नास्तिवाद, दुःखवाद, नैराश्य, जगाविषयीं तिरस्कार, मानवी जीविताची निंदा, स्त्रियांची अवहेलना, कुटुंबसंस्थेविषयीं तुच्छता, प्रवृत्तिपरतेला विरोध इत्यादि आत्मघातक कल्पना घुसल्या आहेत यांत शंका नाहीं. हिंदुसमाज अद्यापि याच कल्पनांच्या पकडींत सांपडलेला आहे. बौद्धधर्मामुळें हिंदुसंस्कृतीवर जे अनिष्ट संस्कार झाले त्यांची यादी वर दिलीच आहे. बुद्धोत्तर कालांत ज्या चार अतिरेकानें हिंदुसंस्कृतीला नामोहरम केलें त्यांचा विचार पुढील कांहीं प्रकरणांत करतों.

—*—

## प्रकरण नववें

# पावित्र्याच्या भ्रामक समजुती

बुद्धोत्तर कालांत पावित्र्यकल्पनेचा अतिरेक, अहिंसेचा अतिरेक, मूर्तिविषयक अद्भुत कल्पनेचा अतिरेक आणि निवृत्तिपर तत्त्वज्ञानाचा अतिरेक झाला. वैदिककर्मकांड व हिंसायुक्त यज्ञयाग यांच्या अतिरेकाविरुद्ध प्रतिक्रियात्मक असे दोन जैन व बौद्ध हे संप्रदाय निघाले. त्यामुळें मोक्ष हेंच ध्येय बनलें व त्याचें साधन अहिंसा व इहलोक-उदासीनता हें ठरलें. त्यामुळें हिंदुसमाजापुढें कोणतेंहि ऐहिक समष्टिधर्माचें ध्येय राहिलें नाहीं. प्रज्ञा, पौरुष, धैर्य, पराक्रम, साहस, त्याग, बुद्धिमत्ता व कर्तृत्व इत्यादि गुणांनीं समाजांत पुढें यावें ही कल्पना मागें पडून भिक्षु, संन्यासी, उपास, अहिंसा, मंत्रचळेपणा आणि पावित्र्यकल्पना यांचें महत्त्व वाढलें. प्रस्तुत प्रकरणीं पावित्र्याच्या अतिरेकाची चर्चा कर्तव्य आहे.

(१९६) **आत्मा परमपवित्रः**—हिंदुधर्मांतील उच्च तत्त्वज्ञानाप्रमाणें आत्मा हा परमपवित्र, अत्यंत निर्मल, शुद्ध, बुद्ध आणि उदात्त असा आहे.

प्रत्येक मनुष्याचा आत्मा असा असल्यामुळें प्रत्येक हिंदूनें मी परमपवित्र आहें, असा दृढविश्वास बाळगला पाहिजे. जीवात्मा हा परमात्म्याचा अंश आहे. तो सच्चिदानंदस्वरूप आहे, तो कधींच अपवित्र होत नाहीं, असा सिद्धांत आहे. आत्म्याच्या अधिष्ठानावर असलेलें मन कुविचारानें, कुकल्पनेनें अपवित्र होऊं शकतें, पण त्यांचा त्याग करतांक्षणींच तेंहि शुद्ध होतें. मन शुद्ध असल्यानंतर शरीराकडून अनिच्छेनें, बलात्कारानें, छलबलानें जरी कांहीं पाप घडलें, तथापि त्याचा दोष लागत नाहीं, हें उच्च तत्त्व हिंदुधर्मशास्त्राचें आहे. या उच्च तत्त्वाचा विसर बुद्धोत्तरकालीं पडला आणि उदारधर्मशास्त्रहि मागें पडून भलताच विचार आला.

(१९७) **धर्मशास्त्राचें औदार्यः**—चुकणें हा मनुष्यस्वभाव आहे. विकारवशतेमुळें मानवाकडून अनेक चुका म्हणजे पापकर्में घडतात व त्याबद्दल त्याला हुरहुर वाटते. आपल्या हातून जी चुकी झाली ती झाली नसती तर बरें झालें असतें, आतां अशी चुकी करूं नये, अशीहि माणसाच्या मनाला सारखी टोंचणी असते. ती तळमळ शांत व्हावी, व मनुष्याला सुधारण्यास संधि मिळावी म्हणून शास्त्रकारांनीं प्रायश्चित्तें सांगितलीं आहेत. देशकालसापेक्ष व परिस्थितिसापेक्ष शास्त्रकारांनीं निरनिराळीं प्रायश्चित्तें सांगितलीं आहेत. त्याचा हेतु माणसानें चुका सुधाराव्या, त्याचा वैयक्तिक विकास व्हावा, चुकी करणें म्हणजे पाप करणें, हें एकंदरींत वाईट असा समज समाजामध्यें रूढ व्हावा, मनुष्यानें चुकी सुधारली म्हणजे फिरून त्याला समाजांत इष्ट तें स्थान मिळावें असा उद्देश आहे; परंतु बुद्धोत्तर कालांत चुकलेल्या लोकांना समाजापासून शक्य तेवढें दूर लोटण्याची कल्पना बळावली आणि पापास प्रायश्चित्तच नाहीं, असेल तर तें फार खडतर आहे, असें सांगण्यास प्रारंभ झाला. हेतु हा कीं, या प्रायश्चित्ताच्या भयानें लोक पाप करण्याचें सोडून देतील, परंतु परिणाम उलटाच झाला. खून, व्यभिचार, चोरी, मद्यपान व त्या पातक्यांशीं संसर्ग ठेवणारा यांना पंचमहापातकांत गणलेलें आहे, पण हीं पातकें अनिच्छेनें वा स्वेच्छेनें केलीं असलीं तरी प्रायश्चित्तानें शुद्धि होते असें मनु. अ. ११–४५–४६, याज्ञवल्क्य अ. ३–२२६ येथें सांगितलेलें आहे. कांहीं ऋषींनीं स्वेच्छेनें केलेल्या पापास प्रायश्चित्त नाहीं असें म्हटलेलें

आहे, तर कांहींनीं प्रायश्चित्तानें त्यांचाहि दोष नष्ट होतो, असें सांगितलें आहे. परेच्छेनें, बलानें, जुलमानें, परिस्थितीच्या रेट्यानें घडलेल्या चुकीला दोष नाहीं. अल्प प्रायश्चित्तानें ती चुकी नष्ट होते, याबद्दल सर्व शास्त्रकारांची एकवाक्यता आहे. मनाच्या पावित्र्याबद्दल रामायणांतील दोन प्रसंग ध्यानांत ठेवण्याजोगे आहेत. देह विटाळला तरी जोंवर मन शुद्ध आहे तोंवर स्त्री अपवित्र होऊं शकत नाहीं. हा सिद्धांत सीतेनें लंकेंत राक्षस व वानर यांचे समोर मोठ्या कळवळ्यानें मांडला आहे. माझ्या अधीन माझें हृदय आहे व तें शुद्ध आहे. शरीरानें मी दुर्बळ झाल्यामुळें आलेल्या पराधीनतेला मी काय करणार, असा तिचा रोखठोक सवाल आहे.

मद्धीनं तु यत्तन्मे हृदयं त्वयि वर्तते ।
पराधीनेषु गात्रेषु किं करिष्याम्यनीश्वरी ॥ –युद्ध. ११८–९

मारुतिराय सीताशुद्धीकरितां अशोकवनांत हिंडत होते. ते रावणाच्या अंतःपुरांतहि गेले. ब्रह्मचाऱ्यानें अन्तःपुरांतील अस्ताव्यस्त उघड्यानागड्या स्त्रिया पाहाणें हें पाप होतें. तथापि माझें मन पवित्र आहे, तें दृढ आहे म्हणून मला पाप लागणार नाहीं, असाच निर्णय शेवटीं मारुतिरायानें घेतलेला आहे.

मनो हि हेतुः सर्वेषामिंद्रियाणां प्रवर्तने ।
शुभाशुभास्ववस्थासु तच्च मे सुव्यवस्थितम् ॥ –वा. रा. ५-११-४०

मनूनें बलानें दिलेलें, जुलमानें भोगलेलें, छलबलानें लिहून घेतलेलें, हें सर्व अकृत म्हणजे झालेलेंच नाहीं, अर्थात् त्याचा दोष मुळींच नाहीं असा रोखठोक निर्णय दिलेला आहे.

बलाद्दत्त बलाद्भुक्तं बलाद्यच्चापि लेखितम् ।
सर्वान्बलकृतानर्थानकृतान्मनुरब्रवीत् ॥१६८॥ –मनु. अ. ८

(१९८) **समाजसुधारणा व प्रायश्चित्तः**–धर्मशास्त्रकारांची मूळ योजना मनुष्यस्वभाव, समाजशास्त्र, मानसशास्त्र, व समाजधारणा यांस अनुसरून होती. समाजधारणेस कांहीं नियम पाहिजेत व त्यांचें अतिक्रमण झाल्यास प्रायश्चित्त पाहिजे, म्हणजे शासन पाहिजे, यांत शंका नाहीं. नानाविध रोगांवर जशीं विविध औषधें देतात, तशीं पाप्यास म्हणजे

चुका करणाऱ्यास त्या सुधाराव्या म्हणून प्रायश्चित्तें सांगितलीं आहेत. उच्च-ग्रंथवाचन, तीर्थवास, सज्जनसंगती, जप, स्वदोषकथन हीं आणि यासारखीं सहस्र प्रायश्चित्तें मन सुसंस्कृत होण्याकरितां सांगितलीं आहेत. पण बुद्धोत्तरकालीन जाणत्यांना असें वाटलें कीं प्रायश्चित्ताची सवलत दिल्यास फार अपवित्रता वाढेल, व लोक पातकी होतील. दुष्टपणामुळें नव्हे किंवा उच्चतेनें मिरवितां यावें म्हणूनहि नव्हे, पण अपवित्रता न वाढावी या कल्पनेमुळें धर्मशास्त्रांतील उदारता मागें पडली. आणि कठोर प्रायश्चित्ताचा बडगा उभारल्यामुळें हिंदुसमाजाची फार हानि झाली. ज्यांच्या हातून चुका झाल्या, दुर्दैवानें ज्यांच्यावर चुका करण्याचे प्रसंग आले अशांना पुन्हां हिंदुसमाजांत स्थान मिळालें नाहीं. कोणत्याहि पापाच्या व्यवहारनिरोधक आणि नरकोत्पादक अशा दोन शक्ति असतात. प्रायश्चित्तामुळें या दोन्ही शक्ति नष्ट होतात व पातक्यांना व्यवहार्यता येते. प्रायश्चित्तपूर्वक पतिताचा समाजांत संग्रह व्हावा व समाजधारणा व्हावी हें ध्येय नष्ट झालें आणि पतित, पतित संतति, पतित स्त्रिया यांना तुच्छतेनें वागविण्याची, समाजांतून दूर लोटण्याची प्रथा पडली. पावित्र्यमूलक उच्चनीच कल्पना वाढल्या, शिवाशीव वाढली, जातिभेद घट्ट करण्यांतहि त्याचें पर्यवसान झालें, आणि हिंदूंच्या या कल्पनांचा मुसलमानांना फायदा मिळाला. मुसलमान येण्यापूर्वीं शक, पल्लव, यवन, कुशान, हूण इत्यादींचीं हिंदुसंस्कृतीवर आक्रमणें झालीं. कांहींना पिटाळून लावलें व जे राहिले ते हळुहळू चातुर्वर्ण्यांत समाविष्ट झाले. मुसलमानसुद्धां पूर्वींच्या विजेत्यांप्रमाणें हळुहळू हिंदुसंस्कृतीमध्यें समाविष्ट होतील अशा कल्पनेमुळें शुद्धीचें राष्ट्रीय महत्त्व त्यावेळीं वाटलें नसावें. पूर्वींच्या विजेत्यांपेक्षां इस्लामचें आक्रमण निराळें आहे, त्यामुळें भ्रष्टांची संख्या अधिक वाढेल, ती हिंदुसंस्कृतीला बाधक होईल, एक देव, एक साधु, एक ग्रंथ असला दुराग्रही संप्रदाय पचविणें कठीण जाईल, ही कल्पना न आल्यामुळें हिंदुसंस्कृतीचा लचका इस्लामनें तोडला. म्हणजे हिंदूंच्या घोडचुकीचा फायदा मुसलमानांना मिळाला. मुसलमानांच्या कडव्या आक्रमणाचे वेळीं राजविरोधाच्या भीतीनें शुद्धि जोरानें होऊं शकली नाहीं. त्यानंतर रूढि आणि धर्मशास्त्राचें अज्ञान यामुळें शुद्धिकार्य जोरानें पुढें आलें नाहीं.

(१९९) प्रा. आळतेकरांचें मतः– हिंदुस्थानावर पूर्वीं ग्रीक, कार्थियन, शक, कुशान व हूण लोकांनीं आक्रमण करून हिंदूंचा पराभव केला होता. पण थोड्याच अवधीमध्यें या सर्व विजेत्यांना हिंदुसंस्कृतीनें जिंकलें व त्यांना हिंदु बनविलें ! आतां हें खरें कीं मुसलमानी जेत्यांची धर्मनिष्ठा अत्यंत कडवी असल्यामुळें त्यांना हिंदु करणें शक्य नव्हतें. पण त्यांच्याकडून आमिष दाखवून अगर जबरदस्तीनें जे लोक बाटविण्यांत येत होते त्यांना हिंदु समाजानें परत घ्यावयास पाहिजे होतें. तसें करण्याची इष्टता देवलादि स्मृतिकारांना पटली होती, व त्यांच्या उपदेशाप्रमाणें अि. स. १००० पर्यंत बाटलेले लोक परत हिंदु धर्मांत घेतले जात होते, हें मुसलमानी इतिहासकारसुद्धां कबूल करतात. पण आमच्या शुद्धाशुद्धतेच्या अवास्तव कल्पनांमुळें ही प्रथा पुढें थांबली, व त्यामुळें आमचें फार नुकसान झालें.' (–सह्याद्रि–नोवेंबर १९४५)

(२००) राजकीय हेतु व संख्यावृद्धिः–इस्लामच्या आक्रमणापूर्वीं हिंदुसमाजाला बाटणें, धर्मांतर करणें व त्याबरोबर समाजांतरहि करणें हें कांहींच ज्ञात नव्हतें. बौद्ध व जैन धर्मांमुळें समाजरचनेंत विशेष बदल झाला नव्हता. त्या धर्मांचे अनुयायी हिंदुधर्माचेच घटक होते. आस्तिक व नास्तिक माणसें एका राजकीय नियंत्रणाखालीं एकाच समाजांत, फार काय पण एकाच कुटुंबामध्यें राहात असत. सम्राट अशोक व कनिष्क यांनीं बौद्धधर्माचा प्रसार अत्यंत सहिष्णुवृत्तीनें केला. पण विधर्मी व विदेशी मुसलमान विजेत्यांचा खाक्या कांहीं निराळा असल्यामुळें राजकीय हेतु साध्य करण्याकरितां आणि राज्यकर्त्यांच्या जातीची संख्या वाढण्याकरितां त्यांनीं बाटविण्याचें सत्र सुरू केलें. दुर्दैवानें त्याच वेळीं हिंदुसमाजांत पवित्र्याच्या भ्रामक कल्पना बोकाळल्या होत्या. हिंदु हा खाऊनपिऊन बाटतो, जन्मानें आलेलें हिंदुत्व खाण्यापिण्यानें, गोमांसभक्षणानें नष्ट होतें, प्रायश्चित्तानेंहि शुद्धि होत नाहीं, असल्या विपरीत अशास्त्रीय कल्पना वावरत होत्या ! जन्मानें आलेलें हिंदुत्व हें जन्मांतरानेंसुद्धां जात नाहीं. कांहींहि खालें, प्यालें, किंवा अहिंदूशीं लग्न लावलें तरी जन्मोजन्मीं आपण हिंदूच राहातों ही कणखर वृत्ति हिंदुसमाजांत नाहीं, हें महंमद कासीमनें ताडलें व आपल्यामागून येणाऱ्या अनुयायांना संख्या वाढविण्याचा मार्ग मोकळा करून दिला. महंमद कासीमनें देबाळ

घेतल्यावर तेथील ब्राह्मणांना व इतरांना बाटविलें व सिंध देशांत पुढें तो जेथें जेथें गेला, तेथें तेथें त्यानें अनेक कत्तली केल्या! त्यामुळें जीव वांचविण्याकरितां अनेक लोक बाटले गेले. सरहद्द प्रांतांतील गस्वर लोक, आणि खैबरखिंड आणि खुरासान प्रांतांतील लोक हे सर्व हिंदूच होते. यांना बाटविल्यानें पुढें मागें राज्य स्थापणेस मदत होईल अशी कल्पना महंमद गझनीच्या मनांत आली. मूर्ति फोडणें व मूर्तिपूजकांना बाटवून खरा मार्ग दाखविणें हा धर्मोत्साह गझनीच्या महंमदामध्यें दांडगा होता. त्यानें भाटिया काबीज केल्यावर तेथील लोकांना, व पंजाबांत स्वारी केल्यावर तत्रस्थांना जबरदस्तीनें बाटविण्याचें कार्य केलें. हे प्रांत बाटविले गेल्यामुळें महंमदास हिंदुस्थानांत वरचेवर येण्याचा मार्ग सुलभ झाला. परक्या देशांत गेल्यावर तेथील लोकांना आपल्याबद्दल जो परकेपणा वाटतो, तो नष्ट करण्याचा हा मार्ग त्यानें शोधून काढला; कारण धर्मभावना एक असली म्हणजे सामान्यतः विरोध कमी होतो. अर्थात् बाटग्या मुसलमानांनीं नोकऱ्यांमुळें महंमदाचा द्वेष न करतां उलट त्याला साह्यच केलें.

महंमद गझनीप्रमाणेंच महंमद घोरीलाहि स्वाऱ्या करतांना राजकीयदृष्ट्या ही युक्ति फायदेशीर वाटली. त्यानेंहि कांहींना बाटवून, तर कांहींना अधिकार देऊन आपलेसे केले व हेच पुढें मुसलमानी राज्याचे आधारस्तंभ बनले. परक्या राज्यकर्त्यांविषयीं प्रेम वाटणारा एखादा वर्ग प्रथम अधिकारदानानें उत्पन्न करावा लागतो. तसा वर्ग उत्पन्न करण्याची युक्ति त्यावेळीं बाटविणें ही होती. बाटविण्याच्या युक्तीबरोबर आणखीसुद्धां एक डाव केला गेला, तो लक्षांत ठेवण्यासारखा आहे. मुसलमानांनीं खुरासान, पंजाब व उत्तर हिंदुस्थान इत्यादि भागांत पुष्कळ लढाऊ क्षत्रिय जातीच बाटविल्या! सटरफटर मेषपात्र जाति त्यांनीं फारशा बाटविल्या नाहींत. कोणच्याहि प्रसंगीं त्यांचा सामना लढवय्या जातीशीं असे. युद्धांत जय आल्यावर बऱ्याच लोकांची ते कत्तल करीत, ज्यांना कत्तलीचें भय वाटे ते पटापट मुसलमान होत. यामुळें हिंदूंच्याच लढवय्या जाति मुसलमान होऊन त्या मुसलमानी राज्यांना पुष्कळ उपकारक झाल्या. हिंदूंमध्यें लढवय्यांचा तुटवडा अधिकाधिक पडूं लागला. हिंदूंनीं बंड केलें किंवा राज्याविरुद्ध कांहीं उपक्रम केला तर हे बाटेक्षत्रिय त्यांचा परस्पर समाचार घेत असत.

जिवाच्या भयामुळें बाटलेल्या लोकांपैकीं ज्यांच्या वंशपरंपरा पाटिलक्या किंवा इतर अशाच तऱ्हेच्या वतनदाऱ्या असत त्या मुसलमान कायम ठेवीत, म्हणून त्यांना पुन्हां हिंदु व्हावें असें वाटत नसे.

(२०१) **सर्वांनीं तेंच केलें**:—महंमद गझनी व घोरी यांच्या मागून कडव्या, धर्मोत्साही कुतुबुद्दिन ऐबक, बलबन, तुघ्रलखान, अल्लाउद्दिन खिलजी, फिरोज तुघलख, शिकंदर लोदी, जहांगीर, औरंगजेब आणि दक्षिणेंतील आदिलशाही, निजामशाही, कुतुबशाही वगैरे शाह्यांतील सुलतानांनीं बाटविण्याचें सत्र सुरू ठेवून आपली संख्या वाढविली आणि या बाट्यांच्या उत्साहानेंच राज्याचा विस्तारहि केला. शुद्धीचा राजमार्ग त्या काळीं लोकमान्यतेस पोंचला नव्हता म्हणून धर्मभ्रष्ट हे मुसलमानच राहिले. अलबेरुनी हा मुसलमान इतिहासकार लिहितो कीं त्यावेळीं शुद्धीचा निषेधच होता. गुलाम करून नेलेल्यांची शुद्धि होत असे. परंतु पूर्व जातींत समावेश होण्यास अडचणच पडे. ( —मध्ययुगीन भारत. )

(२०२) **बाट्या हिंदूंचा धर्मोत्साह**:—एकदां परधर्मांत गेल्यावर पूर्वधर्माचा पाडाव करण्यास विशेष स्फुरण येत असतें. त्यांतून या पूर्व-हिंदूंना हिंदु लोकांचीं व्यंगें, राहाणी, स्वभाव यांची खडान्‌खडा माहिती असल्यामुळें त्यांचा उपयोग मुसलमानांना झाला! कोणती युक्ति करावी, स्त्री कशी व केव्हां पळवावी, हिंदु लोक गाफील केव्हां असतात, देवालय लुटून संपत्तीचा अपहार कसा करावा, हें सर्व पूर्वहिंदूंपासून मुसलमानांना कळत असे. या बाटलेल्या लोकांमध्यें कित्येक फारच मोठे होऊन गेले. त्यांच्या हातून धर्मांतर केल्याबरोबर खऱ्या मुसलमानांपेक्षां बाटविण्याचें कार्य अधिक कसें झालें हें पुढील माहितीवरून समजेल:—

मलिककाफूर हा एका खालच्या जातींतला हिंदु मनुष्य बाटून मुसलमान झाला. अल्लाउद्दीनच्या राज्यवृद्धीचें काम यानेंच केलें. जहांगीरचा सेनापति महाबतखान हा राजपूत सरदार संगराजित याचा मुलगा मुसलमान झाला होता. जहांगिराच्या सर्व मोहिमांवर हाच प्रमुख होता. फिरोजशहाचा वझीर मखबुलखान हा तेलंगणांतील उच्चकुलीन हिंदु होता. त्यानें मुसलमान धर्म स्वीकारला. त्याचें फिरोज तुघलघवर इतकें वजन

होतें कीं, फिरोज स्वतः म्हणे "हा वझीर हाच खरा सुलतान आहे. मी नुसता नांवाचा आहें." फिरोज तुघलघाच्या डोक्यांत इस्लामची संख्या वाढविण्याचें वेड फार होतें. हिंदूंना छळण्याच्या व भ्रष्ट करण्याच्या अनेक युक्त्या या मखबुलखानानें जशा बादशहाला सांगितल्या तशींच अनेक प्रजाहिताचीं कामेंहि त्यानें बादशहाकडून करून घेतलीं. इमादशाहीचा संस्थापक हा मूळचा तेलंगी ब्राह्मण, बाटला व फत्तेउल्ला या नांवानें प्रसिद्धीस आला. पुढें त्यानें राज्य स्थापलें. अहमदाबाद येथें मुसलमान राज्याची स्थापना करणारा मुझफरशहा हा पूर्वहिंदु भ्रष्ट झाला होता. फिरोजनें याला गुजराथेंत पाठविल्यावर तिकडे हा स्वतंत्र झाला. देवालयांचा विध्वंस (सोमनाथाचें देऊळहि) करण्यांत हा अग्रेसर होता. निजामशाहीचा संस्थापक तिमापा बहिरव हा मूळचा ब्राह्मण मुसलमान झाला व त्यानें निजामशाही स्थापली. काश्मीरचा प्रधान मूळ ब्राह्मण असून मुसलमान झाला. त्यानें शमसुद्दीनच्या वंशजांना हिंदूंचीं देवळें फोडण्यास व त्यांना बाटविण्यास फारच साह्य केलें. याच्या साह्यानेंच शिकंदरशहानें अनन्वित प्रकार केले. पूर्व बंगाल मुसलमानमय करणारा काळा पहाड हा उच्च जातींतील कालीप्रसाद सेन या नांवाचा हिंदूच होता. खुश्रुखान हा हिंदु जातींतील अस्पृश्य होता. मुसलमान झाल्यावर स्वतःचें वर्चस्व वाढतें व श्रेष्ठत्व येतें या समजुतीनें तो मुसलमान झाला होता.

वरील पुरुषांपैकीं सर्वच कांहीं स्वखुषीनें मुसलमान झाले होते असें नाहीं. छलबलानें, मोहानें, अभिलाषानें हे मुसलमान झाले असले पाहिजेत. धर्मांतरामुळें यांच्या ठिकाणीं आवेश उत्पन्न झाला आणि सर्व तऱ्हेचीं बंधनें नष्ट होऊन यथेष्ट आचार करण्याची मुभा मिळाल्यामुळें हिंदूंचा पाडाव करण्यास हे पुढें सरसावले. मुसलमानांना कोठें कोठें जयहि मिळत गेले, व राज्यवृद्धीचें काम या पूर्वहिंदूंकडून होऊं लागल्यामुळें मुसलमानी धर्मांत कांहीं विशेष आहे अशा समजुतीनें खुषीनेंहि कांहीं लोकांनीं स्वधर्मत्याग केला. बंगालच्या कंस राजाचा मुलगा जितमल्ल यानें इ. स. १४०० मध्यें "आपण हिंदु हीन आहोंत" या कल्पनेनें इस्लामचा स्वीकार केला व जलालउद्दीन या नांवानें तो पुढें आला. केरळ देशाच्या सामुरी राजानें नवव्या शतकांत इस्लामचा स्वीकार केला. मलबारच्या पेलुमा राजानेंहि

त्याचेंच अनुकरण केलें. गझनीच्या महंमदानें इ. स. १०१८ मध्यें मथुरेवर स्वारी केली. वाटेंत वराण शहरास त्यानें वेढा दिला. तेव्हां राजा हरदत्त यानें आपल्या दहा हजार अनुयायांसह इस्लामचा स्वीकार केला. गिरनारचा हिंदु राजा महंमद बेगडाचा त्रास वांचावा म्हणून बाटून मुसलमान झाला. सिंधचा राजपूत जामराजा इ. स. १४०० मध्यें मुसलमान झाला. याशिवाय कित्येक जातीच्या जाति आणि हजारों कुटुंबें जबरदस्तीनें व छलबलानें मुसलमान झालीं.

**(२०३) कांहीं बाटग्या जातींची माहितीः**–हिंदुस्थानांतील मुसलमानांमध्यें ते सर्व हिंदूंतूनच बाटलेले असल्यामुळें हिंदूप्रमाणेंच अनेक जाति व पोटजाति आहेत. मुसलमानी सत्ता स्थापन झालेवर व ती सत्ता ढासळल्यावरहि अनेक कारणानें अनेक हिंदुजाति मुसलमान झालेल्या आहेत. कोंकण, महाराष्ट्र, गुजराथ, कर्नाटक, बंगाल, पंजाब, अशा सर्व प्रांतांमध्यें मुसलमानांमध्यें निरनिराळ्या जाति आहेत. त्यांचे आचारविचार, संस्कार, दायविभाग, लग्नाच्या चालीरीति वगैरे सर्व हिंदूंच्याच आहेत. पुष्कळ जाति अद्याप हिंदुदेवतांना भजतात, हिंदूंचे सण पाळतात, ब्राह्मणांकडून आपलीं धार्मिक कृत्यें करून घेतात. तात्पर्य त्या जवळ जवळ हिंदूच आहेत. हिंदु सदृश या बाटग्या मुसलमान जातींची माहिति एन्थॉवेन यांच्या 'ट्राइब्ज अँड कास्टस् ऑफ बॉंबे' या ग्रंथाधारें श्री. कालेलकर यांनीं 'मुंबई इलाख्यांतील जाति' या पुस्तकांत दिली आहे, तिच्या आधारें कांहीं जातींची माहिती देतों.

अत्तरादि सुगंधी मालाचा व्यापार करणारी आतार ही मूळ हिंदु जात, औरंगजेबाच्या कारकीर्दींत मुसलमान झाली. कासार व कलईगार याहि जाति आताराप्रमाणेंच मुसलमान झालेल्या आहेत. करालिया ही हिंदुकुंभारांची मुसलमानी जात अहमदाबादकडे आहे. कासबती ही राजपूतहिंदुजात बाटून मुसलमान झाली आहे. कसाब व खाटीक या दोन्ही जातींत अद्याप कांहीं हिंदु व मुसलमान आहेत. बकरकसाब हे पूर्वहिंदु मुसलमान झालेले आहेत. खाटकांचीहि स्थिति तशीच आहे. टिपु सुलतानानें यांना बाटविल्यामुळें कर्नाटकांत यांना सुलतानी म्हणतात. कामलिया या नांवाची

गुजराथेंत एक मुसलमान जात आहे. कनोजीब्राह्मण पुजाऱ्यांस अल्लाउद्दिननें बाटविलें त्यांचे हे वंशज आहेत. खोकार हे मूळ राजपूत कुळांतील हिंदु, गुजराथ काठेवाडांत ही मुसलमानी जात आहे. खोजा म्हणजे ख्वाजा हा ठाकुर शब्दाचा समानार्थक शब्द आहे. सिंधमधील लोहाणा जातीच्या हिंदु क्षत्रियांना ठाकुर म्हणतात. बाटून भ्रष्ट झालेल्या या खोजा जातीचे लोक व्यापाराच्या निमित्तानें गुजराथ, मुंबई, सिंध, कलकत्ता, पंजाब अशा सर्व भागांत आहेत. यांच्यामध्यें अवतारकल्पना आहेत. शेंडी, कान टोंचणें, दाढी, सुंता हे आचार वैकल्पिक आहेत. मूळचे कोल्हाटी हे बाटून गारुडी झाले. मीर शमसुद्दिन अथवा मीरन शमना यानें यांना बाटविलें. मीरन शमनाचें अथवा मिरासाहेबाचें थडगें मिरजेस आहे व तेथें दरवर्षीं उरूस होतो. गोरखोदिया या नांवाची पूर्वहिंदु मुसलमान जात, तशीच घेरमेहदी ही पूर्वहिंदु मुसलमान जात गुजराथेंत आहे. घेरमेहदी हे धर्मोपदेशक होते. चाटला, चूडावाला, छारा, चिदंडीगिरा या मूळच्या हिंदु जाति ! या मुसलमान जाति हल्लीं बांगड्या भरतात, वस्त्रें रंगवितात, रेशमांचे गोंडे करून विकतात. जमाती ही पूर्वहिंदु कोंकणी मराठी बोलणारी मुसलमान जात कुलाबा व रत्नागिरी भागांत आहे. जादुगार यांना कर्नाटकांत मोडीगार म्हणतात, यांतील कांहीं डफहि वाजवितात. ही पूर्वहिंदु मुसलमान जात होय ! तांबोळी या जातींत मराठा, लिंगायत, मुसलमान असे भेद असून मुसलमान तांबोळी पूर्वहिंदु होते. अस्वलांचे व वाघांचे खेळ करणारे दरवेशी पूर्वहिंदूच होत. दालदी ही पूर्वहिंदु मच्छीमारी करणारी कोळ्याची जात रत्नागिरी व जंजिरा या भागांत आहे. अहमदाबाद, बडोदा भागांत असणारी; पूर्वीची हिंदु गौळी जात दूधवाला या नांवानें मुसलमानांत आहे. महाबळेश्वरच्या डोंगराळ भागांतील मूळ कोळी हिंदुजाति औरंगजेबानें बाटविल्यामुळें मुसलमान झाली. त्यांना हल्लीं धावड म्हणतात. ते लोखंडाचे जिन्नस करून विकतात. धूळधोया ही गुजराथेंतील खत्री हिंदु जाति मुसलमानांत आहे. कर्नाटक महाराष्ट्रांत ढोल व नगारे वाजविणारी मूळची हिंदु जाति नगारजी या नांवानें मुसलमानांत आहे. कानडा जिल्ह्यांतील कापड विकणारे नवायत व गुजराथेंतील नक्षबंध आणि पांजणीगार या मूळ हिंदुजातीच होत. हैदर नाईकानें

ज्या मराठा कुणब्यांना बाटविलें ते नाईकवारी होत. ही मुसलमान जात पेशव्यांच्या नोकरींतहि होती. नाल मारण्याचा धंदा करणारी नालबंदाची जात औरंगजेबाच्या कारकीर्दींत मुसलमान झाली. म्हैसूर, गुजराथ, महाराष्ट्रांत असणारी पिंजारी या नांवाची मुसलमान जात औरंगजेबानें बाटविल्यामुळें मुसलमान झाली. आतषबाजीचें दारूकाम करणारी बरुतगार ही मूळची हिंदुजाति होय! औरंगजेबानें जे कुणबी व माळी बाटविले तेच महाराष्ट्रांत व कर्नाटकांत बागवान या नांवानें प्रसिद्ध आहेत. बेनवा या नांवाची गुजराथेंतील भीकमागी जात पूर्वहिंदूच होय! बेळगांव सोलापूर भागांतील बाटलेल्या भोई जातीला बोजगार म्हणतात. बोहोरा म्हणजे व्यापार करणें, त्यावरून बोहोरी हें नांव पडलें. गुजराथेंतील विशेषतः सिद्धपुरांतील बाटलेले ब्राह्मण म्हणजेच हे बोहरी होत. लोखंडी सामानाचा व्यापार व सावकारी हे धंदे करणारी ही व्यापारी जात आहे. औरंगजेबानें बाटविलेली स्वैपाक करणारी हिंदु जाति भट्यारा या नांवानें प्रसिद्ध आहे. मूळचे हिंदु भोई मुसलमान झाले त्यांना पखाली किंवा भिस्ती असें म्हणतात. राजपुतांतून व कोळ्यांतून भ्रष्ट झालेली गुजराथेंत असलेली मकवाना ही जाति पूर्वहिंदूच होय. मणियार ही बांगड्या भरणारी जाति औरंगजेबाचे वेळीं भ्रष्ट झाली. गुजराथेंतील मलिक ही जाति राजपुतांतून भ्रष्ट झालेली होय! महाव्रत किंवा महात हे अद्याप गोमांस वर्ज्य करतात. हे मूळ राजपूत होत. सय्यद अब्दुल कदीरच्या नातवानें चारशे वर्षांमागें बरेच हिंदु बाटविले; त्यांना सय्यद म्हणतात. कोंकणी मुसलमान कोंकणांत आहेत. परिटांतून बाटलेल्यांना धोबी म्हणतात. मूळचे हिंदु लोहार व घिसाडी, ज्यांना औरंगजेबानें बाटविलें त्यांना शिकलगार म्हणतात. काकजी, तांबट, मीर व मिराशी या अनुक्रमें कागद करणें, भांडीं नीट करणें, गाणें व ढोल वाजविणें हे धंदे करणाऱ्या जाति पूर्वहिंदूच होत. काठेवाडांतील कच्छिया व सिंधमधील लोहाणा या हिंदु जातींतून बाटलेली मेमण या नांवाची जात गुजराथ काठेवाडांत आहे. मुसासुहाग ही गुजराथेंतील मुसलमान जात पूर्वहिंदु होय. साळी व कोष्टी यांचा धंदा करणारी मोमीन नांवाची मुसलमान जात गुजराथ व महाराष्ट्रांत आहे. ती मूळ हिंदूच होय. खरखरमुंडे, रफूगार या पूर्वहिंदु जाति औरंगजेबानें

बाटविल्या. राठोड ही मूळ राजपूत हिंदुजाति बाटून मुसलमान झाली. लकरहारा, जळाऊ लाकडें विकून पोट भरणारी ही मूळहिंदु जाति होय! शेखदास ही गुजराथेंतील मतिया कुणब्याची मूळ हिंदुजाति होय. सलतानगर ही मूळची चांभार जाति मोची या नांवानें मुसलमान म्हणून प्रसिद्ध आहे. मूळ रजपूत व नंतर बाटलेली सारवान ही जात आहे. सीपाहि ही लष्करी पेशाची जाति हिंदूच होय. पानांच्या हातऱ्या करणें, शिकार करून पोट भरणें, ही मुष्टिगर नांवाची जाति हिंदूच होय. शिद्दी व हबशी, फार काय पठाण व मोंगल याहि जाती पूर्वहिंदु होत्या. मोंगल लोकांनीं फार उशीरां म्हणजे बाबराच्या पूर्वीं मुसलमान धर्म स्वीकारला. याप्रमाणें आणखीहि देण्याजोगी माहिती विस्तारभयास्तव देतां येत नाहीं.

(२०४) **शुद्धीचा अभावः**—अनेक जाति, अनेक कुटुंबें व अनेक कर्ते पुरुष हे कांहीं कारणानें स्वधर्मभ्रष्ट झाले पण त्यांना कधींतरी आपण हिंदु व्हावें व हिंदु धर्मांतच रहावें असें वाटलें नसेल काय ? केवळ खाण्यापिण्यानें, छलबलानें धर्मांतर आणि समाजांतर होणें हें अत्यंत अनिष्ट नाहीं काय ? जबरदस्तीनें तोंडांत गोमांस घातल्यानें हिंदुत्व नष्ट होतें काय ? असे विचार या सर्वांच्या मनांत कधींकाळीं तरी आलेच असले पाहिजेत. परंतु त्वरित शुद्ध होऊन स्वसमाजांत प्रवेश करण्याचें राजमान्य व लोकमान्य द्वार त्यावेळीं नव्हतें. शुद्धीचें द्वार हें शास्त्रमान्य जरी होतें तथापि लोकमान्य नव्हतें. गोमांसभक्षक, अतिनिंद्य व हीन जो मनुष्य त्याच्या धर्मांचा स्वेच्छेनें वा परेच्छेनें ज्यानें स्वीकार केला, त्याला परत घेणें अतिनिंद्य होय. यवनसंसर्ग, यवनान्नभक्षण, यवनसेवा करणाऱ्यांना शुद्ध करून घेणें हें पाप आहे, अशी समजूत समाजामध्यें होती. मुसलमान हे प्रथम प्रथम तर लढाऊ जातींनाच बाटवीत होते. त्यामुळें आपली संख्या कमी होत आहे हें पाहून तरी रजपुतांनीं व राजांनीं लढवय्ये निर्माण करण्याकरितां शुद्धीचा अवलंब करावयास हवा होता. राजे व पंडित यांनीं उघड्या डोळ्यांनीं हें भ्रष्टीकरण सहन केलें. 'कलियुगांत या गोष्टी व्हावयाच्याच. त्याचें निवारण कोण व कसें करणार ? भविष्यपुराणादिग्रंथांत पुढें पुढें हे असे धर्मोच्छेदाचे प्रसंग येणार असें लिहिलेंच आहेना ? देवदेवतांमध्यें सामर्थ्यहि राहणार नाहीं अशीं वाक्यें आहेत ना ?' असल्या दुर्बलकल्पनांमुळें तत्कालीन पंडितांनीं

शुद्धिकार्यांचा, राष्ट्रीयत्वाच्या भावनेनें मोठ्या हिरीरीनें अवलंब केला नाहीं. येईल तो काल व प्रसंग यांपुढें हात जोडून उभें राहिलें पाहिजे ! असल्या दुबळ्या विचारानें त्यांचीं मनें मारलीं गेलीं होतीं.

(२०५) समाजाचें मनोदौर्बल्यः–पंडितांची ही मनोवृत्ति असल्यामुळें समाजाचेंहि मन दुबळें झालेलें होतें. धर्माचें स्थान बुद्धि आहे, स्थूल शरीरापेक्षां मनाचें महत्त्व अधिक आहे, छलबलानें धर्मांतर होत नाहीं, चुकून कांहीं खाल्लें किंवा प्यालें, किंवा आणखी कांहीं झालें तरी मनुष्य हिंदुत्वांतच राहू शकतो; हिंदुत्व हें संस्कारांकित आहे. दुर्दैवानें ज्यांच्यावर धर्मांतराचा प्रसंग आला आहे त्यांना शुद्ध करून त्यांचा स्वसमाजांत संग्रह करावा अशी बुद्धि समाजामध्यें नव्हती. या कार्यास सामाजिक मन उत्साही नव्हतें. हिंदुसमाजाचें मनोदौर्बल्य, पंडितांची विपरीत विचारसरणी, यांमुळें एखाद्या राजाच्या मनांत जरी शुद्धीचा विचार आला तथापि त्याला अडचण पडे. मधून मधून जरी शुद्धिकार्यें होत गेलीं तथापि प्रभावी प्रसार होण्यास राजसत्तेचें आणि लोकमान्यतेचें तितकेसें साह्य नव्हतें, हें मान्य करणें भाग आहे. प्रथमतः मुसलमानांच्या झंझावातासारख्या आक्रमणापुढें त्वेषानें शुद्धि करणें म्हणजे राजसंकट ओढवून घेण्यासारखें होतें. प्रथम राजभयानें शुद्धि झाल्या नाहींत तर पुढें सामाजिक दौर्बल्य व पावित्र्यकल्पनेच्या भ्रामक समजुती आणि रूढिशरणता अशा त्रिविध कारणांमुळें जोरानें शुद्धि झाली नाहीं. याचीं फळें आजहि आपण भोगत आहों. यास्तव उदार धर्मशास्त्र, आत्म्याचें व मनाचें पावित्र्य इत्यादि गोष्टी हिंदुसमाजांत प्रसृत केल्या पाहिजेत. स्त्रीपावित्र्याविषयीं शास्त्र अत्यंत उदार असतांना समाज कसा अनुदार झाला याचें विवेचन पुढच्या प्रकरणांत करतों.

—*—

## प्रकरण दहावें

### पावित्र्याच्या भ्रामक समजुती ( पुढें चालू )

# स्त्रीपावित्र्य व शरीरपावित्र्य

(२०६) **स्त्रियांचें उच्च स्थान गेलें:**–हिंदुधर्म गृहस्थप्रधान आहे. गृहस्थाश्रमापासून धर्माचरणाला प्रारंभ होतो. गृहिणी हें गृहस्थाश्रमाचें मूळ आहे. पत्नी, भार्या, जाया या नात्यानें स्त्रियांचें स्थान फार थोर आहे, असे विचार हिंदुधर्मामध्यें आहेत.

पण बौद्धक्रांतीनें गृहस्थाश्रम गौण ठरवून संन्यासाश्रमाला महत्त्व दिलें. मोक्षसाधनास संन्यास हा पोषक व गृहस्थाश्रम हा मारक अशा कल्पनेनें बुद्धानें स्त्रीचें महत्त्व कमी केलें. बुद्धानें स्वतः आपल्या सुस्वरूप राणीचा त्याग केला होता. राज्य व भार्या यांच्या त्यागानें त्याचा निवृत्तिपर उपदेश प्रभावी झाला. तो स्त्रियांना भिक्षुणीची दीक्षा देण्याच्या विरुद्ध होता. म्हणून स्त्रिया या मोक्षाच्या आड येणाऱ्या पापखाणी आहेत, त्यांच्यापासून शक्य तों लांब असावें, अग्निसारखी स्त्री आहे, लोण्यासारखा पुरुष आहे. कलियुगांत घरोघरीं कृत्या आहेत. स्त्रियांचा संग सर्वस्वी टाळावा. काष्ठ, पाषाण, मृत्तिकेच्या पुतळीला सुद्धां स्पर्श करूं नये, असे स्त्रियांविषयीं तिरस्कारयुक्त विचार समाजांत वाढले. विरक्तसाधकाच्या दृष्टीनें हे विचार अवश्य असले तरी सर्वसामान्य समाजांत त्याचा विपरीत परिणाम झाला. बौद्धानें सरसकट सर्वांना संन्यासदीक्षेचा अधिकार आहे, असें सांगितल्यामुळें स्त्रियांचें वैभव गेलें, त्यांची योग्यता कमी होऊन स्थानच्युति झाली. स्त्रियांनाहि भिक्षुणी होणें आवडूं लागलें. मुली उपवर झाल्या कीं विवाहविचार सोडून देऊन भिक्षुणी होण्याकरितां मठाकडे धांव घेत ! गृहस्थाश्रम उत्सन्न होण्याचा प्रसंग आला. मुली घराबाहेर पडल्या कीं भिक्षुणी होतात असें पाहून 'न स्त्री स्वातंत्र्यमर्हति' हें शास्त्र पुढें आलें व बालविवाहाचें समर्थन स्मृतींत होऊं लागलें. मुली प्रौढ झाल्या कीं लग्न करीत नाहींत, असें पाहून भिक्षुणी होण्याचें बंद पाडण्या-

करितां बालविवाह रूढ झाला. भिक्षुणींचे स्वैराचार व अनिष्ट वर्तन पाहून स्त्रियांना घरांत डांबावें, त्यांना कार्यव्यापृत ठेवावें, घराबाहेर सोडूं नये, त्यांना कमी बुद्धि असते; अनृत, साहस, माया, मूर्खत्व हे त्यांच्या ठिकाणीं दोष आहेत, म्हणून त्यांचा धर्म पति, दैवत पति, सर्व कांहीं पति. पतीवांचून त्या अगतिक आहेत, त्या उपभोग्य आहेत, असले संकुचित विचार बुद्धोत्तर कालांत वाढले; आणि स्त्रियांविषयीं ज्यांचे विचार फारच अनुदार होते, अशा मुसलमान आक्रमकांनीं त्याचा यथेच्छ फायदा घेतला.

(२०७) **स्त्रिया व आक्रमक मुसलमानः**—इस्लाम हा मुलीविषयीं म्हणजे तिला वारसाहक्क देण्याविषयीं उदार असला तरी तो स्त्रीविषयीं अनुदार आहे, असें स्टोबर्ट, म्यूर, जॉन पूल वगैरे अनेक विद्वानांनीं कुराणाच्या आधारें लिहिलेलें आहे. अन्यधर्मीयांविषयीं इस्लाम उदार नाहीं. मग काफीर आणि काफिराच्या स्त्रियांविषयीं उदार विचार येणार कुठले ? स्त्रिया हीं माणसें आहेत, त्यांना विवेक आहे, त्यांना बुद्धि आहे, आवडीनावडी आहेत, या कल्पनाहि त्या वेळच्या मुसलमान आक्रमकांना अवगत नव्हत्या. त्यामुळें त्यांचें वर्तन काफिरांच्या स्त्रियांविषयीं फारच अमानुषपणाचें झालें. शत्रूशीं लढणें व त्याला ठार करणें ही कल्पना हिंदूप्रमाणें मुसलमानांत होती. पण शत्रूच्या बायकामुलींना सन्मानानें किंबहुनाच आपल्या आयाबहिणीप्रमाणें वागविलें पाहिजे ही समजूत हिंदूप्रमाणें मुसलमानांत नव्हती !! त्यामुळें सुलतानांनीं, शहांनीं आणि बादशहांनीं हिंदूंच्या अनेक स्त्रिया आणि कुमारिका जुलमानें भ्रष्ट केल्या आणि कित्येकांनीं तर त्यांच्याशीं लग्नेंहि लावलीं. गुजराथच्या कर्णरायाची स्त्री कमलदेवी इच्याशीं अल्लाउद्दिनानें तिच्या नवऱ्याला ठार मारून लग्न लावलें ! अल्लाउद्दिनाच्या पश्चात् खुश्रूनेंहि कमलदेवीशीं जुलमानें निक्का लावला ! कमलदेवीची मुलगी देवलदेवी हिची कष्टमय कहाणी हृदयविदारक आहे ! तिजवरहि असाच जुलमानें निक्के लावण्याचा प्रसंग आला ! दीपलपूरचा राजा मल्लभट्टी यानें आपली मुलगी आपल्या लोकांचा असह्य छळ बंद करावा म्हणून फिरोज तुघलघाच्या बापाला दिली ! शमसुद्दिन उर्फ शहामीर यानें काश्मीरचा राजा आनंददेव याला इ. स. १३२६ मध्यें ठार करून त्याची बायको कमलदेवी इच्याशीं जुलमानें लग्न लावलें !

तसेंच पुढें शहा मीर्झा यानें विधवा राणी कोटादेवी इच्याशीं तिला पराभूत करून जुलमानें लग्न लावलें ! आदिलशाहीचा संस्थापक यूसफ यानें मुकुंदराव नामक शूर मराठे सरदाराच्या बहिणीशीं जुलमानें लग्न लावून तिचें नांव बुभुजीखान असें ठेवलें ! फिरोजशहा बहामनीनें विजयनगरचा राजा देवराय याचा पराभव केल्यावर त्याच्या मुलीशीं जबरीनें लग्न लावलें ! तें लग्न विजयानगरासच झालें. तेलंगणचा राजा नरसिंगराय याचा वऱ्हाडच्या स्वारींत पराभव झाला व त्याला फिरोज बहामनीचें मांडलिकत्व कबूल करणें भाग पडलें. त्यानें नाइलाजानें आपली एक मुलगी फिरोजच्या जनानखान्यांत पाठविली ! मुद्गल शहरांतील एका सोनाराची कन्या निहाल हिचें लग्न शहाजादा हसनखान याचेबरोबर जुलमानेंच झालें. सोनगडच्या राजाची सुंदर कन्या परिचेहर हिच्याशीं अल्लाउद्दिन बहामनीनें दिलावरखानाच्या साह्यानें जुलमानें लग्न लावलें. बहलोलखान लोदीनें सोनाराच्या सुंदर मुलीशीं जुलमानें लग्न लावलें. शिकंदर लोदी हा तिच्यापासून झाला. बेगडा महमुदाची बायको ही जमेदार राणाजी गौहेल याची मेहुणी होती. तिला नाइलाजानें पत्नीत्व स्वीकारावें लागलें. अकबरानें जयपूरच्या बिहारीमल्लाच्या मुलीशीं लावलेलें लग्न जुलमाचेंच होतें. जोधपूरच्या मालदेवानें अकबराला दिलेली जोधाबाई स्वखुषीनें विवाहित झाली नव्हती. जहांगीर हा तिचा मुलगा होय. बिकानेरच्या कल्याणमल्लानें अगतिक होऊन आपली पुतणी अकबरास देऊन मांडलिकत्व कबूल केलें. अंबरचा भगवानदास यानें आपली मुलगी मानबाई हिला अत्यंत नाखुषीनें सलीमास दिली !!

इस्लामचें काफिरांच्या स्त्रियांविषयीं कसें वर्तन होतें याची कल्पना येण्यास एवढीं ठळक उदाहरणें पुरेशीं आहेत. हीं सर्व लग्नें जुलमानें झालीं असतांना या सर्व उच्च घराण्यांतील स्त्रिया जुलूम सहन करून गुपचुप तेथें कशा राहिल्या हा महत्त्वाचा प्रश्न आहे. एक तर स्त्रीजात ही दुर्बल, त्या अबला, त्या उपभोग्य, त्यांचें दैवत पति, पुरुषांचा त्यावर हक्क या विचारांनीं त्यांना पछाडलें होतें. दुसरें परत स्वधर्मात येण्याची सोयहि नव्हती. अशा स्त्रियांना शुद्ध करून घेण्यास समाजांत जो जिवंतपणा असावा लागतो तो नसल्यामुळें त्या बिचाऱ्या तशाच खितपत पडल्या.

(२०८) **मुली म्हणजे जंगम मिळकत**–स्त्रिया या पुरुषापेक्षां कमी योग्यतेच्या आहेत, पुरुषांच्या त्या उपभोग्य आहेत, त्यांच्याशीं कसेंहि वागण्यास हरकत नाहीं, बापानें मुलीची व्यवस्था स्वेच्छेनें कशीहि लावावी, कोणाशींहि त्यानें मुलीचें लग्न लावावें, तसें करण्याचा त्याला हक्क आहे, बाप सांगेल त्या वयांत व सांगेल त्याशीं मुलीनें लग्नास सिद्ध व्हावें, व तो ज्याशीं लग्न लावील तो कसाहि असला तरी पतिव्रताधर्मानें तिनें त्याच्याशीं वर्तन करावें; पित्राज्ञेच्या अवमानाची कल्पना स्वप्नांतहि आणूं नये, अशा विचारांनीं स्त्रीजीवन तुच्छ मानलें गेलें होतें. याच विचारांचा पगडा छलबलानें विधर्मीयांशीं लग्न लावण्याचा प्रसंग दुर्दैवानें ज्यांच्यावर ओढवला त्यांचे मनावर होता.

कांहीं प्रसंगीं शहा व सुलतान यांचेकडून होणारा त्रास वांचावा म्हणून आपल्या मुली बळी देऊन त्यांनीं त्यांची मर्जी संपादन केली. स्त्रियांच्या अब्रूकरितां सर्वस्वाची राखरांगोळी करणारे जे रजपूत त्यांच्याकडून हें कृत्य कसें घडलें असा प्रश्न येतो. त्याचें उत्तर कोणी असें देतात कीं रजपुतांचा जनाना मोठा असे, त्याशिवाय त्यांच्या रखेल्या व नाटकशाळाहि होत्या. त्यांच्या कन्या त्यांनीं मुसलमानांना देऊन बचाव केला. पण हें उत्तर समाधानकारक नाहीं. मुली म्हणजे एक प्रकारची मालमत्ता. तिचा उपयोग कुटुंबाच्या व घराण्याच्या फायद्यासाठीं पाहिजे तसा करून घ्यावा अशी भावना त्यावेळीं होती. म्हणूनच प्रथम रजपुतांनीं व पुढें दक्षिणेंतील कांहीं हिंदूंनीं व राजांनीं आपल्या मुली व बहिणी मुसलमानांना देऊन आपला बचाव केला, असें उघड दिसतें. बादशहांना मुली देण्यांत रजपुतांना कमीपणा वाटत नव्हता. पण बादशहांच्या मुली करून घेण्यानें आपलें कुल भ्रष्ट होईल व कुलाला कमीपणा येईल असें मात्र त्यांना वाटतच होतें. 'रजपूत संस्कृति'कर्ते श्री. देशपांडे म्हणतात कीं–रजपुतांनीं क्षुद्र आकांक्षेनें मुसलमानांना मुली दिल्या हा समज अत्यंत चुकीचा आहे. सर्व कुलाच्या शुद्धीसाठीं एकादी मुलगी नाइलाजानें द्यावी लागे. मुलीच्या इच्छेविरुद्ध ते असें करीत नसत. तिची मान्यता नसल्यास शीलरक्षणार्थ ते लढून मरत. परंतु अन्य स्त्रियांच्या शीलरक्षणार्थ आणि राज्याचा व कुटुंबाचा नाश न व्हावा

म्हणून " त्यजेदेकं कुलस्यार्थे " या न्यायानें सुविचारी कन्यकांनीं आपल्या शीलाचा होम केला. त्यामुळें अन्य स्वधर्मीय व स्वजातीय स्त्रियांच्या शीलांचें त्यांनीं रक्षणच केलें हें विसरतां कामा नये.

( राजपूत संस्कृति पान ८८ )

(२०९) **एकांगी शिकवण आंगलट आली:**—स्त्रियांच्या पावित्र्याविषयीं एकंदरींत भ्रामक समजुती समाजांत होत्या. त्यांतच आणखी चांगल्या तत्त्वाच्या एकांगी शिकवणीची भर पडली. त्यामुळें हिंदु स्त्रियांनीं विधर्मी पतीशीं संसार सुखानें केले ! तें तत्त्व म्हणजे पातिव्रत्य हें होय. हिंदु स्त्रियांच्या मनावर सीता, दमयंती, सावित्री या महान् स्त्रियांच्या पातिव्रत्याचे उज्ज्वल संस्कार होते. स्त्रीनें आपल्या पातिव्रत्याच्या तेजानें अनेक गोष्टी घडवून आणल्याचीं पुराणांतील उदाहरणें सांगितलीं जात. पातिव्रत्य म्हणजे एक उज्वल व्रत आहे. पति कसाहि असो, सजातीय असो, विजातीय असो, स्वधर्मी असो, विधर्मी असो, तो पसंतीनें झालेला असो वा छलबलानें झालेला असो, कोणच्याहि भल्याबुऱ्या उपायानें तो पति झाला कीं पातिव्रत्य हें स्त्रियांचें कर्तव्य !! त्यांनीं त्या पतींचें अभिष्ट चिंतित बसलेंच पाहिजे ! पति हीन, दीन, चोर, व्यसनी असा जरी असला तथापि स्त्रीनें त्याची सेवा केलीच पाहिजे, असली घातकी मनोवृत्ति स्त्रियांच्या ठिकाणीं उत्पन्न केलेली होती ! सीतेचें पातिव्रत्य हें रामचंद्राच्या एकपत्नीव्रतामुळें खुलून दिसतें. दमयंतीची पतिनिष्ठा नळाच्या आपत्तींत कसाला लागते आणि सावित्रीच्या उज्ज्वल पातिव्रत्याचा प्रकाश सत्यवानाच्या शीलामुळें पडतो, हें तत्त्व शिकविलें गेलें नाहीं. सीतासावित्रीचें अनुकरण करीत असतांना त्यांच्या पतींच्या सद्वर्तनाकडेहि लक्ष्य दिलें पाहिजे व तारतम्यानें वागलें पाहिजे. या तऱ्हेचें शिक्षण स्त्रियांना नव्हतें, त्यामुळें विधर्मीय व जबरदस्तीनें झालेल्या पतींना हिंदुस्त्रियांचें पातिव्रत्याचें तत्त्व उपयोगी पडलें. हिंदु स्त्रियांना भ्रष्ट करावें, जबरीनें निका लावावा कीं आपला संसार सुखाचा होतो. लग्नानंतर त्या देव म्हणून आपल्याला भजतात. हें रहस्य मुसलमान आक्रमकांना समजलें व त्यांनीं छलबलानें लग्नें लावलीं. जे मुसलमान प्रथम इकडे आले ते स्त्रियांविरहितच आले

होते. त्यांनीं धर्माच्या अभिनिवेशानें काफिरांच्या स्त्रियांशीं छलबलानें लग्नें लावलीं. त्याच वेळीं छलबलानें आक्रमण करणाऱ्यांचा प्रतिकार करून पातिव्रत्य रक्षण करण्याचें शिक्षण स्त्रियांना द्यावयास हवें होतें. विधर्मी पति हा शत्रु आहे, मनानें न वरलेला पति हा पति नव्हे, त्याच्या दास्यांत राहणें म्हणजे नरक होय, जुलमानें झालेल्या विधर्मी पतीच्या तावडींतून काय पाहिजे तें करून सुटका करून घ्यावी, दास्यविमोचनार्थ जुलमानें पति झालेल्या शत्रूचें प्राणहरणहि साधेल तर अवश्य करावें, जुलमानें झालेला संभोग हा संभोग नव्हे, त्यानें भ्रष्टता येत नाहीं. अधर्मविवाहानें हक्क गाजविणाऱ्याचा सूड संधि साधून घेतला पाहिजे. हे विचार जर स्त्रियांमध्यें असते तर तत्कालीन इतिहासाला निराळीच कलाटणी मिळाली असती! इंग्लंड, अमेरिका, इटली, रशिया, जर्मनी, जपान इत्यादि देशांतील देशभक्त स्त्री-पुरुषांच्या कितीतरी रोमांच-कारी आख्यायिका ऐकावयाला येतात. स्त्रियांनीं विदेशीय पतींशीं लग्नें लावलीं, संसार केले, पुरुषांनीं तेथें जाऊन अनेक वर्षें विविध व्यव-सायांत तन्मयतेनें घालविलीं. तथापि वेळ येतांच मातृभूमीच्या कर्तव्याला ते जागरूक राहिले आणि आपल्या राष्ट्राच्या उत्कर्षास त्यांनीं साह्य केलें. यावरून स्वदेशनिष्ठा हा जो उत्कृष्ट गुण त्यांच्या ठिकाणीं दृष्टीस पडतो तसा स्वधर्मनिष्ठेचा गुण हिंदु स्त्रियांच्यामध्यें दिसला असता. एखाद्या स्त्रीनें जर असलें साहसाचें कृत्य केलें असतें तर तिला स्वसमाजांत मोठा मान मिळाला असता, किंवा स्वसमाजानें तिचा संग्रह केला असता अशी स्थिति नव्हती. विधर्मीय पतीला ठार मारून बाहेर आल्यावर जर समाजानें त्यांना झेललें असतें तर त्यांनीं साहस केलेंच असतें. दैववाद, कलिवाद आणि पातिव्रत्याची एकांगी शिकवण यांमुळें त्या दुबळ्या झाल्या होत्या, म्हणून दुर्दैवाच्या फेऱ्यांत सांपडल्यावर विधर्मीय पतीशींसुद्धां त्या पतिव्रताधर्मानें राहिल्या. आपद्धर्म, सामान्यधर्म, व्यष्टिधर्म व समष्टिधर्म आणि धर्मशास्त्राच्या उदारतेचें अज्ञान यांमुळें हिंदुस्त्रियांना दुःस्थितींत जन्म घालवावे लागले.

(२१०) **उदार धर्मशास्त्राचें अज्ञान:**–ज्या स्त्रीवर दुर्दैवानें बलात्कार झाला असेल तिचा त्याग करूं नये. स्त्रिया या परमपवित्र आहेत,

प्रत्येक महिन्याचा मासिक दोष निवृत्त झाल्यानंतर त्या शुद्ध होत असतात, बलात्कारानें गर्भधारणा झाली असली तरी गर्भमोचनानंतर ती शुद्ध होते. तिचा त्याग कोणत्याहि तऱ्हेनें करूं नये. कारण राजा, समाज, पति यांच्या दौर्बल्यामुळें स्त्रियांवर आक्रमणें होत असतात. ती जर मनानें शुद्ध असेल तर तिचा संग्रह अवश्य करावा, असें बौधायन बृहद्यम व देवल आदि स्मृतिकारांनीं कळकळीनें सांगितलें आहे.

स्त्रियः पावित्र्यमतुलं नैता दुष्यन्ति कर्हिचित् ॥६३॥ –बोधायन
बलात्कारोपभुक्ता वा चौरहस्तगताऽपि वा ॥ २ ॥
न त्याज्या दूषिता नारी नास्यास्त्यागो विधीयते ॥ ३ ॥

–बृ. य. अ. ३

विनिःसृते ततः शल्ये रजसो वापि दर्शने ।
तदा सा शुध्यते नारी विमलं काञ्चनं यथा ॥५१॥ –देवल

स्त्रीचें पावित्र्य बाह्य शरीरावर अवलंबून नसून मनाच्या पावित्र्यावर अवलंबून आहे. मन पवित्र असून समाजाच्या, राजाच्या व पतीच्या दौर्बल्यामुळें जरी तिजकडून पाप घडलें, तथापि ती विशुद्ध आहे असें शास्त्रकार उदारतेनें सांगतात. दुर्गुणी, कठोर, कर्कशा अशी कोणतीहि स्त्री घर सोडून जाऊं लागली तर तिला जाऊं देऊं नये. व्यभिचारिणी स्त्रीचासुद्धां त्याग करूं नये, म्हणजे घराबाहेर घालवूं नये, फार तर धर्मक्रिया व उपभोग या क्षेत्रांत तिचा त्याग करावा, असें धर्मशास्त्र आहे. कारण पतित्यक्ता स्त्रीचे हातून जें पाप घडण्याचा संभव असतो, तें शंभरपटीनें नवऱ्याचे व पित्याचे कुलास लागत असतें. पतित स्त्रिया जर समाजास कायमच्या मुकूं लागल्या तर त्यांना भ्रष्ट करणाऱ्यांचें चांगलेंच फावेल ! स्त्री ही संततीची मूस आहे. पतित झालेली किंवा भ्रष्टपणाची शंका आलेली स्त्री जर अन्य समाजांत गेली तर तिजपासून होणारी संतति तिच्या मूळच्या समाजाची शत्रूच होते, असा अनुभव आहे. हिंदुसमाजाशेजारचे समाज कसे वाढले व त्यामुळें हिंदुसमाजाची कशी हानि झाली हें स्पष्टच आहे. पतित स्त्रियांविषयीं तर हिंदुधर्मशास्त्र फार उदार आहे. महाभारतांत गौतम व अहिल्या यांची जी कथा आहे, तींत अहिल्येच्या हातून जी चुकी घडली

तिचा दोष गौतम स्वतःच्या असावधपणालाच देत आहे. स्त्रीकडून जर व्यभिचार घडेल तर त्याचा दोष पतीकडेच अधिक आहे असें मनु ( अ. ८ श्लो. ३१७ ) म्हणतो. व्यभिचारिणी स्त्रीला कडक शिक्षा द्यावी हें जसें शास्त्रांत सांगितलें आहे तसेंच व्यभिचार करणाऱ्या पुरुषालाहि तापलेल्या लोखंडावर घालून जाळून टाकावा असेंहि मनूनें म्हटलेलें आहे. म्हणजे व्यभिचारी स्त्री व पुरुष या दोघांना मनूनें कडक शासन सांगितलें आहे.

भर्तारं लंघयेद्या तु स्त्री ज्ञातिगुणदर्पिता ।
तां श्वभिः खादयेद्राजा संस्थाने बहुसंस्थिते ॥

मनु. अ. ८ श्लो. ३६५

पुमांसं दाहयेत्पापं शयने तप्त आयसे ।
अभ्यादध्युश्च काष्ठानि तत्र दह्येत पापकृत् ॥

मनु. अ. ८ श्लो. ३७२

अन्यस्त्रीवर बलात्कार करणारा, तिच्याशीं जबरीनें लग्न लावणारा पुरुष हा वधार्ह आहे. स्त्रीनें आपलें मन जर शुद्ध ठेवलें असेल तर तिला उदारपणानें वागवावें, अपराधी मानूं नये, असें मत्स्यपुराणांत म्हटलें आहे.

बलात् संदूषयेद्यस्तु परभार्यां नरः क्वचित् ।
वधो दंडो भवेत्तस्य नापराधो भवेत्स्त्रियः ॥

मत्स्य पु. अ. २२७ श्लो. १२६

स्त्रीचें वांकडें पाऊल पडण्यास पुरुषच कारणीभूत होतात. पुरुष हा साहस आणि इतर गुण यांमुळें स्त्रीला मोहांत पाडतो. स्त्रीचें पाऊल वांकडें पडूं नये म्हणून तिला कोणच्याहि वस्तूची वाण न पडेल अशी व्यवस्था पुरुषानें करावी. पतिविरहाचें दुःख पुष्कळ दिवस तिनें सहन करण्याचा प्रसंग न आणावा, अशाहि सूचना मनूनें दिलेल्या आहेत.

विधाय वृत्तिं भार्यायाः प्रवसेत् कार्यवान्नरः ।
अवृत्तिकर्षिता हि स्त्री प्रदुष्येत् स्थितिमत्यपि ॥

मनु अ. ९ श्लो. ७४

शास्त्रांतील या उदार विचारांच्या अज्ञानामुळें बुद्धोत्तर कालांत स्त्रीपावित्र्याविषयीं भलत्याच कल्पना रूढ झाल्या. त्याचे दुष्परिणाम तेव्हां-

पासून समाजाला आजवरहि भोगावे लागत आहेत. समाजपावित्र्य व स्त्रीपावित्र्य याप्रमाणें शरीरपावित्र्याविषयीं कशा भ्रामक समजुती होत्या याच्या विवेचनाकडे आतां वळतों.

(२११) **विटाळाची वंशवृद्धिः**– वैदिक वाङ्मयामध्यें विटाळ-चंडाळाच्या कल्पना फारशा दिसत नाहींत. कारण त्यावेळीं कर्मठपणा व कठोर जातिबंधनें हीं नव्हतीं. विविध समाजांमध्यें वंश व संस्कृतिमूलक जे भेद होते, त्यामुळें निसर्गतः जेवढें अंतर समाजामध्यें होतें, तेवढ्यावरच पावित्र्याच्या कल्पना व विटाळाच्या कल्पना उभारल्या गेल्या होत्या. त्रैवर्णिक संस्था वेदकालीं प्रमुख होती. त्यामध्यें अन्नलग्नादि व्यवहार राजरोस होत होते. त्रैवर्णिकांमध्यें वंशमूलक भेद मुळींच नसल्यामुळें परस्परांतील सोंवळें ओंवळें व विटाळ यांचा बडेजाव वाढलेला नव्हता. मनु–याज्ञवल्क्य–स्मृतींचा काल जरी अनिश्चित असला व त्या ग्रंथांवरहि बौद्धधर्माचे थोडे संस्कार झालेले दिसले तरी या दोन्ही स्मृतींमध्यें सोंवळ्या ओंवळ्याचें स्तोम फारच थोडें आहे. मनु–याज्ञवल्क्यस्मृतिकालीं चातुर्वर्ण्यव्यवस्था होती, राजव्यवस्था होती, समाजशासन होतें आणि नागरजीवनाला उपयुक्त अशा आरोग्य, वैद्यक आणि स्थापत्य या शास्त्रांचा प्रसार झालेला होता. इतकें असूनहि मनु–याज्ञवल्क्यस्मृतींमध्यें विटाळचंडाळाचा अतिरेक नाहीं. बुद्धोत्तर कालांत निर्वाण, संन्यास, अहिंसा, निर्मांस-भोजन, शुद्धाशुद्धतेच्या व उच्चनीचतेच्या कल्पना यांमुळें शिवाशिव व प्रायश्चित्त यांची रेलचेल झाली आहे. स्मृतिग्रंथांत आचार, व्यवहार व प्रायश्चित्त असे तीन विषय आहेत. मनुस्मृतीमध्यें १२ अध्यायांपैकीं शेवटचे दोन अध्याय प्रायश्चित्ताकरितां दिलेले आहेत. दहाव्या अध्यायाच्या शेवटीं "एष धर्मविधिः कृत्स्नश्चातुर्वर्ण्यस्य कीर्तितः । अतः परं प्रवक्ष्यामि प्रायश्चित्तविधिं शुभम् ।" अशी प्रस्तावना केली आहे. याज्ञवल्क्यस्मृतीमध्यें एकंदर तीनच अध्याय आहेत. पैकीं ३६८ श्लोकांत आचारधर्म, ३०७ श्लोकांत व्यवहारधर्म व ३३४ श्लोकांत प्रायश्चित्तधर्म सांगितला आहे. विषयाच्या दृष्टीनें या स्मृतींतहि आचार, व्यवहार व प्रायश्चित्त यांचें तारतम्य चांगलेंच राखलेलें आहे. पण पराशरस्मृतीपासून अत्रि, अंगिरा, आपस्तंब, दक्ष, हारित, बृहस्पति, शंख, लिखित इत्यादि ज्या

स्मृति झाल्या, त्या सर्व स्मृतींना प्रायश्चित्त–स्मृति असें म्हणणें जास्त शोभतें. कारण या ग्रंथांत आचारधर्म, पुरुषार्थ धर्म, व्यवहार व कर्तृत्व यासंबंधाचा विचार समुद्रांत राईइतका असून प्रायश्चित्तांचाच समुद्र खवळलेला दिसतो! बुद्धोत्तरकालांत पराशरापासूनच्या पुढील सर्व स्मृति खास निर्माण झाल्या म्हणून त्यांत शिवाशीव, विटाळ व सोंवळें यांचे धर्म भरलेले आहेत. कारण त्या कालांत बौद्धतत्त्वज्ञानाप्रमाणें जिकडे तिकडे दुःख, दैन्य, घाण व अपवित्रता दिसत होती. प्रत्येक व्यक्तीला आपली शुद्धता, पवित्रता, उच्चता व मोक्ष यांचीच काळजी वाटत होती. त्यामुळें सोंवळ्या ओंवळ्याच्या आचाराला आणि विटाळाच्या कल्पनेला अगदीं ऊत आला. पदार्थ, माणसें, पशु, पक्षी यांच्या ठिकाणीं दोष दिसू लागले व त्यांच्या स्पर्शापासून पाप उत्पन्न होतें असें वाटू लागलें.

(२१२) **विटाळांची संख्याः**–विटाळचंडाळाच्या ज्या कल्पना आज समाजामध्यें आहेत, त्या खिस्तपूर्व ५०० ते खिस्तोत्तर ५०० या कालांतील आहेत. त्यांची संख्या बरीच भरते, ती अशीः–चातुर्वर्णिकांचा परस्पर विटाळ, जातीजातींचा एकमेकांस तारतम्यानें उष्टा विटाळ, मुडदे-फरास, मूर्ख व उन्मत्त मनुष्य, रंगारी, कोळी, बुरूड, परीट, चांभार, नट, सुतकी, म्लेंच्छ, पारसिक, पातकी, बौद्ध, शैव, पाशुपत, नास्तिक, नापित, कलाल, वडार, तेली, विकर्मस्थ द्विज, दुर्जन, गुरव, पुजारी, बाळंतीण, विटाळशी, प्रेत व त्याचें काष्ठलोष्ठ यांचा विटाळ; पान, मैथुन, मूत्र, पुरीष, थुंकणें, शिंकणें, झोंपणें, इत्यादिकांचा विटाळ, हातानें मोडलेलें दहीं, पाण्याचा फेस, दूधभोपळा, कांदा, लसूण, शेवगा, तांबडा मुळा, पांढरीं वांगीं, गाजर, तोंडलें, घोसाळें, दोडका, भोकरें, तिळकूट, कांजी, कमळाचे कांदे, कांहीं पालेभाज्या व कलिंगडें, अशा प्रकारच्या पदार्थांचें विटाळ. ज्यांचे विटाळ सांगितले आहेत ते सर्व पदार्थ भोजनास निषिद्ध असे म्हटले आहेत. वैद्य, नट, धूर्त, लबाड, वाद्यें वाजविणारा यांच्या घरचें अन्न अभोज्य आहे. कारण यांचा विटाळ सांगितला आहे. पशु-पक्ष्यांपैकीं डुक्कर, कुत्रे, मांजर, गाढव, उंट, एडका, कोल्हा, करकोचा, कोंबडा, कावळा, चिमणी, गिधाड, उंदीर, किडे, उवा अशांचे विटाळ सांगितले आहेत. माणसें, पशु, पक्षी व पदार्थ यांच्या विटाळांची एकंदर संख्या

जवळ जवळ चारशेंपर्यंत गेलेली आहे. शिवाशिवीच्या या अतिरेकामुळें धर्म व अधर्म यांच्या कल्पना अगदीं कुजक्या झाल्या होत्या. सोंवळें ओंवळें पाळावें, स्नानें दानें करावींत आणि मुसलमानांशीं शरीरसंबंध ठेवूनसुद्धां आपण पवित्र राहतों अशी हिंदुस्त्रियांची भावना होती. मोंगल बादशहांनीं आपल्या रजपूत राण्यांसाठीं त्यांनीं स्वधर्माचरण करावें म्हणून जनानखान्याजवळ शिवाचीं व विष्णूचीं देवालयें बांधून दिलीं होतीं. सकाळीं स्नान व शिवपूजन, दुपारीं पुराणश्रवण व रात्रौ जुलमानें पति झालेल्या बादशहाशीं शरीरव्यवहार असा त्यांचा कार्यक्रम असे आणि इतकें सर्व करून आपला धर्म बिघडत नाहीं अशी जेथें खुळचट कल्पना होती तेथें काय विचारावें? स्मृतींतील प्रायश्चित्तें, विटाळांचा अतिरेक व पावित्र्याच्या भ्रामक समजुती पाहून राष्ट्रांतील जयिष्णु वृत्तीचा लोप कसा झाला होता याची कल्पना येते. तत्कालीन स्मृतिकारांनीं व पंडितांनीं दुसऱ्याला जिंकावें कसें, याचा धर्म तर सांगितला नाहींच, तर जगण्याचा धर्महि न सांगतां "खाऊं नकोस, जेवूं नकोस", तसें करशील तर पाप लागेल, असें म्हणून प्रायश्चित्तधर्मच सांगितला. जयिष्णु मुसलमान आक्रमकांनीं हें हिंदुसमाजाचें वर्म ओळखलें, आणि त्यावर आघात करण्यास प्रारंभ केला. इस्लामचें तोंड मोठें होतें म्हणून त्यांत सर्व कांहीं जात होतें व आंत गेल्यावर तें पचतहि होतें. पण हिंदूचें तोंड फारच लहान कीं त्यामुळें सजातीय व स्वधर्मीय मनुष्यसुद्धां त्यांत जात नव्हता व पचत नव्हता. संग्राहकतेचा गुणच नष्ट झाला होता आणि या विटाळांच्या वृद्धीमुळें प्रतिकारशक्तिच नष्ट झाली होती, हें उघड दिसतें.

(२१३) **अस्तित्व व प्रतिकारशक्तिः**—व्यक्ति, समाज व राष्ट्रें फार काय निर्जीव पदार्थांचें अस्तित्वहि प्रतिकारशक्तीनेंच राहातें. दगड, झाड, घरसुद्धां आपलें अस्तित्व प्रतिकारक्षमतेनें टिकवितें. दगड, झाड या निर्जीव वस्तूमध्यें जर प्रतिकारशक्ति नसती तर त्यांचें अस्तित्वच न राहातें. जगांतील विविध पदार्थांचें अस्तित्व प्रतिकारक्षमतेंतच आहे. मनुष्यसुद्धां प्रतिकारक्षमतेनें जगतो. पाल कुचकुचली व अंगावर पडली, पिंगळा किलबिलला, कावळा शिवला, कोंबड्याचा स्पर्श झाला, तर माणसाचें पावित्र्य नष्ट कां व्हावें? कावळ्या, कोंबड्याच्या स्पर्शानें जर माण-

साचें पावित्र्य नष्ट होतें, तर माणसाच्या स्पर्शानें ते पक्षी अधिक पवित्रच होतात असें कां समजूं नये? दहा ब्राह्मणांचे पंक्तींत एक पूर्वास्पृश्य येतांच जर पंगत विटाळते तर त्या उलट दहा ब्राह्मणांत तो अंत्यज आल्यानें त्याची अस्पृश्यता सर्वस्वीं नष्ट होते असें मानणें युक्त नाहीं काय? उंदीर, घुशी, बदकें, कोंबडीं, कावळे, कुत्रीं या पशुपक्ष्यांना जर समजलें कीं, आपल्या स्पर्शानें माणसांमध्यें अपवित्रपणा येतो व माणसें स्नान करतात, तर त्यांनीं माणसांवर एकसारखें आक्रमण करून त्याचें अस्तित्व खुशाल नष्ट करावें! तसा यत्न केल्याचें ऐकिवांत नाहीं. तथापि दुसऱ्याच्या स्पर्शानें मी भ्रष्ट होतों या कल्पनेपेक्षां माझ्या स्पर्शानें सर्व जग मी पावन करतों अशी प्रबळ कल्पनाच इष्ट नाहीं काय? शरीरपावित्र्याच्या अतिरिक्त-कल्पनांमुळें प्रतिकारक्षमता मात्र नाहींशी झाली.

**(२१४) सहिष्णुवृत्तीचा प्रादुर्भावः**—हिंदुसमाज त्या काळीं फार सहिष्णु झाला होता म्हणूनच अमक्याला कसें शिवूं, अमकें कसें खाऊं, अमक्या देशांत कसा जाऊं, तेथें गेल्यास दोष घडेल काय, त्याला प्रायश्चित्त काय, असा मंत्रचळेपणा त्याचेमध्यें आला. सहिष्णु समाजाचा सर्व धर्म "शिवूं नकोस व जेवूं नकोस" यामध्यें येऊन बसतो, तर जयिष्णु समाजाच्या मनाला असले प्रतिबंध शिवतहि नाहींत. जगांत कोठेंहि जावें, जगभर आक्रमण करावें, सर्व भागावर आपली संस्कृति प्रस्थापित करण्याचा अट्टाहास करावा, सर्व जगाला आपलें ऐश्वर्य, आपलें ज्ञान व कर्तृत्व दाखवावें, वाटेल त्याला आपल्या धर्मांत घ्यावें, अशी वृत्ति जयिष्णु समाजाची असते व ती तशी इस्लामची होती. खाणें, पिणें, धंदा, स्पर्श यांपैकीं कशाचाहि विधिनिषेध इस्लामला नव्हता. पण हिंदु संस्कृति मात्र या असल्या अनेक नियमांनीं जखडून गेली होती. स्पर्शाला प्रायश्चित्त, भोजनाला प्रायश्चित्त, संसर्गाला प्रायश्चित्त, असा सगळा प्रायश्चित्तधर्म हिंदुधर्माची सहिष्णुता व पावित्र्य-कल्पनेचा अतिरेक दाखवीत नाहीं काय?

**(२१५) एक उल्लेखनीय ग्रंथः**—हिंदुसमाजाच्या अवनतीचा विचार करीत असतांना आम्ही १९२९ सालीं पावित्र्याच्या भ्रामक समजुती, समष्टिधर्माचा अभाव आणि इतर अनेक दोष यांचें विवेचन आमच्या

ग्रंथांत केलेलें आहे. आमचे समानधर्मे पं. तर्कतीर्थ कोकजेशास्त्री यांनीं याच विषयावर ' हिंदूंच्या अवनतीची मीमांसा ' हा उत्कृष्ट ग्रंथ लिहिला आहे. तो अवश्य वाचावा, अशी येथें आम्ही वाचकांना सूचना देतों.



## प्रकरण अकरावें

# अहिंसेचा अतिरेक

गेल्या दोन प्रकरणांत पावित्र्यकल्पनेचा विचार केला. या प्रकरणांत अहिंसेची चर्चा करूं.

**(२१६) वैदिक परंपरा व यज्ञः**–यज्ञ हे केवळ पशुहननाकरितां आणि मांसभक्षणाकरितां नव्हते. क्षत्रियांना मांसाहार विहित आहे व तो यज्ञाशिवायहि ते करूं शकत. बहुतेक यज्ञ राजन्यप्रधान म्हणजे क्षत्रियांनीं करावयाचे आहेत. हे सर्व यज्ञ इहलोकांतील पुरुषार्थाकरितां आहेत. राजसूययज्ञ, अश्वमेधयज्ञ हे अपूर्वाकरितां नसून ऐहिक विजयार्थ ते महत्त्वाकांक्षी सम्राटांना सांगितले आहेत. यज्ञसंस्थेच्या द्वारें आक्रमण करण्याचा वेदकालीं प्रघात होता. यज्ञ हे केवळ धार्मिक अनुष्ठान नव्हतें. तर त्यामध्यें चांगलें राजकारण होतें हें प्रकरण २ परिच्छेद ३४ मध्यें दाखविलें आहे. सम्राटानें अश्वमेध यज्ञ करावा, ' राजा सार्वभौमः अश्वमेधेन यजेत । ' ' राष्ट्रं वै अश्वमेधः ' अशी वेदाज्ञा आहे. अश्वमेध म्हणजे राष्ट्र; त्याचा अर्थ जेवढ्या भूभागाचें आक्रमण तो अश्व करील तो भाग विशिष्ट संस्कृतीच्या लोकांचें म्हणजे त्रैवर्णिकांचें राष्ट्र होय! राजाची सत्ता स्थिर झाल्यावर त्यानें अश्वमेधाचे द्वारें आक्रमण करावें आणि आपल्या संस्कृतीचा प्रसार तेथें करून, त्यास स्वराष्ट्र बनवावें असा हा वैदिकसंप्रदाय होता

पण यज्ञासंबंधीं बुद्धानें एकंदरींत तिटकारा उत्पन्न केल्यामुळें त्यांतील जो चांगला भाग होता, तोहि लुप्त झाला. पशुहनन वर्ज्य करून यज्ञ करावेत, त्याद्वारें अवश्य संस्कृतिप्रसार करावा असा विचार पुढें आला नाहीं. पुष्कळ यज्ञांचीं ब्राह्मणांचा संबंध पुरोहित म्हणजे भिक्षुक या नात्यानेंच येत असे. ऋत्विजांतील भांडणें, भिक्षुकी मत्सर, खर्च व खटाटोप या सर्वांवर टीका करून आणि हिंसेचाहि निषेध करून यज्ञसंस्थेविषयीं आदरानें बोलणें अशक्य नव्हतें. पण अहिंसेच्या बुरख्याखालीं 'अहिंसा परमो धर्मः' याचा घोष करीत वैदिक परंपरा व आक्रमता यांचा नाश करण्याचा यत्न करण्यांत आला. बुद्धाच्या पश्चात् शुंग, गुप्त, शातवाहन आंध्र, चालुक्य अशा महाबलाढ्य वैदिकधर्माभिमानी राजांनीं मधून मधून अश्वमेधयज्ञ केले. परंतु त्यांना त्या यज्ञाचे द्वारें पूर्वपरंपरागत महत्त्वाकांक्षी आक्रमण शीलता समाजांत उत्पन्न करतां आली नाहीं. बुद्धाच्या अहिंसाधर्माचा लोकमतावर एवढा प्रभाव झाला होता कीं केवळ हे राजे म्हणूनच त्यांना यज्ञ करणें शक्य झालें. राजन्य यज्ञांचा जीर्णोद्धारहि करतां आला नाहीं याचें कारण हिंसेविरुद्ध लोकमत फारच प्रक्षुब्ध झालेलें होतें.

**(२१७) यज्ञसंस्था व क्षात्रवृत्तिः**—अग्निहोत्राचा संबंध व्यक्तीशीं होता, म्हणून तें राहिलें. यज्ञ हा समाजसंबद्ध म्हणजे समष्टिसंबद्ध होता, तो नष्ट झाला व कलिवर्ज्यांत त्याला जागा मिळाली. यज्ञविधींचा संकोच होतांच देवदेवतांचें बंड वाढलें, आणि श्रीकृष्णभक्तीच्या प्रसारानें गायीबैलांबद्दल प्रेम वाटूं लागलें. ह्यूएनत्संगाच्या वेळीं गायीबद्दल अतिशयच प्रेम वाढलें होतें. तो म्हणतो कीं त्यामुळें इतर प्राण्यांची हिंसाहि बंद होत आली होती. हर्षादिराजांनीं कायद्यानें हिंसा बंद केल्यामुळें यज्ञ संस्था मागें पडली. हिंसाकार्य हें क्षात्रवृत्तीला पोषक आहे व क्षात्रधर्म हा समाजाला साक्षात् धारण करणारा आहे. समाजाची धारणा क्षात्रवृत्तीवांचून नाहीं व क्षात्रवृत्तीची धारणा हिंसेवांचून नाहीं. यज्ञसंस्थेमध्यें या दोहोंचा समन्वय होता, पण अहिंसेच्या अतिरेकानें ती संस्था व ती वृत्ति समूळ मारली गेली.

**(२१८) अहिंसेचा अत्याचारः**—जगांतील कोणत्याहि समाजामध्यें कांहीं प्रमाणांत हिंसा आणि अहिंसा हीं दोन्ही पाहिजेत. नुसत्या अहिंसेनें

समाज जगणार नाहीं आणि केवळ हिंसेच्या पुरस्कारानें समाजाला स्वास्थ्य मिळणार नाहीं. समाजधारणेकरितां या नीतितत्त्वाचें आचरण तारतम्यानेंच व्हावयास पाहिजे. सहाव्या शतकांत अतिरिक्त वाढलेल्या यज्ञीयहिंसेस विरोध करण्याकरितां जैनधर्म व बौद्धधर्म उदयास आले. पुढें या धर्मांच्या मदतीला ख्रिस्तिधर्म आला. ख्रिस्तपूर्व ६०० ते ख्रिस्तोत्तर सहाव्या शतकांत अहिंसावादाचा प्रसार ॲटलांटिक महासागरापासून तों पॅसिफिक महासागरापर्यंत झालेला होता. युरोपांत ख्रिस्तिधर्मगुरु आपापल्या मठांत सुईच्या अग्रावर किती देवदूत नृत्य करूं शकतील याची गांभीर्यानें चर्चा करीत होते तर इकडे त्याच वेळीं पापणीच्या लवण्यासरशीं किती जिवांच्या तंगड्या मोडत असतील यांचा हिशेब जैन यति करीत होते. तात्पर्य आशिया व युरोप या दोन्ही खंडांत ख्रिस्तोत्तर सहाव्या शतकांत अहिंसावादाचा परिणाम सारखाच झालेला होता. सजीव वस्तूला इजा न देणें म्हणजे अहिंसा होय. हें तत्त्व फार प्राचीन आहे. त्याचें महत्त्व यज्ञीय हिंसेविरुद्ध जोरानें प्रचार करून जैन व बौद्ध यांनीं वाढविलें. जैन व बौद्ध या दोन्ही धर्मांचें तत्त्वज्ञान निवृत्तिपर आहे. कीर्तिमुख निवृत्तिपर असून मागें त्यास प्रवृत्तीचें पुच्छ चिकटविलें तरी त्याचा परिणाम अनिष्टच होतो. संन्याश्यांनीं, भिक्षूंनीं, यतींनीं पूर्ण अहिंसा पाळावी हें युक्तच आहे. कारण त्यांना या जगांत कोणीकडून मरेपर्यंत जगावयाचें असतें. पण गृहस्थाश्रमी, व्यवहारी उलाढाली करणारे आणि राज्यकर्ते यांनीं तशी अहिंसा पाळणें चुकीचें आहे. जैनधर्मामध्यें व बौद्धधर्मामध्यें अहिंसा तारतम्यानें सांगितली असली तथापि भिक्षु, श्रमण, यांना अवास्तव महत्त्व आल्यामुळें त्यांच्या आचाराची छाप समाजावर पडली! घरांतील वृद्ध आजीबाईमुळें घरांत धार्मिक वातावरण निर्माण होतें त्यांचेंच अनुकरण मुलें करतात. सर्वांना वळण तेंच लागतें. तीच गत हिंदुसमाजाची झाली. सिद्धाचें जें लक्षण तेंच साधकाचें साधन अशी परिभाषा आहे. सिद्ध हें ध्येय, सिद्ध हेंच सर्वस्व, त्यांचें आचरण अहिंसायुक्त म्हणून साधकांनीं आणि सामान्य जनांनींहि अहिंसाव्रत गिरविण्यास प्रारंभ केला. "अति सर्वत्र वर्जयेत्, अति तेथें माती" अत्याचार म्हणजे मूर्खपणा आणि अनाचार म्हणजे मालिन्य यांचें प्रत्यंतर

पहावयाचें असल्यास तें हिंदुसमाजाच्या इतिहासांतच सांपडेल, आणि महावीर व बुद्ध यांना आपण सांगितलें होतें काय व पुढें झालें काय असें म्हणणें भाग पडेल!

(२१९) **नारदाची गोष्टः**–एकदां नारद जगदुद्धारार्थ ब्रह्मवीणा हातांत घेऊन नामसंकीर्तन करीत संचार करीत होते. संचार करीत असतांना एका वनांत ते प्राप्त झाले. तों एक महाभुजंग त्यांना दंश करण्यास आला. नारदांचा पादस्पर्श होतांच त्याला उपरति झाली व तो 'भगवन्! मला उद्धरा,' असें म्हणाला. नारदांनीं सांगितलें, "उगाच आल्यागेल्यांना पीडा देऊं नको, आणि विनाकारण चावूं नकोस." भुजंग ठीक आहे असें म्हणून वंदन करून निघाला. नारदांच्या उपदेशाचें सार नीट न समजल्यामुळें त्यानें चावणें सोडून दिलें व गोगलगाईवृत्तीनें तो पड-वळासारखा पडून राहिला. पुढें कांहीं दिवसांनीं नारद परत आले तों त्यांना आपला शिष्य आसन्नमरण दिसला; कारण येणाऱ्याजाणाऱ्यांनीं त्याचेवर धोंडे फेकले होते आणि गुराख्यांनीं त्याला काठ्यांचे तडाखे दिले होते. नारद म्हणाले, 'अरे शिष्या! तुझी ही अशी अवस्था कां?' भुजंग म्हणाला 'महाराज आपल्या उपदेशाचा प्रभाव!' नारद म्हणाले, "मूर्खा, मी तुला विनाकारण चावूं नकोस असें म्हटलें होतें. तूं हें विसरलास. हें पहा स्वसंरक्षणार्थ आणि प्रतिकारार्थ फुत्कार करीत अंगावर जात जा." शिष्य म्हणाला 'ठीक आहे.' दुसरे दिवशीं येणारे जाणारे जेव्हां त्याला उपद्रव देऊं लागले त्यावेळीं फुःस करून भुजंग धावूं लागतांच सर्व पळाले व त्यामुळें तो जगला. नारदांनीं सांगितलें एक व भुजंगानें केलें भलतें. करायला गेला मनुष्य गणपति व झालें माकड, अशी स्थिति अहिंसोपदेशानें हिंदुसमाजाची झाली.

(२२०) **अहिंसेची परीक्षाः**–यज्ञांत हिंसा करूं नये, पशुहननानें स्वर्ग मिळत नाहीं. यतींनीं, भिक्षूंनीं, श्रमणांनीं, व संन्याशांनीं पूर्ण अहिंसा पाळावी, सर्व दुःखें प्रतिकार न करतां सहन करावींत हें अगदीं योग्य होतें. पण तें व्यावहारिकलोकांकरितां नाहीं. त्यांनीं स्वतःचे समाजाचे व राष्ट्रांचे संसार तारतम्यानें अहिंसाव्रत पाळून आणि अणुव्रतें आचरून अवश्य करावेत हा जो उपदेश तो मागें पडला आणि यतिधर्म, भिक्षुधर्म, श्रमणधर्मच

पुढें आला. गौतमबुद्ध आपल्या शिष्यांची कसोटी कशी पहात असे याचा एक मासलेवाईक संवाद येथें देणें योग्य आहे–

गौतमबुद्धानें अनेक शिष्यांना उपदेश करण्याकरितां देशोदेशीं पाठविलें, हें प्रसिद्ध आहे. पूर्णनांवाचा एक शिष्य बुद्धांकडे आला व उपदेश ग्रहण झाल्यावर सुनापरंत या देशांत धर्मोपदेशाकरितां जातों असें म्हणाला. बुद्धानें त्याच्या ठिकाणीं अहिंसा किती बाणली आहे याची परीक्षा घेतली व तो शिष्य पूर्ण झाला, असें वाटल्यावर त्यानें त्याला अनुज्ञा दिली. परीक्षेचे वेळीं बुद्ध व पूर्ण यांत जो संवाद झाला तो असाः—

बुद्धः–पूर्णा ! त्या प्रांतांतले लोक क्रूर व निर्दय आहेत; ते तुला शिव्या देतील व निंदा करतील.

पूर्णः–तसें केलें तरी त्यांनीं मला हातांनीं मारलें नाहीं, म्हणून मी ते लोक चांगले आहेत असें म्हणेन.

बुद्धः–बरें त्यांनीं तुला हातांनीं तडाखे दिले तर.

पूर्णः–त्यांनीं मला दगडांनीं मारलें नाहीं म्हणून मी त्यांना शाबासकी देईन.

बुद्धः–आणि दगडानें मारलें तर–

पूर्णः–त्यांनीं माझ्यावर लाठीमार केला नाहीं म्हणून मी त्यांचे आभार मानीन.

बुद्धः–आणि लाठीमार केला तर

पूर्णः–त्यांनीं शस्त्रप्रहार केला नाहीं म्हणून ते लोक अभिनंदनास पात्र आहेत असें मी समजेन.

बुद्धः–आणि शस्त्रप्रहार केला तर

पूर्णः–मला ठार मारलें नाहीं म्हणून ते चांगले लोक आहेत असें मी म्हणेन.

बुद्धः–आणि तुला ठार मारलें तर–

पूर्णः–भगवन् ! कित्येक भिक्षु या शरीराला कंटाळून आत्मघात करतात अशा दुःखमूलक शरीराचा सुनापरंतच्या रहिवाशांनीं नाश केला आणि त्यांतून मला मोकळें केलें हा मजवर त्यांनीं फार मोठा उपकार केला असें मी समजेन. आणि असे हे लोक चांगले नाहींत काय ?

बुद्धः-साधु साधु, शाबास!! असा अहिंसा बाणलेला शिष्य सर्वस्वीं धर्मोपदेश करण्यास योग्य आहे. पूर्णा, जा.

या संवादावरून अहिंसा म्हणजे अप्रतिकार व तो किती कोटीला गेला होता याची कल्पना येईल. अशा तऱ्हेचे अप्रतिकारी भिक्षु व श्रमण बहुसंख्य असल्यावर समाजांत दुसरें वातावरण कोठलें उत्पन्न होणार? भिक्षु व श्रमण यांच्या कथा, यांचीं रसभरित चरित्रें यांचे अपूर्व चमत्कार हे लोक समाजांतील चर्चेचे आणि बोलण्याचे मुख्य विषय झाले म्हणजे मग गृहस्थ, राजेरजवाडे, वीर वगैरेंना विचारितो कोण?

याप्रमाणें अहिंसेच्या उपदेशाची कसोटी ठरल्यानंतर राजानेंसुद्धां यतीशीं स्पर्धा करण्याचा चंग बांधावा, यांत काय नवल! अशोक व त्यापुढचे जे कनिष्कादि राजे झाले त्यांनीं अहिंसेचे अत्याचार कसे केले हें आतां पाहूं.

(२२१) **अशोक व अहिंसाः**-सम्राट अशोकानें बुद्धधर्माची दीक्षा घेतल्यावर अहिंसेचा पुरस्कार केला. दीक्षा घेतल्यापासून त्यानें देश जिंकला किंवा लढाई मारली असें घडलें नाहीं. तो लहानपणीं अति क्रूर होता. त्यानें अनेक कूट कौटिल्यें करून गादी बळकाविली होती. तो गादीवर बसल्यावर लोक त्याला चळचळा कांपूं लागले, क्रौर्याच्या दराऱ्यानें त्यानें बंडाळ्या मोडल्या, बंदोबस्त केला आणि कारभार आटोक्यांत आणला. पूर्वेस बंगाल, दक्षिणेस गोदावरी, पश्चिमेस सिंधु नदी, व उत्तरेस हिमालय येवढ्या भागावर अनेक स्वाऱ्या करून लढाया जिंकून कत्तली करून त्यानें राज्य स्थापलें होतें. याप्रमाणें राज्यस्थापना होतांच देवाची बरोबरी करण्याकरितां व अपराध्यांना शिक्षा करण्याकरितां त्यानें नरकाची स्थापना केली. अग्निकुंडांत ढकलणें, तरवारीवर चालविणें, करवतीनें कापणें, तप्त लोहस्तंभास कवटाळणें असल्या यमदरबारांतील शिक्षा तो अपराध्यांना देत असे. अशोकानें एकदां कलिंग देशावर स्वारी केली तेव्हां त्यानें दीडलक्ष लोक ठार केले व एकलक्ष लोकांना बंदी करून आणलें! त्या कत्तलीमुळें त्याला वैराग्य उत्पन्न झालें, व तो बौद्धभिक्षु होऊन क्रौर्य व हिंसा सोडून अहिंसेचा पुरस्कार करूं लागला.

बुद्धधर्मांत अहिंसेला प्राधान्य आहे; पण अहिंसातत्त्व मानवधर्माला अनुसरूनच सांगितलें आहे. अशोकाच्या एका शिलालेखांत पशुहत्त्या करूं नये असा उल्लेख आहे; पण अशोकाच्या आमटीभाजीकरितां पूर्वी हजारों प्राणी मारले जात असत; पण या शिलालेखांत 'दोन मोर व एक सांबर हल्लीं स्वतःकरितां मारीत आहे व तेही यापुढें मारले जाणार नाहींत' असें आश्वासन आहे. ( स्मिथ्–ऑक्सफर्ड् हिस्टरी ऑफ इंडिया ) अशोकानें प्राणिमात्रावर दया करावी, सत्य बोलावें, हिंसा करूं नये, नोकरांना चांगलें वागवावें, गोरगरिबांना दानधर्म करावा, वडिलांना मान द्यावा असे आदेश आपल्या प्रजाजनांना स्तंभावर कोरून दिले होते. अशोकानें याप्रमाणें प्रारंभ केल्यावर कनिष्कानें त्याच्यावरही ताण केली.

(२२२) **कनिष्कांचा व इतरांचा अहिंसापुरस्कारः**–सम्राट अशोकानंतर सम्राट कनिष्कानें महायान पंथाची दीक्षा घेतली व अहिंसेचा पुरस्कार केला. 'राजा बोले व दळ हाले' या म्हणीप्रमाणें राजानें पुरस्कारलेल्या अहिंसेचा परिणाम समाजावर विपरीत झाला. समुद्रगुप्तानें चौथ्या शतकांत जरी अश्वमेध यज्ञ केला होता तरी त्यामुळें अहिंसेच्या अतिरेकाला आळा बसला नाहीं. लोकसमाजावर अहिंसेची छाप इतकी पडली होती कीं, ते हिंसा तर करीत नव्हतेच, पण कोंबड्या बदकेंहि पाळीत नव्हते. कांदा लसूण खात नव्हते. व त्यावेळीं खाटकांचीं दुकानें नव्हतीं, असे चिनी प्रवासी फाहियान यानें इ. सन ४०५ मध्यें लिहून ठेवलेलें आहे. अहिंसेचीं एक दोन उदाहरणें नमूद करण्यासारखीं आहेत. पश्चिम माळव्याचा राजा शिलादित्य हा सहाव्या शतकांत झाला. हा इतका अहिंसाभक्त होता कीं, त्यानें कायद्यानें माशीच्या हिंसेची बंदी केलीच. पण तो आपल्या घोड्यांना व हत्तींना गाळलेलें पाणी पाजावयास सांगत असे! मेघवान्‌राजानें काश्मीर प्रांतांत कायदा करून सहाव्या शतकांत हिंसा बंद केली. पण या सर्वांवर ताण हर्षवर्धनानें केली असें ह्यूएनत्संगाच्या निश्चित माहितीवरून म्हणतां येतें. त्यानें आपल्या सर्व साम्राज्यांत प्राणिहत्त्या व मांसाहार करणाऱ्यास जबर शासन ठेवलें. सम्राट् हर्ष म्हातारपणीं अहिंसावादी बनला. तारुण्यांत त्यानें शास्त्रोक्त मांसाहार केला, आणि जाज्वल्य क्षात्रवृत्तीनें साम्राज्य स्थापन केलें.

(२२३) **श्रावकाचाराचें अनिष्ट अनुकरणः**—अहिंसा ही समाजधारणेला अवश्य आहे. तथापि मोठा जीव वांचविण्याकरितां लहान जीव नेहमीं बळी पडतोच. मुंग्या व किडे चिरडतात म्हणून कोणी चालणें सोडून देत नाहीं. आणि हत्येच्या भीतीनें सर्पवृश्चिकांना मोकळें सोडणें हेंहि अनिष्टच. जैनसाधूंच्या पंचमहाव्रतामध्यें अहिंसाव्रत हें आद्य आहे. विशेषेंकरून स्थानवासी पंथाचे लोक वाट झाडण्यासाठीं एक सुताचा कुंचा जवळ बाळगितात, तोंडाला फडकीं बांधतात, अंगावरील व कपड्यावरील कीडहि झाडत नाहींत. सर्पादि घातक प्राण्यांना सोडून देतात. थंड पाणी प्याल्यानें हिंसा होते म्हणून तें तापवून पितात. मध व लोणी हीं जैनशास्त्रांत हिंसेच्या भीतीनेंच निषिद्ध मानलीं आहेत. जैनश्रावक लघुशंकेमुळें किडे व मुंग्या वाहून जातील म्हणून एका पात्रांत लघुशंका करितात आणि ती एका ठरविक ठिकाणींच टाकून देतात. कांहीं श्रावक तर मलोत्सर्गानंतर त्यांत किडे उत्पन्न होऊं नयेत म्हणून तो मल काडीनें विस्कटतात! त्यामुळें तो लवकर वाळतो व किडे उत्पन्न होत नाहींत. हा आचार श्रावकांना इष्ट असला तथापि सर्वसामान्य लोकांनीं याचें अनुकरण करणें अनिष्ट आहे. जनावरें हीं झाडाखालीं बसतात, शेणमूत टाकतात, त्यांतून किडे होतील व ते उन्हानें मरतील म्हणून झाडाखालीं जनावरांनाच बसूं देत नाहींत. ढेकूण, पिसवा या जगाव्यात म्हणून त्यांच्या पांजरपोळांत लठ्ठशा माणसांना पैसे देऊन निजावयास पाठविण्याची हास्यास्पद चाल अद्यापहि आहे, असें कोणी म्हणतात. सुरतेला बनिअन हॉस्पिटलमध्यें इतर वॉर्डांबरोबर उपद्रवी जंतूकरितां एक वॉर्ड असे, असें हॅमिल्टनच्या हिंदुस्थान वर्णनांत लिहिलें आहे. ( ज्ञा. को. अ विभाग पा. ६७६ ) हिंसा होईल म्हणून रात्रीं न जेवणें आणि हिंसा होते म्हणून स्नानहि न करणें वगैरे गोष्टी जर सामान्य समाजांत घडत असतील तर त्या कोणत्या कोटींत जातील हें सांगण्याचें कारण नाहीं.

(२२४) **राजपूत व अहिंसाः**—रजपूत लोक हे शूर, शंकरपार्वतीचे उपासक, एकलिंगजीचे कट्टे भक्त, युद्धाच्या क्षेत्रांत मारूं किंवा मरूं ही ज्यांची प्रतिज्ञा, पण त्यांनीं सुद्धां जैनतीर्थंकराकडून दीक्षा घेतल्यावर अहिंसेचें स्तोम फारच माजविलें! महाराणा राजसिंह यानें जैनांच्या

मंदिरांत व मठांत कोणत्याहि जनावराची हत्या करण्यांत येणार नाहीं, असा त्यांना हक्क दिलेला आहे. जैनधर्मगुरूंना व मंदिरांना रजपूत राजांनीं कित्येक ठिकाणीं गांवेंच्या गांवें अर्पण केलीं आहेत. त्या गांवांतसुद्धां जो कोणी शेळया, म्हशी, रेडे, बकरे व अन्य प्राणी यांची हत्या करील त्यास हद्दपार करून सर्व संपत्ति सरकारजमा करण्यांत येईल अशाहि आज्ञा आहेत.

जैनांच्या हद्दीमध्यें व गांवामध्यें हिंसा होऊं नये हें ठीक. पण हिंदूंच्या समजुतीप्रमाणें ते जर कोठें यज्ञ करीत असले अगर बळी देत असले व त्या ठिकाणीं अकस्मात् जैन साधु आला तर त्याच्या आग्रहा-वरून त्या यज्ञीयपशूला सोडून देण्यांत यावें अशा आज्ञा आहेत. जैनांच्या सणाच्या दिवशीं राजवाड्यांतसुद्धां पशुहत्त्या होत नाहीं अशी स्थिति आजहि राजपुतान्यांत आहे. पावसाळ्यांतील चार महिन्यांत बारीकसारीक किडे होणें अपरिहार्यच असतें. परंतु तीसुद्धां हिंसा थांबविण्याचे यत्न रजपूत राजांनीं केलेले दिसतात. आषाढ ते कार्तिकापर्यंत चातुर्मास्यांत तलावाचें पाणी उपसण्यांत येणार नाहीं, तेलाचे घाणे बंद ठेवण्यांत येतील आणि कुंभारही मातीचीं भांडीं तयार करणार नाहीं, अशा आज्ञा आहेत. क्षुद्रजंतूंच्या रक्षणाकरितां कुंभार व तेली उपाशी मेले तरी पर्वा नाहीं, तलावाचें पाणी बिघडून लोक मरूं लागले तरीहि चालेल, या वृत्तीमुळें राष्ट्राची फार हानि झालेली आहे. क्षुद्रजंतूंना मारण्याची हिंसा घडूं नये एतदर्थ रात्रीं दिवे लावूं नयेत, लोकांनीं अंधारांत रहावें, कारण दिवे लावल्यास त्यावर किडे येऊन ते मरतील व ती हिंसा योग्य नव्हे, असेंहि राजांनीं लोकांना कळविलेलें दिसतें. (राजपूत संस्कृति पृ. १९-२०)

**(२२५) गुजराथेंतील अहिंसाः**—अहिंसेच्या अतिरेकाचें उदाहरण उत्तर गुजराथेंतील अनहिलवाडपट्टण येथें सांपडतें. येथील राजा जैन-धर्मी होता. शत्रू अंगावर आला तरीदेखील पावसाळ्यांत त्यानें सैन्याच्या हालचाली बंद ठेवल्या होत्या. हालचालीजोगे रस्ते नव्हते हें कारण नव्हे, तर त्यामुळें पावसाळी जंतूंची हत्या होईल म्हणून! अहिंसेकरितां यज्ञ करूं नयेत, बलिदानें देऊं नयेत, रात्रीं दिवे लावूं नयेत, तलाव साफ करूं नयेत, तेली, सुतार, लोहार, कुंभार इत्यादींनीं आपले व्यवहार बंद

ठेवावे, हें एवढें कशाकरितां तर अहिंसेकरितां! मग देश पारतंत्र्यांत बुडाला तरी चालेल. (राजपूत संस्कृति पृ. १९–२०)

**(२२६) सर्व गुन्हे माफः**– हें झालें अहिंसेचें खूळ! आतां अहिंसाधर्मांची म्हणजे जैनधर्मांची दीक्षा घेणाऱ्यांना किती सवलती मिळत तें पहा. देशद्रोही, चोर, बदमाष व तुरुंगांतून पळालेले कैदी यांनीं एकदां जैन यतींच्या मठाची शरणचिठ्ठी घेतली व ते अहिंसाधर्मात प्रविष्ट झाले म्हणजे त्यांना कोणी पकडत नसे. या हुकुमामुळें अशा लोकांना चांगलेंच फावलें. वाटेल तें बदमाशीचें कृत्य करावें आणि जैनमुनीच्या मठांत शरण जावें, कीं झाले त्याचे सर्व अपराध माफ! असाच अधिकार श्रीनाथद्वार-मंदिराच्या महंताला मिळाला होता. पण याचा दुरुपयोग झाला आहे, देशद्रोह, राजद्रोह करणाऱ्यांना या संस्थांनीं आश्रय दिलेला आहे, असाच इतिहास आढळतो. आतां अहिंसेच्या अतिरेकाची एक ऐतिहासिक सत्य-कथा देऊन पुढील विवेचनाकडे वळतों.

**(२२७) अहिंसेचा अत्याचार व ऊचें देऊळ**–अनहिलवाड-पट्टणचा राजा कुमारपाल (११४३–११७४) यानें हेमचंद्राकडून जैनधर्मांची दीक्षा घेतली आणि अहिंसेच्या प्रचाराची शपथ घेतली. राज्यांत ढोलकीं वाजवून दवंडी दिली कीं, कोणीहि कृमिकीटकांची हिंसा करूं नये. शिकारी, कोळी वगैरेंना प्रतिबंध केला. स्वतः मद्य, मांस व मृगया यांचा त्याग केला आणि राज्यांतील शिबंदीस्वारांच्या घोड्यांना गाळलेलें पाणी पाजण्याचा हुकूम दिला. कुमारपालची महत्त्वाकांक्षा इतकी वाढली कीं क्षुद्रप्राण्यांच्या हिंसेबद्दलसुद्धां देहांत शिक्षा करून हेमचंद्राची मर्जी संपादन करण्याचें त्यानें ठरविलें.

सांबर येथें धनपाल या नांवाचा एक व्यापारी होता, त्याचें किराणा-मालाचें दुकान होतें. त्याच्या दुकानांत गिऱ्हाईकाची गर्दी असे. त्याला हजामतीला फुरसत नसे. त्यामुळें वस्तु देतां देतां डोकें करकर खाजवून नखांत सांपडलेल्या उवा मारण्याशिवाय त्याला गत्यंतर नसे. कुमारपालचें अहिंसेचें फर्मान निघतांच हिंसेचा बारकाईनें शोध करण्याकरितां आलेल्या राजदूतांना ही शिकार सांपडली व नखांनीं ऊ मारलेली पहातांच राजदूतांनीं त्याला कैद करून राजापुढें नेलें. राजानें आचार्य हेमचंद्राला बोलावलें.

घनपाल घाबरून गेला होता. त्याला प्रथम कोणता अपराध झाला हेंच कळेना! यतीनें त्याची उलट तपासणी करून त्याचे तोंडून ऊची हत्या केल्याचा कबुली जबाब मिळविला व या अपराधास देहांत शासनाची शिक्षा आहे, असें हेमचंद्रभिक्षूनें सांगितलें.

घनपाल म्हणाला "महाराज! मी माझ्या डोक्यांतील ऊ मारली. त्या माझ्या घामावर जगून मला कासावीस करतात. माझा जीव किती कळवळत असेल याची कल्पना करा! नखें आणि केस हे शरीरसंरक्षणार्थ आहेत. मी माझ्या सोईप्रमाणें त्यांचा उपयोग करितों. पोटांत कृमि झाले म्हणजे पोटांत औषध घेऊन ते मारतों. ती हिंसा नाहीं. कारण ते कृमि माझ्या शरीराची हिंसा करतात. माझें रक्त पिणाऱ्या व शरीर-स्वास्थ्य नष्ट करणाऱ्या ऊला मी मारतों, ती हिंसा नसून अहिंसा आहे. एका ऊच्या हत्येकरितां जर तुम्ही मला फांसावर देणार असाल तर त्यामुळें कुटुंबघात, मुलेंबाळें पोरकीं होणें व घनहिंसा घडणें इत्यादि गोष्टी घडतील त्याचा जरा विचार करा."

यति म्हणाला "घनपाला! तूं हिंसा केली आहेस. आतां यांत तारतम्य नाहीं, हिशेब नाहीं, दूरदृष्टि नाहीं. क्षुद्र प्राणी व मनुष्य अशी तुलनाहि नाहीं. हिंसा म्हणजे हिंसा आणि शिक्षा म्हणजे शिक्षा." शेवटीं घनपालानें राजाकडे दयेची याचना केली. राजानें शेवटीं देहांत शिक्षा न देतां त्याची सर्व मिळकत जप्त करण्याचा हुकूम दिला व जें द्रव्य आलें त्यांतून त्या ऊ चें मोठें देवालय बांधून तेथें तिची प्राणप्रतिष्ठा केली. यूकाविहार या नांवानें तें प्रसिद्ध आहे.

One of the Baniyas of Sambhar who having been caught killing a louse was brought in chains to Anhilwada and his property confiscated and devoted to the building, at Anhilwad, of a louse Temple or Yuka-Vihar.

–( Gazetteer of the Bombay Presidency
Vol. I Part I History of Gujarat. )

(२२८) वृत्तिच्छेद व मांसाहारनिवृत्तिः–हर्षकाळापासून हिंदु-समाजांतील मांसाहार पद्धतशीरपणें कायद्यानेंच बंद झाला. क्षत्रियांना

मांसाशन व मृगया हीं विहित असतांना त्यांनीं त्यांचा त्याग केला. वैश्यांचा धंदा व स्वभाव हे मांसवर्जनाला प्रथमपासूनच अनुकूल होते. जैन व बौद्ध या धर्मांच्या उपदेशानें ब्राह्मणांतील मांसाहार हर्षपूर्वकालींच मुक्त झाला होता. वैश्यांनीं निवृत्तमांस होऊन ब्राह्मणांचें अनुकरण केलें. पण याहीपेक्षां आश्चर्य असें कीं हिंसेच्या भीतीनें कृषि, गोरक्ष्य, वाणिज्य, हे त्यांचे धंदे असतांना त्यांनीं कृषिकर्म सोडलें. वैश्यांनीं कृमिहत्येच्या भीतीनें शेती सोडल्यावर ती स्वाभाविक शूद्रांकडे व अन्यजातीयांकडे गेली. आज पूर्वबंगालमध्यें कोणी हिंदु शेती करीत नाहीं. सर्व शेतकरी मुसलमान आहेत, म्हणूनच उपासमारीच्या पन्नासलक्ष माणसांच्या प्रलयांत मुसलमानांपेक्षां हिंदूच अधिक मेले. पराशरस्मृतींत शेती करावी. अशी आज्ञा आहे. तर त्यापूर्वींच्या मनुस्मृतीमध्यें पराधीन व हिंसायुक्त असणाऱ्या कृषीचा त्याग करावा असें म्हटलें आहे. पराशर–स्मृतीचा आधार घेऊन त्रैवर्णिकांनीं शेतीस क्वचित् क्वचित् प्रारंभ केला. हर्षोत्तरकालांत जैनधर्माचा प्रसार बराच झाला. बहुतेक वैश्यांनीं जैनधर्माचा स्वीकार केला व ते अहिंसावादी बनले. पुढें लिंगायत मतहि वैश्यवर्गांमध्यें रूढ झालें व ते शाकाहारी बनले. तेलाच्या धंद्यांत गळिताचीं धान्यें चिरडण्याचा प्रसंग येतो म्हणून हिंसेच्या भीतीनें तोहि धंदा वैश्यांनीं सोडला. तेलीजातीला कमी लेखण्याची खुळचट प्रथा अहिंसेच्या भीतीमुळेंच पडली असावी. ब्राह्मणक्षत्रियवैश्यांतील मांसाहार कमी झाल्यावर शूद्रवर्गानें त्याचें अनुकरण केलें. कारण शिष्टवर्गाचें अनुकरण समाज करीत असतो.

(२२९) **वैदिकसमाज व मांसाहार:**–वेदकालीं मांसाशन निषिद्ध नव्हतें. कांहीं विशिष्ट प्राण्यांचें मांस निषिद्ध मानलें जाई. धर्मसूत्रें व स्मृतिमध्यें श्राद्ध, मधुपर्क व यज्ञ याप्रसंगीं मांस अवश्य विहित असून कोणतें मांस वर्ज्य करावें याचा विचार आलेला आहे. महाभारतांतहि मांसाहाराचें विवेचन आहे. श्राद्धसमयीं मांसान्न तयार करावें, तें ब्राह्मणांना वाढावें म्हणजे पितर तृप्त होतात; जो ब्राह्मण श्राद्धाला बसून मांसान्नाचा स्वीकार करीत नाहीं तो दुर्गतीला जातो, असेंहि म्हटलेलें आहे. ब्राह्मणाला यज्ञ व श्राद्ध यांशिवाय मांसान्नाचा निषेध सांगितला आहे. क्षत्रियानें मृगया करून पशू मारावेत त्यांचें ताजें मांस भक्षण करावें, उरलेलें वैश्यांना विकत द्यावें असे उल्लेख

स्मृतिग्रंथांत आहेत. वाग्भटांतील सूत्रस्थानामध्यें आणि वैद्यकीय ग्रंथांमध्यें कोणतें मांस तुष्टिदायक आहे आणि आरोग्यकारक आहे याचा सविस्तर विचार केलेला आहे. तसेंच कोणत्या रोगावर कोणतें रक्त व मांस उपयुक्त आहे, तें कसें वापरावें हेंहि सांगितलें आहे. आजहि लिव्हर् एक्स्ट्रॅक्ट, चिकन्सफूड् आणि अशींच मांसाच्या अर्कांचीं औषधें घ्यावीं लागतातच.

(२३०) **मांसाहार बंद होण्याचीं कारणें:**–कोणत्याही समाजांतील मांसाहार बंद होण्याला तीन कारणें घडतात. ( १ ) त्या आहाराचा निषेध करणारें तत्त्वज्ञान, ( २ ) त्या तत्त्वज्ञानाचा प्रचार करणारी सत्ता, ( ३ ) त्या अन्नाचे स्थानीं शाकान्नाचा पुरवठा. हीं तीं तीन कारणें होत. बुद्धानंतर हीं तीन्हीं कारणें घडलीं व समाज निवृत्तमांस झाला. पुढें बंगाल्यांत उत्पन्न झालेल्या वैष्णवमतानें आणि वीरशैवमताचा संस्थापक बसव यानेंहि अहिंसेला मुख्य स्थान दिलें. अशा विविध कारणांनीं हिंदुसमाजांतील मांसाहार नष्ट झाला व जो होता तो निंदेस पात्र झाला. पंचद्राविड व पंचगौड हे भेद ब्राह्मणांमध्यें आहारमूलकच पडले; कारण ब्राह्मणांवर अहिंसेच्या तत्त्वज्ञानाचा बराच परिणाम झाला. पुष्कळ क्षत्रियहि अहिंसाधर्माचे अनुयायी बनले. वैश्यजातीचा ओढा अहिंसेकडे मूलतःच होता. तात्पर्य, निरनिराळ्या राजांनीं कायदे करून आणि भिक्षु, श्रमण, यति, यांनीं उपदेश करून मांसाहार निंद्य ठरविला. तत्त्वज्ञान, कायदा व शाकान्नाची समृद्धी यांमुळें हिंदुसमाज पूर्ण निवृत्तमांस बनला.

(२३१) **हिंसेनें दरारा बसविल्याचीं उदाहरणें:**–मुसलमान व हिंदु यांचा जेव्हां पुढें संबंध आला, त्यावेळीं हिंदु पराजित झाले व मुसलमान विजयी झाले; याचें एक कारण म्हणजे उभय समाजांतील हिंसा-अहिंसेच्या भावनेमध्यें असलेलें अंतर हें होय. मुसलमानांच्या धर्मभावना जळजळीत, उत्कट व जाज्वल्य होत्या. पण हिंदूंच्या अगदीं मिळमिळीत होत्या. हिंदु हा अहिंसेच्या अतिरिक्त स्वीकारामुळें शांत, मृदु व नरम असा बनलेला होता व प्रेम, दया, अहिंसा यांचें वेड हिंदूमध्यें फार होतें. पण मुसलमानांत कत्तल, क्रौर्य, विश्वासघात, लुटणें, ठार मारणें, यांबद्दल धर्माज्ञेमुळें उत्साह होता. अशा स्थितींत त्यांनीं अहिंसेविरुद्ध कत्तल करून आपला कसा दरारा बसविला हें ऐतिहासिक

उदाहरणें देऊन सांगतों. महंमद कासीमनें सिंध देशांतील देबाल बंदराचा ७११ इसवीमध्यें पाडाव केल्यावर महंमदीयधर्माच्या भयंकर कत्तलीचा त्यानें हिंदूंना पहिला धडा शिकविला. तो असा कीं, त्यानें नगरांतील सर्व स्त्रीपुरुषांची एकजात कत्तल केली. अहिंसावादी दुबळ्या लोकांनीं केविलवाण्या मुद्रेनें 'महाराज, जीव वांचवा, दया करा' अशी प्रार्थना केली. पण 'मला दया करण्याची आज्ञा नाहीं, कत्तलीची आज्ञा आहे' असें उत्तर देऊन कासीमनें आपला कार्यभाग उरकला. महंमद कासीम शिबिस्तानवर चालून आला. तेथें वत्सराज या नांवाचा अधिकारी होता. त्यानें कासीमशीं दोन हात करण्याचें ठरविलें. पण तेथील बौद्धधर्मी लोकांनीं त्याला निक्षून सांगितलें कीं, 'आम्ही भिक्षु, आमचा धर्म म्हणजे अहिंसा, म्हणून हत्या करणें व युद्ध करणें हें आम्हांला निषिद्ध !!!" (मध्ययुगीन भारत, भा. १) असें म्हणून त्यांनीं कासीमचा प्रतिकार केला नाहीं. महंमद कासीमनें सिंधप्रांत काबीज करून तेथील राजा दाहीर यास ठार केलें. तें पाहून तेथील ब्राह्मणांपैकीं कांहींनीं आत्महत्या केल्या व सुमारें १००० ब्राह्मणांनीं प्रायश्चित्तादाखल क्षौर करवून घेतलें, पण प्रतिकार केला नाहीं !! सिंधप्रांतांतील उत्तर भागांत मुस्थल नांवाच्या शहरावर कासीमनें चाल केली. तेथील रहिवासी मुख्यतः बौद्ध असल्यामुळें ते त्यास शरण तर गेलेच, पण कासीमचें स्वागत त्यांनीं ढोलगीं वाजवीत, पावे वाजवीत व तालावर नाचत नाचत केलें !! पण त्यांना प्रतिकारबुद्धि झाली नाहीं. महंमद कासीमनें मुलतान घेतल्याबर खलीपाच्या हुकुमावरून कत्तलीचें उग्र स्वरूप प्रकट केलें. अशा कत्तलीची लोकांना बिलकुल माहिती नसल्यामुळें ते पटापट प्राणास मुकले. कासीमनें आठव्या शतकाच्या प्रारंभीं सिंधप्रांत काबीज करून मागाहून येणाऱ्या आपल्या इस्लाम अनुयायांना जो धडा घालून दिला, तोच त्यांनीं पुढें अक्षरशः गिरविला. निरपराध बायकामुलें, लढाऊ बिनलढाऊ हिंदु लोक, यांची एकजात कत्तल करण्यास मुसलमानांनीं केव्हांहि कुचराई केली नाहीं. गिझनीच्या महंमदानें जयपाळवर स्वारी करून पहिल्या धडाक्यांत पांच हजार लोकांची कत्तल केली, व काफरांना चळचळा कापावयास लावलें. त्यानें ठाणेश्वरावर स्वारी केली तेव्हां इतकी भयंकर कत्तल केली कीं

रक्ताचे पाट नदींत मिळाले व त्यामुळें नदीचें पाणी पिण्याजोगें राहिलें नाहीं. महंमद घोरीचा सरदार कुतुबुद्दीन ऐबक यानें बहारप्रांत काबीज केल्यावर तेथील सुमारें एक लक्ष क्षौरी ब्राह्मणांना, भिक्षूंना ठार मारलें! सारांश- मुसलमानांच्या क्रौर्यापुढें हिंदूंचा टिकाव लागत नसे. मुसलमान हे युद्धांत जिंकलेल्या लोकांशीं अत्यंत निर्दयतेनें वागून दहशत बसवीत. पण हिंदु हे अहिंसेच्या प्रबळसंस्कारांमुळें जिंकलेल्यांशीं सदयतेनें वागत, म्हणून त्यांना वचक कधींहि बसला नाहीं.

(२३१) **क्षात्रवृत्ति व मांसाहारः**—हिंदुसमाज मुसलमान समाजाला वश होण्याच्या अनेक कारणांपैकीं अहिंसातत्त्व हें एक कारण आहे. या तत्त्वाचा व मांसाहाराच्या निषेधाचा परिणाम समाजांत फार खोलपर्यंत झाला. क्रौर्याशिवाय क्षात्रवृत्ति राहणें कठीण. त्या क्रौर्याचा व मांसाहाराचा बराच संबंध आहे. बौद्धधर्म, जैनधर्म व वैष्णवधर्म या सर्वांनीं अहिंसेला धर्मांत मुख्य स्थान दिलें. त्यामुळें समाज शमप्रधान, भित्रा व शांत अशा स्वभावाचा बनला. जैन आणि बौद्ध या धर्मांच्या अनुयायांमध्यें क्षत्रियेतर बहुजनसमाजाचा भरणा फार होता. हा समाज युद्धापासून नेहमीं परावृत्त असे. त्यांच्यावर अहिंसा तत्त्वज्ञानाची छाप बसल्यामुळें तो युद्धपराङ्मुख बनला! येऊन जाऊन राष्ट्रामध्यें लढवय्यांची जात एकट्या क्षत्रियांची होती. पण त्यानाहि अहिंसेच्या वेडानें पछाडलें होतें.

(२३२) **त्वेष, द्वेष व संताप यांची आवश्यकताः**—हिंदुसमाजाला आज स्वाभिमानपूर्वक जर जिवंत राहावयाचें असेल तर त्याकरितां अपमान होतांच चीड, संताप, त्वेष व द्वेष या भावना उत्पन्न होऊन प्रतिकार करण्याचें सामर्थ्य अंगीं उत्पन्न झालें पाहिजे. जेत्या मुसलमानांनीं हिंदूंना दहशत बसावी म्हणून लोकांच्या कत्तली केल्या तर विजेत्या युरोपीयन लोकांनीं अमेरिकेंतील रेडइंडियन लोकांचा व पेरू मेक्सिको येथील रहिवाशांचा समूळ नाश केला. विजेते सत्ताधीश सत्ता स्थापण्याकरितां व स्थापलेल्या सत्तेला धक्का देणाऱ्यांचें निर्दलन करण्याकरितां क्रौर्याचा अवलंब सदैव करीत असतात. त्यांची इच्छा जित लोकांनीं गुलामगिरीच्या वृत्तीनें भारवाहकाचें काम नेहमीं करावें अशी असते. हिंदुसमाजाला जर यापुढें जयिष्णु व्हाव-

याचें असेल तर त्यानें संताप, त्वेष, द्वेष या भावना आपल्या अंगीं आणल्या पाहिजेत. कारण समाजांत धारणपोषणाला व आक्रमणशीलतेला चीड, संताप, त्वेष, द्वेष, या भावनांची जरूरी आहे. पण या भावनांचा अभाव हिंदुसमाजामध्यें अनेकवर्षांपासून झालेला आहे. कांहींहि झालें तरी हिंदु हा अतिशय सहिष्णु असतो, हजारों स्त्रिया बाटविल्या, देवळें लुटलीं, मूर्ति फोडल्या, फार काय पण यांहिपेक्षां मानवी-संस्कृतीला कलंक लागेल असें जुलमी वर्तन मुसलमानांनीं केलें; पण त्यामुळें संतापानें भडकून व त्वेषानें चिडून शत्रूच्या नरडीचा घोट घेण्याची प्रवृत्ति ही मुसलमान प्रथम आले तेव्हां मुळींच दिसली नाहीं. देवधर्मांची निंदा केली तरी तो नरम, स्त्रियांचा उपमर्द केला तरी तो सहिष्णु ! धर्मग्रंथाला शिव्या दिल्या तथापि त्याचें डोकें शांत ! असें होण्याचें कारण हिंदूंच्या हाडींमांसीं अहिंसातत्त्व भिनलें असल्यामुळें त्याला शांततामय मार्गानें वागण्याची नेहमीं संवय लागलेली आहे, हें होय.

(२३४) **मांसाहार व क्रौर्यः**-थोड्याबहुत प्रमाणावर क्षात्रवृत्तीला पोषक असा मांसाहार आहे. कारण क्रौर्य व शौर्य यांचें साहचर्य असून मांसाहाराचा व क्रौर्याचा संबंध आहे. सिंहासारखा मांसाहारी हिंस्रपशु पशूंचा राजा होतो व बहिरीससाण्यासारखा पक्षी हा पक्ष्यांचा राजा होतो. पशु व पक्षी यांप्रमाणें मांसाहारी मानवसमाज हेच जगावर राज्य करतात असें जगांतील अनेक उदाहरणांवरून दाखवितां येईल. निवृत्तमांस लोकांनीं क्षात्रवृत्तीचा अंगीकार करून राज्यें चालविल्याचें एखादेंच उदाहरण अपवाद म्हणून सांगतां येईल. पण या अपवादानें नियमाचीच सिद्धि होते. हिंदुसमाजानें मांसाहार शास्त्रीय पद्धतीनें करून त्याचा उपयोग क्षात्रवृत्तीला पोषक होईल असा केला पाहिजे.

—*—

## प्रकरण बारावें

# मूर्तिविषयक अद्भुतकल्पना

(२३५) जगांतील मूर्तिपूजा:–हिंदुसमाजांत आज मूर्तिपूजेचा प्रचार आहे. जगांतील कोणत्याहि समाजांत कोणच्या तरी स्वरूपांत थोड्याबहुत प्रमाणावर मूर्तिपूजा आजहि रूढ आहे. मूर्तिपूजाविहीन अशा.ख्रिश्चन व मुसलमान समाजांमध्यें देवालयांसारखीं पवित्रगृहें असतात. त्यांत ईश्वराच्या मूर्ति साक्षात् नसल्या तरी ईश्वर तेथें मूर्त रूपानें वास करितो व भेटतो असें मानतात. रोमन कॅथॉलिक लोकांच्या देवळांत त्यांतील साधूंच्या व मेरी आईच्या प्रतिमा असतात असें ऐकण्यांत येतें. मूर्ति हें ईश्वरप्रणिधानाचें एक साधन आहे, यांत संशय नाहीं. परंतु मूर्तींमध्यें अद्भुत सामर्थ्य असतें, त्या सर्वशक्तिमान् असतात या कल्पनेचा अतिरेक झाला म्हणजे त्या समाजाचा नाश होतो. अहिंसातत्त्वाचा अतिरेक जसा जैन व बुद्ध या धर्मांतून झाला तसाच मूर्तिपूजेचा अतिरेक बुद्धाच्या महायान पंथामधून झाला. या मूर्तिपूजेच्या प्रसारामुळें व तद्विषयक अद्भुत कल्पनांमुळें बुद्धोत्तर कालांत केवढें अरिष्ट ओढवलें, याचा विचार प्रस्तुत प्रकरणांत कर्तव्य आहे.

(२३६) उपासनेंतून मूर्तिपूजेचा उद्भव:–वैदिक धर्माचें मूळचें स्वरूप लक्षांत घेतलें तर, त्यांत मूर्ति व प्रतीकें नसावींत असें वाटतें. वैदिक ऋषि, सूर्य, वायु, वरुण, अग्नि, सोम, इत्यादि देवतांची उपासना करीत. तथापि ज्या देवता पुढें निरनिराळ्या संप्रदायाला अधिष्ठानभूत झाल्या त्यांचे उल्लेख वेदांमध्येंहि आलेले आहेत. अग्नीच्या ध्यानाचा जो मंत्र वेदांत आहे त्यांत त्याला चार शिंगें, तीन पाय, दोन डोकीं व सात हात असल्याचें वर्णन आहे.

चत्वारि शृंगा त्रयो अस्य पादा द्वे शीर्षे सप्त हस्तासो अस्य ।

श्रीविष्णूच्या स्वरूपाबद्दल पुरुषसूक्तांत त्यानें तीन पावलांनें पृथ्वी पादाक्रांत केली असा उल्लेख आहे.

इदं विष्णुर्विचक्रमे त्रेधा निदधे पदम् ।

वरील दोन उल्लेखांवरून वेदकालीं देवता सगुण व साकार मानीत असाव्यात असें दिसतें.

देवता या साकार असत कां निराकार असत यासंबंधीं निरुक्तांतहि वाद दिसतात. कोणी म्हणतो त्या पुरुषासारख्या आहेत. तर दुसरा म्हणतो त्या तशा नाहींत, तिसरा म्हणतो त्या उभयरूप आहेत. तर चौथा म्हणतो त्या कर्मरूप आहेत.

**अथाकारचिन्तनं देवतानाम् । पुरुषविधास्युरित्येकम् । अपुरुषविधाः स्युरित्यपरम् । अपि वोभयविधाः स्युः अपि वा अपुरुष विधानामेव सतामेते कर्मात्मानः स्युः ।** —निरुक्त ७–६–७.

बुद्धापूर्वी मूर्तिपूजा होती. निर्गुण परब्रह्माच्या उपासनेचें एक साधन म्हणून मूर्तिपूजेला वैदिक धर्मांत स्थान आहे. पुढील मंत्रावरून मूर्त देवतांच्या ध्यानाची कल्पना येते.

मैत्रायणीसंहितेमध्यें ( २, ९, १, ) महादेव, गिरिसुत, कार्तिकेय, हस्तिमुख, नारायण, प्रभाकर, सोमराज, भास्कर, केशव इत्यादि देवतांचीं नांवें आलेलीं आहेत. कल्पनेकरतां २।३ मंत्र येथें देतों.

तत्पुरुषाय विद्महे महादेवाय धीमहि
तन्नो रुद्रः प्रचोदयात् ।
तत्केशवाय विद्महे नारायणाय धीमहि
तन्नो विष्णुः प्रचोदयात् ।
तद्भास्कराय विद्महे प्रभाकराय धीमहि
तन्नो भानुः प्रचोदयात् ।

यांवरून शैववैष्णवादि संप्रदायांना अधिष्ठानभूत झालेल्या देवतांचें अस्तित्व वेदोत्तर कालचें नाहीं हें सिद्ध होतें. अनेक वैदिकदेवतांपैकीं कांहीं देवतांना प्राधान्य देणें म्हणजे श्रौतधर्म होय. पण हा धर्म ज्ञानमार्गाचें महत्त्व वाढल्यावर मागें पडला. निर्गुण निराकार परब्रह्माचें महत्त्व वाढल्यावर यज्ञीय देवतांना गौणपणा आला. पण निर्गुण निराकार परब्रह्माचें तत्त्व सर्व लोकांस पचण्यासारखें नव्हतें. कारण त्याचें आकलन सर्वसामान्य लोकांना होणें अशक्य होतें. सामान्य जनसमूहाला कांहीं तरी स्पष्ट आकृ-

तीची आवश्यकता असते. उपनिषद्कालीं जशी तत्त्वविचारांची लाट उसळली होती, तशीच उपासनांचीहि उसळलेली होती. त्या सर्व उपासनांना व्यवस्थित स्वरूप देण्याकरतां देवतांना मूर्तींचें स्वरूप देणें भाग पडलें असावें. नारायणीयधर्म, सात्वतधर्म व भक्तिप्रधान भागवतधर्म असा या उपासनाधर्मांचा उत्क्रांतिक्रम आहे. यांतच चतुर्व्यूहकल्पना व नारदपांचरात्र यांची भर पडलेली आहे. या सर्व उपासना-संप्रदायांना श्रीमद्भगवत्गीतेमुळें व्यवस्थित स्वरूप आलें. गीतेपूर्वी वासुदेवभक्ति प्रचारांत होती. वासुदेवाची उपासना परब्रह्माचें प्रतीक म्हणून करण्याची जी पद्धत गीतापूर्वकालीं होती तीच गीतेंत आली आहे.

(२३७) **बौद्धधर्म व मूर्तिपूजाः**-मूर्ति व देवघर यांचा उल्लेख वाल्मिकीरामायणांतील अयोध्याकाण्डांत आढळतो. तथापि देवळें, मूर्ति, पादुका, प्रतिमा यांचा अतिरिक्त सुळसुळाट वैदिकधर्मांत बुद्धोत्तर कालांतच झाला. बुद्धाच्या पश्चात् त्याच्या धर्माला जें महायानपंथाचें स्वरूप आलें त्यांतील मूर्ति, देवालयें व विहार यांना टक्कर देण्याकरतां रामकृष्ण इत्यादि ऐतिहासिक व्यक्तींना देवत्व देऊन व शिव, विष्णु, इंद्र, सूर्य, वायु, मरुत् इत्यादि आर्ष देवांना मूर्तत्व देऊन त्यांचीं भव्य व रमणीय देवालयें उभारण्यांत आलीं, असा एक स्थूल समज आहे. वास्तविक बुद्धपूर्वकालीन वैदिकांच्या व आर्यांच्या वाङ्मयांत रामकृष्णादि व्यक्तींचा मूर्तिरूपानें उल्लेख उपलब्ध होतो. बुद्धधर्माचा उदय जगांत ईश्वर नाहीं असें मानण्यापासून झाला. पण चमत्कार असा कीं, बुद्धाच्या अनुयायांनीं पुढें त्यालाच ईश्वर करून सोडलें व वैदिकधर्माभिमानी हिंदु त्याला विष्णूचा नववा अवतार मानूं लागले!!! बुद्धपूजेचें महत्त्व इतकें वाढलें कीं त्याचीं हाडें, काढलेलीं नखें, केसांच्या बटा हीं सर्व जशीं सांपडतील तशीं घेऊन त्यांची स्थापना मंदिरांत करण्यांत आली. बुद्धाचे अवशेष ज्या ज्या मंदिरांत ठेवले गेले तेथें प्रकाश पडतो व अद्भुत चमत्कार होतात असेंहि तत्कालीन लोकांना वाटूं लागलें.

(२३८) **सांख्यप्रक्रिया व मूर्तिः**-गीतेवर सांख्यप्रक्रियेची छाप चांगलीच पडलेली आहे. बुद्धोत्तर काळांत सांख्यांच्या या सत्त्वरजतमांना विष्णुब्रह्ममहेशाचें स्वरूप दिलें गेलें. नुसतें त्रिगुणच काय पण सर्व

सद्वृत्तींना देवता, व असद्वृत्तींना असुर कल्पून त्यांचीं आख्यानें रचण्यांत आलीं. या देवतामहात्म्याच्या आधारावर व्रतें, वैकल्यें, पूजा, अर्चा, सगुणोपासना, मूर्तींचे उत्सव हीं सर्व सुरू झालीं. यज्ञयागाचा अधिकार ज्यांना नव्हता त्यांनीं देवतांचे जंगी उत्सवसमारंभ चालविले. या उत्सवांत श्रौतस्मार्तधर्मानुष्ठान करणारे द्विजही हळुहळू समाविष्ट झाले. यज्ञवेदीच्या ऐवजीं देवळें उत्पन्न झालीं व तत्प्रीत्यर्थ सर्वस्वत्यागाची तयारी भक्तांमध्यें दिसून येऊं लागली. यावेळीं यज्ञ तर मागें पडले होते. त्यामुळें या उत्सवांना व समारंभांना अत्यंत महत्त्व आलें.

(२३९) देवपूजाः—हिंदुधर्मांत गृहस्थानें पंचमहायज्ञ करावेत असें सांगितलें आहे. त्यामध्यें देवयज्ञ म्हणजे देवतांच्या उद्देशानें कांहीं हवन करावें असें आहे. यज्ञयाग आणि स्मार्त अग्निकार्य मागें पडल्यावर हिंदुसमाजांत देवपूजेला महत्त्व आलें. वैश्वदेवाप्रमाणेंच देवपूजा अवश्य करावी व ती ब्रह्मयज्ञ व जपयज्ञ यांनंतर करावी असें म्हटलें आहे. देवपूजा म्हणजे देवतेच्या उद्देशानें द्रव्यत्यागात्मक यज्ञ असें जरी पूजाप्रकाशादि ग्रंथांत म्हटलें असलें आणि प्रतिमापूजा ही अज्ञान्यांकरितां किंबहुना मूर्खांकरितां आहे असें जरी म्हटलेलें असलें तथापि प्रतिमापूजेचें महत्त्व आणि प्रतिमेचेंहि महत्त्व ठिकठिकाणीं खूपच सांगितलेलें आहे.

अप्सु देवा मनुष्याणां दिवि देवा मनीषिणाम् ।
काष्ठलोष्ठेषु मूर्खाणां युक्तस्यात्मनि देवता ॥ —शातातप
अग्नौ क्रियावतां देवो दिवि देवो मनीषिणाम् ।
प्रतिमास्वल्पबुद्धीनां योगिनां हृदये हरिः ॥ —पूजाप्रकाश

या श्लोकांत काष्ठलोष्ठांदींच्या प्रतिमा मूर्खांकरितां आहेत असें म्हटलें आहे.

आतां या उलट प्रतिमापूजेचें महत्त्व कसें वर्णिलें आहे व त्यांची फलश्रुति कशी सांगितली आहे हें पहाण्यासारखें आहे.

साकारा विकृतिर्ज्ञेया तस्य सर्वं जगत्स्मृतम् ।
पूजाध्यानादिकं कार्यं साकारस्यैव शस्यते ॥ —विष्णुधर्मोत्तर

अप्स्वग्नौ हृदये सूर्ये स्थण्डिले प्रतिमासु च।
षट्स्थानेषु हरेः सम्यगर्चनं मुनिभिः स्मृतम् ॥ —नारद
हृदये प्रतिमायां वा जले सवितृमण्डले ।
वह्नौ च स्थण्डिले वापि चिन्तयेद्विष्णुमव्ययम् ॥ —वृद्धहारित
रत्नजा हेमजा चैव राजती ताम्रजा तथा ।
रैतिकी वा तथा लौही शैलजा द्रुमजा तथा ॥
अधमाधमा विज्ञेया मृण्मयी प्रतिमा च या ।
सर्वकामप्रदा चैव रत्नदा चोत्तमोत्तमा ॥ —स्कंदपुराण
शैली दारुमयी लौही लेप्या लेख्या च सैकती ।
मनोमयी मणिमयी प्रतिमाष्टविधा स्मृता ॥ —भागवतपुराण

भावार्थः—हें सर्व जगत् ईश्वराचें आहे. साकारता ही विकृति आहे. तथापि साकाराच्या ठिकाणींच पूजा व ध्यान शक्य आहे. सूर्यमंडल, अग्नि, स्थंडिल, प्रतिमा इतक्या ठिकाणीं हरीची पूजा करणें इष्ट असतें. सोनें, रत्नें, चांदी, तांबें, लोखंड इत्यादींच्या प्रतिमा कराव्यात. मृत्तिकेची प्रतिमा ही अगदीं अधम होय! रत्नप्रतिमा ही सर्वोत्तम आणि सर्वकामप्रद असते. पूजेकरितां एकंदर शिला, काष्ठ, लोह, वाळू, रत्नें यांच्या प्रतिमा व कागदावर चित्रित केलेल्या आणि शाडू वगैरेच्या प्रतिमाहि सांगितलेल्या आहेत.

सर्वांमध्यें शालग्राम शिलेच्या प्रतिमेचें महत्त्व फारच वर्णिलें आहे, व तिच्या पूजेचा अधिकार फक्त ब्राह्मणांनाच आहे असेंहि वर्णन आहे. ईश्वराचे असंख्य अवतार, तेव्हां आपणास पूज्य अशा अवताराची सुवर्णप्रतिमा करावी व तिचें पूजन करून ती ब्राह्मणाला द्यावी म्हणजे सकल कामना परिपूर्ण होत असतात. शालग्रामप्रतिमापूजनानें तर मुक्ति मिळते असेंहि म्हटलें आहे.

शालग्रामशिला यत्र यत्र द्वारवती शिला ।
उभयोः संगमो यत्र तत्र मुक्तिर्न संशयः ॥ —नारद

मूर्तिभंजकांचें आक्रमण होण्यापूर्वी मूर्तिपूजेचें हें असें बंड माजलेलें होतें. सर्व सुबुद्ध समाज मूर्ति नि देवळें यांच्याभोंवतींच घिरट्या घालीत होता.

(२४०) **मूर्ति व देवळें यांची गर्दीः**–सहाव्या शतकाच्या सुमाराचा जगाचा इतिहास पाहिला तर, असें दिसतें कीं, मूर्तिपूजेचें साम्राज्य सर्व जगभर होतें. खिस्ती, सेमेटिक, हिंदु व बौद्ध असे सर्व धर्म मूर्तिपूजेंत 'निमग्न' असून जणूं ते एकमेकांची स्पर्धाच करीत होते. कोणत्याहि गोष्टीचा अतिरेक झाला कीं, त्याची प्रतिक्रिया दुसऱ्या टोकानें सुरूं होते. सर्व जग हें मूर्तीच्या मागें वेडें होऊन गेलें असतां तिचा उच्छेद करणारा पंथ निसर्गनियमाप्रमाणेंच उपस्थित झाला. हर्षाचे वेळीं म्हणजे सहाव्या शतकांत चिनी प्रवासी ह्यूएनत्संग हा हिंदुस्थानांत आला होता. तेव्हां त्याला देवळें व स्तूप ह्यांची गर्दी उसळलेली दिसली. बौद्ध व जैन तीर्थंकरांचे पुतळे देवळांत स्थापून त्यांची पूजा हजारों भक्त करीत होते; तर हिंदुदेवालयांत हिंदुपुजाऱ्यांकडून शिव, विष्णु व सूर्य यांची पूजा होई. श्रीमंत व्यापारी, बडे अधिकारी व राजे यांनीं त्या वेळीं बांधलेल्या अनेक देवळांचीं वर्णनें ह्यूएनत्संगानें दिलेलीं आहेत. त्यांतील फक्त एक दोन देवालयांचें वर्णन येथें देतों. "मुलतान येथें सूर्याचें भव्य व प्रचंड मंदिर होतें. त्यांतील मूर्ति सुवर्णाची असून तिजवर रत्नजडित अलंकार होते. तिचें सामर्थ्य कांहीं अद्भुत होतें अशी कल्पना होती. मूर्तीसमोर गाणाऱ्या स्त्रियांचे ताफे एकामागून एक येऊन गायन करीत. मंदिरांत नित्य नंदादीप पेटत असून धूप व फुलें मूर्तीवर सदा वाहिलीं जात. त्या मंदिराला हिंदुस्थानांतील सर्व ठिकाणच्या राजेरजवाड्यांनीं मोठमोठ्या देणग्या दिलेल्या असून गरीब लोकांची जेथें अन्नवस्त्राची व औषधपाण्याची व्यवस्था होईल, अशा धर्मशाळा बांधून ठेवलेल्या होत्या." मुलतानच्या सूर्यमंदिराबरोबर काशीच्या शिवमंदिराचाही उल्लेख केला पाहिजे. या मंदिरांत दररोज १०००० शिवभक्त दर्शनास येत असून त्यांतील देवाची ( शिवाची ) पुरुषाकार मूर्ति जवळ जवळ सत्तर (७०) हात उंचीची असून फार सुबक व भव्य असल्यामुळें हुबेहुब सजीव माणसासारखी वाटे. (म. यु. भारत, भाग १). ह्या दोन देवालयांच्या वर्णनावरून राजेरजवाडे व धनिक यांच्या दातृत्वामुळें देवालयामध्यें अपार संपत्ति कशी सांठत गेली हें समजतें. मूर्तीवर दागदागिने घालणें, त्यांचे उत्सव करणें, त्यांकरितां हजारों रुपये खर्च करणें, खर्चाकरितां जमीनी

तोडून देणें, यांतच सर्व धर्म येऊन बसला व अपार संपत्तीच्या देवालयांतील मूर्तींमध्यें अद्भुत सामर्थ्य असतें अशाहि कल्पना निघाल्या.

(२४१) **देवळें द्रव्याचीं केंद्रें बनलीं**:-मुसलमान येण्यापूर्वी हा देश विशाल व सुशोभित देवालयांनीं अगदीं फुलून गेला होता. राजे, राण्या, श्रीमंत, शेठ, सावकार यांना आपापल्या उपास्यदेवतांचीं मंदिरें उभारण्यांत धन्यता वाटे. देवाची पूजाअर्चा षोडशोपचार विधीनें व्हावी म्हणून मोठमोठ्या देणग्याहि देण्यांत येत असत. मूर्तींवर सोनें, जडजवाहीर व दागिने यांचा वर्षाव होत असे. भिक्षा मागणारे ब्राह्मण, तपस्वी, योगी हे जेव्हां अशा देवालयांचा आश्रय करूं लागले तेव्हां सर्व पैसा दान देण्याजोगें सत्पात्र देवालयांशिवाय दुसरें कांहीं राहिलें नाहीं. शिव व विष्णु यांच्या उपासकांमध्यें देवालयें बांधण्याची अगदीं चढाओढ होऊं लागली. देवालयांतील बहुतेक मूर्ति दगडाच्या असत, पण कित्येकदां राजेरजवाडे व श्रीमंत लोक त्या सोन्या-चांदीच्याहि करीत. रत्नाची मूर्ति केली म्हणजे राष्ट्रांतील स्त्रीपुरुषांचें कल्याण होतें, सोन्याची केली तर सत्ता प्राप्त होते, चांदीच्या मूर्तीपासून कीर्ति, पितळेच्या मूर्तीपासून दीर्घ राज्य, आणि पाषाणमूर्ति केली तर जमीन मिळते अशा समजुती त्या वेळीं रूढ होत्या. देवाच्या पूजेचे व भोगाचेहि बहुत खर्चाचे प्रकार सुरू झाले. संपत्तीचा व्यय राजे लोकांनीं सैन्य, दुर्ग, मंत्री, उद्योग यांचें बल वाढविण्याकरितां करावयाचा सोडून दिला. सर्व कांहीं मूर्तीच्या आराधनेनें मिळतें या कल्पनेवर राष्ट्राचा द्रव्यौघ देवालयाकडे वळला. समाजाची सुस्थिति ज्या शिक्षण, आरोग्य व इतर गोष्टींमुळें होते तिकडे अजिबात दुर्लक्ष्य झालें. मूर्ति व देवळें जितकीं जुनाट होत तितका त्यांविषयीं आदरभाव जास्त वाढे आणि भोळसटपणानें या मूर्तींच्या ठिकाणीं अद्भुत शक्ति आहे अशी लोकांची कल्पना होई. लोकांच्या या कल्पनानुसार त्या वेळीं धर्मग्रंथहि निर्माण झाले. वराहमिहिराच्या बृहत्संहितेमध्यें निरनिराळ्या देवांच्या मूर्ति कशा असाव्या याविषयीं माहिती दिली आहे. तशीच इतर कांहीं ग्रंथांमध्यें निरनिराळ्या देवतांच्या पूजाअर्चांचीहि पद्धत कथन केली आहे! हिंदुसमाजाच्या या सर्व भोळसट व खुळचट कल्पनांचा फायदा मुसलमानांनीं बरोबर घेतला. मूर्तीमध्यें अद्भुत सामर्थ्य असतें या मूर्खपणाच्या कल्पनेनें हिंदु लोक प्रतिकार-

शून्य बनले होते. त्यांना मुसलमानांच्या स्वाऱ्यांनीं असें दाखविलें कीं, तुमच्या मूर्तीत मुळींच सामर्थ्य नाहीं म्हणून त्या आम्ही फोडतों व तेथें असलेली गडगंच संपत्ति लुटून नेतों ! मूर्तिविषयक अद्भुत कल्पना जगांतील प्रत्येक समाजांत असल्या तरी या कल्पनांमुळें हिंदुसमाजाइतकें दुसऱ्या समाजाचें नुकसान झालेलें क्वचित्‌च आढळेल. मूर्तिविध्वंसक मुसलमानांनीं महंमद कासीमपासून तों अखेरपर्यंत हिंदूंच्या या मनोभावनेचा कसा फायदा घेतला हें इतिहासांतील कांहीं उदाहरणें देऊन विशद करितों.

(२४२) **मुसलमानांनीं केलेले मूर्तिभंगः**–हिंदुस्थानावर स्वाऱ्या करणाऱ्या मुसलमानांना असें वाटे कीं, जगांतील मूर्तिपूजेचें पाप धुवून टाकण्याकरितां परमेश्वरानें आम्हांस आज्ञा केली आहे. मुसलमानी धर्म मूर्तिपूजेच्या विरुद्ध असल्यामुळें मूर्ति फोडण्यास त्यांना मोठा धर्मोत्साह वाटे. त्यांत हिंदूंच्या मूर्ति सोन्याचांदीच्या व देवालयांत संपत्ति अगदीं भरपूर ! त्यामुळें लुटीच्या आशेनें मुसलमानांचे बाहू नेहमीं स्फुरण पावत असत. हिंदूंच्या मूर्तिविषयक सामर्थ्यांच्या अद्भुत कल्पना होत्या, म्हणून ते मुसलमानांची टोळधाड आली तरी अगदीं बेपर्वा असत व ईश्वर पाहून घेणारा समर्थ आहे अशा समजुतीनें स्वस्थ बसत. अगदीं आयत्या वेळीं शत्रु येऊन गळा कापूं लागला म्हणजे त्यांना प्रतिकाराची बुद्धि झाली तरी तिचा उपयोग कांहीं न होतां प्राणास मुकावें लागे ! महंमद कासीमनें सिंध देशांतील देबाल बंदरावर स्वारी केली. या बंदरांत एक मोठें मंदिर होतें. त्यावर एक उंच ध्वज फडकत होता. त्या ध्वजांत कांहीं अद्भुत सामर्थ्य आहे व तो जोंवर पडला नाहीं तोंवर आपल्याला भीति नाहीं अशा कल्पनेनें राजा व लोक स्वस्थ बसले. कासीमनें पहिल्याच मंदिराकडे मोर्चा वळविला व वरच्या ध्वजासह शिखर खालीं पाडलें, देवालय लुटलें व मूर्तींचा चुराडा केला ! मूर्तींत कांहीं सामर्थ्य आहे कीं नाहीं याची परीक्षा हिंदु लोक पहात होते. पण अखेरीस तरवारींत सामर्थ्य आहे हें महंमद कासीमनें सिद्ध केलें ! महंमद कासीम मुलतानवर चालून गेला. तेथें एका ब्राह्मणानें त्याला देवालय दाखविलें. त्या देवालयांत सुवर्णमुद्रांनीं भरलेल्या हंड्यावर एक सुवर्णाची मूर्ति मोठ्या माणसाच्या आकाराची होती. तिचें वजन २३० मण होतें व खालच्या हंड्यांत १३२० मण सोनें होतें.

हें सर्व घेऊन कासीम गेला, तेव्हां त्याला आपल्या धर्माप्रमाणें मूर्तिभंजनाचें धर्मकार्य करितांच परमेश्वर केवढी कृपा करतो असें वाटलें असल्यास त्यांत नवल काय ?

(२४३) **मुलतानची हकीगतः**—मुलतानच्या सूर्यमंदिराचें वर्णन ह्युएनत्संगानें केलेलें पूर्वी दिलेंच आहे. त्या उत्कृष्ट मंदिरानें युक्त असें मुलतान जरी पुढें मुसलमानांच्या ताब्यांत गेलें तथापि त्यांनीं सूर्यमंदिर पूर्ण उध्वस्त केलें नाहीं. कारण असें कीं, त्यामुळें हजारों हिंदु यात्रेकरू तेथें येत व देवालयांत अलोट संपत्ति जमे. ही सर्व संपत्ति उपटण्याचें काम मुसलमान अव्याहत करीत. व कोणी प्रतापशाली हिंदु राजा मुलतानवर चालून आला कीं त्याला मंदिरांतील मूर्ति फोडण्याचा धाक घालीत, तेव्हां हिंदु सैन्य धर्मभावनेमुळें स्वारी न करतां परते. या वेड्या समजुतीमुळेंच कनोजच्या प्रतिहार राजांना जवळ असलेलें मुलतान कधींहि काबीज करतां आलें नाहीं.

(२४४) **गिझनीच्या महंमदाचे हल्लेः**—गिझनीच्या महंमदास हिंदुस्थानावर स्वाऱ्या कराव्याशा वाटल्या त्याचें कारण तेथील संपत्तीनें त्याचा लोभ, आणि तेथील मूर्तींनीं त्याचा धर्मोत्साह प्रदीप्त केला होता हें होय. गिझनीचा महंमूद हिंदुस्थानांत आला. त्याला येथील बहुमोल मूर्ति व अपार संपत्तीचीं देवालयें पाहून स्फुरण चढलें. मूर्तिपूजेचें पातक धुवून टाकल्यावर अल्लाची आपल्यावर मोठी कृपा होते, या भावनेनें त्यानें स्वाऱ्यांवर स्वाऱ्या करून मूर्ति फोडून देवालयें लुटून अगणित संपत्ति नेली. नगरकोटवर महंमूद चालून गेला. तेथील देवालयाच्या अद्भुत सामर्थ्याबद्दल लोकांच्या निरनिराळ्या कल्पना होत्या, म्हणून ते स्वस्थ बसले होते. महंमुदानें नगरकोट किल्ला काबीज करून देवालय लुटलें. जवाहीर, हिरे हीं इतकीं सांपडलीं कीं, तीं हातानें मोजतां आलीं नाहींत व वह्यांवर नोंदतां आलीं नाहींत. कारण लिहितां लिहितां वह्या अपुऱ्या पडल्या! रेशमी कापड, इतर दागदागिने, पुष्कराज, पाचू, मोतीं यांचाहि हिशोब झाला नाहीं. लुटींत सोन्याची कशीबशी मोजदाद झाली. तें सोनें ७००।८०० मण होतें. महंमूद स्वारी करून गेल्यावर तो व्यवस्थेकरितां आपल्या पश्चात् जे अधिकारी नेमी तेही मूर्ति फोडणें, मूर्तिपूजकांना शिक्षा करणें, लोकांना

चाटविणें हीं धर्मकार्यें मोठ्या अभिनिवेशानें करीत. पण हिंदु राजे मात्र १०१५ वेळां हा विध्वंसनाचा प्रकार झाला होता तरी सावधपणानें मूर्तिरक्षणाकरितां कधींहि तयारीनें लढले नाहींत. महंमुदानें १०११ मध्यें ठाणेश्वरावर स्वारी केली. तेथील प्रसिद्ध जगसोमदेव भ्रष्ट करण्याचा विचार त्यानें केला. ही बातमी त्या वेळीं नुकत्याच अंकित झालेल्या दिल्लीच्या आनंदपालाला कळली. त्यानें मूर्ति न फोडण्याविषयीं निरोप पाठविला; पण महंमुदानें तो न मानतां असें कळविलें कीं, महंमदी धर्माचे भक्त स्वर्गांत पुण्यफळ मिळण्यासाठीं मूर्तिपूजा नष्ट करण्याचा नेहमींच प्रयत्न करतात. हा निरोप ऐकून हिंदु राजे सावध झाले व मूर्तीचें रक्षण करण्यासाठीं त्यांनीं सर्व हिंदुस्थानचे हिंदु बोलावले. पण ते जमण्यापूर्वींच महंमुदानें ठाणेश्वरावर हल्ला करून मूर्ति फोडून देवालय लुटून आपलें कार्य उरकलें हें सांगणें नकोच! महंमुदानें मथुरेवर स्वारी करून तेथील देवालय लुटून अगणित संपत्ति नेली. मूर्तींचे जे ढीग सांपडले त्यांत ५ हात उंचीच्या सोन्याच्या ५ मूर्ति सांपडल्या. एका मूर्तीवर बसविलेलें एक रत्न सांपडलें. त्याची किंमत १॥–२ लाख रुपये तरी असावी. दुसऱ्या एका मूर्तीवर बहुमोल किंमतीचा नीलमणि मिळाला. एका मूर्तीच्या पायाच्या सोन्यांतून अशींच रत्नें मिळालीं. चांदीच्या मूर्ति इतक्या होत्या कीं, त्यांचें वजन करतां करतां लोक थकले. महंमुदाच्या कानावर सोमनाथ देवालयाचें ऐश्वर्य गेलें. तेव्हां एकाद्या मोठ्या राजापेक्षां या देवालयाचें ऐश्वर्य ऐकून महंमूद थक्क झाला. त्यानें मनांत असें आणलें कीं, सोमनाथावर स्वारी करून मूर्ति फोडून हिंदूंचे देव खोटे आहेत असें त्यांच्या प्रत्ययास आणावें म्हणजे ते आपल्या धर्माचा स्वीकार करतील.

(२४५) सोमनाथावरील आक्रमणः—सोमनाथाची मूर्ति अखिल भरतखंडांत प्रसिद्ध होती. विशेषतः चंद्रग्रहणाच्या रात्रीं तेथें अलोट यात्रा जमे. दररोज मूर्तीच्या अभिषेकास गंगेचें पाणी येई व हजार ब्राह्मण अभिषेकास बसत. दररोज येणाऱ्या यात्रेकरूंचें श्मश्रू करण्याला ३०० न्हावी पुरत नसत! देवालयाच्या खर्चाकरितां १०००० गांवें इनाम दिलेलीं होतीं. त्यांतून दररोज षोडशोपचार पूजा यथासांग होई. देवापुढें नुसत्या गाणारणींची संख्या ३०० पेक्षां अधिक होती. अशा ऐश्वर्यानें संपन्न

असलेला देव महासमर्थ आहे अशा समजुतीनें लोक स्वस्थ होते. महंमूद ३०००० घोडदळ व इतर पुष्कळ सैन्य घेऊन सोमनाथाजवळ आला, तरी सोमनाथ महंमदाचा नाश करील, अशा विश्वासानें लोकांनीं बंदोबस्त ठेविला नाहीं व प्रतिकार केला नाहीं. उत्तरेकडील देवांचा विध्वंस झाल्याच्या वार्ता गुजराथच्या हिंदु लोकांनीं जेव्हां ऐकल्या तेव्हां सोमनाथाच्या अवकृपेमुळें तिकडील देवांची दुर्दशा झाली असें हे म्हणत असत. महंमूद अगदीं तटाजवळ येऊन पोंचला तरी हिंदु लोक किल्ल्याच्या तटावर उभे राहून मुसलमानांकडे पाहून खदखदा हंसत होते व सोमनाथ तुमचा सर्वांचा नाश करील असें म्हणून त्यांना भीति घालीत होते. पण थोडक्याच वेळांत महंमूद शिड्यांच्या साह्यानें तटावर चढला, किल्ल्यांत उतरला व कत्तल करूं लागला. तेव्हां सर्व हिंदु देवळांत शिरले व देवापुढें नाकें घासून, पालथे उलथे पडून देवाची करुणा भाकूं लागले. हिंदु लोक देवळांत शिरत, देवापुढें रडत, गुडघे टेकीत, हात जोडीत, देवाची प्रार्थना करीत व देवळांतून बाहेर येऊन मरेपर्यंत लढत. हिंदूंनीं आयत्या वेळीं देवळाजवळ क्रोधानें संतप्त होऊन प्रतिकार केला, पण तो प्रतिकार म्हणजे मृत्यूला कवटाळणें होतें. महंमुदानें ५०००० पेक्षां अधिक लोकांची कत्तल केली व मूर्ति, सोनें, दागिने, जडजवाहीर असें सर्व सुमारे ६०।७० लाख किंमतीचें द्रव्य घेऊन त्यानें प्रयाण केलें. महंमुदानें गिझनीस गेल्यावर या सर्व द्रव्याचें प्रदर्शन भरविलें व आपल्या अनुयायांना धर्मनिष्ठांच्या साहाय्याला देव कसा तत्पर आहे हें प्रत्यक्ष दाखविलें ! महंमुदानें धर्मोत्साहाच्या भरांत मूर्तींचा विध्वंस केला व मूर्तिपूजकांना अत्यंत निष्ठुरतेनें वागविलें. हें त्याचें वर्तन डोळ्यापुढें ठेवून त्याच्या पश्चात् आलेल्या मुसलमानांनीं तसेंच वर्तन केलें.

(२४६) **महंमुदाचें अनुकरणः**—बखत्यार खिलजीनें १२०२ मध्यें बहार प्रांतांत ब्राह्मणांचें प्रसिद्ध विद्यापीठ होतें तें धुळीस मिळवून सोडलें. आल्तमशनें १२३१ त विक्रमादित्याची राजधानी जी उज्जयिनी ती घेऊन तेथील सर्व देवालयांचा विध्वंस केला ! अल्लाउद्दीन खिलजीनें चितोड पाडाव केल्यावर तेंच केलें व गुजराथेवर १२९७ त स्वारी करून सोमनाथाचें देवालय पुनरपि लुटलें. गिझनीच्या महंमुदाच्या स्वारीनंतर सोमना-

थाची नवीन मूर्ति बसविली होती ती अल्लाउद्दीनानें फोडली व तिचे तुकडे दिल्लीच्या मशिदीच्या पायऱ्यांना लाविले ! गुजराथचा सुलतान मुजफरशहा यानें गुजराथेंतील बहुतेक देवालयांचा विध्वंस करून तेथें मशिदी उठवून दिल्या. सुलतान अहमदशहानें १४१४ मध्यें ताल्जुल्मुक नामक एका धर्माभिमानी मुसलमानी गृहस्थाची धर्मवृद्धीच्या खात्यावर नेमणूक केली. त्यानें दरोबस्त हिंदु देवालयांचा व मूर्तींचा फडशा उडवून तेथें मशिदी बांधून धर्मवृद्धीच्या खात्याची गुजराथमध्यें मोठी वाढ करून दाखविली. १४२४ त अहमदशहा वलीनें वरंगूळच्या राजावर स्वारी करून त्यास ठार केलें व मुलुखांतील देवळें पाडून तेथें मशिदी उठवून दिल्या. ज्यांत अद्भुत सामर्थ्य आहे अशा कल्पनांच्या मूर्ति व अपार संपत्ति आहे अशीं देवळें लुटल्याचा इतिहास मुसलमान आल्यापासून भरगच्च भरलेला आहे. विस्तारभयास्तव अधिक उदाहरणें देत नाहीं.

(२४७) **हिंदूंच्या मिळमिळीत धर्मभावनाः**—मुसलमानांनीं जाज्वल्य धर्मभावनेनें मूर्तींचा विध्वंस केला आणि हिंदूंनीं चुकीच्या व मिळमिळीत कल्पनेनें तो सहन केला. मूर्तीमध्यें सामर्थ्य आहे, ती बघून घेईल ही कल्पना दहावीस मूर्ति फुटल्यानंतर चुकीची आहे असें हिंदूंच्या ध्यानांत आलें असावें. पण अवतारवेड, कलियुग, दैववाद * आणि अशाच भोळसट धर्मवेड्या कल्पनांमुळें ते निष्क्रिय राहिले. मूर्तींचा विध्वंस झाला, देवालयें लुटलीं, असें ऐकलें कीं, हे धर्मभोळे लोक असें म्हणत कीं, देवसुद्धां ज्यांपुढें नम्र होतात त्यांचा विरोध मनुष्यांनीं करणें निरर्थक आहे ! मुसलमान मूर्ति फोडून देवांचा अपमान न करतां ते देव ज्या समाजाचे आहेत त्यांचा अपमान व धिःकार ते करतात असें हिंदूंना वाटलें नसावें काय ? उलट महंमुदाविरुद्ध देवांचें सुद्धां कांहीं चालत नाहीं, देवांचें जेथें चालत नाहीं तेथें दुर्बळ माणसें काय करणार ? तो ईश्वरी अवतार नसेल कशावरून ? कलियुगांत धर्माचा उच्छेद होणार असें पुराणांतरीं जें लिहिलें आहे तें खोटें कसें ठरेल ? कलियुगामध्यें जर हा असा उच्छेद होणारच असेल तर देव

---

* टीपः—या विषयावरील विवेचन ‘ हिंदु समाज समर्थ कसा होईल ? ’ या आमच्या ग्रंथांत पहा.

तरी काय करणार? देवाला जर आपलें ऐश्वर्य व आपली पूजा पाहिजे होती तर त्यानें या लुटारूंचे हात तोडले नसते काय? किंवा त्याच्या अवकृपेमुळें ते आपोआप तुटले नसते काय? डोळे गळून पडले नसते काय? तरवारी बोथट झाल्या नसत्या काय? पण ज्या अर्थीं असें कांहीं झालें नाहीं त्याअर्थीं ईश्वराला हा धर्मोच्छेद मान्य आहे, त्यानेंच ही प्रेरणा केली आहे, अशा चुकीच्या, भोळसट व मूर्खपणाच्या समजुतीनें हिंदु फसले, प्रतिकारशून्य राहिले व प्राणास मुकले! मुसलमानांनीं इतका हाहाःकार उडवून दिला तरी हिंदु लोक शुद्धीवर आले नाहींत.

(२४८) धर्मशास्त्र व मूर्तिपूजाः—हिंदुधर्मशास्त्रदृष्ट्या या मूर्तिपूजेचा विचार केल्यास लोकांच्या मूर्तींबद्दल अशा भोळसट कल्पना कशा झाल्या याबद्दल आश्चर्य वाटतें! मूर्तीच्या योगानें मनाला निश्चल करितां येतें, ध्यान-धारणा होते आणि भक्तिभाव दृढ करितां येतो; याशिवाय त्या प्रतीकामध्यें आत्मबुद्धि ठेवूं नये, असें बादरायणांनीं आपल्या "न प्रतीके न हि सः।" (४–१–४) या सूत्रांत स्वच्छ सांगितलें आहे. कोणत्याहि देवतेची प्राणप्रतिष्ठा झाल्यावरच तिला महत्त्व येतें. आवाहन व विसर्जन हे वैदिक विधि मूर्तींमध्यें देवपणा आणतात व घालवितात. उदाहरणार्थ, मृत्तिकेचे गणपति देव म्हणून पुजून पुनः फेकून देण्यांत येतात हें प्रत्यक्ष हिंदुसमाज पाहात असतां त्याच्या भावना अद्याप पालटत नाहींत; याला काय म्हणावें हें कळत नाहीं. दगडांत सामर्थ्य नाहीं, देवपण नाहीं, अद्‌भुतपणा नाहीं तर सर्व कांहीं मानवी श्रद्धेमध्यें आहे, तपामध्यें आहे व उद्योगामध्यें आहे. सोन्याची मूर्ति केल्यानें व तिला जडावाचे अलंकार घातल्यानें अधिक पुण्य आहे ही समजूत खोटी आहे. देवळें व मूर्ति यांवर सोनें व जवाहीर लादल्यानें कांहीं मोक्ष मिळतो असें नाहीं. तर ईश्वरस्वरूपानें पाषाण–मृत्तिकादि प्रतीकांची जी उपासना निष्ठेनें व निग्रहानें करण्यांत येते त्यामुळेंच सामर्थ्य उत्पन्न होतें असा शास्त्राचा सिद्धान्त आहे. हा सिद्धांत हिंदुसमाजाच्या गळीं उतरविला पाहिजे. मूर्तींमध्यें सामर्थ्य नाहीं तर तें भावामध्यें आहे. "भाव तोचि देव, भाव तोचि देव" असें तुकाराममहाराज अट्टाहासानें सांगतात. मूर्तीची उपासना ईश्वर या भावनेनें, निष्ठेनें, श्रद्धेनें व आस्थेनें केली म्हणजे त्यामुळें मूर्तीचें सामर्थ्य न वाढतां माणसांचें सामर्थ्य

वाढतें. सर्व जगाला व्यापून असणारें जें ईशतत्त्व तें केव्हांही मरत नाहीं, तुटत नाहीं, फुटत नाहीं, वाळत नाहीं, झिजत नाहीं, विटाळत नाहीं, तर तें सदैव अविनाशीच असतें. त्या तत्त्वाचें आकलन होत नाहीं, म्हणून सगुणोपासना प्रचारांत आली. चित्तैकाग्र्याच्या दृष्टीनें या उपासनेचें महत्त्व फार आहे. ज्या मूर्तींच्या उपासनांपासून भाव, निग्रह, आत्मविश्वास, श्रद्धा व चित्तैकाग्र्य यांचा लाभ होऊन चित्तशुद्धि होते, त्या मूर्तींचें संरक्षण करण्याकरतां हिंदुसमाजानें बद्धपरिकर असलें पाहिजे. ज्या समाजाला आपल्या देवांचें रक्षण करतां येत नाहीं व घरचे देव सांभाळतां येत नाहींत, त्या समाजाचें रक्षण देव तरी कसें करतील? 'धर्मो रक्षति रक्षितः' हें वचन जरा फिरवून 'देवो रक्षति रक्षितः' असें म्हटलें तर कांहीं हरकत नाहीं. देवांचें रक्षण जर समाजानें केलें तरच त्या समाजाच्या रक्षणास देवहि प्रसंगीं आपली शक्ति पाठवितील. कारण 'परस्परं भावयंतः' असा न्याय आहे. सर्व कांहीं देव करतो किंवा सर्व कांहीं देवानेंच होतें, मूर्तींमध्यें सामर्थ्य आहे आणि देव दुष्टांना पाहून घेतील हे वाद दुर्बळांचे आहेत. दैवतें हीं मंत्राधीन आहेत, ते मंत्र मनुष्याधीन आहेत, म्हणजे मनुष्य आपल्या भावनेनें दगडांत देवत्व आणतो अशी खरी स्थिति आहे.

(२४९) **जसे लोक तसे त्यांचे देवः**—तेजस्वी लोकांचे देव तेजस्वी असतात, बलवानांचे देव बलवान् असतात, सहिष्णु समाजाचे देव सहिष्णु असतात, आणि जयिष्णु समाजाचे देव जयिष्णु असतात. तुकाराममहाराजांचा देव विठोबा होता, तर समर्थांचा देव जयिष्णु वृत्तीचा कोदंडधारी राम होता. म्हणून हिंदुसमाजानें ज्या शेळपट व मिळमिळीत वृत्तींनीं आपला नाश झाला आहे त्या सोडून जरा जिवंत व समर्थ वातावरणांत आलें पाहिजे. मूर्तींच्या हातांत चक्रगदा हीं आयुधें भक्तानें दिलीं तर देव म्हणतो, यांनीं मी दुष्टांचा संहार करीन. हातांत कोणतेंहि शस्त्र न दिलें तर देव म्हणेल मी आशीर्वाद देईन. सारांश भक्त जसा बनवील तसा देव बनतो, जसें वदवील तसा तो वदतो. परमेश्वरानें शेकडों वेळां सांगितलें आहे कीं, "**अहं भक्त-पराधीनः अस्वतंत्रः**" मी भक्तांच्या आधीन आहें. भक्तांच्या आवाहन-विसर्जनामध्येंच माझें देवत्व आहे. देवांच्या मूर्ति स्वतः कांहीं करणार नाहींत. त्या तरवार घेऊन धांवणार नाहींत, वा गदा घेऊन झडप घालणार

नाहींत. हें सर्व माणसांनींच करावयाचें असतें. ज्या समाजांत उत्कृष्ट, जळजळीत व तीव्र अशा भावना असतील त्या समाजाला परमेश्वर पराक्रमाची बुद्धि देतो. परमेश्वर समर्थ समाजाला समर्थ कर्मे करण्याची व व दुबळ्या समाजाला दुबळी कर्मे करण्याची बुद्धि देतो. परमेश्वर भक्तांचें संरक्षण करतो याचा अर्थसुद्धां हाच कीं, तो भक्ताला प्रतिकारक्षम अशी बुद्धि देतो. महाभारतांत याबद्दल मोठें मार्मिक विवेचन उद्योगपर्वांत आलेलें आहे.

न देवा दंडमादाय रक्षंति पशुपालवत्
यं तु रक्षितुमिच्छंति बुद्धया संविभजंति तम् ॥

—म. भा. ५।३५।४०

यस्मै देवाः प्रयच्छंति पुरुषाय पराभवम् ।
बुद्धिं तस्यापकर्षंति सोऽवाचीनानि पश्यति ॥

—म. भा. ५।३४।८१

म्हणजे, देव ज्याच्या रक्षणाची इच्छा करतात त्याला रक्षणक्षम अशी बुद्धि देतात. पण ज्या समाजांत कांहीं कर्तृत्व नाहीं, त्या पड्या व मारखाऊ समाजाची बुद्धि भ्रष्ट करतात. मूर्तिविषयक अद्‌भुतकल्पना महाभारतांत नाहींत, गीतेंत नाहींत, स्मृतींत नाहींत, व श्रुतींतही नाहींत. परमेश्वराविषयीं शास्त्राचा सिद्धान्त हा कीं, तो साक्षी कूटस्थ प्रभू असा आहे. घरांत ठेवलेला दिवा हा जसा गृहव्यापाराला प्रवृत्तिभूत असतो, तो जसा कुणाचें नियमन किंवा निवारण करीत नाहीं, तशी स्थिति ईश्वराची आहे. म्हणून हिंदुसमाजानें अवास्तव आणि अशास्त्रीय कल्पना टाकून देऊन आपल्या समाजाच्या मानाकरतां देवळांचें व देवतांचें संरक्षण जिवावर उदार होऊनच केलें पाहिजे.

**(२५०) मूर्ति फोडणाऱ्यांचे हेतुः**—मुसलमानांनीं मूर्ति फोडल्या त्या त्यांच्या धर्मांत तशी आज्ञा आहे म्हणूनच केवळ फोडल्या असें नाहीं, तर हिंदुसमाजाचा अपमान व्हावा म्हणूनच त्या फोडल्या! दगडाची, सोन्याची, चांदीची मूर्ति फोडून त्यांना दगड, सोनें व चांदी यांचा कांहीं अपमान करावयाचा नव्हता. या धातूंचा अपमान त्यांना जर कर्तव्य असता तर

त्यांनीं सोन्याचांदीची लूट कधींहि केली नसती. धर्माज्ञा म्हणून जर मूर्ति फोडावयाच्या होत्या तर स्मशानांत, रस्त्यावर व इतर बेवारशी मूर्ति पुष्कळ होत्या. परंतु त्यांकडे त्यांनीं ढुंकून न पाहतां ज्या मूर्तींना महत्त्व आहे तिकडेच मोर्चा वळविला. मूर्ति फोडण्यामध्यें तिच्याभोंवतीं असलेल्या देवविषयक कल्पनेचा त्यांना नायनाट करावयाचा होता आणि त्या कल्पना ज्या समाजांत आहेत त्याचा धिःकार करावयाचा होता. तसा अपमान व धिःकार मूर्ति फोडून व देवालयें लुटून त्यांनीं केला. पण हिंदुसमाज, दैववाद, देववाद, मूर्तिविषयक अद्‌भुतकल्पना, कलिअवतार असल्या भ्रमांनीं भारून गेल्यामुळें त्याला तो अपमान वाटला नाहीं. हिंदुसमाजाला वाटलें कीं, हा देवाचा व मूर्तींचा अपमान आहे, तेव्हां देव पाहून घेईल. पण परमेश्वरानें काय पाहून घेतलें हें इतिहास सांगतच आहे. हल्लीं इंग्रजांचें राज्य आहे. या राज्यांत जर राजाच्या पुतळ्याला कोणी डांबर फाशील, किंवा पंचम जॉर्ज बादशहांचा फोटो भर रस्त्यांत अपमान करण्याच्या हेतूनें पायांखालीं तुडवील तर त्याला ताबडतोब शिक्षा होईल. याचें कारण हेंच कीं हा अपमान त्या धातूचा, पुतळ्याचा किंवा फोटोचा नसून तो ब्रिटिश राज्याचा आहे, त्या सत्तेचा उपमर्द आहे, असेंच समजलें जातें. म्हणून हिंदूंनींहि देवतांचा अपमान म्हणजे समाजाचा अपमान असें समजलें पाहिजे. फोटोंत जॉर्ज बादशहा नाहींत, पुतळ्यांत राजा नाहीं, असें असतांना जर अपमान होतो, तर हिंदूंच्या मूर्तींचा भंग झाला तर तो समाजाचा अपमान नव्हे काय? देवांची निंदा केली तर ती आपली निंदा आहे, वेदांचा तिरस्कार केला तर तो आपला तिरस्कार आहे, देवळें भ्रष्ट केलीं तर तें आपल्याला लांछन आहे, कोठें अत्याचार घडले तर तें समाजाला आव्हान आहे, अशा भावनेनें हिंदुसमाजानें स्वसंरक्षणसमर्थ झालें पाहिजे. जिवंत समाजांतील भावना कोणत्याही विषयामध्यें तीव्र, उत्कट, जळजळीत व यथार्थ असतात. मुमुर्षु समाजांत त्यांचा अभाव असतो. खटला चालला कीं धर देवाचें (म्ह. मूर्तीचें) डोकें, आजार आला कीं कर मूर्तीला अभिषेक, मोठी आपत्ति आली कीं घे देवाच्या दारांत धरणें, परीक्षा नापास झाली कीं कर देवाला नवस, असल्या कल्पना आज सुद्धां प्रत्यक्ष दिसत आहेत. असल्या भोळसट व कार्यकारणविहीन कल्पनांनीं आर्यसंस्कृतीचा अपकर्ष आजवर झालेला आहे.

म्हणून उत्कर्ष व्हावा अशी इच्छा असल्यास ह्या भोळसट कल्पनांचा नायनाट केला पाहिजे.

(२५१) सद्यःस्थितींत नवीं देवळें बांधणें हें पाप होयः—मध्यकालीन राजांनीं व धनिकांनीं मूर्ति व देवळें यांत सर्व पैसा खर्च करून मुसलमानांना स्वाऱ्या करण्यास आमंत्रण दिलें, हें वर आपण पाहिलेंच आहे. एवढा अनर्थ ओढवला तरी अद्याप मूर्ति व देवळें यांचा हव्यास कांहीं पुरा होत नाहीं. मुलगा नसला बांध देऊळ, नष्टांश झाला कर मूर्तीची स्थापना, एकाद्या कामांत कल्पनेपेक्षां अधिक पैसा मिळाला कीं कर एकाद्या देवाची प्राणप्रतिष्ठा, आणि दे त्याला हजार दोन हजारांचें उत्पन्न तोडून ! असलीं कामें जीं हिंदुसमाजांत आज दिसत आहेत, त्यामुळें आपला अपकर्ष असाच होणार असें वाटतें. देवालयें बांधण्यापेक्षां रुग्णालयें, अनाथालयें, सभालयें, विद्यालयें अशा आलयांमध्यें तो पैसा खर्च झाला पाहिजे. मूर्तींची स्थापना करण्यांत, त्यांना नटवण्यांत, सजवण्यांत, त्यांवर अलंकारांचीं ओझीं घालण्यांत आज पुण्य नाहीं. तर तें द्रव्य शिक्षण, आरोग्य, उद्योग, शरीरसामर्थ्य यांकडे खर्च करण्यांत महत्पुण्य आहे, असेंच समजलें पाहिजे. देवाला उत्पन्न देऊन केवळ धर्मभावनेवर आळशी पुजाऱ्यांची जगण्याची सोय करण्यापेक्षां तो पैसा अस्पृश्यांचा उद्धार करण्यांत, निरक्षरांना साक्षर करण्यांत आज महत्पुण्य आहे, असें समजलें पाहिजे. परमेश्वर देवळें बांधून भेटत नाहीं, मूर्ति स्थापिल्यानें तो धांवून येत नाहीं, तो अनन्यभावाला व भक्तीलाच वश होतो. परमेश्वर हा धनवानांपासून नेहमीं भाव इच्छितो. म्हणून देवांना म्हणजे मूर्तींना द्रव्य व अलंकार यांपासून शक्य तितकें लांब ठेविलें पाहिजे. प्राचीन ऋषि तर चंद्र, सूर्य, वायु, वरुण अशा देवतांचे उपासक होते. त्या देवतांकरतां त्यांना देवळें नको होतीं, मूर्ति नको होत्या, अलंकार नको होते, द्रव्यहि नको होतें. पण पुढें अजागळ, प्रतिकारशून्य, पण श्रीमंत अशा भक्तांनीं देवाला आपल्यासारखें केलें. त्याचे दुष्परिणाम आजपर्यंत भोंवले. लुटारू, चोर व आळशी अशांनीं या धर्मभावनेचा फायदा घेतला व आपला धिःकार केला यास्तव आतां नवीन देवळें नकोत व नव्या प्राणप्रतिष्ठाहि नकोत. समाजाला आपल्या देवळाचें रक्षण करतां येईल असा एकच देव असावा. त्याचें एकच देवालय

असावें. बेवारशी असंरक्षित असे देव व देवालयें ठेवण्यांत हांशील नाहीं; त्याचप्रमाणें मूर्तिविषयक अद्भुतकल्पनांचें खूळ ठेवण्यामध्येंही अर्थ नाहीं. तसेंच या देवालयामध्यें अमक्यांनीं जावें व तमक्यांनीं जाऊं नये हेही निर्बंध आतां उपयोगीं नाहींत. देवाच्या घरीं सर्व सारखे आहेत म्हणून सर्व हिंदूंना देवळें मोकळीं पाहिजेत. अस्पृश्यतेचें उच्चाटण बरेंचसें झालें आहे. तिचें समूळ उच्चाटण करून अस्पृश्य हिंदूंचा वर्ग कमी झाला कीं सर्व हिंदु स्पृश्यच आहेत. मग त्यांना लांबून देवदर्शनास प्रतिबंध करण्याचें मुळींच कारण नाहीं. देवांचें संरक्षण करण्यास सर्व हिंदुसमाजानें जर पुढें आलें पाहिजे तर तीं देवळें सर्वांना मोकळीं केलीं पाहिजेत व त्यांतील देवांचें दर्शन सर्वांना झालेंच पाहिजे. तरच त्या देवाबद्दल आत्मीय भाव वाटेल !

(२५२) **देवाचें पावित्र्य नष्ट होत नाहीं:**—देव पवित्र आहे, तो कधीं अपवित्र होत नाहीं व विटाळत नाहीं. सर्व स्पृश्यास्पृश्य हिंदूंनीं लांबून दर्शन घेतलें तर, देवाचें पावित्र्य नष्ट होईल अशी कांहींना भीति वाटते; पण खरी स्थिति अशी आहे कीं, प्रत्येक देवाजवळचें पावित्र्य तेथील पुजाऱ्यांनींच भ्रष्टविलेलें असतें. पावित्र्य हें भावनेंत असतें. द्रव्यार्जना-करतां अनेक धंदे करणारे भाविक लोक देवाकडे येतात. पण पुजाऱ्यांचा द्रव्योत्पादक धंदा 'देवच' असल्यामुळें त्यांनीं त्याचा बाजार मांडलेला असतो. इतर लोकांत कोणत्याहि देवतेबद्दल जितका आदर असतो तितका पुजाऱ्यांत कधींच नसतो. देव हा विषय त्यांच्या श्रद्धेचा नसून तो **त्यांचा पोटापाण्याचा विषय असतो !** देवाचा क्रयविक्रय ते नेहमीं करतात. देव आपला ऋणी आहे या समजुतीनें ते त्या देवाचा दुरुपयोग करतात. चोर व लुटारू हे देवाचा विध्वंस करून सर्व लुटतात. पुजारी अप्रत्यक्ष विध्वंस करून साक-सुरतपणें सर्व लुटत असतात. तेव्हां पावित्र्य बिघडेल ही शंका न बाळगतां सर्व हिंदूंना सर्व देवळें लांबून दर्शनार्थ मोकळीं केलींच पाहिजेत. मूर्ति विटाळते हीसुद्धां चुकीचीच कल्पना आहे. **जो विटाळतो तो देव नव्हे व जो बाटतो तो हिंदु नव्हे असें तत्त्वज्ञान समाजांत आलें आहे.** देव हा व्यापक आहे, विभु आहे. तो सदा पवित्र आहे. त्याला षोडशोपचार पूजा नको, अलंकार नको, इनाम नको व इतर ऐश्वर्य नको. त्याला जात नको, पंथ नको व वर्ण नको. तर त्याला केवळ भाव, भक्ति, प्रेम, माणु-

सकी, शील हीं पाहिजेत. परमेश्वराला जे गुण प्रिय आहेत ते गुण अंगीं आणण्याचा यत्न हिंदुसमाजानें केला पाहिजे. परमेश्वर यश, श्री, औदार्य, ज्ञान, वैराग्य व ऐश्वर्य या षड्गुणांनीं संपन्न आहे म्हणून हिंदुसमाजानें नेहमीं यश मिळवून त्याला प्रिय व्हावें. विद्या व लक्ष्मी यांनीं युक्त व्हावें, औदार्यानें जगाला थक्क करावें, ज्ञानानें सर्व जगावर छाप पाडावी, वैराग्याचा अवलंब करून जगाला शिष्य बनवावें आणि सर्व प्रकारच्या ऐश्वर्यानें जगाला ललामभूत होण्याची इच्छा करावी. परमेश्वरप्राप्तीचा हाच खरा मार्ग आहे व याच मार्गानें हिंदुसंस्कृतीचा प्रदीप उजळणार आहे.

बुद्धोत्तर कालांत ज्या चार अतिरेकांनीं हिंदुसंस्कृतीची हानि केली, त्यांपैकीं पावित्र्यकल्पनेचा अतिरेक, अहिंसेचा अतिरेक व मूर्तीविषयींच्या अद्‌भुतकल्पनेचा अतिरेक यांविषयीं विचार गेल्या चार प्रकरणांत झाला. आतां निवृत्तिपर तत्त्वज्ञानाचा जो चौथा अतिरेक त्याचा विचार पुढील कांहीं प्रकरणांमध्यें करतों.



प्रकरण तेरावें

## बौद्ध व मीमांसक

बौद्ध संस्कृतीनें सर्वव्यापी क्रांति करून हिंदुसंस्कृतीवर जो एवढा भयंकर आघात केला, त्याचा प्रतिकार त्यावेळीं कोणींच कसा केला नाहीं, अशी शंका साहजिक येते. ती तितकीशी खरी नाहीं. कारण बौद्ध-संस्कृतीचें खंडण वैशेषिकांनीं, नैय्यायिकांनीं आणि मीमांसकांनींहि पुष्कळच केलेलें आहे. व तें करून सुद्धां दुःखवाद, निवृत्तिपरता वगैरेचे संस्कार खरडून काढतां आलेले नाहींत. उलट मीमांसकांना व पुढें शंकराचार्यांनाहि

या संस्कृतीचा पूर्ण पराभव करतां न आल्यामुळें निवृत्तिपरतेची परंपरा कशी वाढत गेली याचें विवेचन यापुढें करावयाचें आहे.

(२५३) **बौद्धक्रांतीचा यज्ञावर परिणामः**—बौद्धाच्या तत्त्वज्ञानामुळें व शिकवणीमुळें ब्राह्मण व इतर वर्ण यांच्यामध्यें फारकत झाली, कारण बौद्धानुयायांत ब्रह्मद्वेष्टया व्रात्यक्षत्रिय–वैश्यांचाच बहुसंख्य भरणा होता. त्यांतच पुढें अव्रात्यक्षत्रिय समाविष्ट झाले. यज्ञ व इतर वैदिक कर्में यांच्या अभावामुळें ब्राह्मणांचा व इतर वर्णांचा संबंध कमी येऊं लागला. म्हणून ब्राह्मणहि तत्त्वज्ञान व गृह्यकर्में यांतच गढून राहिले. औपनिषद-तत्त्वज्ञानाचा परिणाम ब्राह्मणांवरहि झालेला होता. त्यामुळें त्यांचीहि यज्ञावर यथापूर्व श्रद्धा नव्हती. बुद्धाच्या पश्चात् जे कर्मवादी मीमांसक झाले, त्यांनीं वैदिक यज्ञाचा उद्धार करण्याचे यत्न केले व त्याप्रमाणें वर्णाश्रमधर्मी हिंदु सम्राटांनीं अश्वमेधहि केले, हें खरें. पण ही यज्ञसंस्था पुढच्या कालांत अनेक कारणांमुळें टिकली नाहीं असें दिसतें.

(२५४) **यज्ञाचें वैदिक स्वरूपः**—यज्ञाकडे जरा बारकाईनें पाहिल्यास त्याचें वैदिक स्वरूप निराळें होतें असें प्रत्ययास येतें. वेद व यज्ञसंस्था यांच्या साह्यानें आर्यांनीं जगाचें आक्रमण केलें असें म्हणावें लागतें. लो० टिळकांनीं आपल्या ग्रंथांत ( आर्क्टिक होम ) "बर्फाच्या प्रलयामुळें ध्रुवावरचें मूलस्थान सोडून वाटेल तिकडे जाणें भाग पडल्यावर प्रतिकूल संकटांशीं झगडत, अनार्य लोकांना जिंकून त्यांना आपलेसे करून आर्यांनीं त्यांच्यावर आपलें वर्चस्व स्थापन केलें व त्यांना भाषा, आचार व विचार इत्यादि गोष्टींत आपल्यासारखे आर्य करून सोडलें. एवढ्या एकाच गोष्टीवरून आर्यांची मूळ सुधारणा कोणत्या प्रकारची होती याचें अनुमान होतें." हें जें आर्य–स्वभावाचें वर्णन केलें आहे, त्यावरून त्यांच्या यज्ञसंस्थेवरहि प्रकाश पडतो. स्वाराज्य, वैराज्य, पारमेष्ठ्य, माहाराज्य, आधिपत्य इत्यादि वैदिकप्रार्थनांवरून यज्ञसंस्था ही आर्यांची राष्ट्रिय संस्था होती यांत संशय नाहीं. यज्ञप्रसंगीं त्या वेळच्या राष्ट्रिय सामाजिक आकांक्षांना वाचा फुटे. विद्वानांची व वीरांची सम्मानना होई. त्या ठिकाणीं तत्त्वज्ञानविषयक चर्चा चालून इतर शोधहि पुढें येत. द्यूतासारख्या व्यसनांचा निषेध होई.

हजारों जमातींचे लोक तेथें जमून वसाहती करतांना पूर्वी केलेल्या घनघोर संग्रामाचे अनुभव विचारांत घेऊन भविष्यकाळीं अनार्यांवर कसें आक्रमण करावें याचीहि चर्चा यज्ञप्रसंगीं करीत. सारांश संहिताकाळीं यज्ञांचें जें राष्ट्रिय व उज्ज्वल स्वरूप होतें तें पुढें राहिलें नाहीं. कदाचित् सर्व हिंदुस्थानभर वसाहती झाल्यानंतर त्यांतील तेजस्वी वृत्ति जाऊन यज्ञ हे परलोकसंबद्ध झाले असावेत. यज्ञक्रिया ही पारलौकिक कल्याणाची अशी समजूत होऊन तिला बुद्धोत्तरकालांत उत्सवाचें स्वरूप आलें. सोमरसप्राशन, ब्राह्मणभोजन, दक्षिणादान व सूतसंस्कृतीची चर्चा या गोष्टी यज्ञोत्सवांत होऊं लागल्या.

**(२५५) जैमिनि व शबर यांच्या कालांतील यज्ञसंस्थाः**—जैमिनिसूत्रावरील भाष्यकार शबर व कुमारिलभट्ट हे बुद्धोत्तर कालांतच झाले. सूत्रकार जैमिनि बुद्धपूर्वकालचे असावेत; पण शबराचार्य, भट्ट कुमारिल, व पार्थसारथिमित्र यांच्या काळीं यज्ञाबद्दल समाजांत फारसा आदर नव्हता. उपनिषदांतील ब्रह्मवेत्त्यांना ते स्वतः वैदिकपरंपरेंतून वाढले होते म्हणून यज्ञकर्माबद्दल फारसा अनादर होता असें नाहीं. पण मोठा उत्साह होता असेंहि नाहीं. बुद्धाच्या एकांतिक शिकवणीनें जगाबद्दल कंटाळा, संसाराबद्दल अप्रीति व संन्यासाबद्दल आवड ही जसजशी वाढली, तसतशी यज्ञावरील श्रद्धा कमी होत गेली. बुद्धाच्या अहिंसावादानें यज्ञसंस्थेवर मोठाच हल्ला केला, व हिंसामय यज्ञ करणें पाप आहे, अशी वृत्ति समाजांत उत्पन्न केली. बुद्धानंतर जे मीमांसक झाले, त्यांनीं बौद्धमताचें खंडण करून वैदिकविधि व यज्ञ यांची पुनश्च स्थापना केली. बौद्ध व वैदिक यांचा हा खंडणमंडणाचा झगडा पांच शतकें चालू होता, तो असाः—

१. वैदिक—गौतमसूत्रभाष्यकार वात्स्यायन यानें चौथ्या शतकांत बौद्धांचें खंडण केलें.

२. बौद्ध—दिङ्नाग यानें पांचव्या शतकांत प्रमाणसमुच्चय ग्रंथ लिहून वात्स्यायनभाष्याचें खंडण केलें.

३. वैदिक—उद्योतकराचार्य यानीं न्यायवार्तिक ग्रंथ लिहून प्रमाणसमुच्चयाचें सातव्या शतकांत खंडण केलें.

४. बौद्ध—धर्मकीर्ति यानें न्यायबिंदु–ग्रंथ लिहिला. सातवें शतक.

५. जैन—समंतभद्र यानें आप्तमीमांसा लिहिली. सातवें शतक.

६. वैदिक—कुमारिलभट्ट यानें तंत्रवार्तिक लिहून सातव्या शतकांत बौद्धांचें खंडण केलें.

७. जैन—अकलंक यानें अष्टशती किंवा अष्टसाहस्री हे टीकाग्रंथ लिहिले. आठवें शतक.

८. वैदिक—शंकराचार्य व सुरेश्वराचार्य यांनीं आठव्या शतकांत भाष्यें व वार्तिकें लिहून बौद्धमत खंडित केलें. यानंतर नवव्या शतकांत बौद्ध धर्मोत्तराचार्य झाले. त्यांचें खंडण भामतीकार वाचस्पतिमिश्र व उदयनाचार्य इत्यादींनीं केलेलें आहे. सांख्यकारिकाकर्ते ईश्वरकृष्ण यांनींहि बौद्ध व जैन या मतांचें खंडण पूर्वीच केलेलें होतें. पंडितांतील खंडणमंडणाचा याहिपेक्षां अधिक तपशीलवार इतिहास देण्याजोगा असला तरी तो अप्रस्तुत आहे. अशोक–मौर्यानंतर शुङ्ग, काण्वायन, गुप्त, शातवाहन, आंध्रभृत्य, अशीं क्षत्रिय सम्राटघराणीं उदयाला आलीं. त्यांपैकीं कित्येकांनीं वैदिक धर्माच्या जयानिमित्त अश्वमेधासारखे यज्ञहि केले; व पंडितांकडून बौद्ध-धर्माचें खंडण करविलें. गुप्तराजांच्या राजवटीमध्यें बौद्धसंस्कृतीचा संकोच बराच झालेला होता. हर्षाच्या राजवटीमध्यें बौद्धधर्माचें वर्चस्व बरेंच कमी होतें. म्हणून कुमारिलभट्टांनीं जर विशेष कांहीं केलें असेल तर बौद्धांनीं त्याज्य ठरविलेल्या आखिल कर्मकलापाचें पुनरुज्जीवन करून वेदांचें व वैदिक-विधींचें महत्त्व वाढविलें असें म्हणतां येतें.

(२५६) **कुमारिलाचें कार्यः**—धर्म म्हटला कीं, आचार आणि तत्त्व-ज्ञान अशीं त्याचीं दोन प्रमुख अंगें असतात. कुमारिलभट्टांनीं वैदिक-धर्माच्या या आचारअंगाचें म्ह. विधीचें संस्थापन केलें. आचार हा धर्माचा आत्मा आहे व विचार हा त्या आचाराला पोषक आहे. आचार गतिमान व कार्यकारी, तर विचार स्थितिमान व बेठा आहे. आचारांत विचारांची प्रत्यक्ष फलसिद्धि आहे आणि विचारांत आचारांना सुफलित करण्याचें सामर्थ्य आहे. म्हणून वैदिक धर्मांत आचार व विचार यांची उत्तम सांगड घालण्यांत आली असून, आचाराचें महत्त्व वाढविलें आहे. भट्ट कुमारिलांनीं या वैदिक विधीवर म्हणजे आचारावर फार जोर देऊन

वैदिक धर्माचा पाया बसविण्याचा यत्न केला. भट्ट कुमारिलांचे प्रसंग-प्राप्त म्हणून येथें थोडें चरित्र सांगतों. भट्ट कुमारिल हे आंध्र देशांत जन्मले. तैत्तिरीय यजुर्वेदी शाखेचे हे तलंगी ब्राह्मण ६३ वर्षे जगले. श्रीशंकराचार्यांनीं वयाच्या पंधराव्या वर्षी कुमारिलाची भेट त्यांच्या देहाव-सानसमयीं घेतली. बौद्धादिकांनीं प्रवर्तविलेलें वेदविरुद्ध मत व अन्य पाखंडमतें यांचे उच्छेदार्थ त्यांचा अवतार झाला, असें अनेक ग्रंथांत म्हटलें आहे. हे महावादी व मोठे पंडित होते म्हणून वादांत यांच्यापुढें कोणी टिकत नसे. जैनमत–भंजन हा ग्रंथ त्यांनीं लिहिल्यामुळें जैन ग्रंथांत त्यांच्याविषयीं ' महान् वादी महान् घोरः श्रुतीनां चाभिमानवान् । जिनानामंतकः साक्षात्...' असें म्हटलें आहे. वेदान्त न मानणें, ईश्वर न मानणें, यज्ञाचा उच्छेद करणें, हें जें वातावरण त्या कालीं उत्पन्न झालें होतें, तें सर्व कुमारिलांनीं बदलून लोकांमध्यें वैदिक धर्माबद्दल श्रद्धा उत्पन्न केली. जैन व बौद्ध यांच्याशीं वाद करून त्यांना जिंकलें. ' जिनानां येन साधूनां कृतं कंदनमद्भुतम् ' असें जैनांनींच म्हटलें आहे ! ' कुमारीलमृगें-द्रेण हतेषु जिनहस्तिषु । निष्प्रत्यूहमवर्धंत श्रुतिशाखाः समंततः ' म्हणजे जैनांना ह्या मृगेंद्रानें जिंकल्यावर श्रुतिशाखांचा चोहोंकडे प्रसार झाला असें शांकरविजयांत म्हटलें आहे. कुमारिलांना अनेक भाषा येत होत्या. बुद्ध-धर्माचा अभ्यास बौद्ध भिक्षूपाशीं व जैनधर्माचा अभ्यास जैनपंडितापाशीं त्यांनीं केला होता. त्यांनीं वैदिक धर्माचें व वैदिक आचारांचें पुनरु-ज्जीवन केलें.

(२५७) **मीमांसक व वर्णाश्रमधर्मः**–मीमांसक हे वर्णाश्रमाचे कट्टे पुरस्कर्ते होते. समाजरक्षणार्थ गृहस्थाश्रम या संस्थेचें त्यांना महत्त्व पटलेलें होतें. चार आश्रमांपैकीं बुद्धानें अत्याश्रमाला म्हणजे शेवटच्या आश्रमालाच महत्त्व दिलें व त्यामुळें सर्व प्रकारच्या कर्मांना त्यानें त्याज्य ठरविलें, हें शल्य मीमांसकांना काढावयाचें होतें. सनातन वैदिक परंपरे-मध्यें समाजरक्षणार्थ वर्णाश्रमधर्म सांगितला आहे. चार आश्रमांपैकीं पहिले दोन आश्रम महत्त्वाचे आहेत. ब्रह्मचर्याश्रमांत ज्ञान, तप व तेज हीं वाढ-तात. गृहस्थाश्रमांत त्यांच्या साह्यानें यज्ञ व दान हीं उत्तम साधून व्यष्टीचें व समष्टीचें हित साधतें. पहिले दोन आश्रम कर्माला प्राधान्य देणारे

आहेत. कारण लोकसंग्रहात्मक कर्माचरण पहिल्या दोन आश्रमांतच सिद्धीस जातें. वानप्रस्थ व संन्यास हे दोन आश्रम शांकरतत्त्वज्ञानास अनुसरल्यास कर्मसंन्यासाला प्राधान्य देतात. कारण संन्यास हा आत्ममोक्षाकरतां आहे, तो वैयक्तिक निःश्रेयसाकरितां आहे म्हणून त्याची पूर्वतयारी वानप्रस्थांत करावी लागते. लोकसंग्रह कर्तव्य असल्यास पहिल्या दोन आश्रमांत तो केला पाहिजे. कारण कर्म हें मुख्यतः लोकसंग्रहार्थ आहे व जगद्धारणार्थ आहे. व्यष्टीचें व समष्टीचें संरक्षण ब्रह्मचर्य व गार्हस्थ्य या दोन आश्रमांतच करतां येतें. या दोहोंमध्यें पुन्हां गृहस्थाश्रम हा ज्येष्ठ व श्रेष्ठ आहे. तो अग्निसेवा, धर्मसेवा, लोकसेवा व लोकसंग्रह यांचें साधन आहे. याच आश्रमामध्यें प्रजासातत्य, ज्ञानसातत्य व तेजसातत्य रक्षिलें जातें. जन्मलेल्या मनुष्याला तीन ऋणें फेडावयाचीं असतात. प्रजासातत्यानें पितरांचें ऋण, अध्ययनानें ऋषींचें ऋण व यज्ञानें देवांचें ऋण हीं गृहस्थाश्रमांतच फेडतां येतात. वेदांचा तर सर्व कटाक्ष ब्रह्मचर्याश्रमांत ज्ञानार्जन करून नंतर गृहस्थाश्रमांत ऋणत्रयांच्या अपाकरणाकडे आहे. यावरून वेदाला कायमचें ब्रह्मचारित्व मान्य नाहीं, हें उघड आहे. यदाकदाचित् एखादा मनुष्य आजन्म अविवाहित राहिला व त्याजकडून अग्नि, लोक व धर्म यांची सेवा कोणत्या तरी स्वरूपांत होत असली, तर तो ब्रह्मचर्याश्रम फारसा दोषार्ह नाहीं. जितेंद्रिय हनुमान, राजर्षि भीष्म, समर्थ रामदास व दत्तात्रेय अवधूत यांसारखे लोकसंग्रही ब्रह्मचारी वेदाच्या रोषास पात्र होणार नाहींत. पण ब्रह्मचर्याश्रमांतून एकदम संन्यास घेण्याची अनुज्ञा वर्णाश्रमधर्मांत नाहीं. संन्यास घ्यावयाचा असेल तर तो क्रमानेंच घ्यावा, मधले दोन आश्रम लाथाडून घेऊं नये, अशी वैदिक धर्माची आज्ञा आहे. कारण हा संन्यास लोकसंग्रहास विघातक आहे. संन्यास हें मोक्षाचें साधन आहे. लोकसंग्रहाकरतां जगत्चक्र चालविण्याकरतां संन्यासाश्रमाची जरूर नाहीं. कर्माची यातायात नको असेल तर संन्यास घ्यावा. कर्म हें लोकसंग्रहार्थ सांगितलें असल्यामुळें वर्णाश्रमव्यवस्थेंत पहिल्या दोन कर्मप्रधान आश्रमांचें महत्त्व अधिक आहे. समाजधारणेच्या दृष्टीनें पाहिलें तर गृहस्थाश्रमी लोकसंग्रही पुरुषांचीच योग्यता अधिक आहे. जगतांत खरे लोकसंग्रही गृहस्थाश्रमी धर्मसंस्थापक श्रीराम व श्रीकृष्ण हे होत. ते संन्यासी नव्हते किंवा वानप्रस्थीहि नव्हते, तर यथासांग ब्रह्मचर्याश्रम संपादिल्यावर यथाशास्त्र गृहस्थाश्रम स्वीकारून युक्त कर्माचरण

करणारे महान् कर्मयोगी होते. क्षत्रियांना कर्मांची यातायात चुकविण्याकरितां गृहस्थाश्रमानंतर वानप्रस्थाश्रम सांगितला आहे व ब्राह्मणांना त्याहि पलीकडचा संन्यास विहित आहे. क्षत्रियांतील महान् ज्ञानी जनक राजा हा मुक्त होता, पण संन्यासी नव्हता. ज्ञानी क्षत्रियांचा जनक हा जसा आदर्श आहे, तसा ज्ञानी वैदिक ब्राह्मणांचा आदर्श याज्ञवल्क्य आहे. योगीश्वर याज्ञवल्क्य हा सर्वज्ञ मुनि व खरा वैदिक होता. हा महामुनि स्मृतिकारच होता असें नाहीं, तर याचें सामर्थ्य नवीन वेदरचना करण्याजोगें होतें, म्हणून यास श्रुतर्षि असें म्हटलें आहे. हा वेद व वेदान्त यांत पारंगत होता व धर्माचें सूक्ष्म रहस्य जाणणारा होता. हा जसा ज्ञानसंपन्न होता तसा क्रियासंपन्नहि होता. प्रथम तीन आश्रमांचें संगोपन करून पूर्वजांच्या ऋणाचें अपाकरण करून शेवटीं आपल्या स्त्रियांना आत्मज्ञानाचा उपदेश करून हा अत्याश्रमी झाला. सारांश वेदानें आज्ञापिलेलीं तीन ऋणें फेडून, समाजाचें अनृणी होऊन, संन्यास घेणें हें वर्णाश्रमविहित आहे यांत संशय नाहीं. मनुस्मृतीमध्यें असें स्पष्ट म्हटलेलें आहे कीं, तीन ऋणें न फेडतां जो एकदम संन्यासाचा स्वीकार करतो तो अधोगतीला जातो.

अधीत्य विधिवद्वेदान् पुत्रांश्चोत्पाद्य धर्मतः ।
इष्ट्वा च शक्तितो यज्ञैर्मनो मोक्षे निवेशयेत् ॥३६॥
अनधीत्य द्विजो वेदाननुत्पाद्य तथा सुतान् ।
अनिष्ट्वा चैव यज्ञैश्च मोक्षमिच्छन् व्रजत्यधः ॥३७॥

–मनु अ. ६

वैदिक वर्णाश्रमधर्माप्रमाणें या परंपरनें वागलें पाहिजे. चार आश्रमांपैकीं पहिले तीन इतरांकरितां असून चौथा फक्त ब्राह्मणांना सांगितला आहे. हा अत्याश्रम सर्व आश्रमांपलीकडचा असून त्यांत भैक्ष्यचर्यानें राहावें असा संन्यासी परिव्राटांना किंवा हंसपरमहंसांना आदेश दिला आहे. केवळ भिक्षावृत्तीवर चालणारा हा संन्यास ब्राह्मणालाच विहित आहे; क्षत्रिय व वैश्यांना नाहीं. क्षत्रिय, वैश्य हे तीन आश्रमांतच पूर्णत्वाला जातात, याचें प्रसिद्ध उदाहरण जनकाचें किंवा धृतराष्ट्राचें आहे.

**(२५८) वैदिक विधि व अपूर्वः**—बुद्धानें अखिल कर्मकलाप त्याज्य ठरविला. त्यांतील वैदिक कर्मांचें पुनरुज्जीवन भट्ट कुमारिलानें केलें. पण मीमांसकांनीं वैदिक विधीचें मंडण करतांना बुद्धाचें शून्य निर्वाण मारण्याकरितां एक अपूर्व पुढें आणलें. चूळ भरणें, शौच, मुखमार्जन, स्नान करणें, अशा नित्य सहज कर्मांपासून तो वैदिक यज्ञकर्मापर्यंत सर्वांना त्यांनीं अपूर्वानें इतकें जखडून टाकलें कीं सर्व कर्में अपूर्वोत्पत्तीकरितां केलीं पाहिजेत, असा मीमांसकांनीं सिद्धांत स्थापन केला. 'भस्मना कांस्यपात्रं शुध्यति' या विधायक वाक्याचें स्वरूप भस्मानेंच काशाच्या भांड्याची शुद्धि होते, दुसऱ्या कशानेंहि भांडें शुद्ध होत नाहीं व ही शुद्धि अपूर्वाकरितां आहे अशी परिभाषा त्यांनीं सुरू केली. वैदिक कर्म हें वेदांत सांगितलें आहे, म्हणून तें जसेंच्या तसें चर्चा, वाटाघाट, चिकित्सा न करतां केलें पाहिजे. कारण श्रुतीची कर्माबद्दलची आज्ञा निर्हेतुक असते. वैदिक सर्व कर्में अपूर्वोत्पत्तीकरितां केलीं पाहिजेत. त्यापासून ऐहिक फल नसलें तरी स्वर्गप्राप्ति हें फल आहे, असा सिद्धांत मीमांसकांनीं स्थापन केला.

**(२५९) मीमांसकांचा पारलौकिक अभ्युदयः**—मीमांसकांनीं संन्यास सांगितला नाहीं, जग मिथ्या म्हटलें नाहीं व गृहस्थाश्रम सोडला नाहीं. पण या गृहस्थाश्रमी कर्मवाद्यांचें सर्व लक्ष अपूर्वाकडे होतें. अतएव जगाच्या दृष्टीनें ऐहिक अभ्युदयाला अनुकूल असें कार्य त्यांच्याकडून कांहीं घडलें नाहीं. मीमांसकांना स्वर्गरूपानें अभ्युदय पाहिजे होता. त्यांना सुखें पाहिजे होतीं. "सुखविशेषः स्वर्गः" ही मीमांसकांची मूळ शास्त्रीय कल्पना होती. स्वर्ग म्हणजे सुखविशिष्ट असा एक मानीव लोक आहे. स्वर्गांतील कामधेनु, तेथील चिंतामणि, तेथील उर्वशी, हीं सर्व मिळावींत ही कल्पना मीमांसकांची नसून ती पौराणिकांची आहे. पुत्र, द्रव्य, उपभोग, किंवा जें कांहीं पाहिजे असेल तें सर्व यज्ञानें मिळतें, म्हणून विविध यज्ञ केले पाहिजेत अशा तत्त्वज्ञानामुळें यांचा उपदेशहि एकदेशी झाला. ऐहिक पुरुषार्थाकरितां जागतिक स्पर्धेत धडाडीनें पडलें पाहिजे, असें कांहीं मीमांसकांनीं म्हटलें नाहीं. तर सर्व ऐहिक व पारलौलिक आकांक्षा यज्ञानें व इतर वैदिक विधींनींच सफल होतात, असें त्यांनीं सांगितलें. बुद्धापासून शंकराचार्यापर्यंतच्या कालांत बरेच यज्ञ झाले व कांहीं अश्वमेधहि झाले.

पण त्यांतील प्रायश्चित्तें, त्यांतील कर्मांचा खटाटोप, त्याकरितां होणारा खर्च, त्याला आलेलें उत्सवाचें स्वरूप आणि यज्ञामुळें मिळणाऱ्या अपूर्वाबद्दलचा संशय इत्यादि कारणांनीं ते पुढें लोकांना नकोसे झाले.

(२६०) **आंधळें अपूर्व व श्रीशंकराचार्यः**—बुद्धाचें शून्य निर्वाण जसें आंधळें तसें मीमांसकांचें अपूर्वहि एका दृष्टीनें आंधळेंच होतें. बुद्ध-निर्वाणाला मारण्याकरितां त्यांनीं अपूर्व पुढें आणलें पण अद्वैताच्या तत्त्वज्ञानापुढें तें टिकलें नाहीं. तत्त्वज्ञानाच्या क्षेत्रांत आद्य शंकराचार्या-एवढा जगन्मान्य ज्ञाता अद्याप झालेला नाहीं. म्हणून त्या दृष्टीनें आचा-र्यांचें भरीव कार्य जसें सर्व जगांत ठसठशीतपणें दिसतें, तसें मीमांसकांचें दिसत नाहीं. याचें कारण आचार्यांच्या ब्रह्मज्ञानापुढें मीमांसकांचें अपूर्व फिकें पडलें हें होय. मीमांसकांचा अभ्युदय म्हणजे स्वर्ग, अपूर्व म्हणजे स्वर्गसाधन. तो स्वर्गहि काल्पनिक सुखाचा व त्यापलीकडे काय ? याला उत्तर नाहींच. म्हणून वैदिक कर्मांचा चित्तशुद्धीशीं आचार्यांनीं संबंध जोडला व तोच पुढें मान्यहि झाला. कोणतेंहि वैदिक कर्म चित्तशुद्धीला कारणीभूत होतें असा समन्वय आचार्यांनीं केला. मीमांसक हे कर्मयोगी नव्हते तर ते कर्मवादी होते. म्हणूनच त्यांनीं जगाकडे दुर्लक्ष केलें. जगांतील ऐहिक व्यवहाराबद्दल मीमांसक कांहीं बोलले नाहींत म्हणून त्यांच्या अपूर्वाचें पर्यवसान शेवटीं कर्मठपणांत झालें. उपनिषदांतील तत्त्वज्ञान व स्मृतींतील गृह्यकर्में एवढ्यांतच ब्राह्मणसमाज बुद्धोत्तरकालांत गुरफटला गेला होता हें वर म्हटलेंच आहे. आचार्यांच्या वेदांतकेसरीनें मीमांसकांच्या अपूर्वाची दाणादाण उडवून दिल्यामुळें त्यांच्या पश्चात् तत्त्वज्ञानाचा एवढा प्रखर संस्कार झाला कीं तो पुढें रामानुजांच्या कालापर्यंत कुणालाहि पुसतां आला नाहीं. इसवी सनाच्या नवव्या शतकापासून तों आकराव्या शतका-पर्यंत जे धर्मनिबंधकार झाले, त्यांनीं आचार्यांच्या तत्त्वज्ञानास मान देऊन, श्रौत स्मार्त कर्मांचा विचार स्मृतिवाक्यसमन्वयदृष्टीनें आपापल्या ग्रंथांत केला आहे. रामानुज, मध्व इत्यादि आचार्यांनीं मिथ्यावादी संन्यासमार्गीय शांकरतत्त्वज्ञानाला विरोध करून ज्ञानोत्तर लोकसंग्रहकारक कर्मयोगाचा प्रचार पुष्कळ केला पण मायावादाच्या मोहिनीनें समाज इतका भारला होता कीं, त्या मायावादाची पकड शिथिल करणें हें महत्प्रयासाचेंच झालें.

(२६१) **धर्मशास्त्राचें प्रयोजनः**—समाजामध्यें जें नैसर्गिक वैषम्य असतें त्याचा दोष कोणावरच नाहीं. पण मानवकृत कृत्रिम वैषम्य हें मात्र सर्व ठिकाणीं नडतें. धर्मशास्त्र हें लोकव्यवहारव्यवस्थेकरितां आहे म्हणून धर्मशास्त्रानें कृत्रिम वैषम्य उत्पन्न न होईल आणि समाजाचें समदृष्टीनें धारण व पोषण होईल असें धोरण ठेवावयास पाहिजे. तें धोरण ध्यानीं न आल्यामुळें जातिद्वेषरूप दावानलामध्यें हिंदुसमाज होरपळून निघाला. बुद्धि, धुरंधरत्व, शक्ति, असल्या त्याच्या ठिकाणीं असलेल्या बहुमोल गुणांची राखरांगोळी झाली. अमुक देशांत जाऊं नये, अमुक भाषा बोलूं नये, अमुक भाषा शिकूं नये, अमक्याशीं बोलूं नये असले वरवर अनैसर्गिक व आत्मघातकी वाटणारे नियम धर्मशास्त्रानें कां घातले याचें रहस्य विचारांत न घेतां व्यक्तिमात्राला याच जन्मीं सर्वांगीण उन्नतीकरितां स्वेच्छा व स्वशक्ति यांना अनुसरून यत्न करण्याचा अधिकार धर्मशास्त्रानें द्यावयास हवा होता असें कांहीं लोक म्हणूं लागले. दैवी संपत्तीनें युक्त होऊन असुरी संपत्तीवर विजय मिळवून पारमार्थिक ध्येयाकडे दृष्टि ठेवून देशकालपरिस्थिति पहात सरळ मार्गानें आपलें कार्य अव्याहत करणें व मध्यें कांहीं अडथळे आल्यास तेवढ्यापुरतें वळणें देतदेत जावयाचें धोरण मूल धर्मशास्त्रकारांचें होतें. पण उत्तर कालांत तें धोरण सुटल्यासारखें वाटूं लागलें.

धर्मशास्त्राचीच दृष्टि केवळ जन्मांतरांतील सौख्यावर, स्वर्गांतील नंदनवनें, विमानें, अप्सरा, अमृत यांवर खिळून राहिल्यानें ऐहिक व्यवहाराची व्यवस्था लावण्याकडे लक्ष देणारे लोक धर्मनिष्ठांचे यादींतून गळूं लागले आणि हिणकस ठरूं लागले. त्याचा परिणाम उदयाला येत असलेल्या अनेक शास्त्रांवरहि झाला. ज्या शास्त्राचा संबंध धर्मांशीं आणि धर्मद्वारां परलोकांशीं फारसा नाहीं त्या व्यवहारोपयुक्त शास्त्रांकडे भारतीयपंडितांचें पूर्ण दुर्लक्ष झालें. धर्मशास्त्राच्या मूलभूत ग्रंथाच्या अपौरुषेयत्ववादानें हिंदुसमाजाची जिज्ञासा मारली. धर्मशास्त्रावर म्हणजे वैदिक व वेदानुसारी धर्मशास्त्रीय विधानांवर हेतुवाद करावयाचा नाहीं. अमुक असें कां ? हा प्रश्न करावयाचा नाहीं. तसा तो कोणी केला कीं त्याला नरकपात ठरलेला अशी समजूत पंडितांचीसुद्धां झाल्यामुळें जिज्ञासा मरणाच्या पंथाला लागली. आणि जिज्ञासाच मुमुर्षु झाल्यामुळें सगळींच व्यवहारोपयुक्त शास्त्रें उपेक्षिलीं गेलीं.

धर्माचा संबंध अपूर्वद्वारां सर्वथा परलोकाशीं आहे. तो साध्यसाधन भाव प्रत्यक्षानें किंवा अनुमानानें कळत नाहीं असा सिद्धांत मांडला गेला. ज्यांत त्यांत अपूर्व येऊन बसलें. दंतधावन, मूत्रपुरीषोत्सर्ग, स्नान यांतहि विधियुक्त अपूर्व आलें. तात्पर्य अपूर्वाचें आंधळें साम्राज्य सर्वत्र झालें.

धर्माचीं प्रमाणें श्रुति-स्मृति! धर्माच्या विषयांत पुरुषबुद्धीचा प्रवेश सर्वथा अशक्य! निषादपंचम चार वर्ण व संकरजन्य सर्व जाति या अनादिसिद्ध, पूर्वकर्मजन्य आणि उच्चनीच भावांशीं धर्मशास्त्रानेंच निगडित आहेत. दैवायत्तं कुले जन्म, असा शास्त्रसिद्धांत. वर्णाश्रमधर्म हे श्रुति-स्मृतिसिद्ध आहेत. वर्णाश्रमधर्मांच्या दृढाचरणानेंच सर्व कल्याणप्राप्ति आणि सर्वारिष्टपरिहार होतो. आपत्काल आणि अडचणी यांचें परिगणन धर्मशास्त्रांतच आहे, आणि त्यावर उपायही धर्मशास्त्रांतच आहे. नवीन अडचण उपस्थित होणें शक्य नाहीं.

धर्मनिष्ठ मनुष्यच समाजांत ज्येष्ठ श्रेष्ठ. पण धर्मनिष्ठ म्हणजे परलोक-निष्ठ, उलट इहलोकनिष्ठ तो परलोकनिष्ठ नव्हे व धर्मनिष्ठ नव्हे! ज्येष्ठ, श्रेष्ठहि नव्हे! अर्थ-काम-शास्त्रांपेक्षां धर्मशास्त्र बलिष्ठ. ‘ अर्थशास्त्रात्तु बलवत् धर्मशास्त्रमिति स्थितिः ’ आर्यचाणक्यानें ‘ धर्मशास्त्रापेक्षां अर्थशास्त्र बलिष्ठ,’ असा सिद्धांत केला, त्यामुळें त्याचें शास्त्र तामस ठरून नरकगामी ठरलें. तें शास्त्र विद्वानांमध्यें राजकारणाकरतां सातत्यानें असतें तर त्याचा प्रभाव आजपर्यंतच्या काळांत कांहीं निराळा दिसला असता. पण तें धूळ खात बाजूला पडलें.

**(२६२) धर्मनिबंधकारांचा परिस्थितिनिरपेक्ष विचारः**- नवव्या शतकापासून सोळाव्या शतकापर्यंत जे महानिबंधकार झाले, ते सर्व मोठे पंडित होते, कर्मवादी होते व मीमांसकांच्या पद्धतीनें धर्मशास्त्राचा विचार करणारे होते. पण त्यांच्या कर्माचें पर्यवसान चित्तशुद्धि व अपूर्व यांकडे झाल्यामुळें जगाच्या दृष्टीनें त्या परिस्थितींत असलेल्या समाजहिताचा विचार त्यांच्या ग्रंथांत आलेला नाहीं. ज्या पंडितांनीं हे ग्रंथ समाजाकरितां लिहिले त्यांनीं समाजाची स्थिति काय आहे, त्यानें काय केलें पाहिजे, कसें जगलें पाहिजे याचा विचार केलेला दिसत नाहीं! समाजाची परीक्षा नव्हती

म्हणून परिस्थिति व तदनुसार समन्वय असा संबंध यांच्या ग्रंथांत आढळत नाहीं. पंडितांनीं हे ग्रंथ अपौरुषेयप्रमाणांच्या आधारांनीं मीमांसापरिपाटीनें वाक्यांचा अर्थ लावून लिहिले. पंडितांच्या या ग्रंथांत आचारधर्म व प्रायश्चित्तधर्म जो आला आहे, तो परिस्थिति-निरपेक्ष आहे, असें म्हणावें लागतें. कारण अनेक पंथ, अनेक भाषा व अनेकजातिविशिष्ट हिंदुसमाजावर त्यावेळीं जे आघात होत होते त्यांच्या प्रति-काराचा विचार या ग्रंथांत मुळींच सांगितलेला नाहीं. चातुर्वर्ण्याला लागलेली कीड, आचारविचारांमध्यें झालेले फेरबदल व इतर उलाढाली यांचें आकलन जर या पंडितांना असतें, तर त्यांनीं तत्कालीन समाजाच्या जीवनाला उपयुक्त असे जिवंत विचार आपल्या ग्रंथांत सांगितले असते. याच कालांत न्याय, व्याकरण, वेदांत, इत्यादि शास्त्रांमध्यें जगाला थक्क करून सोडणारे पांडित्य-प्रचुर ग्रंथ झाले, कांहीं भाष्यें झालीं व मोठमोठ्या टीकाहि झाल्या. हें सर्व वाङ्मय संस्कृतांत झालें. यावरून तें सामान्य जनांकरतां नव्हतें हें सिद्धच आहे. तसेंच या वाङ्मयांत तत्कालीन परिस्थितीचा मुळींच विचार नसल्यामुळें तें वाङ्मय समाजाच्या अभ्युदय–निरपेक्ष होतें, हेंहि सिद्ध आहे. न्याय-व्याकरणादि शास्त्रांत ज्यांनीं अकल्पनीय प्रगति दाखविली, ते ज्ञानाच्या एकेका शाखेंत पूर्ण निमग्न झाले म्हणून त्यांनीं समाजाविषयीं मुग्धता स्वीकारली हें म्हणणें कदाचित् कसेंबसें सयुक्तिक होईल. पण ज्यांचा विषय म्हटला म्हणजे आचार, विचार, प्रायश्चित्त व जो विषयहि समाजसंबद्ध आणि लोकसंबद्ध, त्या पंडितांनीं तरी ज्यांना आपण आचारविचारादि सांगतों त्यांची स्थिति काय आहे हें लक्षांत घ्यावयास नको काय? जरा धाष्ट्यांचा दोष पत्करून आम्ही असें म्हणतों कीं त्यांची दृष्टीच परिस्थितीकडे नव्हती तर ती धर्मानुष्ठानजन्य अपूर्वा-कडे होती. पंडितांनीं परिस्थितीकडे कसें दुर्लक्ष केलें याची सहज कल्पना यावी म्हणून ग्रंथकार, त्याचें स्थान, त्याचा काल व त्याचा ग्रंथ यांची यादी देतों.

| ग्रंथकार | स्थान | काल इ. स. | ग्रंथ |
|---|---|---|---|
| मेधातिथि | मिथिला | ९०० | मेधातिथि भाष्य |
| कुल्लुकभट्ट | काशी | १००० | मन्वर्थ मुक्तावलि |
| विज्ञानेश्वर | कल्याणबेदर | ११०० | मिताक्षरा |
| लक्ष्मीधर | कनोज | ११४३ | स्मृतिकल्पतरु |

| ग्रंथकार | स्थान | काल इ. स. | ग्रंथ |
|---|---|---|---|
| हलायुध | बंगाल | १२०० | ब्राह्मणसर्वस्व |
| देवण्णभट्ट | दक्षिण हिंदुस्थान | १२०० | स्मृतिचंद्रिका |
| हेमाद्रि | देवगिरी | १२६०,१३०९ | चतुर्वर्गचिंतामणि |
| वीरमित्रोदय | मिथिला | १३०० | वीरमित्रोदय |
| माधवाचार्य | विजयानगर | १४०० | पराशरमाधव |
| अपरार्क | काश्मीर | १४०० | अपरार्क |
| चंडेश्वर | बंगाल | १४०० | स्मृतिरत्नाकर |
| जीमूतवाहन | बंगाल | १४०० | धर्मरत्न |
| रघुनंदन | बंगाल | १६०० | स्मृतितत्त्व |
| कमलाकर | काशी | १६०० | निर्णयसिंधु |
| नीलकंठ | काशी | १६११ | भगवंतभास्कर द्वादशमयूख. |

(२६३) **धर्मनिबंधांचें स्वरूपः**–मेधातिथीचा ग्रंथ विद्वत्तेच्या दृष्टीनें भाष्यासारखा आहे. विज्ञानेश्वराची मिताक्षरा महाराष्ट्रांत हिंदु कायद्याच्या क्षेत्रांत अत्यंत महत्त्वाची आहे. चतुर्वर्ग–चिंतामणीमध्यें हेमाद्रीनें दान, तीर्थ, मोक्ष अशा विषयांचीं वचनें संग्रहित केलीं आहेत. कुल्लुकभट्टांची मनुस्मृतीवरील टीका सुबोध व सुटसुटीत आहे. माधवाचार्यांचा पराशरमाधव हा ग्रंथ मोठा पांडित्यप्रचुर असून या टीकेमुळेंच पराशरस्मृतीला महत्त्व आलेलें आहे. पराशरस्मृतीपेक्षां या ग्रंथाची योग्यता अधिक मानतात. वीरमित्रोदय ग्रंथ ज्ञानकोशासारखा असून त्यांत कायद्याखेरीज ज्योतिष, वैद्यक, भक्ति, मोक्ष हे विषय आले आहेत. वीरमित्रोदयकार स्त्रियांना वारसा अधिक असावा, असें म्हणणाऱ्या जीमूतवाहनाचें खंडण करितो. कोंकणप्रांतांत नीलकंठाच्या व्यवहारमयूखाला मान आहे. जीमूतवाहनाला बंगाल्यांत फार मान आहे. कारण स्त्रियांना दायभाग देण्यास सांगणारा हा एकच ग्रंथकार आहे. बंगाल्यांत हा ग्रंथ प्रमाण मानतात. रघुनंदनाच्या स्मृतितत्त्वांमध्यें वारसा व दिव्य हीं प्रकरणें आहेत. निर्णयसिंधु व धर्मसिंधु हे ग्रंथ हल्लीं सर्वपरिचित आहेत. सामान्यतः या ग्रंथाचा स्वरूपादर्श वर सांगितल्याप्रमाणें आहे.

दुर्दैवानें मुसलमानांच्या स्वाऱ्यांचा काळ व या धर्मनिबंधकारांचा काळ काकतालीय न्यायानें एकच आला आहे. ज्या वेळीं मुसलमानांचें लक्ष्य हिंदुसमाजाच्या अतिरिक्त सद्‌गुणांचा फायदा घेण्यांत गुंतलें होतें व हिंदुसमाजाचीं वर्में पाहून त्यांवर आघात कसे करावेत याकडे वेधलें होतें त्यावेळीं आमचे भाष्यकार व महानिबंधकार तत्त्वविचारावर मोठमोठीं भाष्यें व आचारधर्मावर मोठमोठे ग्रंथ लिहीत होते. * श्रीशंकराचार्य यांचें कार्यक्षेत्र व महंमद कासीमच्या जुलमाचें क्षेत्र उत्तरेंतच असतां शंकराचार्य महंमद कासीमनें केलेल्या अधर्माबद्दल आपल्या ग्रंथांत अवाक्षरहि लिहीत नाहींत. त्यानें सिंधपासून काश्मिरापर्यंत उडवून दिलेला हाहाःकार आचार्यांना अज्ञात होता हें असंभवनीय दिसतें. मेधातिथीच्या प्रचंड भाष्यांत

---

* टीपः—या काळांत ब्राह्मणक्षत्रियांची बुद्धिमत्ता अलंकारशास्त्रांत गुंतली होती व तिनें युद्धाच्या शस्त्रोपयोगी विद्येकडे दुर्लक्ष्य केलें होतें. संभोगविप्रलंभशृंगारांतील नायिकांचे बारीक भेद व काव्याचे रसादि गुण यांच्या छाननीकडे व भाषेच्या सौंदर्याकडे देशांतील उत्तम बुद्धीचें लक्ष लागलें होतें. किंबहुना राजेहि काव्य व नाट्यशास्त्रावर विद्वत्तापूर्ण ग्रंथ लिहिण्याकडे वेळ देत असत. राजांची दृष्टि व संपत्ति सेनापतीपेक्षां राजकवीकडे जास्त वळे आणि सैन्यभूमीपेक्षां रंगभूमि ही राजाला अधिक गुंगवी. अलंकारशास्त्राचा सूक्ष्म अभ्यास, जनरुचि व नीति बदलविण्यास कारणीभूत झाला. तो राजशेखराच्या कर्पूरमंजिरीपासून तों नयनचंद्रसूरीच्या रंभामंजरीपर्यंत शृंगाररसाच्या वाढत्या लोंढ्यांत सारखाच दृष्टीस पडतो. लोकांची अभिरुचि किती बिघडली होती हें नियमयुक्त ब्राह्मणांस दिलेल्या दानपत्रांवरून दिसून येईल. कनोजच्या लेखाच्या आरंभीं दानपत्रावरसुद्धां शृंगारयुक्त श्लोक लिहीत असत. काव्यें, नाटकें, चंपू यांमध्येंच ब्राह्मण पंडितांची बुद्धि गुरफटलेली होती. जे याच्याबाहेर येत त्यांना तत्त्वज्ञानाच्या पलीकडे कांहीं दिसत नसे व ते टीकांवर टीका व भाष्यांवर भाष्यें लिहून आपलें पांडित्य दाखवून कालक्रमणा करीत असत. मुसलमानांची बुद्धि शस्त्रास्त्रांच्या जोरावर हिंदूंना पादाक्रांत कसें करावें यांत वेधली होती तर हिंदूंतील बुद्धिमानांचीं डोकीं वरील विषयांत रंगलीं होतीं हें पाहून विषाद वाटतो.

बलात्कारानें भ्रष्ट केलेल्या स्त्रीपुरुषांच्या शुद्धीचा विचार येणें ओघप्राप्त होतें, पण तो मुळींच नाहीं. मेधातिथि हे महंमद कासीमनंतर १०० वर्षांनीं झाले. तेव्हां त्यांना १०० वर्षांपूर्वी झालेल्या उत्पातानें केलेले अनर्थ माहीत नव्हते असें कसें म्हणतां येईल ? विजयानगरचें राज्य चालविणारे प्रधान माधवाचार्य यांच्या पराशरस्मृतीवरील टीकाग्रंथांत किंवा इतरत्र कोठें तरी थोडाबहुत तरी परिस्थितीचा विचार यावयास पाहिजे होता. कारण मुसलमानांशीं झगडतांना हिंदुसमाजाच्या कोणत्या धार्मिक समजुती आड येत असत यांचा अनुभव त्यांना होता. अहिंसेच्या एकांतिक व खुळचट कल्पना माधवाचार्यकालीन समाजामध्यें होत्या, पण त्या कशा चुकीच्या आहेत याचें विशदीकरण त्यांच्या ग्रंथांत ओघानें कोठें तरी यावयास पाहिजे होतें, पण तेंहि आमच्या दुर्दैवानें आलें नाहीं. माधवाचार्यांनीं वेदभाष्य हा ग्रंथ सायणाकडून लिहविला. सायण हा नुसता पंडित होता असा एक समज आहे. तो खरा असल्यास सायणपंडिताच्या ग्रंथांत परिस्थिति आली नाहीं हें ठीकच झालें ! पंडित व परिस्थिति यांचें विळ्याभोपळ्याइतकें सख्य आज मितीपर्यंत कायम आहे ! कारण पूर्वपंडितांनीं जसें परिस्थितिनिरपेक्ष अध्ययन केलें, तसेंच यांनींहि केलेलें आहे. धर्माचा विचार करितांना परिस्थिति मुळींच लक्षांत घ्यावयाची नाहीं अशी यांनीं शपथच घेतलेली असते. साधारणतः विचारी मनुष्याला असें वाटतें कीं मन्वादि स्मृतिकार हे भिन्न भिन्न काळीं झाले व त्यांनीं आपल्या कालच्या परिस्थितीप्रमाणें धर्माधर्मप्रवचन केलें. परंतु ही साधी गोष्ट पंडितांच्या लक्षांत येत नाहीं किंवा बुद्ध्या ते याकडे दुर्लक्ष करितात असें म्हणणें भाग पडतें. शके १८४९ च्या माघामध्यें प्रयाग येथें एक पंडितपरिषद भरली होती. तेथें सुमारें अठ्ठेचाळीस तास चर्चा करून 'नमो नारायणाय' हा मंत्र सर्वांना द्यावा कां न द्यावा आणि तो ॐकारपूर्वक द्यावा कां त्याविरहित द्यावा एवढ्या प्रश्नाचाहि निकाल लागला नाहीं. शके १८५० च्या आश्विनांत श्रीक्षेत्र काशी येथें एक ब्राह्मणमहासंमेलन भरविण्यांत आलें होतें. या संमेलनाची विद्वत्परिषद सात दिवस भरली होती. सुमारें ३०० पंडितांनीं चर्चा करून काय ठरविलें तर रजोदर्शनानंतर कन्येला वृषलीत्व येतें व त्याची प्रायश्चित्तानें निवृत्ति होत नाहीं. अर्थात् रजो-

दर्शनानंतरचें कन्यादान अधर्म्य समजावें. पोटजातींत विवाह करूं नये. मुसलमान व अस्पृश्य यांची अस्पृश्यता जन्मतः आहे, इत्यादि निर्णय प्रसिद्ध झालेले वाचून पंडितांच्या या परिस्थितीच्या अज्ञानाची कींवच येते.

(२६४) **पांडित्याकरितां ग्रंथ लिहिले:**—वस्तुस्थिति अशी दिसते कीं हे सर्व ग्रंथ पंडितांनीं पंडितांची मान्यता मिळावी एतदर्थ लिहिले आहेत. बुद्धकालापासून विद्वानांना पांडित्याची संवय जडली होती. एका पंडितानें दुसऱ्या पंडिताचें खंडण करावें, दुसऱ्यानें त्याचें मंडण करावें. तें इतर पंडितांनीं पसंत करावें. विशेषतः काशीस्थ पंडितांनीं आपला ग्रंथ मान्य करावा असें प्रत्येक पंडिताला वाटे. कारण त्या काळीं काशी हें मोठें विद्यापीठ होतें. तेथें मान्यता मिळाली कीं भरतखंडांत ती मिळे, म्हणून पांडित्यप्रचुर ग्रंथ लिहून मान्यता मिळविण्यांत कृतार्थता वाटत असे. सारांश पंडितांनीं पंडितमान्यतेकरितां ग्रंथ लिहिले, ते अपौरुषेय प्रमाणांनीं लिहिले, मीमांसापरिपाटीनें संस्कृतभाषेमध्येंच लिहिले आणि ते अपूर्वाच्या समर्थनार्थ लिहिल्यामुळें हजार दीड हजार वर्षांत झालेल्या वीस पंचवीस धर्म–निबंध–ग्रंथांत परिस्थितीचा विचार, समाज–अभ्युदय–विचार मुळींच नसला तर त्यांत आश्चर्य कसलें !

(२६५) **पंडितांच्या धर्मभोळ्या समजुती:**—किंबहुना या निबंधकारांची प्रामाणिक समजूत अशीच असावी कीं, धर्म म्हणजे मन्वादि स्मृतिकारांनीं सांगितलेला, तो जसाच्या तसा ठेविला पाहिजे, त्यांत बदल करूं नये, त्याला धक्का लावूं नये व परिस्थितीचा विचार धर्मांत करूं नये. धर्माचा व परिस्थितीचा संबंध नाहीं. ग्रंथांतील धर्म समजुतींत ठेवून परिस्थितींत जेवढें शक्य असेल तेवढें करावें व अशक्य झाल्यास तो अधर्म समजावा. याच प्रामाणिक समजुतीनें हे पंडित अद्याप असें म्हणतात कीं, धर्माचे बाबतींत एकूण एक सर्व कांहीं ठरलेलें आहे. त्याप्रमाणें वागणें एवढेंच मनुष्याचें काम आहे. श्रुति, स्मृति, पुराणें, भाष्यें व निबंध यांमध्यें सर्व धर्म सांगितला आहे. तो परिपूर्ण आहे. त्यांत कानामात्रेचासुद्धां बदल करूं नये. परिस्थितींतील विचार मोठे गुंतागुंतीचे असतात म्हणून या पंडितांनीं आचार व प्रायश्चित्त यांनीं समाजाला जितकें जखडतां येईल तितकें जखडावयाचा यत्न केला

आहे. कर्मावर पूर्ण श्रद्धा असावी हें खरें, पण अंधश्रद्धेमुळें कर्म केव्हांहि डोळस होत नाहीं याची वाट काय? तर्कांचा अतिरेक झालेला पाहून मीमांसक पंडितांनीं श्रद्धा उत्पन्न केली. पण तीहि पुढें आंधळी होऊन तिचें पर्यवसान कर्मठपणांत झालें. पंडितांच्या प्रायश्चित्तांचा हा दुर्भेद्य किल्ला महाराष्ट्र-साधुसंतांनीं पुढें उध्वस्त केला हें इतिहासप्रसिद्ध आहे.

धर्मनिबंधकारांनीं आपल्या ग्रंथांत परिस्थितीचा विचार मुळींच केला नाहीं. ह्याचें कारण ‘ कलियुगांत ह्या गोष्टी व्हावयाच्याच, त्याला कोण काय करणार, त्यांचें निवारण मानवी शक्तीच्या पलीकडचें आहे ’ अशी त्यांची समजूत हें एक असावें. व ही त्यांची पक्की समजूत असल्यामुळेंच त्यांनीं मुसलमानी अत्याचारांकडे लक्ष्य दिलें नसावें. भविष्योत्तरपुराणासारखे ग्रंथ या समजुतीचे पोषकच आहेत. अशा ग्रंथांना पंडितांनीं प्रमाण मानलें व बळजबरीनें धर्मांतर करण्याचा प्रसंग एकाद्यावर आला कीं, तो हिंदुत्वापासून कायमचा भ्रष्ट झाला, त्याला या जन्मीं शुद्ध होण्याचा मार्ग नाहीं, ही कल्पना उराशीं बाळगली. यामुळें समाजाचें जें अपरिमित नुकसान झालें होतें तें त्यांच्या पांडित्यप्रचुर ग्रंथांच्या योगानें मुळींच भरून आलें नाहीं. मुसलमानी आचार-विचारांचा व संस्कृतीचा पगडा तत्कालीन समाजावर सारखा बसत होता, तथापि त्याचा तीव्र निषेध पंडितांच्या ग्रंथांत क्वचितच दृष्टीस पडतो. भोळ्याभाबड्या हिंदुसमाजाशीं पंडितांचा संबंध नव्हता म्हणून त्या लोकांमध्यें फकीरांच्या पूजा व अर्चा आणि नवससायास सुरू झाले यांत नवल नाहीं. परंतु उच्चवर्णीय ब्राह्मणसुद्धां जेव्हां आपल्या सर्व देवता इष्ट फल देण्यास जणूं असमर्थ असें समजून दावलमलकास भजूं लागले व ताबूद करून त्यांत फकीर होऊं लागले, तेव्हां त्याचा दोष तत्कालीन पंडितांच्या अनास्थेलाच दिला पाहिजे.

(२६६) **जग दुःखमय आहे या तत्त्वाची परंपराः**—उपनिषद्‌कालीं जगापलीकडील वस्तु शोधणारें तत्त्वज्ञान उत्पन्न झालें. बुद्धानें जगाला “ सर्वं दुःखं सर्वं शून्यं सर्वं क्षणिकं ” या सूत्रत्रयीचें मूर्त स्वरूप दिलें. पुढें अशोक व कनिष्क हे महासम्राट राजे या तत्त्वज्ञानाचे प्रचारक बनले. त्यामुळें हें तत्त्वज्ञान समाजाच्या इतकें रोमरोमांत व नसानसांत

भिनून गेलें कीं, तें त्यानंतर कुणालाहि नष्ट करतां आलें नाहीं. बुद्धानंतर १०० वर्षांनींच चंद्रगुप्त मोर्य व आर्य चाणक्य हे मोठे कर्ते पुरुष झाले. पण त्यांनाहि हें तत्त्वज्ञान नष्ट करून तेथें दुसरें प्रस्थापित करतां आलें नाहीं. शुंग, काण्वायन, गुप्त, शातवाहन, आंध्रभृत्य अशीं वैदिक सम्राट घराणीं अशोक मौर्यानंतर उदयाला आलीं. त्यापैकीं कित्येकांनीं अश्वमेध यज्ञहि केले व पंडितांकडून बौद्धधर्माचें खंडणहि करविलें. वैदिक प्रवृत्तिपर धर्मस्थापनेकरितां अनेकांनीं यत्न केले, तथापि बहुजनसमाजाच्या भूमिकेवर आरूढ झालेला ' दुःखमय जगताचा ' व निवृत्तीचा संस्कार त्यांना खरडतां आला नाहीं. बौद्धधर्माच्या जन्मापासून बौद्ध पंडितांचे व वैदिक पंडितांचे वाद चालू होते. पंडितांचे ते बुद्धिप्रधान व तर्कप्रधान वाद पंडितांनाच समजत. सामान्य जनांना त्याची वार्ताहि नव्हती. वैदिकांनीं वाद करून बौद्धपंडितांना जिंकलें असेल, पण जनसमाजाची बुद्धमय मनोवृत्ति कोणालाहि जिंकतां आली नाहीं. समुद्राच्या अगाध उदरांत वरील वादळाची जशी वार्ता नसते, तशी बहुजनसमुदायाला तात्त्विक आणि बौद्धिक अशा या खंडण-मंडणाची वार्ता नव्हती. बहुजनसमाज जो तत्त्वज्ञानानें व आचारविचारानें एकदां बुद्ध बनला तो तेव्हांपासून आजपर्यंत तसाच आहे. जग दुःखमय आहे, तें क्षणिक आहे, या विचारसरणीचा परिणाम हिंदुसमाजावर असा झाला आहे कीं त्यामुळें त्याला जगाकडे रहस्यपूर्ण दृष्टीनें पहावेसें वाटतच नाहीं. जगांत राहाणाऱ्या हिंदूंची जग दुःखमय आहे, या सिद्धांतानें जळांत राहून जळाशीं वैर अशी स्थिति झाली आहे. जगत् हें ईश्वराचें लीलाकैवल्य आहे, त्याकरितां स्वकर्मणा तमभ्यर्च्य या शास्त्राधारें सर्व व्यवहार धडाडीनें केले पाहिजेत हें तत्त्वज्ञान त्यावेळीं पुढें आलें नाहीं.

—*—

## प्रकरण चौदावें

# बौद्ध व श्रीशंकराचार्य

श्रीमत् आद्य शंकराचार्य यांनीं बौद्धधर्माचें खंडण करून भरतखंडांतून त्याची हाकालपट्टी केली अशी सर्वसामान्य समजूत लोकसमाजांत आहे. परंतु शंकराचार्यांपूर्वी बौद्धधर्माचें खंडण वैशेषिकांनीं, नैय्यायिकांनीं आणि मीमांसकांनींहि पांच शतकें कसें अव्याहत चालविलें होतें याची कल्पना गेल्या प्रकरणांत दिलीच आहे. श्रीशंकराचार्यांनीं प्रामुख्यानें मीमांसकांचेंच खंडण केलें असून चित्तशुद्धीचें साधन म्हणून कर्माला उचलून धरलेलें आहे. बौद्धांचें खंडण शंकराचार्यांनीं केलें नाहीं असें नाहीं. प्रसंगोपात्त केलेलेंहि आहे. बौद्धधर्माच्या पकडींत सांपडलेल्या समाजाला वैदिक धर्माच्या क्षेत्रांत आणून सोडण्याचें कार्य श्रीशंकराचार्यांनीं केलें. तें करीत असतांना त्यांना बौद्धधर्माशीं किती मिळतें घ्यावें लागलें आणि बौद्धधर्मीय संन्यास व जगन्मिथ्यात्व या तत्त्वांचा पुरस्कार कसकसा करावा लागला हें या प्रकरणांत पहावयाचें आहे.

(२६७) **आचार्यांचें चरित्रः**—प्रथम प्रसंगप्राप्त म्हणून श्रीशंकराचार्यांचें थोडें चरित्र व कार्याचें वृत्त देतों. श्रीशंकराचार्य हे मलबारमध्यें एका नंबुद्रिब्राह्मणाच्या कुलांत जन्मले. कालटी हा गांव त्यांची जन्मभूमि होता, तो कोचीन संस्थानांत आहे. त्यांचे वडील शिवगुरु व आई आर्यांबा हे कालटीला रहात. पांचवे वर्षीं उपनयन, आठवे वर्षीं संपूर्ण वेदाध्ययन, पूर्णानदींत मगरानें पाय धरल्यामुळें आईकडून संन्यासग्रहणाची परवानगी, दहाव्या वर्षीं शास्त्राध्ययन व नर्मदातीरीं गोविंद यतींची भेट, संन्यासग्रहण, चार वर्षें बद्रिकाश्रमीं तपश्चर्या, इतकें झाल्यावर सोळाव्या वर्षीं काशीमध्यें येऊन त्यांनीं शारीरभाष्य व इतर अनेक ग्रंथ लिहिले, अनेकांशीं वाद केले, मठ स्थापले, उपनिषदांतील ब्रह्मविद्येचा पुरस्कार करून केवलाद्वैताची प्रस्थापना केली. विविध उपासनांचा समन्वय करून पंचायतनपूजा रूढ केली. नाना वाद, नाना तर्कटें हीं

सर्व मोडून ब्रह्मविद्येचा उद्धार केला. आचार्यांचा जन्म शके ७१० विभव संवत्सर वैशाख शुद्ध १० या तिथीस असून त्यांनीं गुहाप्रवेश शके ७४२ च्या वैशाखी पूर्णिमेस केला अशी आख्यायिका आहे. शंकराचार्यांच्या पश्चात् द्वैती, विशिष्टाद्वैती असे अनेक आचार्य झाले तरी हिंदुसमाजांतील शेकडा पाऊणशे लोक शांकरमतानुयायीच आहेत. शेकडा पंधरा फार तर रामानुजमताचे व शेकडा पांच माध्वमताचे असावेत. बाकीचे फुटकळ संप्रदायांचे आहेत. महाराष्ट्रीय संत सारे शांकरमतानुयायी आहेत. अनेक पंथ व संप्रदाय असतांना शंकराचार्यांचें हिंदुभारतावर असलेलें वजन भारताचें मूलभूत ऐक्य सिद्ध करतें.

(२६८) म. रा. बोडसांचें मतः—महाराष्ट्रांतील एक दिवंगत विद्वान महादेव राजाराम बोडस हे ' श्रीशंकराचार्य ' या आपल्या निबंधांत म्हणतात—' इसवी सनाचें आठवें शतक सर्व जगांतच क्रांतिकारक होतें. इस्लामधर्माच्या लाटा पूर्वपश्चिम दिशांस पसरूं लागल्या. त्याच सुमारास ख्रिस्ती लोक मलबारांत येऊन राहिले. हिंदुस्थानांत बौद्ध व जैन आणि कर्मकांडी वैदिक यांच्या झटापटी सुरू झाल्या. अनेक पीठांतून विद्वान पंडित निर्माण झाले. दिङ्नाग व धर्मकीर्ति यांसारखे बौद्ध, स्यमंतभद्र, अकलंकासारखे जैन, कुमारिल व प्रभाकर यांसारखे मीमांसक, उद्योतकार व प्रशस्तपाद यांसारखे नैय्यायिक वगैरेनीं बुद्धीला चालना देऊन शाब्दिक कोट्यांमुळें सर्वत्र तर्कवितर्क माजविले होते. अशा वेळीं या भांबावलेल्या चित्ताला श्रीशंकराचार्यांनीं ' तत्त्वमसि ' या महावाक्यानें अंतर्मुख करून ' अहं ब्रह्मास्मि ' असा साक्षात्कार करविला. श्रुतिस्मृतींचा समन्वय करून उपनिषदांच्या प्रामाण्यावर वेदांत—शास्त्र निर्माण केलें आणि वादविवादांनीं चंचल झालेल्या बुद्धीला स्थैर्य आणलें. दक्षिणेंतील कदंब, चालुक्य, चोलादि राजे वैदिक धर्मानुयायी विद्वानांचे चहाते होते. श्रुतिस्मृतिविहित सनातन धर्माची स्थापना आचार्यांनीं केली. बुद्धीला शीण देणारा शून्यवाद, जैनांचा ' स्याद्वाद ' म्हणजे संशयवाद व देहाला शीण देणारा कर्मठ मीमांसकांचा कर्मवाद हे नष्ट करून अद्वैतब्रह्मांत अंतर्मुखवृत्तीनें बुद्धि स्थिर करण्याचा मार्ग आचार्यांनीं जगाला दाखवून दिला.

(२६९) **पूज्यपाद आचार्यांचें कार्य:**–कुमारिलभट्टानंतर सुमारें १०० वर्षांनीं शंकराचार्य झाले. त्यांनीं कुमारिलभट्टांनीं घातलेल्या वैदिक विधीच्या पायावर बौद्ध तत्त्वज्ञानाला वैदिक तत्त्वज्ञानाचें स्वरूप देऊन बसविलें. शंकराचार्य हे प्रतिभासंपन्न, धोरणी, राजकारणी व व्यवहारनिपुण होते. त्यांनीं तत्कालीन परिस्थितीचें चांगलें आकलन केलें होतें असें स्पष्ट दिसतें. त्या वेळीं वैदिक हिंसेला फारसा मान नव्हता. अग्निहोत्राकडे लोकांचा ओढा स्वाभाविक कमी होता. शिव, विष्णु, देवी, इत्यादि देवतांच्या उपासनांना महत्त्व येऊं लागलें होतें. बौद्धभिक्षूंच्या वैभवानें लोकांचे डोळे दिपून गेले होते आणि अहिंसा व यतिधर्म यांचा बहुजनसमाजाच्या मनावर चांगलाच पगडा बसलेला होता. या परिस्थितीचा कयास घेऊन आचार्यांनीं कुमारिलभट्टांचें केवळ वैदिक कर्म किंवा बुद्धाचा केवळ कर्मसंन्यास याला पृथक् पृथकपणें महत्त्व न देतां दोघांची एकवाक्यता केली. ज्ञानाला संन्यास पाहिजे, संन्यासापूर्वीं चित्तशुद्धि पाहिजे, व चित्तशुद्धीकरितां वर्णाश्रमविहित कर्में केलीं पाहिजेत, असें मत त्यांनीं प्रस्थापित केलें. शंकराचार्यांच्या ग्रंथांत बौद्ध, जैन, सांख्य व मीमांसक यांचेंही खंडण आहे. बौद्ध धर्मातील यतिधर्माचें खंडण शंकराचार्यांनीं खरमरीतपणें केलेलें नाहीं आणि वैदिक विधींचें झणझणीत मंडणही केलेलें नाहीं. उलट मिथ्यात्ववादाचें आचार्यांनीं केलेलें अवलंबन पाहून त्यांच्यावर ' प्रच्छन्न ' बौद्धत्वाचा आरोप जो येतो तो यथार्थ आहे. कोणत्याहि कर्त्या माणसाला परिस्थितीला मान द्यावा लागतोच. शंकराचार्यांनीं परिस्थिति लक्षांत घेऊन उत्क्रांतीच्या नियमाप्रमाणें परिस्थितीशीं अनुगुण वर्तन केलें. अशा वर्तनानेंच त्या वेळीं वैदिक संस्कृतीचें थोडेंबहुत रक्षण झालें. तसें नसतें तर आर्यसंस्कृति जी आज दिसते तीहि टिकली नसती.

(२७०) **आचार्यकालीन परिस्थिति:**–कोणच्याहि मनुष्याच्या कामगिरीची व तत्त्वज्ञानाची छाननी करतांना त्या काळचा इतिहास, त्याचें जीवनवृत्त व समाजस्थिति हीं लक्षांत घेणें जरूर आहे. आचार्यपूर्वकाळची परिस्थिति पुढीलप्रमाणें होती. आचार्यांना बौद्ध व जैन पाखंडांशीं जसें भांडावयाचें होतें, तसेंच त्यांना शैव, वैष्णव, शाक्त, गाणपत, भैरव, कापालिक, इत्यादि वैदिक संप्रदायांशींहि झुंजावयाचें होतें. कारण या

वैदिक संप्रदायांमध्यें मोठें द्वैत माजलेलें होतें. बुद्धोत्तर कालांत बुद्धाच्या शिष्यांनीं त्याचे शरीरावशेष जतन करून त्यांवर बुद्धाच्या प्रतिमा बसविल्या व स्तूप उभारले. त्यांमध्यें बुद्धाच्या मूर्तीच मूर्ति होऊं लागल्या. "मूळ वैदिक धर्मांत देवळें, मूर्ति, पादुका, प्रतिमा वगैरे कांहींएक अतिरिक्त नव्हतें. हें सर्व या काळांत उत्पन्न झालें, व त्यायोगें बौद्ध धर्माला चांगला आळा बसला. हा आगमतंत्रग्रंथांचा व अष्टादश पुराणांचा काळ होय. यांत उपासनामार्ग बळावला, व त्यांत नाना प्रकारचे द्वैती, विशिष्ट देववादी किंवा एकदेववादी पंथ निर्माण झाले. त्यायोगें व्यक्तींत असहिष्णुता शिरली, धर्मांत कलह पेटला, व समाजांत बजबजपुरी माजली. कर्मवादी मीमांसक कर्मांत रत राहून एका बाजूनें बौद्धांच्या विरुद्ध वैदिक परंपरेचें रक्षण करीत होते तर दुसऱ्या बाजूनें शुंग, गुप्त, शातवाहन, आंध्र, चालुक्य इत्यादि महासमर्थ वैदिक धर्माभिमानी राजे अश्वमेधादि क्रतु करून वैदिक धर्माचें परिपालन करीत होते. वेद, शास्त्रें, धर्म, इतिहास इत्यादि गहन विषयांत गति करण्यास ज्यांना सवड नव्हती, त्यांच्याकरितां महाभारतादि सोप्या इतिहासग्रंथांचें प्रणयन ह्याच कालांत झालें. ह्या सोप्या विश्वकोशानें सामान्य जनांस आर्य ऐतिह्याची व परंपरेची ओळख होण्यास मदत केली. ह्याच कालांत महायान पंथांतील देवालयें, विहार, मूर्ति इत्यादींशीं टक्कर देण्याकरितां त्रैवर्णिकांनीं राम, कृष्ण इत्यादि ऐतिहासिक थोर विभूतींना देवत्व देऊन व शिव, विष्णु, इंद्र, सूर्य, वायु, मरुत्, लक्ष्मी, इत्यादि आर्ष देवांना मूर्तत्व देऊन त्यांचीं भव्य व रमणीय देवालयें उभारलीं. ह्याच काळांत लोकांना धर्म कळावा एतदर्थ मानवधर्मशास्त्र, याज्ञवल्क्यस्मृति, इत्यादि नामांकित कायद्यांचे ग्रंथ निर्माण झाले. ह्याच अवधींत बौद्ध व जैन पांडित्याला दिपवून टाकणारे ब्रह्मसूत्रें, न्यायसूत्रें, वैशेषिकसूत्रें, मीमांसासूत्रें, भक्तिसूत्रें वगैरे सूत्रग्रंथ उदयास आले. यानंतर पुढें थोड्या काळांतच शबराचार्यांचें पूर्वमीमांसेवर प्रचंड भाष्य निर्माण झालें. भट्ट कुमारिलांचीं वार्तिकें जन्मास आलीं, व पार्थसारथिमिश्रांची शास्त्रदीपिका उदय पावली. परंतु त्यांबरोबरच उपासनामार्गांत जे जे नाना प्रकारचे अत्याचार व अनाचार शिरले होते व द्वैत माजलें होतें, तें नष्ट करण्याकरितां दुसऱ्या बाजूनें ज्ञानवादी शंकराचार्य पुढें आले. शंकराचार्यांनीं आरंभापासून एकदम द्वैताच्या विरुद्ध अद्वैताचें टोंक धारण

केलें व द्वैतांतील प्रखरता मोडली. कर्मांच्या विरुद्ध ज्ञानाची कांस धरली व कर्मठांतील मूढपणाला धक्का दिला. त्या कालीं सर्वत्र ज्या पद्धतीचा संन्यास लोकप्रिय झाला होता, तत्सदृश संन्यास आचार्यांनीं ब्रह्मचर्यांतून स्वीकारला व पुढें त्याचाच पुरस्कार केला. श्रीशंकराचार्यांचें नांव उच्चारतांच संन्यास या कल्पनेची प्रथम आठवण होते, व नंतर त्यांचा अद्वैत सिद्धांत आणि जगन्मिथ्यात्ववाद हीं पुढें उभीं राहातात. शंकराचार्यांसारख्या वैदिक धर्माभिमान्याला संन्यास व जगन्मिथ्यात्ववाद यांचा अवलंब कां करावा लागला, हा मोठा विचाराचा प्रश्न असला तरी तो यामागील परिच्छेदांत वर्णिल्याप्रमाणें परिस्थितीला अनुसरून त्यांना स्वीकारणें भाग पडलें असें मानून किंवा पुढीलप्रमाणें तरी त्यास उत्तर देऊन तो सोडविलाच पाहिजे.

**(२७१) आचार्यांनीं संन्यासाचा पुरस्कार कां केला ? :–** संन्यासाचें महत्त्व शंकराचार्यांनीं कां वाढविलें ? याचें उत्तर हेंच आहे कीं, आचार्यांना बौद्ध यतींना तोडीस तोड देण्याकरितां वैदिक यति निर्माण करावे लागले. आचार्यांपूर्वी जिन व बुद्ध यांनीं संन्यासाचें द्वार सर्वांना मोकळें केलें होतें. क्षत्रिय वर्गांतहि संन्यासाची उठावणी झाली होती. हजारों बौद्ध यति अनेक देशांत जाऊन धर्माचा प्रसार करीत होते. त्यामुळें बौद्ध यतींचें वैभव लोकांच्या डोळ्यांत भरलें होतें. आचार्यांनीं जैन व बौद्ध धर्मांचें खंडण केलें खरें, पण त्यांना लोकांच्या मनांत यतिधर्माबद्दल जी आदरबुद्धि उत्पन्न झाली होती ती नष्ट करतां आली नाहीं. त्या आदर-बुद्धीला वैदिक रूप देऊन बौद्ध यतींच्या ऐवजीं वैदिक यति निर्माण करण्यावांचून त्यांना गत्यंतर नव्हतें. आचार्यपूर्वकालीं ज्या संन्यासाचें एवढें वर्चस्व माजलें होतें त्याचा इतिहासहि मनोरंजक आहे, म्हणून तोहि थोडा देतों.

**(२७२) उपनिषदांतील संन्यासः–** उपनिषदांमध्यें संन्यासाचा उल्लेख आहे. तो असा:—

"एतद्ध स्म वै तत्पूर्वे विद्वांसः प्रजां न कामयन्ते किं प्रजया करिष्यामो येषां नायमात्मायं लोक इति ते ह स्म पुत्रैषणायाश्च वित्तैषणायाश्च लोकैषणायाश्च व्युत्थायाथ भिक्षाचर्यं चरन्ति ।"

या वर्णनावरून संन्यास म्हणजे आत्मज्ञानानें प्राप्त होणारी स्वाभाविक स्थिति असा अर्थ दिसतो. पण ही मूलभूत कल्पना जाऊन पुढें

संन्यास हें एक आत्मज्ञानाचें अवश्य साधन होऊन बसलेलें दिसतें. उपनिषदांतील ब्रह्मवेत्त्यांपैकीं स्वाभाविक ब्राह्मी स्थितीला कांहीं ब्रह्मवेत्ते गेल्याचीं वर्णनें आहेत. पण जाबालोपनिषदामध्यें जेव्हां वैराग्य प्राप्त होईल तेव्हां संन्यास घ्यावा असें म्हटलें आहे. जाबालोपनिषदांतील **यदहरेव विरजेत्तदहरेव प्रव्रजेत्** ॥ हें वाक्य अर्वाचीन आचार्यांकडून वेदांतग्रंथांत प्रामुख्यानें श्रुतिवचन म्हणून पुढें मांडण्यांत आलेलें आहे. या वचनाचा उच्चार व पुरस्कार बुद्धपूर्वकाळीं झाला व त्याच वेळीं आर्यसंस्कृतीच्या अपकर्षाचें बीज पेरलें गेलें! आश्रमधर्माला अत्यंत घातक, लोकसंग्रहाला अत्यंत अनिष्ट असें हें जाबालवचन आहे. याचाच जो संन्यासवृक्ष पुढें फोफावला त्याचीं कडवट फळें अद्याप चाखावीं लागत आहेत. गौतमबुद्धानें या वचनांचा यथास्थित फायदा घेतला. म्हणून हें उपनिषद् बौद्धमतनिदर्शक आहे, असेंहि म्हणतां येईल. बुद्धापूर्वीं फक्त ब्राह्मणांना संन्यास विहित होता. बुद्धानें सर्व जातींना संन्यासाचें द्वार मोकळें करून मोक्षाची पाणपोयी उघडली. उपनिषदांमध्यें ज्ञानाची सहज स्थिति म्हणून संन्यास वर्णिला आहे. पण बुद्धानें ज्ञानाची एक अवश्य पूर्वावस्था म्हणून संन्यासाचें समर्थन केलें. त्यामुळें संन्यासाची सहज स्थिति जाऊन तेथें कृत्रिमता आली व आळेंबळें वैराग्य दाखविणें भाग पडूं लागलें. भोजनोत्तर तृप्तीच्या ढेकरा स्वाभाविक येतात. तशा पूर्णकाम व आप्तकाम झाल्यावर निवृत्तीच्या लहरी सहज उठतात. बुद्धाच्या ‘ जगत् दुःखमय ’ या तत्त्वज्ञानानें त्याग व निवृत्ति यांतील सहजता गेली व तृप्तीच्या अभावीं पित्ताच्या ढेकरा जशा येतात तसा प्रकार झाला. जगत् दुःखमय आहे, मग या जगांत राहा कशाला? मेलेलेंच बरें! पण आत्महत्या करणें वाईट, यास्तव जगांत जिवंत असून मेल्याप्रमाणें राहाण्याची अवस्था म्हणजे संन्यास होय, या बुद्धीनें जो तो भिक्षु होऊं लागला. बुद्धाला जगांत दुःख, दैन्य, घाण, व अपावित्र्यच दिसत होतें. त्यांतून मुक्त होण्याकरितां त्यानें दुःखविलयात्मक तत्त्वज्ञानाला पोषक म्हणून सर्वांना संन्यास सांगितला. संन्यासामध्यें अधिकारभेद ठेविला नाहीं व तारतम्यहि ठेविलें नाहीं. स्मृतिकारांनीं आश्रमव्यवस्थेमध्यें प्रवृत्तिनिवृत्तीची म्हणजे गृहस्थ व संन्यास यांची योग्य व्यवस्था केली होती. पण बुद्धाला चातुर्वर्ण्यविरुद्ध मोठी

सामाजिक क्रांति करावयाची होती म्हणून त्यानें ती व्यवस्था लाथाडली व जाबालोपनिषत्सदृश वचनांचा आधार घेऊन सर्वांना संन्यासाचें द्वार खुलें केलें. दुःखविलयात्मक निर्वाणाला संन्यास घेणें, भिक्षु होणें, हाच उपाय आहे, असें त्याचें स्वच्छ मत होतें. जो जो भिक्षु होईल तो तो निर्वाणपदाला जाईल, या तत्त्वामुळें गृहस्थाश्रमाचें महत्त्व कमी झालें. समाजांतील लोकांपुढें चतुर्विध पुरुषार्थप्राप्तीचें साधन गृहस्थाश्रम हेंच ध्येय असावयास पाहिजे. बुद्धपूर्वकालीं हें ध्येय होतें. पण बुद्धानें विवाह करणेंच चांगलें नसून भिक्षु होणें हें चांगलें या मताचा जोरानें पुरस्कार केला व समाजापुढें संन्यास हें ध्येय ठेविलें. गृहस्थाश्रमी मनुष्यानें भिक्षु व भिक्षुणी यांना दानधर्म करावा, त्यांचा योगक्षेम चालवावा व नीतीनें वागावें असें तो म्हणे. जाबालोपनिषदाची छाप बौद्धमतावर आणि बौद्धमताची छाप आचार्यग्रंथावर पडली आहे यांत संशय नाहीं. '**ब्रह्मचर्याश्रमादेव गृहीतसंन्यासिनाम् परमहंसपरिव्राजकाणां मोक्षेऽधिकारः**' अशा आशयाचीं वाक्यें आचार्यभाष्यांत दिसतात, त्याचें कारण हेंच होय. तिपिटक या बौद्धधर्मग्रंथामध्यें बौद्ध मताचें प्रतिबिंब चांगलेंच पडलेलें आहे. त्यांतील विनयपिटकामध्यें तर भिक्षु-भिक्षुणींच्या आचाराचे नियम दिलेले आहेत, त्यांवरून बुद्धाचीं मतें कशीं आहेत हें पाहूं.

(२७३) **तिपिटकांतील संन्यासः**-तिपिटकामध्यें निवृत्ति उत्पन्न होईल, अशा अनेक कथा आहेत. त्यांपैकीं कांहींचा सारांश महाराष्ट्र ज्ञानकोशावरून येथें देतों. "कांहीं तरुण आपल्या स्त्रियांसह मजा मारण्याकरतां बाहेर गेले. एकानें स्त्री नसल्यामुळें बरोबर एक कुमारी घेतली. तिनें बाहेर जातांच त्यांच्या सर्व वस्तु घेऊन पळ काढला. तरुण तिचा पाठलाग करीत असतां वाटेंत त्यांना बुद्ध भेटला. त्यानें स्त्रीच्या शोधापेक्षां आत्मशोध करा असा उपदेश केल्यावर ते सर्व भिक्षू झाले!" "रठ्ठपाल नामक तरुण राजपुत्रास भिक्षु होण्याची इच्छा झाली, पण आईबाप संमति देईनात. तेव्हां अन्नत्याग करून त्यानें संमति मिळविली. पुढें तो भिक्षु होऊन बापाच्या घरीं आला. बापानें त्याच्यापुढें पंच पक्वानांचें जेवण, सोन्या-दागिन्यांच्या राशि, आणि त्याची तरुण स्त्री, हीं उभीं केलीं. रठ्ठपाल राजपुत्र म्हणाला,

कीं यांमुळें दुःख, क्लेश, दैन्य, व त्रास उत्पन्न होतो, म्हणून गंगेच्या खोल पाण्यांत हीं सर्व बुडवा. त्याच्या तरुण स्त्रीनें त्याचे पाय धरले; तेव्हां जीविताची अशाश्वता व कामाची अतृप्तता यांविषयीं तिला उपदेश करून तो निघून गेला." थेर–गाथेमध्यें अनेक भिक्षूंनीं संसार-पाश कसे तोडले याचेच अनुभव सांगितलेले आहेत. "एका श्रीमंत मनुष्याच्या सुंदर मुलीला अनेक राजपुत्र मागणी घालीत होते. एकानें तर तिच्या आठपट सोनें व जवाहीर देतों, असा तिच्या बापाकडे निरोप पाठविला होता. पण तिनें बुद्धाचा उपदेश ऐकल्यामुळें संसारांत पडण्याचें नाकारलें, व ती भिक्षुणी झाली." "सुभा नांवाच्या स्त्रीची प्रेमयाचना करीत एक पुरुष तिच्या पाठोपाठ अरण्यांत गेला. पण ती त्याला वश झाली नाहीं. तिनें शरीराच्या नश्वरतेचें व ओंगळपणाचें वर्णन करून आपला एक डोळा कापून त्याच्या हातांत दिला. पुढें ती स्त्री बुद्धाकडे गेली." अशा प्रकारच्या किती तरी गोष्टी देतां येण्याजोग्या आहेत. बुद्धाच्या निवृत्तिपर उप-देशाचा परिणाम समाजावर इतका झाला होता कीं, कोणताहि व्यवसाय न करतां भिक्षु होऊन स्वार्थ–परमार्थ साधावा, अशी प्रबळ इच्छा समा-जांत झालेली होती. कारण भिक्षु होण्यांत मोठेपणा वाटे. आणि श्रीमंतांच्या दानधर्मावर भिक्षूंची यथास्थित चैनहि चालत असे. तत्कालीन परिस्थितीचा निदर्शक एक गमतीचा संवाद तिपिटकांत आहे, तो असा–मातापितरांमध्यें मुलाला कोणती विद्या शिकवावी, याचा खल चालला. माता म्हणाली, त्यानें कारकुनी केली असतां त्याचीं बोटें दुखतील, तो गणित करूं लागला तर छाती दुखेल व चित्रकला शिकला तर डोळे बिघडतील. हें ऐकून बापानें पत्नीचे अनुमतीनें मुलाला भिक्षु होऊं देण्याचा निश्चय केला. कारण त्या वेळीं पोटाला मिळविण्याचा हा सर्वांत सोपा व संभावित मार्ग झाला होता.

(२७४) **बौद्ध भिक्षु व भिक्षुणी यांचा अधःपातः**–बुद्धानें भिक्षु व भिक्षुणी यांविषयीं पुष्कळ नियम घालून दिलेले होते. पिंवळा पोषाक करावा, मद्यमांसापासून निवृत्त असावें, पावसाळ्याशिवाय एका ठिकाणीं राहूं नये, सारखा धर्मप्रसारार्थ संचार करावा, भिक्षा मागून निर्वाह करावा, एक वेळ जेवावें, अरण्यांत राहावें, तत्त्वचर्चा करावी, इत्यादि. परंतु

बुद्धाच्या या आज्ञेप्रमाणें भिक्षूंचें वर्तन त्याच वेळीं घडेनासें झालें. बौद्ध-भिक्षूंसाठीं जे विहार बांधले असत त्यांतच हे भिक्षु पुढें निरंतर राहूं लागले व त्यांनीं अरण्यवास सोडला. बुद्धिमत्ता, कळकळ व सत्याची चाड यांतहि हे भिक्षु पुढें हिणकस ठरले व यांपैकीं कांहींचें तर शहाण-पण शब्दावडंबर व तर्कावडंबर यांतच खर्च होऊं लागलें. भिक्षूंच्या-करतां मठ, विहार, सभागृहें व राजधानीच्या ठिकाणीं दिवाणखानेहि असत. पण त्यांचा पुढें पुढें दुरुपयोग होऊं लागला. पोट भरण्याचा सर्वांत सोपा धंदा भिक्षु होणें हा झाल्यामुळें नीच व हलक्या कुलां-तल्या लोकांचा त्यांत भरणा झाला. त्यामुळें भिक्षूंमध्यें मुंडश्रावक, जटिलक, गोगंडिक, तेदंडिक, अविरुद्धक, गोतमक वगैरे भेद पडले. या सर्व भिक्षूंमध्यें बरेच भिक्षु बुद्धिमान्, नीतिमान् व आचारवान् होते. सर्वच कांहीं लुच्चे होते असें म्हणतां येत नाहीं. भिक्षुसंघाप्रमाणें भिक्षुणींचे संघहि स्थापन झाले. स्त्रियांविषयीं बुद्धाचा अत्यंत तिरस्कार असे. त्यांना बौद्ध भिक्षुणींची दीक्षा देऊं नये असें त्याचें मत होतें. परंतु बुद्धाचा पट्टशिष्य जो आनंद याच्या व मातेच्या आग्रहावरून त्यानें स्त्रियांना भिक्षुणी होण्याची अनुज्ञा दिली; पण त्या वेळीं गौतमानें असे उद्गार काढले कीं, "माझा धर्म जो कित्येक वर्षें टिकणार होता तो आतां ५०० वर्षें आधीं नामशेष होईल." पुढें खरोखरच बुद्धाच्या वरील उद्गारांप्रमाणें स्थिति झाली. बौद्धभिक्षु आणि भिक्षुणी यांची धग-धगीत व जाज्वल्य वैराग्यवृत्ति पूर्ण मावळली. त्यांमध्यें चैन व मिजास यांचा शिरकाव झाला. मोठमोठ्या विहारांमध्यें हजारों भिक्षुभिक्षुणी राहात असत. त्यांचें साहचर्य कांहीं काल धर्मप्रसाराला उपयोगीं पडलें. पण पुढें जो उठला सुटला तो भिक्षु होऊं लागला व पाहिजे ती स्त्री भिक्षुणीसंघांत येऊं लागली. त्यामुळें विहाराची पवित्रता व उदात्तता जाऊन विहार म्हणजे अनाचाराचे कारखाने बनले. गांवांत जे अनाचार दुराचारी मनुष्यें करीत ते बंद पडले, पण भिक्षु व भिक्षुणी यांनीं गच्च भरलेले आणि शहरवजा झालेले विहार हे अनीतीचें माहेरघर बनले! बुद्धाच्या अनुयायांमध्यें ब्राह्म-क्षत्रियवैश्यशूद्रादींची संख्या अधिक असल्यामुळें असा प्रकार घडला. बुद्धाच्या पश्चात् अशोकानें धार्मिक घोटाळे कमी करण्याकरितां एक धर्म-

समिति बोलावली, त्यावेळीं त्या समितीस आलेल्या भिक्षूंपैकीं सुमारें साठ हजार भिक्षु लुचे आढळले, म्हणून त्यानें त्यांची हाकालपट्टी केली.

शुंग घराण्यांतील पुष्यमित्रानें अशोकानंतर बौद्ध भिक्षूंचा छळ केला, तो त्यांच्या अनाचारामुळेंच केला अशी माहिती मिळते. कनिष्काच्या कारकीर्दीमध्यें बौद्ध भिक्षूंचे ग्रह उच्चीचे होते असें म्हटल्यास चालेल. वैदिक धर्माभिमानी जो समुद्रगुप्त त्याच्या राजवटींतहि भिक्षूंचें बंड कांहीं कमी नव्हतें. चिनी प्रवासी फाइयान हा त्या वेळीं हिंदुस्थानांत आला होता. त्याला सिंधुनदीपासून मथुरेपर्यंत हजार पांचशें बौद्ध मठ आढळले, त्यांत लाखो भिक्षु राहात असावेत असें त्यानें लिहिलें आहे. या सर्व मठांना राजाकडून मोठमोठ्या देणग्या होत्या. त्यामुळें भिक्षूंची चांगली चंगळ चाले. सम्राट् हर्ष हा निपुत्रिक असल्यामुळें म्हातारपणीं त्याचा ओढा बुद्धधर्माकडे वळला. तो दर पांच वर्षांनीं आपली सर्व संपत्ति मोठा समारंभ करून श्रमण व ब्राह्मण यांना अर्पण करीत असे. बौद्ध भिक्षूंवर सोनें, रत्न, उंचीं वस्त्रें यांचा पाऊस पाडण्यांत हर्षानें आपला हात आखडता घेतला नाहीं. जगत्प्रसिद्ध चिनी प्रवासी ह्युएनत्संग हा हर्षाच्या कारकीर्दींत हिंदुस्थानांत आला होता. त्यानें इकडे हर्षराजानें बांधलेले शेकडो मठ व स्तूप पाहिले. हर्षाच्या दानधर्मावर लाखों भिक्षु जगत असत, असें तो म्हणतो. हर्षाच्या वेळच्या भिक्षूंचें वर्णन बाणभट्टानें लिहिलेलें आहे. त्यावरून या भिक्षूंमध्यें उदरंभरी, अधार्मिक, शिक्षणशून्य असे लोक असल्यामुळें ते लोकांच्या तिरस्काराला पात्र झाले होते असें दिसतें. पाराशरी म्हणजे लुच्च्या लफंग्या, यांमध्यें अधार्मिक नाहीं असा मनुष्य विरळा अशी समजूत त्या वेळीं झालेली होती असें बाणभट्ट लिहितो. इ. स. ८४५ त वुत्संग नामक बादशहानें चीन देशांतील भिक्षुभिक्षुणींचे अनाचार पाहून त्यांचीं सुमारें २॥ लक्ष लग्नें लाविलीं असें महाराष्ट्र ज्ञानकोशकार लिहितात. वर्णाश्रमधर्माप्रमाणें फक्त ब्राह्मणांना संन्यास विहित असतां बुद्धानें तो सर्वांना देऊन दुःखविलयात्मक निर्वाणाचा मार्ग खुला केल्यामुळें शकपूर्व ६०० ते शकोत्तर ८०० म्हणजे सुमारें १५०० वर्षें भिक्षु, संन्यास, निवृत्ति, यांचाच प्रवाह सारखा सुरू झाला होता. पुढें शंकराचार्यांना परिस्थितीमुळें या प्रवाहापुढें मान वाकवावी लागली व अवैदिक संन्यासाला वैदिक संन्यासाचें

रूप देऊन त्याचा पुरस्कार करावा लागला. आचार्यपूर्वकालच्या संन्यासाचा हा असा इतिहास आहे.

(२७५) **उदरंभरू परिव्राटांचा सुळसुळाटः**–बुद्धानें स्वातंत्र्य, समता व बंधुता या भावनांच्या बंडाचें निशाण उभारलें असें म्हणण्यास हरकत नाहीं. त्याचा परिणाम काय झाला व अद्याप तो कसा दिसत आहे याची कल्पना यावी म्हणून नासदीयसूक्तभाष्यकर्ते श्री. राजवाडे यांच्या ग्रंथांतून पुढील उतारा देतों. "बुद्धापुढील काळांत वैदिक, अवैदिक, आर्य व अनार्य, व्रती व अव्रती, स्नातक व अस्नातक, साग्निक व निरग्निक, ब्राह्मण व चांडाल या सर्वांनींच सररहा प्रव्रज्येचा सुखेनैव अंगीकार केला व तेव्हांपासून या देशांत अशा बेजबाबदार, कर्मशून्य किंवा कर्तव्यहीन परिव्राटांचा जो सुळसुळाट झाला त्यायोगें धर्माला कायमचें हीनत्व आलें. अशा स्थितींत व्यक्तीला समाजाचें बंधन नाहीं व धर्माची उपाधि नाहीं, म्हणून स्वतः कर्माची जबाबदारी नाहीं व संसाराची काळजी नाहीं, तर केवळ आत्म-मोक्षार्थ जगताला ताप देऊन आणि पुन्हां त्या जगताची निंदा करून देहाचा योगक्षेम उत्तम चालवावा व त्या सुखाला आत्मानंद, ब्रह्मानंद इत्यादि मोठमोठ्या नांवांनीं संबोधावें ही वृत्ति उत्पन्न झाली. मूळ चातुर्वर्ण्यसमाजांत फक्त एका ब्राह्मणालाच गृहस्थाश्रम संपविल्यानंतर परिव्राजकत्व विहित होतें. पण जाबालोपनिषदांसारखीं उपनिषदें झाल्यानंतर पुढें कोणीहि धर्मभ्रष्ट किंवा धर्मबाह्य कसलाच धर्मबंध न राखतां परिव्राट् होऊं लागला. असे सर्व नियत कर्मत्यागी परिव्राट् बुद्धपूर्वकालीं अनेकशः इतस्ततः वावरूं लागले व त्यायोगें ब्राह्मणांच्या अत्याश्रमाचें महत्त्व लोकांच्या डोळ्यांतून पार उतरलें. असे कांहीं परिव्राट् येणेंप्रमाणें—

१ संन्यासी, २ बैरागी, ३ वन्यासन, ४ तापस, ५ गोसावी, ६ अवधूत, ७ हंस, ८ परमहंस, ९ दंडी, १० मुंडी, ११ मस्करी, १२ जोगी, १३ चरक, १४ शाक्य, १५ श्रावक, १६ श्रमणक, १७ भिक्षु, १८ रक्तपट, १९ जिनकल्पी, २० सातवादी, २१ निग्गंथ, २२ तेरासीय, २३ आजीविक, २४ अच्छेलक, २५ एकसातक, २६ हत्थापलेखक, २७ श्वेतवासस्, २८ दिग्वासस्, २९ जटाधारी, ३० कृष्णवसन इत्यादि.

(२७६) **भिक्षेकऱ्यांचें पेवः**—याच संन्यासी लोकांमधून पुढें भिक्षेकरीवर्ग निर्माण झाला. भिक्षावृत्तीला फाजील उत्तेजन बौद्ध धर्मानें दिलें, त्यामुळें उदरंभरु व आळशी अशा लोकांना भीक मागून पोट भरण्याचा बिनभांडवली उत्तम धंदा मिळाला! बौद्धधर्माच्या उत्कर्षकालीं भिक्षूंबद्दल आदरबुद्धि होती म्हणून त्यांचा योगक्षेम यथास्थित चाले. पण पुढें तो आदर गेल्यावर हे भिक्षु लोकांना भिक्षा मागून सतावूं लागले. निरनिराळ्या स्वरूपानें या भिक्षेकऱ्यांची संख्या हिंदुसमाजांत सांप्रत पुष्कळ आहे. लेखकाच्या माहितीप्रमाणें अवधूत, कानफाटे, गिरी, पुरी इत्यादि प्रतिष्ठित पंथांचे भिक्षेकरी बैरागी, कांहीं नाहीं तरी ३,००,००० आहेत! अत्यंत बेजबाबदारपणें आयुष्यक्रमणा करीत, जगाची निंदा करून, जगावर जगणारा हा वर्ग व त्यासंबंधानें समाजांत असलेला परमार्थदृष्टीचा आदर पाहिला म्हणजे मन आश्चर्यचकित होतें; भिक्षुवर्गांतून जसा भिक्षेकरी वर्ग उत्पन्न झाला त्याचप्रमाणें भिक्षुणींतून लग्न न करतां देवाच्या नांवावर आयुष्य काढणारा वर्गहि निघाला. देवाला मुली अर्पण करण्याची चाल व देव नवरा समजून राजरोस अनाचार करण्याची चाल खंडोबाच्या मुरळ्यांत आहे व यल्लमाच्या जोगत्यांत आहे. जोगत्या व जोगाप्पा, वाघ्या व मुरळी आणि अशाच प्रकारचीं लग्नविरहित देवाच्या नांवाचीं जोडपीं पाहिलीं म्हणजे बौद्धकालीन भिक्षुभिक्षुणींचें स्मरण होतें हें खास. *

(२७७) **जगन्मिथ्यात्व व बौद्धतत्त्वज्ञानः**—श्रीशंकराचार्यांच्या पूर्वी संन्यास, निवृत्ति व दुःखनाशात्मक तत्त्वज्ञान यांचा प्रवाह उपनिषदें व बौद्धवाङ्मय यांमधून चालू होता. त्यालाच आचार्यांनीं मान वाकविली. आचार्यांच्या पश्चात्हि तीच परंपरा तदनुयायी आचार्यांनीं व संतांनीं चालविली. त्यामुळें समाजापुढील प्रवृत्तिपर कर्मयोगाचें ध्येय जें एकदां भ्रष्ट झालें तें झालें. जगांत कांहीं कर्तव्य आहे, कांहीं रहस्य आहे, ही बुद्धि पूर्वी नष्ट झालेली होती; ती जगन्मिथ्यात्वाच्या तत्त्वज्ञानानें अधिक अढळ राहिली. जगन्मिथ्यात्वाच्या तत्त्वज्ञानावर सुद्धां बौद्धतत्त्वज्ञानाचीं पुटें चढलेलीं दिसतात. याकरतां त्या तत्त्वज्ञानाची थोडी छाननी केली पाहिजे.

---

* **टीप**—प्रौढ व तरुण कुमारिकांनीं भिक्षुणी होऊं नये म्हणूनच लवकर लग्नें करून टाकण्याची चाल व्यवहारांत आली असावी.

बौद्धधर्म म्हणजे वैदिक धर्माविरुद्ध जे जे भावनातरंग बुद्धापर्यंत उठले होते, त्या सर्वांचा तो स्फोट होय. कारण वैदिक धर्माविरुद्ध जीं जीं धार्मिक, नैतिक व तत्त्वज्ञानविषयक मतें निघालीं होतीं, त्या सर्वांचा अंतर्भाव बौद्ध-धर्मांत झाला होता. बौद्ध व जैन हे पंथ एकाच कालीं वैदिक धर्माशीं स्पर्धा करीत होते. त्यांनीं वेदांबद्दल अनादर उत्पन्न केला, कर्माचें महत्त्व कमी केलें, यज्ञाला गौणत्व आणलें, ज्ञानाचा जयजयकार केला, समाजाचा धिःकार केला, मनुष्याचें जीवित दुःखमय ठरविलें आणि दुःखविलयाकरितां संन्यासाचा अवास्तव पुरस्कार केला. शंकराचार्य व बुद्ध यांच्या तत्त्व-ज्ञानांची तुलना केल्यास एक जगत् दुःखमय मानतो, तर दुसरा तें मिथ्या मानतो. एकाला जगांत दुःख दिसत होतें, तर दुसऱ्याला द्वैत दिसत होतें. एकाची दृष्टि दुःखनाशाकडे होती, तर दुसऱ्याची दृष्टि अद्वैतप्राप्तीकडे होती. दोघांनाहि जगाबद्दल प्रेम नव्हतें. शंकराचार्यांचें नांव घेतलें कीं संन्यास व जगन्मिथ्यात्व हीं दृष्टीपुढें उभीं राहातात. त्याप्रमाणें बुद्धाचें स्मरण होतांच दुःखवाद व भिक्षु हीं पुढें उभीं राहातात. एक वैदिक होता व दुसरा अवैदिक होता. एक वेद, देव, यज्ञ यांची उघड निंदा करीत असे तर दुसरा प्रच्छन्नबौद्ध आहे कीं काय असें लोकांना वाटे. बुद्ध जगताला दुःखमय मानतो तर आचार्य तें मायामय मानतात व तें सदसद्विलक्षण, अनिर्वचनीय आहे असें सांगतात. बुद्धाच्या तत्त्वज्ञानांत शून्य निर्वाण होतें तर आचार्यांच्या तत्त्वज्ञानांत ब्रह्म निर्वाण होतें.

**(२७८) शांकर यति व बौद्ध भिक्षुः**—शांकर आचारविचारांत सुद्धां बौद्ध भिक्षूंची छटा अधिक असल्यामुळें शांकरमतांत व बौद्धमतांत परिणामीं फरक काय, अशी शंका त्यावेळीं कित्येकांस आली असावी. व ती दूर करण्याकरितां बौद्ध व सांख्य यतिधर्म वेदबाह्य अतएव खोटा व शांकर संन्यासधर्म वैदिक म्हणून खरा अशा अर्थाचें समर्थन त्यांना छांदोग्य उपनिषदावरील भाष्यामध्यें करावें लागलें. बुद्धानें जगाला दुःखमय ठर-विलें, आचार्यांनीं जगाकडे दुर्लक्ष करून त्याचा उद्धार न करतां शून्य-निर्वाणाच्या ऐवजीं ब्रह्मनिर्वाण पुढें आणलें. बौद्धतत्त्वज्ञानानें समाजांत जी पौरुषहीनता व नैराश्य आलें होतें तें कांहीं आचार्यांच्या तत्त्वज्ञानानें पुसलें गेलें नाहीं. अहिंसेच्या अतिरेकानें क्षात्रवृत्तीचा नाश झाला होता.

यज्ञकर्में नष्ट होऊन मूर्तिपूजेचें बंड वाढलें आणि संन्यास, निवृत्ति, यांचें जें प्रस्थ माजलें होतें, तें आचार्यांनंतर नष्ट झालें नाहीं. म्हणून पुष्कळांना असा संशय येतो कीं आचार्यांनीं बुद्धाला जिंकलें कां बुद्धानें आचार्यांना जिंकलें ?

(२७९) कोणीं कोणाला जिंकलें ? :–आचार्यांनीं पांडित्यप्रचुर वाद करून, मोठमोठे ग्रंथ लिहून बौद्धांचें खंडण केलें, हें जसें खरें आहे, तसेंच बौद्धधर्मांतील ज्या वृत्तींचा, भावनांचा व तत्त्वांचा संस्कार जनमनावर झाला होता तो त्यांना मुळींच खोडतां आला नाहीं, हेंहि तितकेंच खरें आहे. बौद्धधर्माची हिंदुस्थानांतून हकालपट्टी झाली असें म्हणण्यापेक्षां वस्तुतः बौद्धधर्मानें वैदिक धर्माला बौद्धस्वरूप करून ठेविलें असें म्हणणेंच योग्य आहे. आज जो हिंदुसमाज विद्यमान आहे, त्याला वैदिक हिंदु म्हणण्यापेक्षां बौद्ध हिंदु म्हटल्यास वावगें होणार नाहीं. सनातन वैदिक धर्मांतील प्रवृत्तिपरता, चतुर्विध पुरुषार्थांकरतां अखंड उद्योग, जगाकडे रहस्यपूर्ण दृष्टीनें पाहणें व लोकसंग्रहार्थ निष्काम कर्मयोग या वृत्ति ज्या आचार्यपूर्वकालीं मावळल्या होत्या त्या तशाच राहिल्या. संन्यास, निवृत्ति, व जगन्मिथ्यात्व यांमुळें समाजाचें ध्येय जें बदललें, तें कांहीं पुन्हां सुधारतां आलें नाहीं. मोक्षाच्या एकदेशीय तत्त्वज्ञानानें समष्टिधर्म पूर्ण नाहींसा झाला व व्यष्टिधर्म बळावला. तसेंच वैदिक देवता, वैदिक भाषा व वैदिक तत्त्वज्ञान हींहि या झपाट्यांत चुरडलीं गेलीं. लोक आपल्या नवीन देवतांना मान देऊं लागले. हिंसाप्रधान यज्ञ क्वचित् होत असत, पण ते नवीन देवतांना उद्देशून होऊं लागले. यज्ञकर्मांत ब्राह्मणांचें वर्चस्व असे तें पुढें यज्ञाभावीं हळूहळू कमी झालें. वैदिक देवतांना न मानणाऱ्या व त्यांची पूजा न करणाऱ्या लोकांसाठीं नवीन दैवतकल्पनांना अनुसरून नवीन वाङ्मय बनवावें लागलें. मात्र असें करितांना ऐतिहासिक व तात्त्विक दृष्टि नष्ट झाली व नुसतें काव्यस्वरूप आलें. वैदिक व स्मार्त संस्कृति नष्ट होऊन केवळ पौराणसंस्कृतीच्या साधनानेंच सर्व समाजावर छाप पाडतां आली. त्यामुळें फारच थोड्या लोकांना वैदिकसरस्वतीचा ओघ थोडासा कायम ठेवितां आला. सारांश, बौद्धधर्माशीं झुंज देतां देतां आपलाच जय झाला इतकें सांगण्यापुरता वैदिक धर्म राहिला. हा जय म्हणजे पानपतच्या लढाईंत अबदालीला मिळालेल्या जयासारखाच होता.

(२८०) मायावाद व राष्ट्रनाशः—श्रीमत् शंकराचार्यांच्या मायावादानें राष्ट्रनाश केला, असा जो एक अपसमज आहे, त्याचें निराकरण केलें पाहिजे. हा मायावाद आचार्यांनीं काढलेला नाहीं. ईशावास्योपनिषद मंत्र १५, छांदोग्य ६–१–४, कठोपनिषद प्र. १ मं. १६, श्वेताश्वेतर उपनिषद् आणि भगवद्गीता अ. ७ श्लो. १४ इतक्या ठिकाणीं मायावाद स्वीकारलेला आहे. आचार्यांनीं जगत् हें मिथ्या म्हणजे शून्य, अभावरूप असें सांगितलें नसून तें अनिर्वचनीय आहे असें सांगितलें. ब्रह्मसापेक्ष जगत् हें मिथ्या म्हणजे परिवर्तनशील आहे असा त्यांचा सिद्धांत असल्यामुळें व्यवहार व परमार्थ यांचा घोटाळा आचार्यांनीं केलेला नाहीं, तो लोकांनीं केलेला आहे. सत्य व अनृत यांनीं भरलेल्या या जगाचा व्यवहार अव्याहत चालतो, जीवन्मुक्तालाहि हा व्यवहार सुटत नाहीं म्हणून व्यवहार व तत्त्वज्ञान यांचे प्रदेश त्यांनीं पृथक् पृथक्च ठेवले. आत्मसाक्षात्कार होईपर्यंत वैदिक व लौकिक व्यवहार चालत असतो व तो चाललाच पाहिजे, असें त्यांनीं ( इति असकृत् अवोचाम ) वारंवार सांगितलें असलेमुळें मायावादानें राष्ट्र बुडविलें हा आरोप त्यांचेवर येऊं शकत नाहीं. मायावादाचा अर्थ ज्यांना समजूं शकत नाहीं किंवा तो समजूनहि स्वतःच्या इंद्रियदौर्बल्याचें समर्थन ज्यांना मायावादानें करावयास सांपडतें, अशा मतलबी वेदांत्यांनीं, बुवांनीं आणि ढोंगी महाराजांनीं राष्ट्राचा घात केला आहे असेंच फार तर म्हणतां येतें.

(२८१) समाजाचा आदर्श–संन्यासीः—शंकराचार्यांच्या पश्चात् मध्वाचार्य, रामानुजाचार्य, वल्लभाचार्य, रामानंद, चैतन्य इत्यादि आचार्य भक्तिमार्गी साधु झाले. हे सर्व वैदिक होते. यांच्या द्वैत, अद्वैत, विशिष्टाद्वैत, शुद्धाद्वैत इत्यादि तत्त्वज्ञानाच्या वादांनीं जगन्मिथ्यात्ववादावर पुष्कळ आघात केले, पण तो वाद सर्वांशानें नष्ट झाला नाहीं. हे आचार्य जगद्गुरु व मोक्षगुरु या नात्यानें लोकांत वावरूं लागल्यामुळें बुद्धकालीन भिक्षूंप्रमाणें संन्याशांचें वैभव वाढलें आणि संन्यासी हा समाजाचा आदर्श बनला. आचार्यपूर्वकालीं भिक्षु व दुःखविलयात्मक तत्त्वज्ञान हे आदर्श पुढें ठेवून समाजाच्या हालचाली होत होत्या. आचार्यांच्यानंतर त्या हालचाली निवृत्ति, संन्यास व द्वैताद्वैतादि एखादें तत्त्वज्ञान या ध्येयानें होऊं लागल्या. संन्याशांचे, आचार्यांचे मठ, उपमठ स्थापन झाले, भिक्षूंचे विहार गेले

व त्यांच्या जागीं आचार्यांचे व संन्याशांचे मठ स्थापन झाले. बुद्धभिक्षूंमध्यें जसे भेद पडले होते, तसेच संन्याशांमध्येंहि कुटीचक, बहूदक, हंस, परमहंस, तुरियातीत व अवधूत असे भेद पडले. वैदिक कर्मयोगी गृहस्थाश्रमाचें ध्येय जें बौद्ध भिक्षूंनीं नष्ट केलें त्याचा उठाव या पीठस्थ संन्यासी आचार्यांना व त्यानंतर झालेल्या साधुसंतांनाहि करतां आला नाहीं. समाजाचें ध्येय मोक्ष व त्याचा आदर्श संन्यासी यांनीं लोकांच्या मनाची पक्कड घेतली. मोक्ष, दुःखविलय, अपूर्व, तपस्या याला भाव आला. व्यक्तीचें परमसुख मोक्ष, तो प्रत्येकाचा सुटा, त्याला दुसऱ्याची जरूर नाहीं अशी कल्पना बळावली. समाजाची सुरवात दोन माणसांपासून होते. 'एकस्तपेत् द्वयोरध्ययनम्' म्हणजे तप एकट्यानेंच करावें. पण अध्ययनाला दोन लागतात. प्रपंचाला सुरवात दोहोंपासून होते. तेथें 'सह नाववतु सहि नौ भुनक्तु' 'संगच्छध्वं संवधध्वं' अशा समाजधर्मांची आवश्यकता असते. सहकार्य, संभाषण, संभोजन याची आवश्यकता संन्याशाला नसते. अहिंसा, सत्य, अस्तेयादि नीतितत्त्वांतील तारतम्य संन्याशाला ठेवण्याचें कारण पडत नाहीं. कारण संन्यासी हा अपरिग्रही आणि उपाधीपासून विमुक्त असतो. सत्य, अहिंसादींचें निर्भेळपणें आचरण करून कांहीं झालें तरी प्रतिकार करावयाचा नाहीं असे विचार पुढें येतात. स्वप्नांतहि खरें बोलावें, स्वप्नांत दिलेलें वचन पुरें करून दाखवावें, स्वस्त्रीवरहि कोणी आक्रमण करूं लागला तरी वृत्ति शांत ठेवून पूर्ण अहिंसा पाळावी, म्हणजे आक्रमकाला उपरति होते व आपण स्वर्गांत जातों, असल्या या बेभान व एकांगी कल्पनांमुळें राष्ट्रहित व समाजहित म्हणून कांहीं आहे याची कल्पनाहि राहात नाहीं. अती तेथें माती याप्रमाणें हिंदुसंस्कृतीमध्यें कोणत्याहि गोष्टीचा अतिरेक करण्याची जी कल्पना शिरली त्याचें कारण समष्टिधर्मांचा अभाव व मोक्षकल्पनेला प्राधान्य हें होय. पारमार्थिक उच्च आदर्श म्हणून संन्यास ही संस्था आवश्यक असली तरी तिचा अतिरेक केव्हांहि अनिष्टच होय. मुंडी, मस्करी वगैरे उपहासास्पद शब्दहि त्या अतिरेकाचेच निदर्शक होत. आचार्योत्तर कालांत त्या संन्यासाचें विडंबन चालू झालें.

—*—

## प्रकरण पंधरावें

# साधुसंतांची कामगिरी

बुद्धोत्तर कालांत जे चार अतिरेक उत्पन्न झाले, त्यांतील निवृत्तिपर परंपरेचा विचार आपण करीत आहोंत. मीमांसकांनीं कर्मयोग आणला नाहीं, तर कर्माला एक आंधळें अपूर्व चिकटविलें. शंकराचार्यांनीं संन्यास व जगन्मिथ्यात्व यांचें महत्त्व प्रतिपादन केलें. जैनांचा स्याद्वाद, बुद्धाचा शून्यवाद व दुःखवाद, मीमांसकांचें अपूर्व, आचार्यांचा संन्यास आणि साधुसंतांची भक्ति हे सर्व निवृत्तिमार्गांतील एकेक टप्पेच आहेत. या परंपरेंतील शेवटचे प्रचारक साधुसंत हे होत. चार आचार्यांनंतर महाराष्ट्रांतच नव्हे तर सबंध भरतखंडभर भक्तिमार्गाचें महत्त्व फारच वाढलें. बंगाल, आंध्र, पंजाब, अशा सर्व भागांत त्याकाळीं भक्तिमार्गानें उचल केली. तामीळ देशांत बारा आळवार म्हणजे बारा प्रसिद्ध वैष्णव भक्तिमार्गांचे पुरस्कर्ते होऊन गेले. त्यापैकीं नम्माळवार, तिरुज्ञानसंबंदर, ज्ञानसंबंदर, अप्पर, संबंदर व अप्पर, सुंदरमूर्ति, माणिक्कवासहर, तिरुमुल्लर, प्रेममूर्तिनंद हे प्रमुख होत. महाराष्ट्रांत आदि कवि मुकुंदराज, मत्स्येंद्र-नाथादि नवनाथ, निवृत्तिज्ञानेश्वरादि हीं चार भांवडें, नामदेव, परिसा-भागवत, गोराकुंभार, विसोबा खेचर, जनाबाई, चांगदेव, सच्चिदानंदबाबा, कानु पाठक, सेना न्हावी, नरहरी सोनार, सावता माळी, जगमित्र नागा, जोगा परमानंद, चोखा मेळा, रोहिदास चांभार, श्रीएकनाथ, मुक्तेश्वर, तुकाराम, निळोबा इत्यादि सत्पुरुष होऊन गेले. या साधुसंतांनीं तत्तत्कालीन परिस्थितींत भक्तिमार्गानें स्वभाषेच्या द्वारें पांडित्याशीं अपरिचित अशा हिंदु-समाजाला जीवन दिलें आणि त्याच्या आत्म्याचें म्हणजे त्याच्या संस्कृतीचें रक्षण केलें. साधुसंतांनीं हिंदुसमाजाला हिंदुत्वांत ठेवण्याचें मोठें कार्य केलें तथापि त्यांच्या एकांगी भक्तीमुळें हिंदुसंस्कृतीमध्यें कोणते दोष शिरले याचा विचार येथें कर्तव्य आहे.

(२८२) रामानंदः—ज्ञानेश्वरापासून तों तुकारामापर्यंत जे शेकडों साधुसंत त्या चारशें वर्षांत उत्पन्न झाले, त्यांनीं केलेल्या कार्याचा येथें

आढावा घ्यावयाचा आहे. या सर्व साधुसंतांचे ज्ञानेश्वर, एकनाथ, तुकाराम आणि रामदास आणि त्यांचे समकालीन साधुसंत असे चार प्रमुख वर्ग पडतात. श्रीसमर्थांविषयीं पुढील प्रकरणांत स्वातंत्र्यानें विचार केला आहे. म्हणून त्यांचें कार्य सोडून इतरांचें कार्य प्रस्तुत पहावयाचें आहे.

ज्ञानेश्वर आणि त्यांचे समकालीन नामदेवादि संत हे सर्व स्वराज्यांतच वावरत होते. म्लेंच्छ-आक्रमणाचे चटके यांना बसले नव्हते. ज्ञानेश्वरांच्या पश्चात् म्लेंच्छांचें आक्रमण झालें. ज्ञानेश्वरकालीं यदुवंशाला भूषणभूत असणारा राजा रामदेवराव यादव हा थोर राजा न्यायानें क्षितीचें पालन करीत होता. अशा या न्यायी राजाच्या स्वराज्यामध्यें ज्ञानेश्वरांना हिंदु-समाजाकरितां धार्मिक क्षेत्रांत मोठें कार्य करावें लागलें. ज्ञानेश्वरांचे वडील विठ्ठलपंत हे रामानंदांचे शिष्य होते. रामानंदांच्या क्रांतिकारक शिकवणीचा वडिलांचेद्वारा ज्ञानेश्वरांचे मनावर परिणाम झाला असला पाहिजे. रामानंद हा मोठा क्रांतिकारक होता. त्यानें वर्णभेदाचा कटाक्ष मोक्षमार्गांतून काढून टाकला. कबीरासारख्या मुसलमानाला ब्रह्मोपदेश करून रामानंदानें त्याला आपला शिष्य बनविलें. आणि मोक्षाच्या क्षेत्रांत वर्ण, जाति, पंथ यांचा संबंध नाहीं असें सिद्ध केलें. साधुसंतांच्या भागवत धर्मांतहि मोक्षाच्या क्षेत्रांत अशीच समता आहे हें पुढील विवेचनावरून दिसेलच.

(२८३) आद्य महाराष्ट्र-विद्यापीठः—ज्ञानेश्वरपूर्वकालीं हिंदु-धर्माचे सर्व ग्रंथ विशेषतः ब्रह्मविद्या ही सर्व संस्कृतमध्यें होती. पण ज्ञानेश्वर ज्या नाथसांप्रदायामध्यें शिष्यत्वानें प्रसिद्धीला पावले त्या संप्रदायांत मात्र कांहीं पूर्व-आचार्यांनीं ब्रह्मविद्येचा उपदेश देशभाषेमध्यें केला असल्याचें दिसून येतें. तीच परंपरा ज्ञानेश्वरांनीं पुढें चालू केली. ब्रह्मविद्यानिरूपण बव्हंशीं संस्कृत भाषेच्या द्वारेंच निरूपल्यामुळें सामान्य जनांना ती दुर्मिळ होती. कर्मठ पंडितांशीं झगडून संस्कृतांतील ज्ञान मराठींत आणण्याचें कार्य आपल्या पूर्व संप्रदायानुसार ज्ञानेश्वरांनीं अटीतटीनें केलें. संस्कृत-भाषा ही श्रेष्ठ आहे, मराठींत ब्रह्मविद्या आणतां येणार नाहीं, अशा समजाला ज्ञानेश्वरांनीं ‘ माझा मराठा बोल कौतुकें । अमृतातें पैजा जिंके ’ असें म्हणून चोख उत्तर दिलें. आणि ‘ इये मराठीचिये नगरीं । ब्रह्म विद्येचा सुकाळु करी ’ असें म्हणून ब्रह्मविद्येची मराठींत लयलूट केली.

अवघ्या सोळाव्या वर्षी ज्ञानेश्वरांनीं ज्ञानेश्वरीसारखा श्रेष्ठ ग्रंथ लिहिला, त्यावरून त्यांचें लोकोत्तरत्व दिसून येतें. ज्ञानेश्वरासारखा उपजत ज्ञानी, सिद्धप्रज्ञ, लोकोत्तर पुरुष उत्पन्न झाला म्हणूनच सनातनी पंडितांविरुद्ध बंड करून भक्तिमार्गानें मीमांसकांच्या एकांगी कर्मठपणाला पुष्कळ आळा बसला आणि संस्कृतांत गुरफटून बसलेलें ब्रह्मज्ञान मराठींत येऊन तें सर्वांना सुलभ झालें. ज्ञानेश्वरानंतर मोठा विद्वान् व कर्तृत्ववान् सत्पुरुष म्हणजे एकनाथ होय! ज्ञानेश्वरांनीं जसा गीतेचा भाव शुद्ध मराठींत सांगितला तसाच एकनाथांनीं भागवतांतील एकादशस्कंधाचा अध्यात्मविषय समाजाला सुलभ केला. एकनाथांनासुद्धां जुन्या पंडितांशीं भांडावेंच लागलें. 'संस्कृत भाषा ही देवाची आणि प्राकृत ही काय चोराची,' असे प्रश्न करून त्यांना चुप बसवावें लागलें. सनातनीपंडितांकडून या दोघांचा त्यांनीं पूर्व परंपरा सोडली म्हणून छळ झाला, तुकारामहि हीन जातीचा असून प्राकृतांत वेदांत सांगतो म्हणून रामश्वेरादिभट्टांनीं त्याचा छळ करण्यास कमी केलें नाहीं. पंडितपक्षीयांच्या सर्व छळाला न जुमानतां साधुसंतांनीं सामान्यजनाकरितां जें ब्रह्मविद्येवर मराठी वाङ्मय निर्माण केलें, तेंच आद्य महाराष्ट्र–विद्यापीठ होय! स्वराज्यांत बहुजन समाजाला हें ज्ञान मिळावें म्हणून ज्ञानेश्वराचा पहिला यत्न झाला तर पुढें यावनी सत्तेच्या आक्रमणामुळें स्वधर्म व स्वसंस्कृति यांचा अभिमान जाग्रत राहावा म्हणून स्वभाषेच्या द्वारां अध्यात्माचें आणि स्वसंस्कृतीचें शिक्षण हिंदुसमाजाला देण्याकरितां अशा यत्नाची आवश्यकताच होती. ज्ञानेश्वरकालीं वर्णाश्रम धर्मसंस्था होती. म्हणून स्वधर्मरूपी यज्ञाचें अखंड यजन करा, देवतांतरांना न भजतां व्रत, नियम न करतां, शरिरातें न दंडितां स्वधर्मानुष्ठानच करावें. विहित कर्मांचें अनुष्ठान करून त्याच कुसुमानें सर्वात्मक परमेश्वराचें पूजन करावें असें ज्ञानेश्वरींत उत्तम प्रकारें सांगितलें आहे. स्वधर्मानुष्ठानाप्रमाणेंच गीतेंतील निष्काम कर्मयोगाचें विवेचन गीतारहस्यापूर्वी ज्ञानेश्वरींतच आलेलें आहे. तें उपमादृष्टांतादीनीं युक्त, हृदयस्पर्शी आणि तर्काला पटणारें असें आहे.

**(२८४) समानतेची घोषणा:–** ज्ञानेश्वरपूर्वकालीन परंपरा त्रैवर्णिकांनाच वेदाचा अधिकार आणि मोक्षाचाहि त्यांनाच अधिकार अशी होती. श्रीमत् शंकराचार्यांनीं शूद्रहि मोक्षाधिकारी आहे असें धर्मव्याधादींची

उदाहरणें देऊन सिद्ध केलें. पण अतिशूद्र, अंत्यज, पापी, दुराचारी, स्त्रिया अशा सर्वांना मोक्षप्राप्ति होते, ईश्वराच्या घरीं वर्ण, जाति, उच्च, नीच, स्पृश्य, अस्पृश्य असा कोणताहि भेद नाहीं, तो सर्वांचा उद्धार करतो, अशा तऱ्हेची समतेची घोषणा पूर्वीं रामानुजाचार्यांनीं जरी केली होती तरी तिचा अधिक प्रचार ज्ञानेश्वरांनींच केला ! त्याकरितां त्यांनीं वेदाला कृपण ठरविलें आणि गीतेचा गौरव केला. वेदांतील ही उणीव भरून काढण्याकरितां परमेश्वरानें गीता सांगितली आणि पापयोनि अंत्यजादि दुराचारीसुद्धां उद्धरून जातो असें तत्त्व धिटाईनें प्रतिपादिलें. स्त्रिया शूद्र, मोक्षाधिकारी नाहींत अशा पूर्वशांकरसांप्रदायी समजाला त्यांनीं धक्का दिला. ईश्वराच्या घरीं 'येथ भक्ति एकसरे । जाती अप्रमाण' भक्तीला महत्त्व आहे, जातीला महत्त्व नाहीं. 'तुका म्हणे जाती । हो का तयाची भलती' या सिद्धांतानें त्या काळीं मोठी क्रांति केली. सर्व जातींचे, धंद्यांचे आणि पंथांचे लोक एका निशाणा-खालीं गोळा झाले. नामदेव शिंपी, सावता माळी, गोरा कुंभार, नरहरि सोनार, सेना न्हावी, चोखामेळा महार, रोहिदास चांभार अशा सर्व जातींतून शेकडों साधुसंत उत्पन्न झाल्यामुळें धर्माविषयीं अभिमान उत्पन्न झाला. तत्त्व-ज्ञानाचें समाधान लाभलें आणि समाजांत एक प्रकारची समानता आली.

(२८५) **संत व पंडित यांची झुंजः**—ज्ञानेश्वरपूर्वकालीन परंपरेंत योगयाग, जपजाप्य, व्रतें वैकल्यें, नेमधर्म, संन्यास यांचें महत्त्व फार होतें. त्यामुळें कर्मठपणा आणि भिक्षुकी यांचेंहि बंड बरेंचसें होतें. ज्ञानेश्वरादि संतांनीं ईश्वरप्राप्त्यर्थ या अशा खटाटोपाची मुळींच जरुरी नाहीं. भक्तीच्या सोपा-नानें, शुद्ध अंःतकरणानें, श्रद्धेनें, प्रपंचांत राहूनच ईश्वरप्राप्ति होते असें सांगितलें. त्यामुळें सनातनीपंडितवर्ग अगदीं हादरून गेला ! पंडितांची दृष्टि पूर्वपरंपरेकडे होती, तर साधुसंतांची दृष्टि जनतेकडे होती. यावनी सत्तेच्या कहरामुळें होरपळलेली जनता हाय हाय करीत आहे असें पाहून तिला जीवन देण्याकरितां संतांनीं धडपड केली. संतांचें पीठ पंढरी तर पंडितांचें पीठ पैठण होतें. या उभयतांत कांहीं काळ झुंज लागली, शेवटीं ते पंडित पराभूत झाले. परमेश्वर हा उदात्त, परम कारुणिक, भक्तवत्सल, दीनोद्धारक आहे. तो परमभक्ताकरितां पाहिजे तें करतो. त्याला सर्व भावानें शरण जावें. अत्यंत श्रद्धेनें यत्न करावा, असें तत्त्व या साधुसंतांनीं

सांगितल्यामुळें आणि तें लोकांना समजल्यामुळें कोणी तरी परम कृपाळु त्राता आपला आहे असा विश्वास जनतेमध्यें उत्पन्न झाला. ज्ञानेश्वरादि साधुसंतांनीं ईश्वरभक्ति व नामस्मरण यांच्या साधनानें म्लेंच्छमय होणाऱ्या समाजास थोपवून धरलें. त्याच्या ठिकाणीं स्वधर्म, नीतिमत्ता व संस्कृति यांचा अभिमान उत्पन्न करून त्यांच्या हिंदुत्वाची कशी जोपासना केली याचें अत्यंत उत्कृष्ट विवेचन इतिहासाचार्य राजवाडे यांच्याच शद्बांत देतों.

**(२८६) भक्तिमार्गाचें कार्यः**–" भक्तिधर्म हा व्यक्तीचा मोक्षधर्म आहे. तो मिळविण्यासाठीं महाराष्ट्रांतील व्यक्ति भक्तिपंथांत व्यक्ति या नात्यानें शिरल्या, समष्टि ह्या नात्यानें शिरल्या नाहींत ! चातुर्वर्ण्यसमाजरचनेंत वर्णाश्रमधर्मरज्जूंनींच तेवढें समष्टिस्वरूप शक्य केलें आहे. वर्णाश्रमधर्म शिथिल झाल्यामुळें, प्रत्येक मनुष्य केवळ व्यक्ति ह्या एकाच नात्यानें मोक्षाकडे भक्तिमार्गानें जाऊं लागला. ती भक्ति कृष्ण, दत्त, स्कंद या हिंदु दैवतांची असल्याकारणानें तो मनुष्य हिंदुत्वांत जसा गणला जाई, तसेंच राज्यकर्ते जे म्लेंच्छ लोक त्यांच्या जुलमास व अवहेलनेस पात्र होई. हा जुलूम व अवहेलना केवळ भक्तिमार्गानें नाहींशी होण्यासारखी नव्हती. भक्तिमार्ग हा सशस्त्र प्रतिकाराचा तर नव्हेच, पण अशस्त्र प्रतिकाराचाहि मार्ग नाहीं. प्रतिकार म्हणजे प्रवृत्ति. ती निवृत्त्येकप्रधान भक्तीच्या अगदीं उलट. तेव्हां तामस प्रवृत्त्येकप्रधान जे म्लेंच्छ राज्यकर्ते त्यांच्या छलास महाराष्ट्रांतील भक्तव्यक्ति दिवसेंदिवस जास्त पात्र होऊं लागली. प्रत्येक भक्तव्यक्ति हिंदुत्वांत राहिली; जर भरतखंडांत व महाराष्ट्रांत त्याकालीं भक्तिमार्ग नसता, तर अफगाणिस्तान, इराण वगैरे देशांतल्याप्रमाणें ह्या देशांतील सर्व प्रजा एकवर्णी मुसलमान झाली असती. "

( राजवाडे ले. सं. भाग तीन पान १११ )

" ज्ञानेश्वरमहाराजांपासून एकनाथमहाराजांपर्यंतचे जे साधुसंत झाले, त्यांनीं महाराष्ट्रांतील लोक हिंदुत्वांत राखिले, ही तर अजब कर्तबगारी खरीच. ह्या कर्तबगारीहूनहि एका अजब कर्तबगारीचें वर्णन आतां करावयाचें आहे. वर्णाश्रमधर्म मोडणें म्हणजेच कलियुग होणें आहे–व तो पुन्हां प्रचलित होतो, म्हणजेच इतर युगांची स्थापना होते; अशा उत्तम युगाचा प्रचार करण्याचा थोर पुरुषांनीं शिवकालीं प्रयत्न केला. नाम-

स्मरणानें देवाची ओळख होते, ओळख वाढल्यानें भक्ति उत्पन्न होते, नवविध भक्तीनें आचारशुद्धि व भारतकथाज्ञान होतें, आणि ज्ञानानें आपण कोण, आपला धर्म काय, आपली प्रस्तुत स्थिति काय व आपण झालें पाहिजे काय ह्याची जाणीव निर्माण होते. हा परंपरित प्रकार भक्तिमार्गानें महाराष्ट्रांतील लोकांत प्रादुर्भूत झाला होता. वर्णाश्रमधर्म लोपलेला आहे; फक्त नांवाचे ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य राहिलेले आहेत, राजा क्षत्रिय नाहीं; ब्राह्मण षट्कर्मकर्ते नसून निव्वळ वृषल बनले आहेत, अशी प्रतीति साधुसंतांप्रमाणेंच सामान्य जनांची झाली...भक्तिमार्गानें आचारशुद्धि, चित्तशुद्धि, व पूर्वेतिहासज्ञान झालें. आणि स्वधर्म व स्वसंस्कृति या संस्थांकडे लोकांचें लक्ष वळलें. त्यांचे रक्षक आपण बनावें अशी जिज्ञासा समाजामध्यें उत्पन्न झाली तो मार्ग पुढें श्रीरामदासांनीं दाखविला."

( राजवाडे लेखसंग्रह भाग ३ पान १११-१२ )

**(२८७) संतांचे महदुपकारः**—" अठरा पगड जातींचे लोक ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य व शूद्र स्वधर्मभ्रष्ट झाले असतां, बहुतेक मुसलमान बनल्यासारखेच झाले. इतकेंच कीं, त्यांनीं सुंतेची दीक्षा मात्र घेतली नाहीं. तीहि त्यांनीं घेतली असती. परंतु त्यांच्या आड एक मोठी घोंड आली. ती घोंड महाराष्ट्रांतील साधु व संत हे होत. भांडणें, तंटे, अपेयपान, अभक्ष्यभक्षण ह्यांचें साम्राज्य सर्वत्र माजलेलें पाहून, बजबजपुरी कांहींतरी ताळ्यावर यावी, या सद्धेतूनें साधुसंतांनीं सर्वांना सहजगम्य व सुलभ असा भक्तिमार्ग सुरू केला. धर्मज्ञान लोपलें होतें. विधिनिषेधाची प्रतिष्ठा राहिली नव्हती. प्रायश्चित्तास कोणी पुसत नव्हतें. अशी सर्व प्रजा वृषलवत् अथवा बहुतेक म्लेंच्छवत् बनली होती. ही प्रजा सनातन धर्माला, आर्यसंस्कृतीला सोडून जावयाच्या पंथास लागली होती. बरेच लोक सोडून गेलेहि होते. बाकी राहिलेल्या लोकांचा मगदूर पाहून साधुसंतांनीं परम कारुण्यबुद्धीनें भक्तिमार्ग सुरू केला. अशा सद्धेतूनें कीं कसेंहि करून हे लोक हिंदुत्वांत रहावे आणि अशा सदाशेनें कीं, पुढेंमागें कोणी लोकोत्तर अवतारी पुरुष निघालाच तर त्याच्या द्वारां हे लोक पुनः धर्मकर्मनिष्ठ बनण्याचा संभव रहावा..."

"...मुमुक्षु नामस्मरणानें आकृष्ट झाला म्हणजे साधुसंत त्याला नवविधा भक्तीची माहिती देत. त्यांत शुचिर्भूतपणानें रहावें कसें, सत्य-

अहिंसादि साधारण धर्म पाळावे कसे, सर्वांभूतांचे ठायीं समबुद्धि ठेवावी कशी, वगैरे हिंदुधर्मशास्त्रांतील विधिनिषेधांची ओळख त्याला दिली जाई. कुलधर्म, जातिधर्म व पितृधर्म पाळण्यांत पुण्य आहे, एवढेंच सांगितलें जाई. अशा रीतीनें ह्या भक्तिमार्गाच्या द्वारां साधुसंतांनीं ही महाराष्ट्रांतील दुर्दैवी प्रजा दोन अडीचशें वर्षें आर्यसमाजांत मोठ्या शिताफीनें थोपवून धरिली, व आर्यसंस्कृतीचें संरक्षण केलें. तेव्हां **आपल्या ह्या देशावर ह्यांचे उपकार बिनमोल झाले ह्यांत काडीचाहि संशय नाहीं.**"

(राजवाडे ले. सं. भाग ३ पान १०९-११०)

(२८८) **दुःखवादाचें समर्थनः**—ज्ञानेश्वरपूर्वकालापासून चालत आलेल्या बुद्धाच्या दुःखवादाची परंपरा ज्ञानेश्वरांनीं तशीच चालू ठेवली. ज्ञानेश्वरी अध्याय ९ मध्यें संसाराच्या दुःखमयतेचें जें रसभरित वर्णन आहे त्यावरून ज्ञानेश्वरावर दुःखवादाची छाप चांगलीच पडलेली दिसते. ज्ञानेश्वरकालीं यवनकृत अनन्वित प्रकार नव्हते. न्यायानें चालणारें स्वराज्य होतें; तरीसुद्धां प्रपंचाची असारता इतकी वर्णन केली आहे कीं अशा या दुःखमय जगताचा त्याग करून भक्तिमार्गासच वाचकानें लागावें! प्रपंच आणि जगत् दुःखमय आणि पूर्ण स्वराज्यांतसुद्धां जर समाजांत स्वास्थ्य नाहीं तर या जगाविषयीं आस्था कां धरावी अशी साहजिकच उदासीनतेची वृत्ति निर्माण झाली. त्यामुळें निवृत्तिपरता, प्रपंचविमुखता आणि समाज व राष्ट्र यांविषयीं औदासीन्य राष्ट्रांत उत्पन्न झालें. ज्ञानेश्वरोत्तर तुकारामापर्यंत सर्व साधुसंतांनीं 'सुख पाहातां जवापाडें । दुःख पर्वताएवढें" असेंच वर्णन केलेलें आहे. त्याचा परिणाम राष्ट्रिय दृष्ट्या कसा अनिष्ट झाला हें इतिहासाचार्य राजवाडे यांच्या पुढील उताऱ्यावरून ध्यानीं येईल.

"तात्पर्य, ममत्व व ममताभाव, अहंता व अहंताभाव, मृतत्व व अमृतत्व अशा परस्परविरुद्ध स्थितिप्रत ही मंडळी जाऊन पोचलीं. अशांचें तत्त्वज्ञान जसें प्रपंचाला तसेंच परमार्थालाहि परम बाधक होय. ह्यांना प्रपंचहि नाहीं व परमार्थहि नाहीं. कारण परमार्थाला आपण जाऊन पोहोंचलों व प्रपंचाला सोडून दिलें, अशी ह्यांची भावना असते. ह्या शाखेच्या तत्त्वज्ञानाचा परिणाम महाराष्ट्रांत दोन चार वेळां झालेला आहे. व जेव्हां जेव्हां झाला आहे तेव्हां तेव्हां राष्ट्रत्वाचा लोप होऊन गेला आहे.

जीवन्मुक्त, संन्यस्त व विरक्त ह्यांनीं प्रपंच सोडलेलाच असतो, तेव्हां त्यांची कांहीं हानी व्हावयाची राहिलीच नसते. ज्यांनीं प्रपंच सोडला नाहीं, त्यांची मात्र ह्या तत्त्वज्ञानानें पुरी फजिती होते. व्यक्तींचा समुदाय जो समाज किंवा राष्ट्र त्यांच्या प्रपंचाला व परमार्थमार्गाला तर हें तत्त्वज्ञान अत्यंत घातक असतें. समाज किंवा राष्ट्र ह्यांना समाजाचा किंवा राष्ट्राचा तिटकारा करावयास शिकविणें म्हणजे समाजाला किंवा राष्ट्राला नाशाच्या पंथासच लावणें आहे. शिवाजीच्या हत्तींना, रथांना व घोड्यांना, जनसमूहाच्या मताला धाब्यावर बसविणारा तुकाराम, ज्ञानेश्वराचाच शिष्य होय. ही ग्यानबातुकारामाची जोडी महाराष्ट्रांतील समाजाच्या व राष्ट्राच्या प्रपंचाला बहुत घातक झालेली आहे."

( राजवाडे ले. सं. भाग १ पृ. ३४१ )

(२८९) श्रीएकनाथः–ज्ञानेश्वरसमकालीन संतानंतर मोठा क्रांतिकारक संत म्हणजे श्रीएकनाथ होय. सहनशीलता, अस्पृश्योद्धार आणि ग्रंथरचना अशा सर्व दृष्टींनीं एकनाथचरित्र लोकोत्तरच आहे. एकनाथी भारुडामध्यें जे अनेक धंदे करणाऱ्यांचें रूपकात्मक पारमार्थिक भाषेंत बारकाईनें वर्णन केलेलें आहे त्यावरून त्यांची चतुरस्रता दिसून येते. श्रीएकनाथकालीं यावनी सत्तेचा प्रभाव दिसूं लागला होता. ग्रंथ जाळणें, देवालयें फोडणें, ब्राह्मणांना ठार करणें, हिंदूंचे हालहाल करून त्यांना बाटविणें, हाणमार व लुटालूट करून जनतेला 'त्राहि भगवन्' करून सोडणें, असे सर्व प्रकार चालत (भावेकृत महाराष्ट्र सारस्वत पा.९२–९३).

एकनाथांनीं हे सर्व प्रकार पाहून त्यांचा प्रतिकार करण्याचाहि यत्न केलेला दिसतो. एका हिंदु व तुर्क संवादांत "खुदा माना पश्चिमेकडे। येर अवघें कां ओस पडे?" "पांच वख्त खुदाचे झाले। बाकी वख्त काय चोरीं नेले?" "आम्हासी म्हणतां पूजितां फत्तरे। तुम्ही कां मुड्यावर ठेविता चिरे?" अशा कोटिक्रमानें तुर्काला पराभूत केल्याचें दाखविलें आहे. हे व या तऱ्हेचे साधुसंतांच्या वाङ्मयांत विचार असले तरी ते समुद्रांत बिंदुसारखेच होत.

(२९०) यावनी सत्ता व संतः–व्रतेंवैकल्यें, जपजाप्य, योगयाग यांचें महत्त्व कमी करण्याकरितां साधुसंतांनीं भक्तिमार्गाचें प्रतिपादन

केलें. परंतु त्या भक्तीच्या एकांगी शिकवणीमुळें समाजांत निवृत्तिपरता, उदासीनता आणि नैराश्य उत्पन्न झालें. यवनांनीं केलेल्या अनन्वित प्रकारांमुळें साधुसंतांना दुःखवादाचें रसभरित वर्णन करण्यास आयतेंच फावलें. वाङ्मयांतील हा दुःखवाद, प्रत्यक्ष व्यवहारांतील असहायता आणि यांतून तारणारा फक्त एक ईश्वर अशा या त्रयीमुळें देवावर भार घालून स्वस्थ रहावें असें वाटलें, पण यावनी सत्तेचा प्रतिकार करावा असें वाटलें नाहीं. तुकारामाच्या साडेचार हजार अभंगांमध्यें कांहीं अभंग भीक मागून राज्य मिळत नाहीं; तें त्यागानें मिळतें; प्रपंच उत्तम केला पाहिजे असे विचार मधून मधून आहेत. एके ठिकाणी अगदीं कळवळ्यानें 'काय रे देवा, काय हा अनर्थ! या दुष्टांचें दंडन करण्याची शक्ति माझे हातीं नाहीं' असे उद्गार त्यानें काढलेले आहेत. समाजांत त्याकाळीं यावनी सत्तेविरुद्ध असंतोष खूपच वाढलां होता, पण त्याला प्रतिकाराचें स्वरूप या संतांना देतां आलें नाहीं. तें कार्य पुढें महाराष्ट्रधर्माचे द्वारें रामदासांनीं केलें असें राजवाडे म्हणतात.

"ज्ञानेश्वरापासून तुकारामापर्यंत तत्त्वज्ञानात्मक स्थितीचा पगडा महाराष्ट्रावर बेसुमार बसलेला होता. त्यामुळें शास्त्रीय ज्ञानाचा मुख्य आधारस्तंभ जो इतिहास त्याचा उदय ज्ञानेश्वरापासून तुकारामापर्यंतच्या काळांत झाला नाहीं. 'ब्रह्म सत्यं जगन्मिथ्या' असें मत उराशीं बाळगणारें जें तत्त्वज्ञान त्याला जगत् जो संसार अथवा प्रपंच अथवा समाज त्याचें चरित्र जाणून घेण्यांत कोणता फायदा आहे? परब्रह्माची, विठोबाची प्राप्ति करून घेण्यांत ज्यांनीं तनु, मन व धन अर्पण केलें, त्यांना संसाराची व समाजाची वास्तपुस्त करण्याला सवडच राहाणें अशक्य आहे! ज्ञानेश्वरापासून तुकारामापर्यंत तत्त्वज्ञान हें असें इतिहासाला म्हणजे समाजाला म्हणजे प्रपंचाला सोडून होतें. अर्थात् ऐतिहासिक तत्त्वज्ञानाचा म्हणजे प्रपंच व परमार्थ ह्यांच्या एकवाक्यतेचा उदय त्याकाळीं होणें अशक्य होतें. तो उदय रामदासांच्या हस्तें झाला. धार्मिक, तात्त्विक, भक्तिमार्गी, वगैरे सर्व लोकांच्या मंडळ्या करून, म्हणजे त्यांना लोकसंग्रहाच्या यंत्रांत घालून राज्ययंत्राची निर्मिति करावी आणि धर्म, तत्त्वज्ञान व प्रपंच यांचें रक्षण करावें, असें समर्थांचें तत्त्वज्ञान होतें. प्रपंच साधूनच परमार्थाचा लाभ

होतो, हा उपदेश समर्थ पदोपदीं करीत आहेत. ह्या उपदेशाचा परिणाम त्याकालीं राष्ट्रीभवनांत झाला."

( राजवाडे लेखसंग्रह भा. १६ अ. ३५४ )

(२९१) **पराभवाचीं कारणें**:–ज्ञानेश्वरीसारख्या श्रेष्ठ ग्रंथाचे द्वारें पूर्ण स्वराज्यामध्यें स्वधर्मानुष्ठानाचें आणि निष्काम कर्मयोगाचें प्रतिपादन होत असतांना तो समाज पुढें पराभूत कां झाला असा मोठा प्रश्न आहे. देवगिरीच्या राज्यनाशाचा आणि ज्ञानेश्वरतत्त्वज्ञानाचा अर्थाअर्थी कांहीं संबंध नाहीं, काकतालीय न्यायानें ती घटना घडली, असें म्हणणें अयुक्त आहे. ज्ञानेश्वरप्रतिपादित स्वधर्ममहत्त्व हें समाजाच्या गळीं उतरलें नव्हतें असेंच म्हणावें लागतें. रामदेवराय जर क्षात्रधर्माप्रमाणें वागला असता आणि त्याचेमध्यें गाफीलपणा, घमेंड, बेपर्वाई आणि दीर्घसूचनेचा अभाव हे दोष नसते तर ऐतिहासिक घटना कांहीं निराळीच झाली असती. ज्ञानेश्वरकालीन समाजाला बौद्धभिक्षु, श्रीशंकराचार्य यांच्यापासून चालत आलेली निवृत्तिपरता आणि दुःखवादाची प्रक्रिया यांनीं पछाडलें असल्यामुळें एकंदर राज्ययंत्राबद्दल समाज उदासीनच होता. त्यामध्यें उत्साह उत्पन्न करण्याचें कार्य रामदेवादि राजांनीं न केल्यामुळें एका बाजूस जरी उत्कृष्ट विचारांचा प्रचार होत होता तरी दुसऱ्या अनेक दोषांनीं पोखरलेल्या समाजाचा पराभव क्रमप्राप्तच होता. रामदेवरावाच्या राज्यांत मानभावांचें बरेंच प्रस्थ माजलें. त्यांनीं हिंदूंचीं रुद्रलिंगें उपटून टाकलीं. या कृत्यास राजाची फूस असावी अशा समजुतीनें राज्यांतील प्रजा बिथरली आणि त्यावेळीं लोकांचा पाठिंबा राजाला न मिळाल्यामुळें तो पराभूत झाला असेंहि कांहीं अनुमान करतात. ( संस्कृति संगम पा. २५६ ).

(२९२) **सुखासीनताः**–तो मुख्य दोष म्हटला म्हणजे मराठ्यांचें सर्व लक्ष परमार्थाचे नांवावर ऐहिक उपभोग घेण्याकडे लागलेलें होतें हा होय. सुखैकपरायणता आणि विलासनिमग्नता यामुळें मराठ्यांना कष्टप्रचुर मर्दुमकीचे, यातायातीचे, लष्करी व इतर धंदे करण्यास फुरसत नव्हती. तेराव्या शतकांत ज्यानें शिवाजीसारखा पराक्रम गाजविला त्या सिंघण यादवाला मरून पन्नास वर्षें होत नाहींत तोंच मुसलमानांकडून मराठ्यांचा

पराभव होतो !! याचें कारण सिंघणाच्या विजयानें लोक अत्यंत धनसंपन्न झाले होते आणि तें धन व्रताप्रीत्यर्थ खर्च करीत बसले होते. हेमाद्रीच्या चतुर्वर्गचिंतामणि या ग्रंथांतील दोन हजार व्रतें पाहिलीं म्हणजे व्रतें करणें, पक्वान्नें झोडणें याशिवाय लोकांना कामच राहिलें नव्हतें असें दिसतें. अशा या उपभोगपरायण समाजाचा बुभुक्षु, निर्धन, साहसी, रानटी लोकांनीं पराभव करावा यांत आश्चर्य नाहीं. पराक्रम, हत्यार, व्यूहरचना, संस्कृति, कला अशा सर्व विषयांत मराठे हे मुसलमानांपेक्षां कांकणभर श्रेष्ठ असतांना त्यांचा पराभव मुसलमानांनीं करण्याचें कारण इतिहासाचार्य राजवाडे यांनीं आठव्या खंडाच्या प्रस्तावनेंत जें वरीलप्रमाणें सांगितलें आहे तें सत्य अंशतः असलें तरी त्याला आणखी एक बाजू आहे.

हेमाद्रीनें दोन हजार व्रतें जरी सांगितलीं असलीं आणि त्याच्या शेवटीं दान व भोजनाचें महत्त्व गायिलें असलें तथापि हीं सर्व व्रतें प्रत्येक माणसानें व प्रत्येक क्षत्रिय राजानें करावींत असें त्यानें सांगितलें नाहीं. एवढ्या प्रचंड हिंदुस्थानांत आणि तेथें असणाऱ्या अफाट हिंदुसमाजाकरितां दोन हजार व्रतें सांगितलीं म्हणून कांहीं मोठेसें बिघडत नाहीं. तारतम्यानें तीं कोणी, कोठें, केव्हां व किती करावयाचीं हा मुख्य प्रश्न आहे. तें तारतम्य सुटलें होतें, विलासमग्नता आली होती, आणि सुखासीन समाजामध्यें जे दोष येतात, ते सर्व शिरले होते व त्यामुळें हिंदुसंस्कृतीचा पराभव झाला असें म्हणणें भाग पडतें.

साधुसंतांच्या या भक्तीमुळें व त्यापूर्वींच्या परंपरेमुळें हिंदुसमाजाचा स्वभाव कसा बनला व साधु हेंच समाजाचें ध्येय झाल्यामुळें हिंदुसंस्कृतींत कोणते दोष शिरले हें सांगून हें प्रकरण संपवितों.

(२९३) **हिंदुसमाजाचा स्वभावः**–हिंदुसमाज, मुक्तद्वारी, तुटक, संन्यस्त व उदासीन, असा आहे. त्याचीं कारणें निरनिराळीं आहेत. बुद्धाच्या दुःखवादाच्या पकडीनें या दुःखमय जगतांत कोणी आलें काय, गेलें काय, आला तर त्यानें खुशाल यावें व या दुःखांत लोळावें. राष्ट्राभिमान पाहिजे कशाला ? या कल्पनेनें हिंदुसमाज मुक्तद्वारी बनला आहे. ब्रह्म सत्य व जग मिथ्या या तत्त्वज्ञानाचें पर्यवसान तुटक व संन्यस्तवृत्तींत

झालें. कारण या वृत्ति जितक्या जाज्वल्य तितका मोक्ष जवळ अशी कल्पना आहे. साधुसंतांच्या भक्तींत एका ईश्वराशिवाय इतर कशाचीहि परवा करण्याचें कारण नव्हतें म्हणून समाजामध्यें उदासीनता आली. समष्टि-धर्मापेक्षां व्यष्टिधर्माला फार तेजी आली व वैय्यक्तिक सुखाच्या म्हणजे स्वार्थाच्या एकांगी, संकुचित व अवास्तव कल्पना रूढ झाल्या. व्यष्टिधर्म जवळ जवळ इतका बळावला आहे कीं त्यानें समष्टिधर्माला नाहींसेंच केलेलें आहे. परमार्थ म्हणजे वैय्यक्तिक मोठा स्वार्थ. तो साधण्याकरितां समाज व राष्ट्र याकडे दुर्लक्ष केलें तरी चालतें. पारमार्थिक स्वार्थावरून खालीं यावयाचें म्हणजे वैय्यक्तिक स्वार्थासाठीं राष्ट्राचें भयंकर नुकसान करण्यासहि कांहीं वाटत नाहीं. समष्टिधर्माचा अभाव व पारमार्थिक कल्पनेचा अतिरेक यामुळेंच दाहीरचें राज्य घेण्यास साह्य करणारा मोक्कावसय्या, पृथ्वीराजा-विरुद्ध साह्य करणारा जयपाल, रायगडावर औरंगजेबाचें निशाण फडकविणारा सूर्याजी पिसाळ व शनिवारवाड्यावर इंग्रजांचें निशाण रोंवणारा बाळाजीपंत नातू यांची परंपरा चालू राहाते. हिंदुसंस्कृतीमध्यें ज्या अनिष्ट कल्पना वर सांगितल्याप्रमाणें उत्पन्न झाल्या त्यास साधुसंतांची एकांगी भक्ति इतर अनेक कारणांप्रमाणें कारणीभूत आहे.

**(२९४) साधु हेंच समाजाचें ध्येय:**—श्रीशंकराचार्यांच्या पश्चात् रामानुज, माध्व, वल्लभादि आचार्यांनीं भक्तीचा पुरस्कार फारच जोरानें केला. त्यानंतर झालेल्या साधुसंतांनीं पंडितांविरुद्ध बंड करून एकांगी भक्तीचाच जोरानें प्रचार केला. त्यामुळें भक्ति व साधुत्व यांचें पर्यवसान निवृत्तींतच झालें. संतांनीं अभ्युदयाच्या कोणत्याहि व्यावहारिक अंगाकडे ढुंकूनहि पाहिलें नाहीं व ब्रह्मविद्येशिवाय कोणतीहि विद्या मराठींत आणली नाहीं. त्यामुळें तत्त्वविचार करण्याचें सामर्थ्य कमी झालें. साधन-चतुष्टयसंपन्न अधिकारी दुर्मिळ झाले व त्रिविध तापानें पोळलेले सामान्य लोक मोक्षाधिकारी होऊं लागले. भक्तीच्या अतिरेकानें आणि एकदेशीय शिकवणीनें संन्याशांची जागा साधुसंतांनीं व्यापली व जवळ जवळ चारपांच शतकें समाजाला भक्तीच्या केंद्राभोंवतीं फिरावयास लावलें. निवृत्तिपरता, नैराश्य, अल्पसंतुष्टता, उदासीनता हे दोष वाढून निर्वाहापुरत्या अन्नाच्छादनाच्या दृष्टीनें हालचाली होऊं लागल्या. या सर्व दुर्बलवृत्तींचा फायदा

पुढें मुसलमानांनीं घेतला. निवृत्तिपरता, संन्यास, भिक्षु, दुःखवाद, स्याद्वाद, शून्यवाद, भक्ति, साधुत्व या ध्येयांमुळें हिंदुसंस्कृतीचा जो ऱ्हास झाला त्यास मीमांसक, मायावादी आचार्य व साधुसंत हे सर्व सारखेच दोषास पात्र आहेत. त्या पकडींतून हिंदुसमाजाला यापुढें बाहेर काढण्याचा यत्न अंशतः श्रीसमर्थांनीं कसा केला हें पुढें समजेलच.



## प्रकरण सोळावें

# मध्ययुगीन राजकीय घडामोडी

वेद, उपनिषदें, रामायण व भारत यांतील संस्कृतीचें समीक्षण केल्यावर जैन व बौद्ध संस्कृतींची क्रमप्राप्त म्हणून माहिती देऊन चर्चा केली. बुद्धोत्तर कालांत जे चार अतिरेक हिंदु समाजांत शिरले त्यांचें विवेचन प्रकरण ९ ते १५ अखेर केलें. त्या अतिरेकांचा राजकीय उलाढालींशीं थोडाफार संबंध आहे. कारण अनेक राजांनीं जैन व बौद्ध धर्मांची दीक्षा घेऊन त्याचा प्रचार केलेला आहे. राजकीय घडामोडींच्या पार्श्वभूमिकेवरच संस्कृतीचा संकोच व विकास कसा अवलंबून असतो, याची कल्पना देण्याकरितां प्रस्तुत प्रकरणांत राजकीय घडामोडींचें सांस्कृतिकदृष्ट्या समालोचन करावयाचें आहे.

हिंदुस्थानचा प्राचीन इतिहास असावा तसा उपलब्ध नाहीं. दंतकथा, ताम्रपट, कोरीव लेणीं, नाणीं, शिलालेख, कांहीं इतिहासग्रंथ व कांहीं चरित्रग्रंथ यावरूनच जुजबी माहिती मिळते. अशोकपूर्वकालीन इतिहास तर अद्याप अंधेरांतच आहे. तथापि उपलब्ध साधनांचे आधारें प्रथमतः बृहद्रथ, शिशुनाग, नंद, चंद्रगुप्त मौर्य वगैरेंची माहिती थोडक्यांत देतों.

**(२९५) लोकांकडून राजाची पदच्युतिः**–ख्रिस्तपूर्व सातव्या शतकांत पाणिनीनंतर काशी, कोसल, कौशांबी, अवंती, मगध, तक्षशिला

व गिरिव्रज इत्यादि ठिकाणीं वैदिक धर्माभिमानी पराक्रमी राजे होते. मगध देशांतील राजगृह येथें बिंबसार व अजातशत्रु, श्रावस्ती येथें प्रसेनजित् व विद्युद्भव, कौशांबी येथें उदयन व उज्जैनीस प्रद्योत असे राजे राज्य करीत होते. मगध देशावर जरासंधाचें राज्य होतें. त्याचा पुत्र सहदेव. त्यानंतर एकवीस राजे झाले. या घराण्याला बृहद्रथ घराणें म्हणतात. प्रद्योतांनीं मगधांचें राज्य बळकावलें. प्रद्योतांपैकीं चार राजे चांगले झाले. शेवटचा नंदिवर्धन हा फार जुलमी होता, म्हणून लोकांनीं त्याला पदच्युत करून शिशुनागाला गादीवर बसविलें. तेविसावा जैन तीर्थंकर पार्श्वनाथ याचा धर्मप्रचार या सुमारास चालू होता. त्यामुळें वैदिक ऋषि व जैन साधु यांच्या उपदेशाची जनमनावर पक्कड होती.

(२९६) बिंबसारः–हा कोसलदेशचा राजा तक्षशिला विद्यापीठांतील विद्यार्थी होता. हा आयुर्वेदज्ञ होता व बुद्धधर्माची छाप याजवर बरीच पडलेली होती. शिशुनागानंतर झालेल्या श्रेणिक राजानें लिच्छवी व वैशाली येथें असणाऱ्या राजघराण्याशीं सोयरिक करून मैत्री संपादन केली. वैशाली व लिच्छवी येथें गणराज्यें होतीं. वरील श्रेणिकाचें बिंबसार हें दुसरें नांव आहे. त्यानें कोसलाधिपति प्रसेनजिताच्या बहिणीशीं लग्न लावून कोसलांची मैत्री संपादन केली, आणि गिरिव्रज ही राजधानी सोडून राजगृह येथें ती आणिली. हा जिनभक्त होता. वासुदेवधर्म, बौद्धधर्म व जैनधर्म अशा सर्वांचा प्रचार याच्या कारकीर्दींत होत होता. बिंबसारनें प्रसेनजिताच्या मदतीनें अनंग व पंचाल इत्यादि देश काबीज केले.

(२९७) अजातशत्रुः–बिंबसाराचा मुलगा अजातशत्रु हा बुद्ध व जैनपंथाचा अनुयायी होता. त्याची राणी मल्लिका हिनेंहि बुद्ध धर्माची दीक्षा घेतली होती. यानें प्रसेनजिताशीं युद्ध करून त्याला मांडलिक बनविलें. वैशाली राजांनाहि त्यानें मांडलिक बनविलें. आपल्या राजधानीस तटबंदी करून आपल्या राज्याची सरहद्द हिमालयापर्यंत नेऊन भिडवली व शोण नदाच्या कांठीं पाटलीपुत्र ही राजधानी वसवली. पुढें मौर्यांच्या कारकीर्दींत पाटलीपुत्र हें सबंध हिंदुस्थानचें राजकीय केंद्र झालें.

(२९८) डरायस्ः–इराणांतील डरायसनें सिंधुनदीच्या मुखांतून इराणापर्यंत मार्ग शोधून काढला. सिंध, पंजाब व सिंधुनदीच्या पलीकडील

भागांवर हिंदुसम्राट राज्य करीत होते. त्यांच्यावर आक्रमण करण्याचा यत्न केला. या सुमारास कपिलवस्तु, अवंती व कौशांबी येथें निरनिराळे राजे राज्य करीत होते. डरायसला खरा शह सुधन्वानंद अथवा घनानंद यानेंच दिला. वीस हजार घोडेस्वार, तितकेच रथ, प्रचंड पायदळ व चार हजार हत्ती हें पाहूनच डरायस सिंधु नदीच्या पलीकडे येऊं शकला नाहीं.

(२९९) महापद्म नंदः—अजातशत्रूनंतर शैशुनाग वंशांतील कांहीं राजे राज्यारूढ झाले. पण ते नाकर्ते असल्यामुळें महापद्म नंद घराण्याकडे तें राज्य गेलें. नंदिवर्धन व महानंदी हे पराक्रमी राजे होते. उत्तरहिंदुस्थानांतील सोळा राज्यें जिंकल्यामुळेंच महापद्मनंद असें नंदाला म्हणूं लागले. नंदवंशाच्या उत्पत्तिविषयीं पुराणांमधून महापद्मनंद व त्याचे आठ पुत्र अशा नवनंदांचा उल्लेख आहे. 'नंदातं क्षत्रियकुलं' हा वाक्प्रचारहि प्रसिद्ध आहे. नंदराजे पराक्रमी होते यांत शंका नाहीं. याच सुमारास जैनांचा २४ वा तीर्थंकर वर्धमान महावीर व गौतमबुद्ध यांच्या धर्मप्रसाराचें काम जोरांत होतें. महापद्म नंदानें तळीं, विहिरी, गुहा वगैरे अनेक लोकोपयुक्त कृत्यें केलीं. पाणिनीच्या सूत्रावरील वार्तिककार कात्यायन हा याचा मुख्य प्रधान होता.

(३००) चंद्रगुप्तः—हा हिंदुस्थानांतील पहिला मोठा सम्राट होय. याची आई इराणी दाई होती. ती शूद्रा म्हणून घनानंदाच्या इतर राण्यांनीं चंद्रगुप्ताला जन्मतः रानांत टाकून दिलें होतें. याचा संभाळ धनगरांनीं केला. विष्णुमित्र अथवा आर्यचाणक्य याचाहि अपमान घनानंदानें केल्यामुळें त्या बुद्धिमान व पराक्रमी ब्राह्मणानें या वीराचें संगोपन करून शेवटीं त्यास गादीवर बसविलें व आपली प्रतिज्ञा सिद्धीस नेली. विष्णुमित्राजवळ चंद्रगुप्ताला नीतिशास्त्र, अर्थशास्त्र, राजकारण व युद्धशास्त्र यांचें शिक्षण मिळालें होतें. चंद्रगुप्ताचे बाळपणचे पराक्रम शिवाजी महाराजांच्या पराक्रमासारखेच आहेत. हा राज्यावर येण्यापूर्वी शिकंदर पंजाबांत येऊन पौरसचा पराभव करून गेला होता, त्यामुळें तो सारखा जळत होता. वयाच्या अवघ्या तेविसाव्या वर्षीच हा पंजाबांत गेला, तेथून शिकंदरकडे गेला. यानें मोठ्या धाडसानें प्रवास करून पुष्कळ अनुभव मिळविला. तिकडून परत येतांच ग्रीकांची हकालपट्टी तक्षशिलेंतून केली. शिकंदराच्या सैन्याच्या डावपेचाची

त्याला माहिती असल्यामुळें त्यानें हां हां म्हणतां पंजाब हस्तगत केला व चाणक्याचे साह्यानें मगधावर स्वारी केली. पुढें नेपाळहि जिंकला. नंदाचा प्रधान अमात्यराक्षस यानें अनेक राजांच्या मदतीनें पाटली-पुत्रावर स्वारी केली. परंतु आर्यचाणक्यानें मोठ्या युक्तीनें राक्षसाला आप-णाकडे वळवून घेतलें. व त्याला चंद्रगुप्ताचा अमात्य नेमलें. चंद्रगुप्ताची राज्याची हद्द इराण, हिंदुकुश पर्वत, बंगालचा उपसागर आणि हिमालयाचा पायथा येथपर्यंत होती. यानें दक्षिणेंतील पांड्य, चोल, केरळादि पांच राजांच्या फौजा अंगावर घेऊन सर्वांना जिंकून मांडलिक बनविलें. अशा या सम्राटावर शिकंदर सेनापति सेलिल्युकस प्रचंड सैन्यानिशीं चालून आला. पण चंद्रगुप्तानें सर्व राजांच्या मदतीनें सेलिल्युकसचा पराभव केला. व त्यांजकडून काबूल, कंदाहार व हिरात हे प्रांत व पांचशे हत्ती घेतले. सेलि-ल्युकसनें खि. पू. ३०५ या वर्षी चंद्रगुप्ताशीं तह केला व त्याला आपली मुलगी दिली, आपला वकील मेगॅस्थेनिस यास चंद्रगुप्ताच्या दरबारीं ठेवलें आणि अफगाणिस्तान, बलुचिस्तानादि देशांमधील आपले हक्कहि सर्व सोडून दिले. चंद्रगुप्तानें अवघ्या चोवीस वर्षांच्या कारकीर्दीत ग्रीकांना हाकलून दिलें, सेलिल्यूकसचा पराभव केला, इतर राजांना मांडलिक बनवून प्रचंड संघटना उत्पन्न केली, परदेशी राजांशीं सख्य जोडलें, साम्राज्याची व्यवस्था उत्तम केली आणि प्रचंड सैन्याच्या साह्यानें त्याचें रक्षणहि उत्तम केलें. चंद्रगुप्ताच्या राज्याची माहिती देण्यापूर्वी शिकंदरच्या स्वारीचें थोडें अव-लोकन करूं.

(३०१) शिकंदरः—मॅसिडोनियाचा राजा शिकंदर हा हुषार, कल्पक, पराक्रमी व मुत्सद्दी होता. त्यानें विश्वसंस्कृतीवर छटा उमटविली आहे. हिंदुस्थानावर चालून येतांना त्याला वाटेंतील बॅक्टेरिया व इतर अनेक राज्यें बुडवावीं लागलीं व दुथडी भरलेल्या नद्या ओलांडून आपलें सैन्य आणावें लागलें. अनेक आपत्तींना, संकटांना तोंड देत देत, रानटी टोळ्यांशीं लढत लढत, नद्यांचीं खोल पात्रें ओलांडत तो हिंदुस्थानावर आला. तो येण्यापूर्वी त्याचा सरदार हिंदुस्थानांत येऊन पोंचला होता. ओहिंदजवळ शिकंदर येतांच तक्षशिलेचा राजा अंभी हा ७०० घोडे, ३०० हत्ती वगैरे घेऊन त्याला भेटावयास गेला. अंभीचें अभिसाराशीं व

पौरसशीं युद्ध चाललें होतें, म्हणून त्यानें शिकंदरची मदत मागितली. कांहीं दिवस विश्रांती घेऊन शिकंदरचें सैन्य पौरसकडे वळलें. वाटेंत अभिसार शरण आला. पण पौरसनें प्रचंड सैन्यानिशीं सामना देण्याचें ठरविलें. नदीस भयंकर पूर पाहून शिकंदरनें तो ओसरेपर्यंत येथेंच छावण्या ठोकणार अशी भूमिका उठवून दिली. पोरसचें सैन्य गाफील राहिलें. शिकंदरनें युक्तीनें उतार शोधून नदीपार सैन्य नेलें. प्रथम पौरसचा मुलगा सैन्यावर चालून गेला. त्याच्या मागोमाग पौरसहि गेला. शिकंदरकडील तिरंदाजी व चपळ घोडेस्वार यांनीं पौरसच्या सैन्यांत हाहाःकार उडवून दिला. पौरसच्या हत्तींनीं शत्रूच्या व स्वतःच्या सैन्यांतहि धुमाकूळ उडवून दिला. त्या अंदाधुंदीमुळें पौरसचा पराभव झाला. शिकंदरनें त्याला सन्मानानें वागविलें आणि त्याचा सर्व मुलुख त्यास देऊन आपला मित्र बनविलें. शिकंदर जों स्वदेशीं परततो तों त्याच्या लोकांची चंद्रगुप्ताच्या सैन्यानें धुळदाण उडविली ! त्यानें पौरसचें व तक्षशिलेच्या राजाचें सख्य घडवून आणलें होतें तें टिकलें. शिकंदरला परत जातांना खूपच त्रास झाला. हालअपेष्टा भोगून तिकडे गेल्यावर खि. पू. ३२३ या सालीं तो मरण पावला. या स्वारीपासून शिकंदरास आर्थिक दृष्ट्या कांहीं फायदा झाला नाहीं. त्यानें पंजाबांत नेमलेला अधिकारी अवघ्या तीन वर्षांत मारला गेला. व सर्व पंजाबची सत्ता तक्षशिलेचा अंभी व पौरस यांचे हातीं गेली. भीषण रक्तपाताशिवाय या लढाईचें स्मरण राहिलें नाहीं. या स्वारीमुळें युरोप व हिंदुस्थान यांचें दळणवळण वाढलें. परस्परांना परस्परांची शिस्त, टापटीप, युद्धनीति व मनोवृत्ति याची चांगली माहिती झाली. तक्षशिलेचा अंभी व अभिसार यांनीं पौरसविरुद्ध शिकंदरला मदत केली नसती तर इतिहासाला निराळेंच वळण लागलें असतें. हिंदुस्थानांतील अलोट संपत्ति, सुपीकपणा, हिंदूंचा भोळा स्वभाव आणि राष्ट्रधर्माचा अभाव यामुळें परक्या बुभुक्षितांना हिंदुस्थानांत येण्यास स्फुरण चढलें. शिकंदरचेबरोबर पुष्कळ विद्वान लोक होते. त्यांनीं ज्योतिष, वैद्यक, गणितादि शास्त्रांचा अभ्यास करून त्या विद्या प्रथम ग्रीस देशांत व नंतर युरोपांत नेल्या.

(३०२) **चंद्रगुप्तकालीन राज्यव्यवस्थाः**—कौटिलीय अर्थशास्त्र व मेगॅस्थेनिससारख्या वकीलांनीं लिहिलेल्या हकीगती यांवरून चंद्रगुप्तकालीन सामाजिक, धार्मिक व राजकीय स्थितीवर फारच उत्तम प्रकाश पडतो. पाटलीपुत्र हें फार मोठें, विस्तीर्ण व सुंदर शहर असून त्याला चौसष्ठ दरवाजे व सत्तर बुरुज होते. लोकसंख्या चार लक्ष होती. चंद्रगुप्ताचा राजवाडा फारच मोठा आणि भव्य होता. राजवाड्यांत सशस्त्र पहारा असे. शिकारीकरितां राखीव कुरणें असत. पाकशालेवर वैद्यांची नेमणूक असे. चतुरंग सैन्य होतें. शिस्त कडक होती. सहा लक्ष सैन्याच्या आठ हजार हत्तींच्या छावणींत रोज शंभरसवाशेंची चोरी होई. शिक्षेमध्यें तारतम्य असे. निरपराध्यांना शिक्षा केल्यास अधिकाऱ्यांना दंड होई. उद्योगधंदे व कला, जननमरण नोंद, वजनें व मापें याजवर देखरेख, तयार मालावर कर, अशी सर्व व्यवस्था होती. निरनिराळ्या खात्यांवर निरनिराळे अध्यक्ष असत. पाटबंधारे, रस्ते, कालवे, रस्त्यास दोहोंबाजूंस झाडें, मोफत औषधालयें यांची व्यवस्था होती. बातम्या काढण्याकरितां वेश्या व कबुतरें यांची व्यवस्था होती. तांदूळ व गहूं व दुधदुभतें हें मुख्य अन्न होतें. हिरे, मोतीं, माणकें वगैरे अपार संपत्ति राज्यांत होती. खेड्यांत ग्रामपंचायती असत. चराईचें स्वतंत्र कुरण असे. खेड्यांतहि सर्व सुखसोयी असत. तात्पर्य तत्कालीन सर्व जगांत श्रेष्ठ अशी त्याची राज्यव्यवस्था होती.

चंद्रगुप्ताच्या या राज्यव्यवस्थेचें अनुकरण आसपासच्या राजांकडूनहि थोडेंबहुत होत असावें. ज्या गणराज्यांतून पुढें बुद्ध उत्पन्न झाला त्या शाक्यांच्या कपिलवस्तु येथेंहि हीच राज्यपद्धति होती. बुद्धाचा जन्म, तत्कालीन परिस्थिति, जैन धर्माचे तीर्थंकर महावीर, वगैरेंची माहिती मागें स्वतंत्र प्रकरणांत ( ६ व ७ मध्यें ) दिलेलीच आहे. आतां अशोकापर्यंत हा दुवा आपण जोडूं.

(३०३) **बिंदुसारः**—चंद्रगुप्तानंतर त्याचा मुलगा बिंदुसार गादीवर बसला. सेलिल्युकसचा मुलगा ॲंटिओकस व बिंदुसार यांची फार मैत्री होती. त्यांचा पत्रव्यवहार चाले व ॲंटिओकसकडून त्याला नजराणेहि येत. ॲंटिओकसला बिंदुसार राजानें एकदां एक विद्वान मनुष्य इकडे पाठवा असें लिहिलें, पण त्यानें ग्रीक कायद्याविरुद्ध तें कृत्य केलें नाहीं. आपली

विद्या दुसऱ्यास न देण्याबद्दल ग्रीक फार दक्ष असत. बिंदुसारानंतर त्याचा कुरूप मुलगा ज्याला लहानपणीं व्रात्य व क्रूर असल्यामुळें चंड असें म्हणत, तो अशोक गादीवर बसला. राज्यारूढ होतांच त्यानें राजवंशांतील मुलांबाळांसह सर्व स्त्रीपुरुषांची कत्तल केली. त्याच्या कुरूपपणाला हंसल्याबद्दल अंतःपुरांतील स्त्रियांना त्यानें जिवंत जाळलें.

(३०४) अशोक:–( खिस्तपूर्व २६३ ते खि. पू. २३२ ) नंद घराण्यांतील चंद्रगुप्त व त्याच्या मागून कांहीं राजे राज्यारूढ झाल्यावर मौर्य, शुंग, काण्व व आंध्र या वंशांतील राजे हिंदुस्थानांतील निरनिराळ्या भागांत राज्य करीत होते. नंदामागून मौर्यवंश राज्यारूढ झाला. पण शुंग, काण्व व आंध्र हे एकामागून एक राज्यारूढ झाले असें नसून उत्तरेस शुंगवंश राज्यारूढ असतांना दक्षिणेस आंध्रवंश साम्राज्य चालवीत होता, तर कलिंग देशांत खारवेल नामक एक प्रबल जैन राजा राज्य करीत होता. मौर्यवंशांतील ज्याच्या कालाला सुवर्णयुग म्हणतात, त्या अशोककालीन परिस्थितीकडे वळूं.

अशोक हा लहानपणीं मोठा व्रात्य होता. त्यानें अनेक प्रांतांवर स्वाऱ्या करून कत्तली करून रक्ताच्या नद्या वाहविल्या, म्हणून त्याला लोक चळचळा कांपत! अशोकचा राज्यविस्तार काश्मीर–हिमालयापासून तों गोदावरीपर्यंत होता आणि दक्षिणेंतील सर्व राज्यें त्याचीं मांडलिक होतीं. अशोकामुळें बौद्धधर्माला एकदम राष्ट्रिय स्वरूप आलें. अशोकचे समकालीन अँटिओकस, थिऑस, टॅलेमी, मगस, ॲलेक्झांडर वगैरे परदेशांतील राजे त्याचे मांडलिक असल्यामुळें अशोकानें धर्मप्रसारार्थ आपले नातेवाईक तिकडे पाठविले. सिलोन, सयाम, ब्रह्मदेश, सीरिया, इजिप्त आणि ग्रीस अशा सर्व देशांत अगणित पैसे खर्च करून धर्मोपदेशक पाठविले. खिस्तीलोकांनीं परदेशांत धर्मप्रचार करण्याची कल्पना अशोकापासून उचलली. बुद्धभिक्षूंमध्यें अनाचार माजला होता, म्हणून त्यानें साठ हजार बुद्धभिक्षूंची हकालपट्टी केली. मोग्गलीपुत्र तिष्य याच्या अध्यक्षतेखालीं धर्मसमिति खिस्तपूर्व २५३ च्या सुमारास भरवून बुद्धाच्या निरनिराळ्या संप्रदायांचें एकीकरण करून तिपिटक नामक ग्रंथाचें संशोधन केलें. त्या कामीं हजार

विद्वान् भिक्षु नऊ महिने खपत होते. या संशोधनानंतर अशोकाच्या घराण्यांतील सर्व माणसें जोरानें धर्मप्रसार करूं लागलीं. मुलगे, भाऊ, बहिणी, नातलग या सर्वांनीं पूर्वेकडे एक चीन देश सोडून सर्वत्र प्रसार केला. अशोकानें तीर्थयात्रा केल्या. बुद्धाच्या महत्त्वाच्या सर्व स्थानांना भेट देऊन चौऱ्यांशीं हजार स्तूप त्यानें उभारले. नालंदा येथील प्रचंड विद्यापीठ हें अशोकानेंच बांधलें. त्याची राजनीति व राज्यव्यवस्था उत्तमच होती. आर्यचाणक्यानें सांगितल्याप्रमाणें रस्ते, विहिरी, बागा, दवाखाने, शिक्षण वगैरेची व्यवस्था होती. अहिंसाधिष्ठित त्याची राज्यव्यवस्था होती. तो श्रमणांबरोबर ब्राह्मणांचाहि परामर्श घेई. पाली भाषेला त्यानें उत्तेजन दिलें. हा सुवर्णयुगनिर्माता, बुद्धधर्माचा प्रचारक, खिस्तपूर्व २७२ व्या वर्षी निर्वाणाप्रत गेला. जगांतील फार थोर राजांमध्यें हा श्रेष्ठ राजा होऊन गेला. अशोकानंतर चार पांच राजे झाले. शेवटचा राजा बृहद्रथ यास बाजूस सारून शुंगघराण्याचा संस्थापक पुष्यमित्र यानें गादी बळकावली.

(३०५) **पुष्यमित्रः**—शुंग घराण्यांतील हा मोठा कर्तृत्ववान राजा होऊन गेला. याचेंहि राज्य अशोकाप्रमाणें सबंध भरतखंडावर होतें. पाटलीपुत्र हें राजधानीचें शहर जिंकण्यास ( खि. पू. १७५ मध्यें ) खुष्कीच्या मार्गानें ग्रीक राजा मिनँडर नामक यवन व बॅक्टेरियांतून ग्रीक लोक आले. त्यांचा पुष्यमित्रानें व त्याच्या सेनापतीनें धुव्वा उडवून दिला. याचा ज्येष्ठ पुत्र अग्निमित्र यानें पराक्रमानें विदर्भ आणि इतर प्रांत मिळविले. पुष्यमित्रानें अश्वमेध यज्ञ केला. अश्वसंरक्षणार्थ नातु वसुमित्र यास पाठविलें. सिंधूच्या कांठच्या यवनांनीं अश्वाला प्रतिबंध करतांच वसुमित्रानें त्यांना हांकलून लावलें. पुष्यमित्रानें आपलें सम्राटत्व अश्वमेधाचे द्वारें सिद्ध केलें. या समारंभास प्रसिद्ध व्याकरणभाष्यकार पतंजलि हा उपस्थित होता. पुष्यमित्राचा अश्वमेध म्हणजे बुद्धधर्माविरुद्ध मोठी प्रतिक्रिया होती. हा वैदिक संस्कृतीचा पुरस्कर्ता होता. बौद्धांनीं व जैनधर्मियांनीं दिलेल्या त्रासाची यानें प्रतिक्रिया केली असें म्हणतात. पुष्यमित्रामागून अग्निमित्रादि नऊ राजे झाले, त्यांतील शेवटचा राजा देवभूति यास बाजूस सारून त्याचा ब्राह्मण प्रधान वसुदेव यानें तें राज्य बळकावलें. पुढें कण्व-

वंशांतील राजवटींत वैदिकसंस्कृतीची भरभराट होती. हें कण्ववंशीय राज्य पुढें आंध्रांनीं बुडविलें.

(३०६) शालिवाहनः–खि. पू. १८५ ते खि. पू. ७३ शुंगवंश व खि. पू. ७३ ते २८ कण्ववंशीय साम्राज्य उत्तरेंत असतांना चंद्रगुप्त मौर्यांच्या खालोखाल आंध्रप्रांतांत खि. पू. २३० ते इ. स. २२५ या कालावधींत आंध्रांची मोठी भरभराट होती. सर्व दक्षिण यांच्या ताब्यांत होतीच, पण उत्तरेस नर्मदेपारहि यांचें राज्य होतें. शातकर्णी, शालिवाहन, शातवाहन अशा निरनिराळ्या नांवानें हा पराक्रमी सम्राट राज्य करीत होता. शालिवाहनानें परदेशस्थ क्षत्रपांना ( शकांना ) हिंदुस्थानांतून पिटाळून लावलें आणि आपला शक स्थापन केला. इ. स. १२६ च्या सुमारास गौतमीपुत्र श्रीशातकर्णी पुलुमाई यानें शकाचा राजा नहपान क्षहरात क्षत्रप याचा पराभव केला व त्याचें राज्य आपल्या राज्यास जोडलें. शकपल्लवादि जातिविहीन परकी लोकांपासून सनातन वैदिक धर्माचें व बौद्धधर्माचें रक्षण करणारा अशी प्रौढी यानें मारलेली आहे. यानें अश्वमेध करून ब्राह्मणांना व बुद्धभिक्षूंना पुष्कळ देणग्या दिल्या. वासिष्ठीपुत्र पुलुमाई हा मोठा विद्वान होता. याचा प्रधान गुणाढ्य यानेंहि विद्येला उत्तेजन दिलें व त्यामुळें साहित्य, व्याकरण, धर्मशास्त्रादींची वाढ झाली. आंध्रांच्या राजवटींत वैदिकधर्म व बुद्धधर्म या दोहोंची चलती होती. या राजवटींत एकंदरींत शांतता, सुबत्ता व सुव्यवस्था यांचा लाभ प्रजेला झाला. दक्षिणेंतील खारवेल नामक जैनराजानें आंध्रावर दोनदां स्वारी केली, पण पुढें त्यांचें सख्य झालें.

(३०७) यवन हिंदु झालेः–याच कालांत पंजाबांत यवन लोकांनीं व सिंधुनदीच्या मुखांतून सीथिअन व शक यांनीं प्रवेश करण्याचा यत्न केला. पण त्यांचा पुरा मोड झाल्यानें ते या देशाचे कायमचे रहिवासी झाले व ते हिंदु झाले. शकराजा उषावदत्त यानें लाखो ब्राह्मणांना अन्नदान केल्याची माहिती मिळते. सर्व परकीयांना हिंदुलोक यवन असेंच समजत असत. शिकंदरपासून जे जे आले ते सर्व यवनच. त्या यवनांतील मिनँडर हा पंजाबांत सियालकोट येथें खि. पू. १६५ चे सुमारास प्रसिद्ध

राजा झाला होता. यानेंहि बुद्धधर्म स्वीकारला. मिलिंदपन्ना ( मिलिंदप्रश्न ) हा ग्रंथ बुद्धधर्मांत महत्त्वाचा मानला जातो. यांत मिनँडर व बुद्ध भिक्षु यांचे मजेदार संवाद आहेत व बौद्ध तत्त्वज्ञानाची फोड आहे. मिनँडर-प्रमाणें परदेशस्थ बरेचसे क्षत्रप हिंदु झाले. त्यांनीं विष्णु, शिव इत्यादींची उपासना घेतली. याप्रमाणें यवन, हूण, शक या क्षत्रिय जाति हिंदुसमाजानें याच सुमारास पचविल्या.

(३०८) कनिष्कः—शकपल्लव व यवन यांच्याहून एक निराळी जात पूर्वेकडून हिंदुस्थानांत आली. ती यूएची अथवा कुशान ही होय. ही जातीहि हिंदुसमाजांत पचून गेलेली आहे. चीन देशांत या जातींत कांहीं प्रबळ राजे राज्य करीत असतांना त्यांचा व हिंदुस्थानचा संघर्ष होत असे. त्यांतीलच एक राजा कनिष्क हा होय. याचाहि राज्यविस्तार अफाट होता. याचा काल अनिश्चित असला तरी हा बुद्धधर्मांचा चहाता होता, अशी माहिती मिळते. अशोकाप्रमाणें कनिष्कहि पूर्ववयांत मोठा व्रात्य, क्रूर, जुलमी असाच होता. उत्तर वयांत तो सुधारला. याचे कारकीर्दींत महायान नांवाचा सुधारलेला बौद्ध संप्रदाय निघाला व पूर्वींच्या संप्रदायाला हीनयान म्हणूं लागले. कनिष्क दोहोंनाहि मान देत असे. कनिष्कानें ठिक-ठिकाणीं बुद्धाचीं मोठीं स्मारकें उभारलीं, मठांना व विद्यापीठांना उत्तेजन दिलें, संस्कृतभाषा व्याकरणबद्ध स्वरूपांत पुन्हां चमकूं लागली. कनिष्का-नंतर हविष्क, वासुदेवादि राजे झाले. पुढें गुप्तवंशाचा उदय होईपर्यंत या राजांनीं हिंदुधर्मांचीच आस्था बाळगली होती असें दिसतें. अशोकाचा काल म्हणजे बौद्धधर्माच्या उत्कर्षाचा मध्यान्हकाल आणि कनिष्कानंतरच्या राजांचा काल म्हणजे बौद्धधर्माच्या अपकर्षाचा काल होय! पुढें पुढें या बुद्धभिक्षूंत अनाचार माजला, वैराग्य नष्ट झालें, चैन वाढली, त्यामुळें त्यांच्या-विषयीं अनादर उत्पन्न होऊन वैदिकधर्माबद्दल आस्था उत्पन्न झाली. दक्षिणेंत जैनगुरु भद्रबाहु यानें जैनधर्माचा प्रसार केला, पण पुढें शंकराचार्य, वीरशैव, माध्व यांच्या धर्मप्रचारामुळें जैनधर्माचा विस्तार झाला नाहीं. ब्रह्मदेशांत बौद्ध संप्रदाय चांगला फोफावला. सिंहल द्वीपांतहि तो वाढला, चीन देशांतहि तो फोफावला. पण बुद्धभिक्षूंच्या अनाचारानें चिडून उत्संग नांवाच्या राजानें ४६०० मठ, ४०००० धार्मिक इमारती नाहींशा केल्या

व दोन लक्ष साठ हजार भिक्षुभिक्षुणींचीं लग्नें लावून चाळीस वर्षांच्या आंत कोणीहि धर्मोपदेश करूं नये असें फर्माविलें. जपान, सुमात्रा, सयाम, मलाया, जावा, तिबेट अशा सर्व भागांत बुद्ध भिक्षूंच्या वैराग्याच्या वृत्तीवर बौद्ध धर्माचा उत्कर्ष व अपकर्ष अवलंबून होता असें दिसतें. हिंदुस्थानांत गुप्तांच्या राजवटीपासून बुद्धधर्माचा सूर्य हळुहळू मावळतच चालला होता.

(३०९) **राजा भर्तृहरि व विक्रमादित्यः**–इसवी सनापूर्वीच्या पहिल्या शतकांत माळव्यांत एक नवीन राज्य उदयास आलें. त्याचा संस्थापक गंधर्वसेन मालव हा होय! हा सोमवंशी क्षत्रिय होता. मालवांनीं शिकंदराला तो पंजाबांत आल्यावेळीं चांगला हात दाखविला होता. गंधर्व-सेनाचा थोरला मुलगा राजा भर्तृहरि यानें कांहीं वर्षें राज्य केलें. हा मोठा विद्येचा भोक्ता होता. शृंगार, नीति व वैराग्य अशीं याचीं तीन शतकें प्रसिद्ध आहेत. भर्तृहरीनंतर त्याचा भाऊ गादीवर बसला. हाच सुप्रसिद्ध विक्रमादित्य होय! यानें पराक्रमानें शकांची जी पहिली टोळी पंजाबांत शिरली होती तिला पराभूत केलें व पंजाबपासून नर्मदेपर्यंत एकछत्री राज्य त्यांनीं स्थापलें. उज्जैनीच्या महांकाळाचें प्रचंड मंदिर त्यानें बांधलें. त्याचा २४ खांबी दरवाजा अद्याप विशालत्वाची साक्ष देतो. विक्रमादित्याचा काळ म्हणजे भारतवर्षाच्या उत्कर्षाचा काळ होय! विद्या, विक्रम व वैभव तीहींची त्या कालीं समृद्धि होती. कालिदासादि विश्वविख्यात कवि याच वेळीं उदयास आले. हा राजा रसिक, उदार, विद्वान व शूर होता. याच्या नांवाचा विक्रम संवत् अद्याप उत्तरेकडे चालू आहे. विक्रमादित्य या नांवाला इतकें महत्त्व आलें कीं ती पदवी यापुढें अनेक राजांनीं धारण केली. यानें बौद्धजैनांना सहिष्णुतेनें वागविलें.

(३१०) **समुद्रगुप्तः**–कुशान घराण्यापासून गुप्त घराण्यापर्यंतचा काल हा धामधुमीचा होता. पाटलीपुत्राच्या आसपास राज्य करणाऱ्या एका चंद्रगुप्त नामक राजानें राजकन्येशीं विवाह करून आपला दर्जा वाढ-वून पराक्रमानें मोठा प्रांत बळकावला. याचा मुलगा समुद्रगुप्त हा इ. सन ३३० ते ३७५ मध्यें राज्य करीत असतां त्यानें दक्षिणेंतील अकरा राजांना मांडलिक बनविलें व सर्व उत्तर हिंदुस्थानांत आपलें साम्राज्य स्थापलें.

अशोकाच्या तोडीचें याचें साम्राज्य होतें. परदेशांतहि याचा दरारा होता. गांधार, काबूल, सिलोन, आसाम, नेपाळ, गडवाल इत्यादि हिंदुस्थानच्या बाहेरच्या देशांतून याला करभार येत असे. मोठा पराक्रमी, मोठा कुशल, मोठा दूरदर्शी आणि हिंदुधर्मी अशा या सम्राटानें मोठ्या थाटानें अश्वमेध-यज्ञ करून अपार संपत्ति वाटली. हिंदुस्थानचा हा नेपोलियन होता असें कांहीं लेखक लिहितात. समुद्रगुप्तकालीन सोन्याचीं नाणीं यज्ञीय अश्वाची प्रतिमा असलेलीं उपलब्ध झालेलीं आहेत.

(३११) दुसरा चंद्रगुप्त ( इ. स. ३७५ ते ४१३ ):—बापाच्या तालमींत तयार झालेल्या या चंद्रगुप्तानें विक्रमादित्य ही पदवी धारण करून मोठ्या पराक्रमानें चाळीस वर्षें राज्य केलें. तो परधर्मसहिष्णु होता. त्यानें पश्चिमेकडील क्षत्रपांना पिटाळून लावलें. अयोध्या व कौशांबी याहि त्यानें राजधान्या केल्या. याच्या कारकीर्दींतील मुख्य गोष्ट म्हणजे चिनी प्रवासी फाइआन याचें आगमन होय. हा हिंदुस्थानांत सहा वर्षें होता. त्यानें संस्कृतभाषा व बौद्ध ग्रंथांचा तीन वर्षें अभ्यास केला. हीनयान व महायान ग्रंथांतील मोठमोठ्या मठांतील सुमारें सहासातशे भिक्षूंची त्यानें भेट घेतली होती. त्यानें दिलेल्या माहितींतील महत्त्वाचा भाग पुढीलप्रमाणें:—'शहरें चांगलीं संपन्न होतीं, लोक शांततेंत व सुखांत होते. गरीब व निराश्रितांना औषधपाणी मोफत देऊन शुश्रुषा करण्याकरितां शहरोंशहरीं मोफत औषधालयें होतीं. हजारों भिक्षु असलेले बौद्धमठ सिंधूपासून मथुरेपर्यंत होते. फौजदारी गुन्हे कमी असत. फांशीची शिक्षा बहुतेक नसे. बौद्धमठांतील भिक्षूंना अन्नवस्त्र यथास्थित मिळे. धार्मिक बाबतींत व्यक्तिस्वातंत्र्य असे. कोणत्याहि धर्माचा छळ होत नसे. प्रवाशांना चोरांचें भय कधींच नसे.' यासारखी परक्या प्रवाशानें दिलेली माहिती वाचून हिंदुसंस्कृतीच्या गतवैभवाबद्दल प्रत्येक हिंदूला अभिमान कां बरें वाटणार नाहीं ?

(३१२) कुमारगुप्त ( इ. स. ४११ ते ४५५ ):—विक्रमादित्याचा मुलगा कुमारगुप्त यानें दिग्विजयानंतर अश्वमेध यज्ञ केला. पुढें हूणांचा उपद्रव स्कंदगुप्ताच्या वेळीं झाला. पण स्कंदगुप्तानें हूणांचा धुव्वा उडवून दिला आणि विष्णूची मूर्ति असलेला एक प्रचंड स्तंभ त्यानें पाटणा येथें

उभारला. स्कंदगुप्ताचे पश्चात् गुप्त घराण्यांत कोणी पराक्रमी राजे झाले नाहींत. पुढील अकरा सम्राटांपैकीं आदित्यसेनानें अश्वमेघ यज्ञ केला होता व यानेंहि हूणांच्या दुसऱ्या टोळीला पिटाळून लावलें अशी माहिती मिळते. गुप्तांच्या राजवटींत महायानपंथ व जुना हिंदुधर्म यांच्यामध्यें साम्य उत्पन्न झालें. वैदिकधर्माचें महत्त्व वाढलें, संस्कृतभाषेचा उत्कर्ष झाला, अश्वमेघ यज्ञामुळें विद्या व कला यांची अभिवृद्धि झाली. गुप्त राजे विद्यांचे भोक्ते होते. अनेक परकीय लोकांना प्रथम महायान पंथानें पोटांत घेतले व महायान पंथाला हिंदुसमाजानें आत्मसात केलें. शिल्प, नौकाशास्त्र, वास्तुविद्या, काव्यनाटकादि विद्या, कला यांचाहि उत्कर्ष यावेळीं झाला. पुराणांची निर्मिति याच कालांत झाली. आपस्तंब, बौधायन, आश्वलायन वगैरे शाखीय सूत्रावर स्मृतिग्रंथ झाले. गोवध बंद झाला. आर्यभट्टानें गणितशास्त्रांत, वराहमिहरानें ज्योतिषशास्त्रांत व धन्वंतरीनें वैद्यशास्त्रांत शोध लावून सुधारणा केल्या. गुप्तांच्या पडत्या कालांत हूणांनीं त्यावर आघात केले. माळव्यामध्यें मिहिरगुल्ल यानें राज्य स्थापलें. मोलापो येथें पश्चिम माळव्यांत शिलादित्य या नांवाचा राजा होता. तो मोठा अहिंसाभक्त होता ! हीं सर्व राज्यें पुढें हर्षानें आपल्या राज्यास जोडलीं म्हणून त्याच्या राजवटीकडे वळूं.

(३१३) **हर्षवर्धन** ( इ. स. ६०६ ते ६४७ ):–हर्षपूर्वकालीं हिंदुस्थानांत बऱ्याच घडामोडी झालेल्या होत्या. राजा ग्रहवर्मा यानें महाराजाधिराज परम भट्टारक हा किताब धारण करून हूणांना पिटाळून लावून राज्य चालविलें. याचा मुलगा हर्षवर्धन होय. हा मोठा बुद्धिमान् व पराक्रमी होता. याची बहीण राज्यश्री. हिच्या नवऱ्यास माळव्याच्या गुप्तानें ठार करून तिला कैद केलें होतें. हर्षानें मोठ्या युक्तीनें प्रथम तिची सुटका केली, व नंतर तो दिग्विजय करीत खंडण्या घेत निघाला. हर्षाचा समकालीन सत्याश्रय पुलकेशी हा दक्षिणेंत सम्राट होता. त्यामुळें हर्षाला उत्तरेप्रमाणें दक्षिण काबीज करतां आली नाहीं. जोमदार लढवय्या महाराष्ट्रियांपुढें त्याला मान वाकवावी लागली. म्हणून तो तडक पूर्वेकडे गेला. हर्ष राज्यकारभारांत इतका रंगून जाई कीं त्याला झोंप व अन्न यांचाहि विसर पडे. हिंसा व मांसाहार त्यानें बंद केले होते. राज्याची व्यवस्था सर्व बाजूंनीं सर्व दृष्टीनें

त्यानें उत्तम लावली होती. निपुत्रिकत्वामुळें त्याचा ओढा बौद्धधर्माकडे अधिक होता, असें कांहीं विद्वान् लिहितात. आरंभीं तो शैव होता व तो सर्व धर्मांना सारखे लेखीत असे. दर पांच वर्षांनीं तो मोठा समारंभ करून आपलें सर्व धन बौद्धभिक्षु, ब्राह्मण, जैनसाधु आणि इतर सर्व धार्मिक सांप्रदायिकांना वाटत असे. दातृत्व, सर्वज्ञत्व, रसिकत्व आणि पराक्रम हे सर्व गुण याच्या ठिकाणीं एकवटलेले होते. हर्षानंतर एका शतकांत यशोवर्मा राजा गादीवर आला. भवभूति हा त्याच वेळीं पुढें आला. या राजानें वैदिक धर्माचा पुरस्कार केला.

(३१४) चिनी प्रवासी ह्यूएनसंगः–हा हर्षाच्या वेळीं हिंदुस्थानांत आलेला होता. नालंदा विद्यापीठांत तो एकोणीस महिने राहिला. त्यावेळीं दहा हजार विद्यार्थी तेथें होते. तक्षशिला, विक्रमशिला येथेंहि मोठीं विद्यापीठें होतीं. त्यानें हर्षकालीन धार्मिक, सामाजिक व राजकीय परिस्थितीचें जें वर्णन लिहिलें आहे त्याचें अतिसंक्षिप्त टिप्पण येथें देतों. ' चार वर्ण स्वकर्मदक्ष होते. सवर्ण विवाह होत. स्त्रीपुनर्विवाह नसे. पोटजाती नव्हत्या. जातिनिर्बंध शिथिल होते. वस्त्रें स्वच्छ व पोषाख नीटस असे. स्त्रियांचें केशरंजन, अलंकार वगैरे सर्व आकर्षक असे. पुरुषहि कंठे, कुंडलें, मुद्रिका असे अलंकार धारण करीत. लष्करी अधिकारी दाढ्या व कल्ले राखीत. वायव्य सरहद्दीवर बौद्धधर्माचें वर्चस्व होतें. पण हर्ष, शिव, विष्णु, सूर्य आणि बुद्ध अशा सर्व देवतांच्या उपासनेला उत्तेजन देई. हजारों देवालयें कोट्यवधि रुपये खर्चून बांधलेलीं होतीं. दहा दहा हजार भक्त दर्शनास येत असत. देवतांच्या मूर्ति भव्य, उंच व सुबक असत. शैव पंथांत मनुष्यबलीची चाल होती. पाशुपतमतहि जोरांत होतें. हिंसाप्रधान यज्ञ बंद होते. गोवध सगळ्या हिंदुस्थानांत कोठेंहि होत नव्हता. लोक मांसाहार करीत नसत. ढोंगी संन्याशांना पाराशरी म्हणत. वैदिक संन्यासी, बौद्ध भिक्षु, जैन साधु अशांची संख्या फार होती. राजे लोक यांचा योगक्षेम चालवीत. कृष्णभक्तीमुळें गोवध बंद होता. मूर्तिविषयक सामर्थ्याच्या अद्‌भुत कल्पना होत्या. विद्वानांचे परस्परमत–खंडनात्मक मोठे वाद चालत. विजयी पंडिताला मशाली लावून हत्तीवरून मिरवीत. हजारों नग्न मूर्तिहि

देवळांत दिसत. ईश्वरी अंश राजा म्हणून त्याजवर फार भक्ति असे. ग्राम, खेटक, नगर आणि त्यांचे निरनिराळे अधिकारी वसुलीची व्यवस्था फार उत्तम करीत. हर्षाची राज्यव्यवस्था तत्कालीन जगतांत फारच श्रेष्ठ होती.

(३१५) **बौद्धधर्माचा ऱ्हासः**—हर्षकालीं बाहेरून बुद्धधर्माचें जरी ऐश्वर्य दिसत होतें, शेकडो मठ, भिक्षु, मूर्ति व साधु यांवर जरी पैशाचा पाऊस पडत होता तरी आंतून सर्व पोंखरलें असल्यामुळें त्या धर्माबद्दल आदर राहिला नव्हता. जैन धर्माला त्यावेळीं फारसा राजाश्रय नव्हता. तथापि उत्तरेकडे त्याचा प्रसार होत होता.

(३१६) **ह्यूएनसंगची लूटः**—हर्षानें ह्यूएनसंगाला प्रवास खर्चाकरितां सोन्याचांदीचीं नाणीं देऊन मोठ्या सन्मानानें पाठविलें. वीस घोड्यांवर लादतां येतील असे बुद्धाच्या शरीराचे एकशेपन्नास अवशेष, सहाशेसत्तावन पोथ्या व शेकडो मूर्ति त्यानें बरोबर नेल्या, असें म्हणतात. चीनच्या राजाची व हर्षवर्धनाची ह्यूएनसंगामुळें मैत्री जमली, परस्पर शिष्टमंडळें जात येत असत. हर्षानंतर सर्वत्र धामधूम चालू झाली. हर्षाच्या दक्षपणामुळें जे मांडलिक दबलेले होते त्या सर्वांनीं उचल खाल्ली. अशा या विस्कळित परिस्थितीमध्यें इस्लामचें आक्रमण आलें व अरबांनीं सिंध प्रांतावर स्वारी केली. या स्वारीनंतर महंमद गिझनीच्या स्वाऱ्यांपर्यंत इस्लामचें आक्रमण झालें नाहीं. अर्थात् या कालखंडामध्यें काश्मीर, वल्लभी, भडोच, नेपाळ, कनोज, कोसल, माळवा, बंगाल, बहार, राजपुताना, तामीळनाड, चेर, पल्लव या देशांत आणि महाराष्ट्रांत राष्ट्रकूट, चालुक्य, यादव इत्यादि घराण्यांच्या ज्या राजवट्या होत्या त्यांचा सांस्कृतिक आढावा घेऊन हें प्रकरण पुरें करतों.

(३१७) **कांहीं ब्राह्मण राजेः**—क्षत्रियांनीं राज्य करावें असा जरी दंडक होता तथापि हर्षाच्या वेळीं कांहीं ब्राह्मण राजे राज्य करीत होते. उज्जैनी, जझोटी, महेश्वरपूर, पूर्वबंगाल, कामरूप या देशांवर विद्येला उत्तेजन देणारे ब्राह्मण राजे राज्य करीत होते. इ० स० ६५० च्या सुमारास चच नामक ब्राह्मणानें सिंध प्रांतावर आपलें राज्य स्थापन करून तें काश्मीर व कच्छपर्यंतहि वाढविलें होतें. या शूर व धोरणी राजानें चाळीस वर्षें

राज्य केलें. हा बौद्धधर्मविरोधी होता. चचाच्या पश्चात् त्याचा पुत्र दाहिर हा पराक्रमी पुत्र गादीवर आला. महंमद कासीमनें अरबांच्या टोळ्यांनिशीं जेव्हां सिंध प्रांतावर स्वारी केली, तेव्हां त्यास बौद्धांनीं बरेंचसें साह्य केलें होतें; कारण चचानें बौद्धांस त्रास दिला नव्हता.

गयेस एक हजार ब्राह्मण कुटुंबें त्याकाळीं एकजुटीनें स्वतंत्र राज्य स्थापून होतीं. त्यावर अन्य कोणाहि राजाची सत्ता नव्हती.

(३१८) **शिवोपासक कर्कोटकः**—इ. सन ६०२ च्या सुमारास काश्मीर प्रांतांत शिवोपासक कर्कोटक घराणें राज्य करीत होतें. ह्युएनसंग काश्मीरांत गेला होता. राजे न्यायप्रिय, प्रजाहिततत्पर, धर्माभिमानी होते असें तो लिहितो. दुर्लभवर्धन, प्रतापादित्य वगैरे राजे झाले. ललितादित्यानें बहुतेक उत्तर हिंदुस्थान जिंकून तुर्कस्तान व बलुचिस्तानवरहि स्वाऱ्या केल्या होत्या. अकरा कोट रुपये खर्च करून मोठमोठालीं शिव, विष्णु व मार्तंड यांचीं मंदिरें बांधलीं. तुर्कस्तानच्या वाळवंटांतहि विहिरी खोदल्या, पुष्करणी बांधल्या. याला कलियुगांतील धर्मराजा म्हणत. राजा जयापीड (नववा) मोठा विद्वान्, व पंडितांचा भोक्ता होता. क्षीरस्वामी, उद्भट हे अनुक्रमें अमरकोशटीकाकार व साहित्यशास्त्रज्ञ त्याचे पदरीं होते. मनोदत्त, शंखदत्त, पटक व सन्निधान हे कवि, दामोदरगुप्त व वामन असे पंडित त्याचे पदरीं होते. कर्कोटक घराण्यामागून उत्पल घराण्यांतील राजांनीं राज्य केलें. त्यांतील अवंतिवर्मा हा मोठा विद्वान् व धार्मिक होता. त्याचे राजवटींत फार सुबत्ता, शांतता व सुख प्रजेला लाभलें होतें. पुढील यशस्कर राजाच्या कारकीर्दीचें वर्णन कल्हणानें केलें आहे. तो म्हणतो, 'प्रजा दरवाजे उघडे टाकून स्वस्थ झोंप घेत असे.' या कालांत काश्मीरी पंडितांची ख्याति सर्वत्र पसरली. काश्मीर हा देश विद्वानांचा आहे, अशी ख्याति झाली. कैय्यट, मम्मट, कल्हण, बिल्हण या नांवांवरून शेवटचीं ट व ण हीं अक्षरें काश्मिरी विद्वानांच्या नांवाच्या शेवटीं असतात. व्याकरण, साहित्य या शास्त्रांमध्यें अत्यंत निष्णात असे ग्रंथकार जसे काश्मीरांत झाले तसे तत्त्वज्ञानामध्येंहि कांहीं नामांकित पंडित तिकडे झाले आहेत. शैवतत्त्वज्ञानाचा उदय काश्मीरांतच झाला असून त्याचें प्रतीक प्रत्यभिज्ञादर्शन किंवा त्रिकदर्शन या दर्शनांमध्यें उमटलेलें दिसतें. शांकरतत्त्वज्ञानांतील

मायावादाला विरोध करून अद्वैताची सिद्धि यांनीं केल्यामुळें पुढें भक्ति-मार्गाचे द्वारा त्याचा अधिक विस्तार झाला. याच सुमारास नेपाळांत लिच्छवी राजे राज्य करीत होते. ते वैदिक धर्माचे अभिमानी होते. काश्मीराप्रमाणें नेपाळांत विद्येचा उत्कर्ष झाला नाहीं. अशोकानंतर बुद्ध-धर्म नेपाळांत शिरला. हर्षानंतर गुजराथेंत वल्लभी येथें भट्टारक या नांवाचा राजा व भडोचमध्यें जयभट्ट नांवाचा राजा असे दोन धर्माभिमानी राजे राज्य करीत होते.

**(३१९) कनोजांतील वर्मा**:—मौखरीघराण्यांतील यशोवर्मा हा मोठा पराक्रमी होता. याचा व काश्मीरांतील ललितादित्याचा आणि दक्षिणें-तील पुलकेशीचा संघर्ष उत्पन्न झाला. पण पुढें यांचें सख्य झालें. यशो-वर्म्याच्या कारकीर्दींत कनोज हे वैदिक धर्माचें केंद्रस्थान झालें होतें. वाज-पेय, अग्निष्टोम असे यज्ञ सुरू झाले होते. कुमारिलभट्ट, त्याचा शिष्य भव-भूति, त्याचा शिष्य वाक्पति यांना यशोवर्म्याचा आश्रय होता असें म्हणतात. या कालांत बुद्धधर्माची चलती नव्हती. यशोवर्म्यानंतर प्रतिहार घराण्यांतील मिहिरभोज नांवाचा पराक्रमी राजा कनोजावर राज्य करीत होता. त्यानें उत्तरेस आपलें साम्राज्य स्थापलें व पारसिकांचा पराभव केला असा काव्यांत उल्लेख केला आहे. कोसल, माळवा येथेंहि पराक्रमी राजे वैदिक संस्कृतीची अभिवृद्धि करीत होते.

**(३२०) राजा भोज**:—उज्जैनीच्या परमारघराण्याचा मुख्य संस्था-पक कृष्णराज हा होय ! इ. स. १०१८ च्या सुमारास प्रसिद्ध राजा भोज राज्यारूढ झाला. याची बुद्धिमत्ता असामान्य होती. ज्योतिष, शिल्प, काव्य, व्याकरण, साहित्य या विषयांवर याचे ग्रंथ आहेत. यानें एक संस्कृत महाविद्यालय स्थापलें. अवंतीच्या भोजराजाच्या अनेक आख्यायिका सर्व हिंदुस्थानभर ऐकावयास मिळतात. त्याची कीर्ति आज हजार वर्षें हिंदुस्थानभर पसरली आहे. हा वैदिक धर्माभिमानी होता. भोपाळजवळ यानें मोठा विस्तीर्ण तलाव बांधला होता. ओरीसा प्रांतांत शिवोपासक केसरीघराणें राज्यारूढ असतांना अनेक शिवमंदिरें बांधलीं गेलीं. तेथील शिवमूर्तींच्या अवलोकनानें रुद्र ही संहारक देवता आहे अशी कल्पना येते. कांहीं राजांनीं बौद्ध विहारांनाहि बुद्ध धर्माची दीक्षा घेऊन

आश्रय दिला. आसाम येथें राजा भगदत्त, त्याप्रमाणें पंजाब, चेदी उर्फ त्रिपुर, बुंदेलखंड येथेंहि हिंदुराजे हिंदुसंस्कृतीला उत्तेजन देत होते. बंगाल व बहार प्रांतावर पाल, सेन, व गुप्त या घराण्यांचीं अधिराज्यें होतीं. 'बौद्ध-संप्रदायी गोपालराजा इ. स. ७८० मध्यें बंगालवर राज्य करीत होता. सेनघराण्याच्या राजवटींत बुद्धधर्म ऱ्हास पावूं लागला. सेनराजे ब्राह्मण होते. गीतगोविंदाचा कर्ता जयदेव कवि हा तत्कालीनच होय." राजपुतान्यां-तील सुप्रसिद्ध गुहिलोत राजघराणें व त्यांतील पराक्रमी पुरुष यांनीं संस्कृति-रक्षणार्थ केलेला संग्राम पुढें एका प्रकरणांत येतच आहे. सांबरचे चव्हाण अनहिलवाडपट्टणचे चावडा, बुंदी, कोटा, सिरोही येथील क्षत्रिय राजे यांचा उल्लेख करूनच पुढें जाऊं.

(३२१) **दक्षिणेंतील पांड्य, चोल व केरळः**—दक्षिणेंत पांड्यांचें राज्य मोठें होतें. मदुरा हें राजधानीचें ठिकाण होतें. तेथेंच मोठें विद्यापीठहि होतें. वार्तिककार कात्यायनानें पांड्यांचा उल्लेख केलेला आहे. पांड्य हे कांहीं काल पल्लवांचे व चोलांचेहि मांडलिक होते. हे पांड्यराजे हिंदुधर्माभिमानी होते. दक्षिणेंत त्याच वेळीं जैनधर्माचा प्रसार जोरानें चालू होता. पांड्यराजा नेदुमारण यानें जैनधर्माची दीक्षा घेतली होती. पण पुढें शिवभक्त चोलराजाच्या कन्येशीं त्यानें विवाह केल्यावर शैवधर्म स्वीकारला, व पुढें जैनांचा त्यानें छळ केला. तेव्हांपासून दक्षिणेंत जैनधर्माला उतरती कळा लागली. कात्यायनानें चोलराजांचा उल्लेख केलेला आहे व ह्यूएनसंगानेंहि केलेला आहे. चोलराजांचा ग्रीस व अरबस्तान या देशाशीं व्यापार चाले. चोलराजा कारिकाल यानें सीलोनवर स्वारी करून कावेरी नदीला धरण बांधण्या करितां व राजधानीची स्थापना करण्याकरितां सिलोनमधून बारा हजार मजूर आणले होते. चोलांच्या कारकीर्दींत केरळ देशांत हिंदुसंस्कृतीचा प्रसार होत होता. चोलराजा पुरांतक यानें चिदंबरम् येथील शिवमंदिराची पटई सोन्यानें मढविली. पल्लवांची वसाहत कांचीस होती. शिवोपासक नरसिंह-वर्मा यांचा उल्लेख ह्यूएनसंगानें केलेला आहे. हे पल्लवराजे विद्येचे भोक्ते होते. ह्यांनीं अनेक शिवमंदिरें बांधलेलीं आहेत. पूर्वपल्लव, उत्तरपल्लव असे पल्लवांचे दोन भेद मानतात. उत्तरपल्लवांतील सिंह—विष्णु व त्याचा मुलगा

महेंद्रवर्मा हे मोठे पराक्रमी होते. पुलकेशीपुत्र विक्रमादित्य चालुक्य यानें पल्लवांचा पराभव केला.

(३२२) महाराष्ट्रांतील राज्येंः—चालुक्यराजे क्षत्रिय होते. अयोध्येच्या रामवंशापासून त्यांच्या वंशावळी सांपडतात. विजापूरजिल्ह्यांतील वातापि ( बदामी ) येथें राज्य स्थापणारा पहिला पुलकेशी हा होय. यानें अश्वमेघ यज्ञ करून सम्राटपद धारण केलें. याच्या पुत्रांनीं पूर्व व पश्चिम दिशा जिंकल्या. दक्षिणेंतील चोल, पांड्य, केरळ, पल्लव यांनाहि मांडलिक बनविलें. इ. स. ६२० च्या सुमारास हर्षवर्धनानें पुलकेशीवर स्वारी केली होती, पण त्याला यश आलें नाहीं. पुलकेशीनें हिंदुस्थानाबाहेरील देशांतही आपले वकील पाठवून दिलेले होते. चालुक्य व पल्लव यांचे संघर्ष सारखे चालू होते. त्यांतूनच पुढें राष्ट्रकूटवंश गादीवर आला. चालुक्याच्या राजवटींत जैनधर्माचा उत्कर्ष व बुद्धधर्माचा ऱ्हास होता. जैनपंडित रविकीर्ति व विजय हे पुलकेशीचे आश्रित होते. याच सुमारास इराणांतील पुष्कळ पारशी घराणीं मुसलमान राजांच्या जुलमाला कंटाळून संजान येथें आलीं. ह्यूएनसंग नाशकाजवळ पुलकेशीला भेटला. तो मराठ्याविषयीं लिहितो कीं, मराठे हे इमानी, करडे, करारी, कृतज्ञ, अपकार सहन न करणारे, माघार न घेणारे, अपकाऱ्याचा सूड घेणारे असे आहेत. चालुक्यांचेहि पूर्व चालुक्य व उत्तर चालुक्य असे दोन भेद झाले. राष्ट्रकूटांनीं चालुक्यांना पराजित केल्यावर पूर्वेकडे वेंगी येथें चालुक्यांच्या दुसऱ्या शाखेंतील विष्णुवर्धनाचें राज्य सुरू झालें.

(३२३) राष्ट्रकूटः—मान्यखेटचे ( मालखेड ) राष्ट्रकूट हें चंद्रवंशीय होते. अरबांनीं सिंध जिंकल्यावर महाराष्ट्राकडे मोर्चा वळविला, परंतु त्यांना माघार घ्यावी लागली. राष्ट्रकूटांनीं उत्तरेकडेहि स्वाऱ्या करून विजय मिळविले. वेरूळ येथील जगाला थक्क करून सोडणाऱ्या शिवलेण्यामुळें राष्ट्रकूटांनीं कलाकौशल्यांत आपलें नांव चिरंतन करून ठेवलें आहे. कृष्णरायानें त्याच्या शेजारीं जैन व बौद्ध लेणीं करवून आपली सहिष्णुता दाखविली आहे. जैनगुरू जिनसेन व पं. गुणभद्र यांना राष्ट्रकूटांचा आश्रय होता. शंकराचार्यांच्या धर्मस्थापनेमुळें बुद्धधर्म व जैनधर्म या

राजवटींत खालावलें. राष्ट्रकूटानंतर उत्तरचालुक्यांनीं सव्वादोनशें वर्षे राज्य करून वैभव वाढविलें. यांतील सहाव्या विक्रमादित्याचें चरित्र बिल्हणानें आपल्या विक्रमांकदेवचरितनामक काव्यांत लिहिलें आहे.

**(३२४) चालुक्य विक्रमादित्य** ( इ. स. १०७६ ते ११२६ ):– याच्या कारकीर्दींत हिंदुसंस्कृतीचा उत्कर्ष झाला. संस्कृतभाषेला आश्रय मिळाल्यामुळें अनेक चांगले ग्रंथ निर्माण झाले. याची राजधानी कल्याणी येथें होती. याज्ञवल्क्यस्मृतीवरील सुप्रसिद्ध टीका मिताक्षरा, तिचा कर्ता विज्ञानेश्वर हा याचा आश्रित होता. विक्रमादित्य स्वतः विद्वान व गुणग्राही होता. कांची येथील शिवविष्णूंचीं मंदिरें यानें दुरुस्त केलीं व नवीन बांधलीं. हिंदुधर्माचा यानें पुरस्कार केला. याच्या कारकीर्दींत कलादगी जिल्ह्यांत बागेवाडी येथें लिंगायत धर्माचा उदय झाला. बसवपुराण हा ग्रंथ चन्नबसवानें तयार केल्यावर या पंथाचा प्रचार जोरानें चालू झाला. विक्रमादित्यानंतर चालुक्यांच्या राज्याला उतरती कळा लागली, व यादव राजे पुढें आले.

**(३२५) सिंघण व रामदेवराव**:–यादवांचे दोन वंश चांदवड व देवगिरि येथें होते. समस्तभुवनाश्रय ही पदवी धारण करणारा जैत्रपाळ हा देवगिरि येथें पराक्रमानें राज्य करीत होता. हा तर्कशास्त्र व मीमांसा जाणत होता. याच्या पदरीं ज्योतिषी भास्कराचार्यांचा मुलगा लक्ष्मीधर व विवेकसिंधूचा कर्ता मुकुंदराय असे जाडे पंडित होते. जैत्रपाळाचा मुलगा सिंघण यादव हा प्रतिशिवाजीच होता. त्यानें उत्तरेकडे स्वाऱ्या करून क्षत्रियांना मांडलिक बनवून त्यांच्याशीं सोयरिकी केल्या. यानेंच शिखरशिंगणापूरचें देवालय बांधलें. सिंघणच्या पदरीं संगीतरत्नाकरचा कर्ता शार्ङ्गधर भास्कराचार्यांचा नातु प्रसिद्ध ज्योतिषी चांगदेव व पुतण्या गणपति अशीं विद्वत्रत्नें होतीं. पंडित चांगदेवानें ज्योतिषशास्त्र शिकविण्याकरितां खानदेशांतील चाळीसगांवजवळ पाटण येथें पाठशाळा काढली होती. तेथील शिलालेखावर कांहीं मराठी मजकूर आहे. दौलताबादचा शेवटचा वैभवशाली राजा रामदेवराय होय. याच्या कारकीर्दींत हेमाद्रि व बोपदेव असे विद्वान् पुढें आले. बोपदेवानें व्याकरणावर दहा, वैद्यकावर नऊ, ज्योतिषावर एक, साहित्यावर तीन आणि अन्यशास्त्रावरही अनेक ग्रंथ

लिहिले. " हरिलीला " या नांवाचा कृष्णचरित्रपर एक ग्रंथ बोपदेवानें लिहिला असल्यानें भागवत महापुराण यानेंच केलें अशी लोकांची भ्रांत समजूत झाली. हेमाद्रीनें मोडी लिपी व बाजरी शोधून काढली असे सामान्य लोक म्हणतात. हेमाडपंती मेस्तकें व ओबडधोबड पण बळकट इमारती आजहि पहावयास सांपडतात. हेमाद्रीचा चतुर्वर्गचिंतामणि हा ग्रंथ प्रसिद्ध आहे. ज्ञानेश्वरादि चार भावंडें रामदेवरायाच्या कालींच सत्पुरुष म्हणून प्रसिद्धीस आलीं. सिंघणाइतका पराक्रमी राजा यादवांत झालेला नाहीं. यादवांच्या राजवटींत मानभावपंथाचा उदय झाला. त्यामुळें मराठी वाङ्मय उत्पन्न झालें. याच सुमारास शिलाहारांचें राज्य कराड, कोल्हापूर या भागामध्यें होतें. या सर्व राजकीय घडामोडींचें समालोचन केल्यास असें दिसतें कीं, एकंदरींत बौद्ध संस्कृतीचा क्रमानें ऱ्हास आणि हिंदुसंस्कृतीचा विकास होत चालला होता. जैनमत, वीरशैवसंप्रदाय व मानभाव यांचाहि प्रादुर्भाव आढळतो.

अकराव्या शतकांत दक्षिणेमध्यें वेदसंमत सांप्रदायाचा पुरस्कार जोरानें करून क्रांतिकारक समाजसुधारणांची घोषणा करून हिंदुसमाजाला संघटित करण्याचें कार्य ज्या सांप्रदायानें केलें आणि दक्षिणेंत जैनमताच्या प्रसाराला ज्या संप्रदायानें नेटानें विरोध केला त्या वीरशैव तथा लिंगायत संप्रदायाचें स्थान हिंदुसंस्कृतीच्या नकाशांत चांगलें ठसठशीतपणें दिसतें. यास्तव पुढील प्रकरणांत त्या संप्रदायाची व त्याशीं समकालीन असलेल्या महानुभावसंप्रदायाची माहिती देतों.

—*—

## प्रकरण सतरावें

# वीरशैव तथा लिंगायत आणि मानभाव

हिंदुसंस्कृतीच्या नकाशांत पूर्ण वेदसंमत असलेल्या वीरशैव तथा लिंगायत संप्रदायाला बरेंच महत्त्व आहे. या संप्रदायानें दक्षिण महाराष्ट्रांतील व कर्नाटकांतील हिंदु समाजाला चांगलें जीवन दिलेलें आहे. हिंदुसंघटनेला पोषक अशीं संग्राहक तत्त्वें या संप्रदायांत आहेत. सत्ता, संपदा व संस्कृति विशेषतः संस्कृतीच्याच क्षेत्रांत समता उत्पन्न करण्याचें कार्य या संप्रदायानें केलें असल्यामुळें त्याचें यथातथ्य स्वरूप थोडक्यांत प्रस्तुत प्रकरणांत देण्याचें योजिलें आहे.

**(३२६) वेदप्रामाण्यः**—शैवशास्त्र पूर्ण वेदसंमत आहे. चार वेद म्हणजे शिवाचे निश्वास होत. शैवामध्यें सामान्य, मिश्र, शुद्ध आणि वीर असे मुख्य चार भेद आहेत. शिवागम हा मुख्य प्रमाण ग्रंथ होय. पाशुपत नांवाचा एक भेद शैवांतीलच आहे. पशु, पाश, व पति या पदार्थांचा विचार करून उत्पन्न झालेल्या ज्ञानापासून होणाऱ्या शिवसारूप्य मुक्तीचें प्रतिपादक शास्त्र तेंच वैदिक पाशुपत होय.

विशब्देनोच्यते विद्या शिवजीवैक्यबोधिनी ।
तस्यां रमन्ते ये शैवा वीरशैवास्तु ते मताः ॥

या उक्तीला अनुसरून लिंगांग सामरस्यरूप मुक्तीला प्रतिपादणारें मतच वीरशैव मत होय. वीरशैव मत स्वीकार्य आहे असें समजून अनेकांनीं या मताचें अवलंबन केलें आणि लिंगधारणादि बाह्य लक्षणें व भक्ति वगैरे अंतर्लक्षणें त्यांनीं स्वीकारलीं. वीरशैव मताचे उत्पादक रेणुक, दारुक, घंटाकर्ण, गजकर्ण, विश्वकर्ण हे आचार्य होत. याच आचार्यांना रेवणसिद्ध, मरुळसिद्ध, एकोराम, पंडिताराध्य अशीं निराळीं नांवेंहि आहेत. हे पंच आचार्य म्हणजे शिवाचीं सद्योजात, वामदेव इत्यादि पांच मुखें होत. या पंच आचार्यांचे ब्रह्मसूत्रावर भाष्यग्रंथ आहेत. वीरशैव मताचे हे पंच आचार्य द्विजांचे गोत्रकर्ते होत. लिंगधारणादि—विषयीं वेदाधारें अनेक ग्रंथ लिहिलेले

आहेत. तत्त्वमसि ही श्रुति वीरशैवांच्या लिंगांग संयोगास अनुसरून आहे. वीरशैवांचीं सर्व तत्त्वें वेदांतील ज्ञानकांडाला धरून आहेत. तें मत शक्तिविशिष्टाद्वैत असें समजलें जातें. नीळकंठ, शिवाचार्य, सोमाराध्य वगैरेंनीं ग्रंथाधारें या मताचें समर्थन केलेलें आहे. अन्य समाजाप्रमाणें याहि समाजांत सनातनी व सुधारक असे भेद आहेत. सनातन्यांना जुन्या पंच आचार्यांचा संप्रदाय मान्य आहे, तर सुधारकांना बसवेश्वराचें मतच अधिक पटतें.

**(३२७) वीरशैवांचे आचारः**–आठव्या वर्षीं शिवदीक्षासंस्कार होतो. या पंथांत शिखासूत्र नाहीं. तथापि वीरशैव शिवोपासक आहेत. दीक्षा, संस्कार, शिवलिंगार्चनाचा अधिकार स्त्रियांनाहि आहे. अंगावर कोठें तरी चांदीच्या किंवा लाकडाच्या करंड्यांत घालून अथवा वस्त्रांत गुंडाळून दंडास बांधून लिंग सदैव धारण करावयाचें असा यांचा दंडक आहे. लिंगधारणावरूनच यांना लिंगायत म्हणतात. अष्टावर्णामध्यें गुरु–आज्ञापालन, लिंगपूजन, जंगमाविषयीं आदर, विभूति व रुद्राक्षधारण, शिवपादोदकप्राशन, प्रसादभक्षण, नमःशिवाय या मंत्राचें संकीर्तन अशा गोष्टी येतात. भक्त, महेश, प्रसादी, प्राणलिंगी, शरण व ऐक्य अशा मोक्षाच्या षट्स्थळ म्हणजे सहा पायऱ्या ते मानतात. वीरशैवांत चार वर्ण व चार आश्रमही आहेत. तथापि भक्त व माहेश्वर असे दोन ठळक भेद आहेत. शिवार्चनादि पंचमहायज्ञ आहेत. शिव हाच मोक्षदाता व शिव हाच एकमेव देव असा या पंथाचा विश्वास आहे. वेद, आगम, उपनिषदें यांतील शिवभक्तिप्रधान भागास ते मानतात. ब्राह्मविवाह मुख्य मानून तो स्वजातीच्या पुरोहिताकडून होतो. वीरशैवांत अग्नीची उपासना नाहीं. म्हणूनच प्रेतें पुरण्याची चाल आली असावी. विवाहामध्यें होमाऐवजीं पंच कलश स्थापून पंच आचार्यांच्या साक्षींत लग्न लागतें. पुनर्विवाहाची रूढि आहे. संस्कारांचे मंत्र आगमोक्त आहेत. कारण ते वेदापेक्षां आगमाला मानतात. शैवागम हा त्यांचा मुख्य ग्रंथ होय! दीक्षाग्रहण, विवाह व उत्तरक्रिया एवढे तीनच संस्कार आहेत. मठ, मठपति वगैरे संस्था आहेत. ऋषिगोत्रें नाहींत. दीक्षेचे एकवीस प्रकार असून त्यांतील तीन प्रमुख आहेत. वीरशैवांत अनेक विद्वान ग्रंथकार झाले असून

त्यांनीं बाराव्या शतकापासून संस्कृतमध्यें आणि कानडीमध्यें पुष्कळच ग्रंथसंपत्ति निर्माण केलेली आहे. त्याला वचनशास्त्र म्हणतात. अठरा पुराणांपैकीं स्कंदलिंगादि दहा पुराणें आणि अठरा आगमें यांना या संप्रदायांत विशेष महत्त्व आहे. वेदामध्यें रुद्र व शिव या देवता आहेत. पाशुपत संप्रदायाचा उल्लेख महाभारतांत आहे. वीरशैव तत्त्वज्ञानांत २९ तत्त्वें असलीं तरी तीं सांख्याहून भिन्न आहेत. वीरशैवांचा एक मठ बद्रिकेदार व दुसरा काशी येथें असून, उर्वरित तीन दक्षिण हिंदुस्थानांत आहेत.

(३२८) **वैष्णवांविरुद्ध प्रतिक्रियाः**–बाराव्या शतकाचें शेवटीं रामानुजाचार्यांनीं म्हैसूरभागांत वैष्णवमताची स्थापना केली. त्यांतहि श्रीवैष्णव व वीरवैष्णवादि भेद आहेत. श्रीवैष्णवांनीं शूद्रास व इतर हीन जातींतील लोकांस मुद्राचिन्ह व इतर संस्कारहि करून आपल्या मताला मिळवून घेतलें आहे. त्यांना तिरुकूल असें म्हणतात. रामानुजानंतर सुमारें चाळीस वर्षांनीं कानडी व तेलंगी भाषा बोलणाऱ्यांमध्यें शिवभक्तीचा प्रसार होऊन लिंगायत या नांवाची एक प्रसिद्ध जात बनली. बसवानें आपल्या पंथांत ब्राह्मणापासून अंत्यजापर्यंत सर्वांना प्रवेश देऊन वैष्णवांविरुद्ध एक तऱ्हेची प्रतिक्रियाच केली! वीरशैवमतांत शिरलेले लोक पूर्वीं आचरण करीत असलेल्या जातींत जी पदवी भोगीत होते, तीच पदवी वीरशैवमतांतहि भोगतात. म्हणजे सामाजिकदृष्ट्या तोच दर्जा व धंदाहि तोच अशी स्थिति आहे. अकराव्या शतकांत ज्यांनीं या सुधारणा केल्या त्या बसवेश्वराचें चरित्र येथें थोडें देणें उचित आहे.

(३२९) **बसवेश्वरचरित्रः**—वीरशैवांतील मोठा कर्ता आणि सुधारक पुरुष म्हणजे बसव होय! हा आराध्य ब्राह्मण विजापूर जिल्ह्यांतील, बागेवाडी येथें जन्मला. चालुक्याच्या उतरत्या काळांत विज्जल नामक सेनापतीनें राजाला पदच्युत करून राज्य बळकावलें. विज्जलाचा मुख्य प्रधान बलदेव होता. बसव हा मोठा कारस्थानी होता. तेव्हां त्यानें आपला मामा जो बलदेव मुख्य प्रधान त्याच्या पश्चात् तें प्रधानपद बळकावलें, आणि आपल्या बहिणीचा मुलगा जो चन्नबसव त्यास हाताशीं धरून अधिकाराच्या जोरावर लिंगायतसंप्रदाय भरभराटीस आणला. कांहीं कार-

णानें राजा विज्जलाचें आणि बसवाचें पुढें वांकडें आलें. बसवानें राजाला मारलें. राजपुत्रानें बसवाचा सूड घेण्याच्या हेतूनें पाठलाग चालविला असतांना तो मलप्रभेंत पडून ( कोणी म्हणतात विहिरींत ) समाधिस्थ झाला. चन्नबसवानें आपल्या मामाचें हें कार्य वीरशैवपंथ वाढीस लावून पुरें केलें. वैश्यवर्णांतून त्याला बरेच अनुयायी मिळाले. कारण याच वर्णांतील बरेच लोक जैन झालेले होते.

(३३०) **क्रांतिकारक सुधारणा:**—बसवेश्वर हा मोठा क्रांतिकारक होता. त्यानें जातिभेद मोडून सर्व लिंगधारी समान दर्जाचे आहेत आणि स्त्रियांना पुरुषांच्या बरोबरीचें स्थान देऊन त्याहि मोक्षाधिकारी आहेत असें ठरविलें. विधवाविवाहाला मान्यता दिली, इतकेंच नव्हे तर विवाहित व पुनर्विवाहित स्त्रियांची योग्यताहि सारखी ठरविली. अस्पृश्यता काढून टाकली. साध्या रहाणीचा उपदेश केला. भिक्षा मागण्याचा निषेध करून स्वकष्टानें उपजीविका करणाऱ्यांची योग्यता अधिक ठरविली. कर्मकांड व तपश्चर्या यांपेक्षां अंतःशुद्धीवर अधिक भर दिला. आत्मशुद्धीनें सर्व पातकांची शुद्धि या जन्मांतच होते, अन्यजन्माची आवश्यकता नाहीं असेंहि त्यानें प्रतिपादिलें. जातिबाह्य मनुष्याला जातींत घेतां येतें अशी बसवाची शिकवण आहे. चातुर्वर्ण्य आणि कर्मकांड यामुळें तत्कालीन सामान्य जनांना जो धर्ममार्ग सुलभ व सोपा असा हवा होता, तोच बसवानें दाखविला. बसवेश्वराला मतप्रचाराचे कामीं अनेक लेखकांचें साह्य झालें. त्याचे प्रमुख सहकारी म्हणजे मडिवाल मचैय्य, प्रभुदेव आणि सिद्धराम हे होत. षट्स्थळवचन, कालज्ञानवचन, मन्त्रगोप्य, घट्चक्रवचन आणि राजयोगवचन असे बसवानें रचलेले लिंगायत ग्रंथांचें निरुपण करणारे ग्रंथ आहेत. बसवाला नंदीचा अवतार आणि चन्नबसवाला शिवावतार असें मानतात. हा पंथ बसवेश्वरानें सुरू केला असें नसून शिवलिंग आणि नंदी यांच्या उपासनेचा जो लिंगायत पंथ पूर्वापार चालत आलेला होता त्यांत अनेक क्रांतिकारक सुधारणा करून तो सामान्य जनांना सुलभ असा केला.

**जैनांचा छळ:**—बसवेश्वरानें अधिकाराच्या जोरावर जैनांचा छळ केला असें म्हणतात. वीरशैव व जैन यांचे कर्नाटकांत आणि दक्षिण हिंदुस्थानांत

पुष्कळच विग्रह झालेले आहेत. अलीकडील जैन लेखक त्यांचीं पुष्कळ भडक वर्णनें करतात. कुमारिल भट्ट आणि रामानुज यांच्या कालांत जैनांचा प्रखर छळ झाला असेंहि कोणी म्हणतात. तथापि एवढें खरें कीं पांड्यांचा राजा नेदुमारण हा जैन होता. त्यानें चोल राजाच्या शिवभक्त कन्येशीं विवाह केला व तिच्या वजनानें त्यानें शैवधर्म स्वीकारला. असें पथांतर केल्यावर त्यानें मोठ्या अभिनिवेशानें थोड्या थोडक्या नव्हे तर आठ हजार जैनांना सुळावर चढविलें. ज्या ठिकाणीं हा अनन्वित प्रकार घडला त्या मदुरेंत अद्यापिहि शिवाच्या महोत्सवांत सातवा दिवस हा जैनांच्या सुळाचा दिवस म्हणून पाळला जातो. ( संस्कृतिसंगम पा. २५५ ).

(३३१) **महानुभाव पंथः**—यादवांच्या राजवटींत स्वास्थ्य लाभल्यामुळें शूद्र म्हणून उपेक्षिलेला अफाट समाज पुष्कळ सुधारला होता. त्याची आर्थिक स्थिति उत्तम होती. पण बौद्धिक आणि मानसिक स्थितीची उपासमार होत होती. कारण सर्व धर्मग्रंथ संस्कृतमध्यें, वादविवाद संस्कृतमध्यें, कांहीं पुराण ऐकलें तर त्यामुळें त्यांचें समाधान न होतां उलट गोंधळच होई. अशा या जटिल परिस्थितीमुळें महानुभाव पंथ उदयास आला. श्रीशंकराचार्यांनीं वैदिक धर्माचें पुनरुज्जीवन केल्यानंतर वर्णभेद, कर्मकांड, आणि उच्चनीचता हीं असह्य झालीं. हा भेदभाव सौम्य करण्याकरितां एकीकरणाचा जो यत्न झाला त्यांतीलच महानुभाव हा एक पंथ होय. चक्रधर नामक ब्राह्मणानें या पंथाची स्थापना केली. या संप्रदायाला वेद व चातुर्वर्ण्य हीं मान्य आहेत. उपदेशी व संन्यासी असे यांचे दोन वर्ग आहेत. उपदेशी हा जातिधर्म व संस्कार पाळतो. लग्नादि व्यवहार सजातीयांशींच करितो. पण एकाद्यानें जर महानुभावीय संन्यासदीक्षा घेतली तर जातिनिर्बंध पाळण्याची जरुरी नाहीं. स्त्रीशूद्रांनाहि संन्यास घेतां येतो व तो घेतल्यावर अस्पृश्येतर संन्याश्यांमध्यें जातिनिर्बंध नाहींत, हा या पंथाचा विशेष आहे. हा पंथ ईश्वर मानतो. पंथसंस्थापक चक्रधराला ईश्वराचा अवतार समजतात. दत्तात्रेय व श्रीकृष्ण यांना पूर्णावतार समजतात आणि हंस, प्रशांत आणि चक्रधर असे तीन मिळून पंचकृष्ण मानतात. श्रीमत् भगवत्गीता आणि भागवतांतील दशम व एकादश स्कंध हे प्रमाण मानतात.

तिरस्काराचीं कारणें:–साधुसंतांच्या वाङ्मयांत मानभावांविषयीं बराच तिरस्कार आहे. भागवतधर्मांतील भक्तिसंप्रदाय या पंथाला मान्य आहे. परंतु स्त्रीपुरुषांना संन्यास देऊन भगव्या वस्त्रांऐवजीं काळें वस्त्र नेसण्याची टूम चक्रधरानें काढली म्हणून नाथ म्हणतात–'होऊनि मान-भाव । अवघा बुडविला ठाव ॥ नेसूनि काळेपण । अंगा लाविती दूषण ॥ एका जनार्दनी देवा जळो जळो त्यांची सेवा ।' तुकारामाच्या अभंगांतहि मानभावांविषयीं तिरस्कारच आहे—

दाढी, डोई, मुंडी मुंडूनिया सर्व । पांघुरती बरवीं वस्त्रें काळीं ।
चाळवुनी रांडा देऊनियां भेष । तुका म्हणे त्यास यम दंडी ॥

मानभावांमध्यें प्रथम मूर्तिपूजा नव्हती. त्यामुळें ते कृष्ण, दत्तात्रेय, चक्रधर यांच्या चरणस्पर्शानें पवित्र झालेल्या स्थळीं आपले ओटे बांधूं लागले. हिंदु हे मूर्तिपूजक आणि मानभाव हे ओटे बांधणारे म्हणजे हिंदूहून भिन्न असा मुसलमानांचा समज झाला. मुसलमानी अंमलांत एका पाताळयंत्री मानभावानें स्वपंथरक्षणार्थ आणि जिजिया कर टाळण्यासाठीं चौदाव्या शतकांत तत्कालीन एका बादशहाकडून एक फर्मान मिळविलें आणि मुसलमानांनीं उध्वस्त केलेल्या हिंदूंच्या प्राकारांतहि ओटे बांधले. त्यामुळें मानभावांविषयीं तिरस्कार अधिक वाढला. काळीं वस्त्रें धारण करणारा, शूद्रांनाहि संन्यासदीक्षा देणारा, हिंदूंशीं फटकून वागणारा, आपले धर्मग्रंथ गुप्त ठेवणारा म्हणून या समाजाबद्दल आधींच सनातनी हिंदूंचा तिरस्कार होता. त्यांत मुसलमान सुलतानाकडून शाहपोश, काळीं वस्त्रें परिधान करणारा असें उपपद लिहून घेतल्यामुळें तो तिरस्कार वाढला. म्हणूनच सर्व संतांच्या वाङ्मयांत मानभावांची निंदा भरपूर आहे. करणी कसाबाचीं बोलणीं मानभावाचीं, शुद्ध मानभावीपणा या म्हणीहि तिरस्कार-दर्शक आहेत. महानुभावांची लिपी सांकेतिक असून शके १२७५ पासून त्यांनीं ती गुप्त ठेवण्याचा प्रारंभ केला. मानभावांचें मराठी वाङ्मय विविध, विपुल आणि प्रचंड आहे. ज्ञानेश्वरपूर्वकालीन मानभावी मराठी वाङ्मय पुष्कळच आहे. तें पाहिलें म्हणजे ज्ञानेश्वरांनीं गीतेला देशीकार लेणें कां दिलें असावें याचा उलगडा होतो.

(३३२) **प्रसाराचें क्षेत्रः**—या पंथास गुजराथेंत अच्युतपंथ आणि पंजाबांत जयकृष्णी पंथ म्हणतात. चक्रधराचे सुमारें पांचशें शिष्य होते. त्यांतील प्रमुख अशा शिष्यांनीं सर्वत्र शाखा सुरू केल्या. त्यांस आम्नाय म्हणतात. बसवेश्वर आणि चक्रधर हे दोघेहि समाजसुधारक व क्रांतिकारक होत. चक्रधरानें वेदानुयायित्व ठेवून हिंदुधर्मांत सुधारणा केली. बसवेश्वरानेंहि जवळजवळ तसेंच केलें. वेद व चातुर्वर्ण्य हीं दोघांनींहि झुगारून दिलीं असें कांहींचें मत आहे. उपनिषदें, गीता व भागवत हे ग्रंथ प्रमाण मानून एका ब्राह्मणानेंच हा पंथ स्थापन केला. या पंथाचें आचार्यत्व पहिलीं तीनशें वर्षें ब्राह्मणकुलाकडेच होतें. पंजाबसारख्या यवनप्रधान देशांत या पंथानें अहिंसातत्त्वाचा प्रचार केला आणि मद्यमांसापासून समाजाला निवृत्त केलें. मराठी भाषेचा प्रसार गझनी, काबूल, कंदाहारपर्यंत करून काबुलास कृष्णमंदिर बांधलें व नागेंद्रमुनि विजापूरकर या नांवाच्या दक्षिणी ब्राह्मण महंताची नेमणूक केली. काबुलांत महानुभावांचे मराठी ग्रंथ आहेत. काबूलचा अमीर दोस्त महंमद याचा प्रधान चरणदास आणि काश्मीरचा राजा गुलाबसिंह याचा सेनापति सरदार भगतसुजनराय यांनीं महानुभावी उपदेशामुळें आपल्या अमदानींत मराठी ही धर्मभाषा मानली. आज पंजाबांतसुद्धां कित्येक धनिक व्यापारी, सरकारी अधिकारी व विद्वान् गृहस्थ हे महानुभावीय असून धार्मिक भाषा मराठीच मानतात. महानुभावांचे पुष्कळ दुर्मिळ ग्रंथ पेशावरकडेहि आहेत. हा पंथ मूळ वऱ्हाडांत ऋद्धिपूर येथें अस्तित्वांत आला. तथापि आतां सबंध महाराष्ट्र, गुजराथ, मध्यप्रांत, इंदूर, संयुक्तप्रांत, पंजाब या सर्व भागांत या पंथाचा प्रसार झाला आहे. या पंथाचीं कृष्णमंदिरें काश्मीर व काबूलपर्यंत असून या पंथाचे अनुयायी गझनी व कंदाहारपर्यंतहि पसरलेले आहेत.

—*—

## प्रकरण अठरावें

# इस्लामवर ओझरती नजर

(३३३) **महंमद पैगंबरः**–इ. सन ७११ मध्यें इस्लामचा हिंदु संस्कृतीशीं आक्रमक या नात्यानें संबंध आला. त्यापुढें हिंदुसंस्कृति व इस्लाम यांचे बरींच वर्षें संघर्ष चाललेले होते. त्या राजकीय दालनांत प्रवेश करण्यापूर्वीं इस्लामची माहिती येथें देणें अवश्य वाटतें. इस्लामचा संस्थापक महंमद पैगंबर हा इ. सन ५७१ मध्यें अरबस्थानांत कुरेश जातीच्या हशम घराण्यांत जन्मला. हे लोक मूर्तिपूजक होते. भगवान् श्रीकृष्ण, बुद्ध, महावीर, शंकराचार्य, ख्रिस्त या सर्व धर्मप्रवर्तकांपेक्षां महंमद पैगंबरनें धर्मप्रसारार्थ निराळाच मार्ग काढला. नवा धर्मसंस्थापक कांहीं नवीं तत्त्वें सांगतो, तीं जुन्यांना आवडत नसतात, म्हणून ते त्यांचा छळ करतात व तो धर्मसंस्थापक लोकांकडून होणारा छळ आनंदानें सहन करतो, असा सर्वसाधारण जगांत नियम आहे. मूर्तिपूजक कुरेशांना महंमद पैगंबरचा उपदेश मानवला नाहीं. त्यांनीं त्याला ठार करण्याचा कट केला, तेव्हां हा पळून मदिनेस गेला. तेथें त्याला हळू हळू अनुयायी मिळाले; छलकांविरुद्ध त्यानें तलवार हातीं धरली. लढायांवर लढाया देऊन छलकांस चीत केलें आणि धर्मस्थापनेबरोबर राज्यस्थापनाहि केली. पैगंबरचे ठिकाणीं अनेक सद्‌गुण होते, त्यामुळें त्याची छाप त्याच्या अनुयायांवर पडली व तत्कालीन अरब, तुर्क, मोंगल, अफगाण, ज्या रानटी अडदांड जाती होत्या त्यांमध्यें त्यानें आपल्या धर्मोपदेशानें नवचैतन्य उत्पन्न केलें. महंमदाच्या उपदेशामुळें त्याच्या अनुयायांत मोठी संघटना उत्पन्न झाली आणि पराक्रम करून सर्व जगभर राज्यस्थापना करावी अशीहि त्यांना चेतावणी मिळाली. पैगंबराचा उपदेश, कुराणांतील शिकवण, त्याचें नैतिक वर्तन वगैरेसंबंधीं विद्वानांमध्यें पुष्कळ मतभेद आहेत. तेव्हां तो वादग्रस्त विषय येथेंच सोडून पश्चिमेकडून जे मुसलमान आक्रमक हिंदुस्थानांत आले त्यांच्या आक्रमणाकडे थोडी ओझरती नजर टाकूं.

(३३४) इस्लामच्या आक्रमणाचा आढावा:—मुसलमानांच्या पहिल्या स्वाऱ्या संघटितपणें केवळ लुटारूपणाच्या होत्या. महंमद बिन कासीमनें इ. स. ७११ मध्यें सिंधवर स्वारी केली. दाहरचा पराभव करून नेरून, शिबिस्तान, ब्राह्मणाबाद वगैरे जिंकून लूट मिळविली. हे स्वारीवाले परत फिरले मात्र तों रजपुतांनीं थोड्या काळांत तेथील मुसलमानी सत्ता नामशेष करून टाकली! गझनीच्या महंमदाच्या स्वाऱ्या लुटीकरितांच होत्या, व त्या सिंधच्या आसपासच होत्या. त्यानें बारावी स्वारी काय ती सौराष्ट्रांत केली व इ० स० १०२४ मध्यें सोमनाथ लुटून तो जात असतांनाच राजपुतांचे रट्टे खात खातच त्याला गिझनी गांठावी लागली. महंमद घोरीनें इ. सन ११९३ मध्यें मुसलमानी सत्ता स्थापण्याचा यत्न केला व अल्लाउद्दिन खिलजीपर्यंत थोडाथोडा सत्तेचा विस्तारहि केला. दक्षिणेमध्यें दूरवर अशी अल्लाउद्दिनाची स्वारी देवगिरीवर झाली. पण त्याच्या अंतकाळीं इतकी बेबंदशाही झाली कीं कर्नाटक व वरंगळ येथील प्रबळ हिंदु राजांनीं मुसलमानांना दक्षिणेंतून पिटाळून देवगिरिहि घेतली! खिलजी, तुघलख, सैयद व लोदी अशा घराण्यांतील मुसलमानांकडून फारशी सत्ता प्रस्थापित झाली नाहीं. दिल्लीच्या आसपास यांची सत्ता असे. मारामाऱ्या आणि अंदाधुंदी यांचें साम्राज्य असे. इ. स. १५२७ मध्यें फत्तेपूर शिक्रीच्या लढाईनंतर मोंगल बादशाहाची सत्ता दिल्लीच्या आसपास प्रस्थापित झाली. बाबरला सत्तेनें थोडें स्वास्थ्य दिलें, पण हुमायूनला पुढें लौकरच वनवासांत जाणें भाग पडलें. अकबरानें हिंदूंच्या सहाय्यानें मुसलमानी सत्तेला स्थैर्य आणलें, मेवाडशिवाय राजपुताना त्यानें जिंकला. बंगाल, गुजराथ त्यानें सर केले, पण खानदेशच्या पुढें दक्षिणेंत त्याची सत्ता प्रस्थापित झाली नाहीं. अकबरानंतर जहांगीर व शहाजहान हे विलासी निपजले. त्यांच्याच कारकीर्दींत इ. स. १६१५ मध्यें ईस्ट इंडिया कंपनी मोंगल साम्राज्यांत घुसली. शिवाजीच्या जन्मापासून मुसलमानी सत्तेला हिंदु ग्रहणाचा वेधच लागला! अकबरानंतर मुसलमानी सत्ता औरंगजेबानें जारी केली. पंचवीस वर्षांत त्यानें दक्षिणेंतील मुसलमानी राज्यें बुडविलीं, मराठ्यांवरहि त्यानें दरारा बसविला. पण धर्मवेड, मत्सर व दुराग्रह या दुर्गुणांमुळें एवढी प्रतिक्रिया झाली कीं

मोंगल बादशाहीचा ऱ्हास त्यामुळें चालू झाला. औरंगजेबानें मराठ्यांना जेर केलें, संभाजीचा वध केला, राजारामाला पळविलें, तथापि मराठ्यांनींच त्याला इतकें रडकुंडीस आणलें कीं त्या काळजींतच त्याचा अंत झाला. अकबर ते औरंगजेबापर्यंतचा काल म्हणजेच मुसलमानी सत्तेचा उत्कर्षकाल होय ! अकबराच्या राज्याचा विस्तार राजा मानसिंग, राजा तोडरमल्ल अशा पराक्रमी व मुत्सद्दी हिंदूंच्या मदतीनेंच झाला. औरंगजेबानंतर जे तख्ताधिपति झाले ते इतके नादान होते कीं, मराठ्यांच्या आश्रयावरच ते जगत होते. नादीरशहानें इ. सन १७३९ त दिल्लीचें मयूरासन लांबविलें. इ. स. १७६० त सदाशिवराव भाऊनें दिल्लीच्या सिंहासनावर घण घातला. अलिजाहबहादूर महादजी शिंदे यानें शहा अलमला पेन्शनर बनविलें. खर्ड्याच्या लढाईत मराठ्यांनीं निजामाला चांगले खडे चारले. पटवर्धन सरदारांनीं हैदर व टिपु यांची हड्डी चांगली नरम केली. इ. स. १८०३ मध्यें इंग्रजांनीं दिल्लीचें राज्य खालसा केलें. मुसलमानांचीं मुख्य राज्यें उत्तरेंत दिल्ली व दक्षिणेंत पांच ठिकाणीं होतीं. तथापि त्याशिवाय गुजराथ, काश्मीर, बंगाल, बिहार, माळवा, खानदेश, जोनपूर, मुलतान व सिंध अशा निरनिराळ्या भागांत मुसलमानांचे लहान लहान सत्तापुंज होते. ते सर्व पुढें निरनिराळ्या काळीं कांहीं कारणानें खालसा झाले, कांहीं नष्ट झाले व कांहीं आज शिल्लक आहेत. मुसलमानी सत्ता जोरांत असतांनासुद्धां उत्तरेंत व दक्षिणेंत हिंदूंचीं अनेक स्वतंत्र राज्यें होतीं. आजहि अनेक हिंदु संस्थानें अस्तित्वांत आहेत. त्यावरून इस्लामचें खग्रास ग्रहण हिंदुसंस्कृतीला नव्हतें हें उघड आहे. इस्लामशीं हिंदुसंस्कृतीचा संघर्ष इ. स. १००० ते १७५७ पर्यंत म्हणजे साडेसातशें वर्षेंपर्यंत चालू होता. शेवटीं राजपूत, विजयनगरकर, मराठे व शीख यांनीं मुसलमानी सत्तेला मोडून काढलें, असेंच इतिहास सांगतो.

**(३३५) हिंदु जातीची हीन स्थिति**:—लुटारूपणाच्या स्वाऱ्यांनंतर इ. स. ११९३ ते १५२६ पर्यंतचा हा तीनशे तेहतीस वर्षांचा काल संग्राम, धामधूम, कडवा लष्करी अंमल, स्वाऱ्या व लूट यांनींच भरलेला आहे. हिंदूंचा प्रतिकार अव्याहत चालू होता, त्यामुळें हीं सव्वा तीनशें वर्षें अंमल सुस्थिर करणें व राज्याला बळकटी आणणें यांतच गेलीं. हा

काल हिंदुप्रजेच्या दृष्टीनें फारच वाईट गेला. राज्यारूढ असलेल्या घराण्यांत कपट, विश्वासघात, क्रौर्य व कत्तल असे प्रकार चालत. कोणी बापाचा, तर कोणी चुलत्याचा मुडदा पाडी. कोणी सगळ्या भावांची वाट लावी, तर कोणी सर्वांना तुरुंगांत टाकून राज्य बळकावी! राज्यपदाच्या उलाढाली, राजघराण्यांतील कत्तली, क्षणांत एक राज्यव्यवस्था, तर क्षणांत दुसरी तऱ्हा, अशामुळें जनहिताच्या दृष्टीनें हा काल फार वाईट गेला. एखादा पराक्रमी पुढें येई, तों दुसरा त्याला नाहींसा करी! जनहिताची आणि राज्य करण्याची लायखीच फार थोडी असल्यामुळें या कालांत बंगाल, गुजराथ, माळवा व खानदेश येथील सुभेदार स्वतंत्र झाले. जो जो राज्यारूढ होई, तो तो कडवेपणानें देवालयें पाडी, मूर्ति फोडी, विद्यापीठाचा विध्वंस करी आणि लूट नेई. राज्यकारभारांत कुशलता दाखविणें, जिंकलेल्या लोकांचें प्रेम संपादन करून त्यांची उन्नति करणें हे विचार या शासकांच्या मनालाहि शिवले नाहींत. या अशा कट्टया व कडव्या अमलामुळें हिंदुसमाजाची स्थिति फारच हीन झाली होती.

(३३६) **सरकार व सरदेसाई यांचीं मतें**:—सुप्रसिद्ध इतिहासज्ञ जदुनाथ सरकार आणि रावबहादूर सरदेसाई यांच्या ग्रंथाधारें त्यावेळच्या हिंदूंच्या स्थितीचें थोडें चित्र रेखाटतों.

"एकंदरींत हिंदु लोकांना कोणी विचारीत नसे. जिझिया करामुळें सर्व त्रस्त झाले होते! हिंदूंना खालच्या प्रतीच्या नोकऱ्या मिळत असत. मुलकी खात्यांत त्यांचा विशेष भरणा असे. व्यापार, उदीम व कलाकौशल्य हीं हिंदूंच्या हातांत असत. लष्करामध्यें व मोठमोठ्या अधिकाराच्या जागांवर हिंदूंना प्रवेश मिळत नसे. दरबारच्या कामांत जरी हिंदूची मदत लागे, तथापि त्यांना मानमरातबाच्या जागा मिळत नसत." ( हिस्टरी ऑफ औरंगजेब—सरकार पा. २५७ )

मुसलमान राज्यकर्त्यांना हिंदूंचे कायदे समजत नसत. मुल्ला, मौलवी व काजी हे कसा तरी अनमानधबक्यानें न्याय देत. त्यामुळें हिंदूंच्या मिळकती, वांटण्या व वारसदार या संबंधांत फारच अन्याय होई. जातिभेद व धार्मिक बंधनें यांमुळें हिंदु लोक आपसांत जें कांहीं ठरवीत,

तेवढेंच त्यांच्या फायद्याचें असे. तें सोडल्यास मुलकी, फौजदारी अशा कामांत सर्व गोंधळच असे !

परचक्र आलें रे आलें कीं सामान्य जनसमुदायाची स्थिति फार वाईट होत असे. जे धीर व पराक्रमी असत ते लढून मृत्यूला कवटाळीत. स्त्रिया शत्रुभयानें पटापटा अग्निकाष्ठें भक्षण करीत. मुलेंबाळें तरी सुरक्षित रहावीं म्हणून आईबाप त्यांना कोठें तरी पोहोंचवून अपत्यविरहाचें दुःख गिळीत व पळून जात. जवळ असलेली मिळकत व इतर सोनें-नाणें वगैरे जिन्नस पुरून दृष्टीआड करण्यांत येत. भांडींकुंडीं विहिरींत टाकलीं जात. हा नित्याचा क्रम असल्यामुळें बाह्यतः सदैव गरिबी व हायहाय दाखविण्याचा प्रचार पडला. कपडालत्ता, धान्य, कांहीं असलें तरी त्याच्या उपभोगाची चोरी असे. पैसे मोजावयाचे झाले तर ते गुप्तपणें ! कांहीं खावयाचें झालें तर तें चोरून! कारण आपणाजवळ कांहीं आहे, असा संशयसुद्धां येणें हें बरें नव्हतें. अखंड अस्वाथ्य, क्षणभंगुरता, अस्थिरता, चिंता, हुरहुर, काळजी व औदासिन्य यांमुळें विलास, आराम व उपभोग या कल्पना जळून खाक झाल्या होत्या. पिकांची वाताहात होई. शेतांत धान्य पिकलें तर घरीं येण्याची पंचाईत, व धान्य घरीं आले तर तें खपवावें कसें हा प्रश्न ! त्यामुळें वीस वीस वर्षें धान्य घरांतील पेवांत कुजत पडलें जात असे ! दळणवळण अगदीं बंद होई. एक गांव सोडून दुसऱ्या गांवास जावयाचें म्हणजे मोठे प्रयास व संकट वाटे. व्यापाऱ्यांनाहि जकाती, दस्तुऱ्या वगैरेंचा त्रास होई. चौक्या, पहारे हे असूनसुद्धां लुटालुटीची भीति व उपद्रव नेहमी असे. जीव कसा जगेल, अब्रु कशी राहील आणि बायका व मुलें कशीं सुरक्षित राहतील, अशी विवंचना सारखी असल्यामुळें हिंदूंचे हाल या कालांत किती झाले असतील याची कल्पनाच करवत नाहीं. (मु. रि भा. १ पृ. ३६९) ( हि. ऑ. औ. –सरकार पा. २५४ ते २६०).

प्रत्येक खेड्यापाड्यांतील लोकांवर सुद्धां मुसलमानांनीं जिझिया कर बसविला होता. तो देण्याचा त्राण नसल्यामुळें कित्येक वेळां गांवचे गांव जाळून लुटून फस्त केले जात किंवा बाटवून भ्रष्ट करीत. सरकार देणें पूर्वीं धान्याच्या रूपानें होतें, तें मुसलमानांनीं पैशाच्या रूपानें वसूल करण्याची

प्रथा पाडल्यामुळें प्रजेचा (हिंदु प्रजेचा) छळ अतिशय होई. अशा विपत्तींत हिंदूंनीं आपली संस्कृति मोठ्या प्रयासानें जतन केली. इतकेंच नव्हे तर आपल्या श्रेष्ठ संस्कृतीचा पुढें मोंगली बादशाहींत हळु हळु इस्लाम संस्कृतीवरहि प्रभाव पाडला, हें मोठें विस्मयकारक आहे. संस्कृतीच्या विविध अंगाचें परीक्षण केल्यास वरील विधानाची यथार्थता पटेल.

(३३७) **हिंदूंचें सांस्कृतिक वर्चस्वः**—पंधराव्या व सोळाव्या शतकांत हिंदूंचा प्रतिकार राजकीयदृष्ट्या अयशस्वी ठरला. तथापि सांस्कृतिकदृष्ट्या वर लिहिल्याप्रमाणें बिकट परिस्थिति असतांहि हिंदूंचें वर्चस्वच होतें. इराण, अरबस्तान, तुर्कस्तान, इजिप्त, उत्तर आफ्रिका येथील पूर्वधर्म व संस्कृति नष्ट झाली, तसें हिंदुस्थानांत झालें नाहीं. अत्यंत प्रतिकूल परिस्थितींत हिंदुसंस्कृति टिकली, इतकेंच नव्हे तर आक्रमक मुसलमानावर आणि बाटून मुसलमान झालेल्या समाजावर तिनें आपला प्रभाव पाडला. हिंदुसमाज हतप्रज्ञ झाला नव्हता. धार्मिक, नैतिक, सांस्कृतिक, सामाजिक बाबतींत हिंदूंनीं आपलीं मनें दृढ ठेवलीं होतीं. मुसलमान हे कांहीं कारणानें जरी विजेते असले तरी ते आपल्यापेक्षां श्रेष्ठ आहेत, धर्म व संस्कृति या क्षेत्रांत त्यांच्यापासून कांहीं घेतलें पाहिजे, त्यांचें अनुकरण केलें पाहिजे, हें हिंदूंच्या स्वप्नांतसुद्धां आलें नव्हतें. किंबहुना मुसलमानापेक्षां आपण सर्व दृष्टीनें श्रेष्ठ आहों असाच हिंदूंचा आत्मविश्वास होता. 'मॉडर्न रिव्ह्यू' नामक एका मासिकांत १९११ सालीं बॅ. मझरलहक्क यांनीं एक लेख लिहिला आहे. समग्र केळकर ग्रंथाच्या संस्कृति खंडांतील ६३५ पानावर तो दिलेला आहे. त्यावरून गर्भाधान, उष्टावण, लग्न, लग्नांतील दहिभात खाण्याचा विधि, लग्नांतील गाणीं, मुलांचीं नांवें, भाषा, पोषाख, रीति—रिवाज, यात्राजत्रा, मूर्तिपूजा, ज्योतिष, शकुन, शास्त्रें, कला, जातिसंस्था, आचारविचार, शिष्टाचार या सर्व बाबतींत हिंदूंच्याच चालीरीती व समजुती मुसलमानामध्यें आहेत असें दिसेल. संत मंडळीची छाप तर मुसलमान समाजावर फारच पडलेली होती. अलीकडे मुसलमानांत हिंदूहून आपण कोणी निराळे आहों, अशा तऱ्हेचा जरी न्यूनगंड उत्पन्न झालेला असला, तथापि वस्तुस्थिति त्या उलट आहे, हें आजहि सूक्ष्मपणानें अवलोकन केल्यास दिसून येईल. मुसलमानामध्यें मूर्तिपूजा निषिद्ध असली तरी पंजे, नालपीर, नाल-

साहेब आणि मृतांचीं थडगीं हीं सर्व मूर्त प्रतीकेंच आहेत. नाण्यावर प्रतिमा खोदणें, बादशहाचा मुखवटा काढणें हें सर्व हिंदु संस्कृतीचेच परिणाम होत. अकबर तर हिंदुसारखाच वागत असे. तो हिंदु सत्पुरुषांचा उपासक होता. कारण मुसलमानांचे उरूस जेथें होतात त्यांपैकीं पुष्कळ ठिकाणें मूळचीं. हिंदु सत्पुरुषांचीं आहेत. पुष्कळ ठिकाणच्या हिंदु साधूंचे पुजारी मुसलमान व हिंदु असे दोघेहि आहेत. मूळ हिंदु सत्पुरुषांचीं स्थानें, तेथें शंकराच्या पिंडीची स्थापना व पुढें मुसलमानांचें आक्रमण असा इतिहास दिसतो. जव्हार येथील राजवाड्या-बाहेरील पिरास सदोबा म्हणतात. तो मूळचा सदानंद नांवाचा हिंदु सत्पुरुष होय. त्याचा पुजारी मुसलमान आहे. नगरचे पिरास विठोबा म्हणतात. अहमदाबादेस मलिकसहान याच्या कबरेस नरसोबा म्हणतात. कल्याणजवळील किल्ल्यांत असणाऱ्या पिराला बाबा मलंग म्हणतात, त्याचे पुजारी केतकर ब्राह्मण आहेत. चिंचवड भागांतील मुसलमान संकष्ट्या करतात. पंढरपूर भागांतील कित्येक मुसलमान शनिवारचा उपवास करतात. पुष्कळ मुसलमान हिंदूंच्या यात्राजत्रांस जातात, तेथें भाग घेतात आणि हिंदु देवतांची उपासनाहि करतात. हिंदुद्वेष्टा एवढा टिपु, तोसुद्धां इ. स. १७९१ मध्यें मराठे चालून आलेले पाहून इतका घाबरला कीं त्यानें हिंदु देवता व खुद्द शंकराचार्य यांनाहि आळविण्यास सुरुवात केली. त्याबद्दल हरिपंत फडके लिहितोः—

'रंगस्वामीपाशीं व शिवालयीं ब्राह्मण अनुष्ठानास घालून प्रयोग चालविले आहेत. एक ब्राह्मण जलांत मस्तक ठेवून दोन अडीच प्रहर वरते पाय करून अनुष्ठान करीत आहे. बहुत ब्राह्मणांकरवीं अनुष्ठानें चालविलीं. त्यांत कोणी भोजन करून, कोणी निरशनाचा फराळ करून आहेत. शृंगेरीकर स्वामी यास तेथें नेलें आहे. ते उपवास करितात. त्याजकरितां भोजनाविशीं बहुत बहुत आग्रह केला. त्यांनीं उत्तर केलें जे, भोजनाचा प्रकार ज्यावेळीं घडेल तेव्हां करीन. तेव्हां बहुतप्रकारें सांगितलें जे, तुम्ही स्वस्थ असावें, द्रव्य पाहिजे तितकें देईन. सर्व यथास्थित करून देईन. याप्रमाणें बोलोन सुवर्णप्रतिमा फार कांहीं एक करून दिल्या. चाळीस सहस्रांचा शिधा ब्राह्मणभोजनाकरितां देविला. पट्टणांत दररोज दोन हजार ब्राह्मण भोजन करीत आहेत.' (ऐ. ले. सं.)

(३३८) अखेर हिंदु संस्कृतीच विजयी झाली ! :–इस्लाम व हिंदु संस्कृतीमध्यें साडेसातशें वर्षें संघर्ष चाललेला होता. त्यांतल्या त्यांत पंधराव्या व सोळाव्या शतकांत हिंदु संस्कृतीचा सर्व बाजूंनीं संकोच होत असतांनाहि हिंदुसमाजानें मोठ्या चिवट आणि जिवटपणानें आपल्या संस्कृतीचें रक्षण केलें. त्यामुळेंच पुढें राजपूत, मराठे, विजयानगरकर व शीख यांनीं इस्लामचें वर्चस्व नष्ट केलें. बंगाल प्रांतावर मुसलमानांचा अंमल सर्वांत अधिककाल होता. बख्त्यार खिलजीपासून प्लासीच्या लढाई-पर्यंत इस्लामचा अंमल असतांना प्रतापादित्यासारखे स्वातंत्र्यवीर उत्पन्न झाले व त्यांनीं प्रतिकार करून स्वातंत्र्य भोगलें. मुसलमानांच्या अमानुष छळाला मुळींच मान न वाकवितां गुरु नानकानें पंधराव्या शतकांत नवीन पंथ स्थापन केला व पुढें त्या पंथांतील गुरूंनीं स्वतंत्र राज्यें स्थापलीं. रणजितसिंगानें काश्मीरपासून पेशावरपर्यंत अंमल बसविला. यावरून हिंदुस्थानांत इंग्रज जर न येते तर हिंदूंचेंच राज्य दिसलें असतें. इंग्रजांनीं मुसलमानाकडून हिंदुस्थानचें राज्य घेतलें नसून तें हिंदूकडून विशेषतः मराठ्यां-कडूनच घेतलें अशी साक्ष दोन प्रसिद्ध इंग्रज ग्रंथकार देतात. विजयी मराठे व शीख यांनीं मुसलमानावर विजय मिळविला, पण पुढें या दोघांची विज्ञान, भौतिकशास्त्रें, शस्त्रें व संघटना इत्यादींनी संपन्न अशा पाश्चात्य संस्कृतीशीं गांठ पडली. त्या शास्त्रसंपन्न संस्कृतीपुढें यांना नमावें लागलें ही गोष्ट जरी खरी असली, तथापि त्यापूर्वी हिंदुस्थानवर शीख व मराठे यांचींच अधिराज्यें होतीं, हें अवश्य ध्यानांत ठेवलें पाहिजे. इंग्रजांनीं हिंदुकडूनच राज्य कसें घेतलें, यासंबंधीं खालील दोन ग्रंथकारांचे विचार वाचकांपुढें ठेवून हें प्रकरण पुरें करतो.

" The Moghal Empire had been severed piece-meal and dilapidated by the middle of the eighteenth century . . . we alone were able to drive off the Maratha Vultures which were tearing the moribund carcase. When we had driven the Marathas out of Agra and Delhi, the defenceless capitals of extinct Mohamedan dominion; when we secured the Moghal emperor from affronts and captivity, we

found all the Punjab the land of Mohamedans had been strongest, in the hands of the Sikhs. Every one knows what it cost us to break that formidable fighting power which had completely subdued the Mohamedans." (Page 236).

सर आल्फ्रेड लायल, माजी लेफ्टनंट गव्हर्नर हा 'एशिआटिक स्टडीज' या नांवाच्या पुस्तकांत वर सांगितल्याप्रमाणें लिहितो कीं, "मुसलमानी सत्तेचा विध्वंस इंग्रजांनीं केला ही गोष्ट खोटी आहे. इतिहासावरून असें दिसेल कीं, अठराव्या शतकाच्या मध्यांतच मुसलमानी सत्ता संपुष्टांत आली होती. इंग्रज जर आले नसते तर मराठ्यांनीं दिल्ली व आग्रा बळकाविली असती. दिल्लीच्या बादशहांना जवळजवळ हिंदूंनीं कैदखान्यांतच ठेवलें होतें. पंजाब तर शीखांच्याच हातांत गेला होता. दक्षिणेंत निजामाचें राज्य होतें, पण तेंहि मराठ्यांच्या टांचेखालीं."

"The British won India not from the Mughals but from the Hindus. Before we appeared as conquerors, the Mughal empire had broken up. Our final wars were neither with the Delhi King nor with his revolted governors but with the two Hindu confederacies, the Marathas and the Sikhs. Our last Maratha war dates as late as 1818, and the Sikh confederation was over only in 1848.' (Page 258 Chap. XI). (The Indian Empire-W. W. Hunter).

प्रसिद्ध इतिहासकार हंटर लिहितो कीं, "ब्रिटिशांनीं हिंदुस्थान जिंकून घेतलें ते मोंगलापासून नाहीं तर तें हिंदुपासूनच जिंकून घेतलें. इंग्लिश लोक हा देश काबीज करूं लागण्यापूर्वीच मोंगलांचें मुसलमानी राज्य मोडून गेलें होतें. इंग्रजांना मराठ्यांशींच लढावें लागलें.

—*—

प्रकरण एकोणिसावें

# महान् पराक्रमी रजपूत

(३३९) अद्वितीय प्रतिकारः—इस्लामच्या आक्रमणाचा प्रतिकार करून तिचा विध्वंस करण्याच्या कामीं ज्या रजपूत जातीनें तेजस्वितेनें रक्ताचा सडा शिंपडून वीरतेनें आपलें नांव जगांत अजरामर करून ठेवलें, त्या रजपूत जातीच्या पराक्रमाची माहिती प्रस्तुत प्रकरणांत द्यावयाची आहे. महाराष्ट्राच्या इतिहासाइतका स्फूर्तिदायक राजपुतांचा इतिहास आहे. दुर्दैव मात्र असें कीं हा उज्ज्वल इतिहास शाळा कॉलेजांतून शिकवला जात नाहीं! असो!

राजपुतासंबंधीं विद्वत्कुलशेखर कै. चिं. वि. वैद्य म्हणतात—'' अरबांचा दिग्विजयसिंधूचा ओघ उत्तर आफ्रिका भिजवून जिब्राल्टरच्या सामुद्रधुनींतून स्पेनमध्यें घुसला व पिरॅनीज पर्वत ओलांडून फ्रान्समध्यें उतरला. पुढें तो फ्रेंच लोकांच्या शौर्यखडकावर आदळून भंग पावला! त्याच धर्मवेडानें फुगलेला त्याच अरबांच्या दिग्विजयसिंधूचा दुसरा ओघ पूर्वेच्या बाजूनें मेसापोटामिया, इराण व बलुचिस्तान यास उदरांत घेऊन व सिंधुनद पार होऊन सिंधप्रांत बुडवून पुढें चालला.तो गेहलोट राजपुतांनीं थोपवून धरून शतशः विदीर्ण केला.'

सतत एक हजार वर्षे पराक्रमानें प्रतिकार करण्याइतका जोम या राजपूत जातीमध्यें होता. राजपुताइतकी पराक्रमी जात पृथ्वीच्या पाठीवर क्वचितच आढळेल!!

रावबहादूर इतिहासकार सरदेसाई हे मु. रि. भा. १ पृ. ३५८ वर उदेपूरच्या राजवंशासंबंधीं लिहितात. ' उदेपूरच्याइतका तेजस्वी, सुसंस्कृत आणि तितकाच सज्जन राजवंश जगांत कोठें सांपडेल कीं नाहीं याची शंका आहे. मुसलमानांनीं त्यांच्यावर इतकें आघात केले कीं, त्यांतून त्यांना स्त्रियांचें पातिव्रत्य, अब्रूचें संरक्षण आणि स्वातंत्र्य यांसह पार पडण्यास

फारच किंमत द्यावी लागली ! त्यामुळें राजपुतांचा इतिहास वीर, करुण व अद्भुत अशा तिन्ही रसांनीं भरलेला आहे. कपट, विश्वासघात, क्रौर्य व हत्या इत्यादींनीं मुसलमानांचा इतिहास परिपूर्ण आहे. पण सत्य, सदाचार, नीति आणि धैर्य इत्यादींनीं युक्त असा राजपुतांचा इतिहास आहे. अल्लाउद्दीन, बाबर, बहादुरशहा, अक्बर, औरंगजेब वगैरे वीरपुरुषांनीं राजपुतांपुढें हात टेकले. शत्रूची पाठ फिरली कीं, उदेपूरचें राज्य पूर्ववत् चालू असे. कांहीं झालें तरी शत्रूस हार जावयाचें नाहीं, मग शत्रू कितीहि बलाढ्य असो ! नेटानें वागलें म्हणजे त्यांच्या हातून कांहीं होत नाहीं अशा समजुतीनेंच राजपूत वागले. अकबरानें भलेबुरे सर्व प्रयत्न केले. पण उदेपूरचे राणे त्याला बिलकुल वश झाले नाहींत. मोगलांचें सारखें आक्रमण असतां राजधानीचीं शहरें बदलून अनेक संकटें सहन करून आपलें स्वातंत्र्य चितोडच्या राण्यांनीं गमाविलें नाहीं आणि दुसऱ्याचें हरणहि केलें नाहीं. जगाच्या इतिहासांत हा प्रतिकार अपूर्व होय.'

इस्लामचें सर्वभक्षक आक्रमण लाहोर, दिल्ली, कनोज व अयोध्या येथील क्षत्रियांना असह्य झालें. या भागांतील या क्षत्रियांनीं राजस्थानांतील अरवली पर्वताचा व त्याच्या आश्रयानें असणाऱ्या प्रदेशाचा आश्रय वैदिक संस्कृतीचे रक्षणार्थ केला. नव्या उत्साहानें हिंदु राज्याची परंपरा स्थापून मध्ययुगाच्या दुसऱ्या कालविभागांत त्यांनीं हिंदुस्थानवर राज्य केलें. येथेंहि जेव्हां इस्लामचा उपद्रव होऊं लागला, त्यावेळीं या पराक्रमी रजपुतांनीं अरब, तुर्क व मोंगल यांना नुसतें मागेंच हटवलें नाहीं तर अनेक लढायांत त्यांचा पराभव करून दराराहि बसविला.

**(३४०) अरबांचा पराभवः**— चितोड घराण्याचा मूळ संस्थापक बाप्पा रावळ हा होय. श्रीरामचंद्रापासून इक्ष्वाकु कुलांतील हा ८० वा पुरुष असें मानतात. महमद बिन कासीमनें सिंध देशावर स्वारी करून दाहर राजाचा तो प्रांत जेव्हां पादाक्रांत केला त्यावेळीं बाप्पा रावळ चितोडास राज्य करीत होता. अरबांच्या मनांत पुढें सरकून चितोडवर आक्रमण करण्याचा विचार येतो न येतो तोंच बाप्पानें मोठ्या शौर्यानें अरबांना पराभूत करून खंबायतपर्यंत पिटाळलें, आणि कासीमनें सिंध येथें ठेवलेल्या सेलीम सुभेदाराला दातीं तृण धरावयास लावून त्याच्या मुलीशीं तिला हिंदु

करून बाप्पानें स्वतः लग्न लावलें. अविवाहित मुसलमान मुलीला हिंदु करून तिच्याशीं लग्न लावणारा हा पराक्रमी हिंदुवीर पहिलाच होय!

बगदाद येथील खलिफा अल्मामुन हा राज्य करीत असतांना चितोडवर आक्रमण करण्याचा त्यानें बेत केला. त्यावेळीं (नवव्या शतकाच्या प्रारंभीं) दुसरा खुम्माण मेवाडच्या गादीवर होता. त्याला अरबांचा बेत कळतांच त्यानें प्रतिकाराची पूर्ण सिद्धता केली. 'एक खंडणी तरी भर, किंवा खलीफाचें मांडलिकत्व तरी मान्य कर' असा उद्धट निरोप अरबांनीं जेव्हां खुम्माणास पाठविला तेव्हां त्यानें तरवारीनेंच प्रत्युत्तर पाठविलें! आणि एकदम इतक्या वेगानें लांडगेतोडीचा हल्ला चढविला कीं त्यापुढें अरबांना आपल्या फौजासह वाट फुटेल तिकडे पळतांपळतां भुई थोडी झाली! या युद्धांत एकंदर लहानमोठ्या चाळीस लढाया झाल्या. खुम्माणानें त्या सर्व जिंकल्यामुळें अरबांनीं मेवाडचा नाद सोडून दिला.

**(३४१) तुर्कांची हकालपट्टीः**—अरबांचा मोड केल्यानंतर इ. स. १००० ते १२०० पर्यंत मेवाडच्या राजांनीं आपलें स्वातंत्र्य संभाळलें. पुढें त्यांचा तुर्कांशीं संघर्ष सुरू झाला. मेवाडचा राणा जैत्रसिंह हा मोठा पराक्रमी, रणरंगी, युद्धकुशल व महत्त्वाकांक्षी होता. इ. स. १२१० मध्यें दिल्लीच्या तख्तावर बसलेल्या इल्तमशचा पराभव जैत्रसिंहानें केला आणि त्याच्या सैन्याची दाणादाण उडवून दिली. पुढें जैत्रसिंहानें सिंध प्रांतावर चाल केली. कारण कुतुबुद्दिन ऐबकचा जांवई नासुरुद्दिन कुबाच हा सिंध प्रांत बळकावून बसलेला होता. त्यानें व जलालुद्दिनानें सिंध प्रांतांत अगदी कहर उडवून दिलेला होता. जैत्रसिंहानें सिंधच्या स्वारींत विजय मिळवून मुसलमान सरदारांचा बींमोड केला. तसेंच त्यानें दिल्लीच्या नासिरुद्दिन सुलतानालाहि चांगलेंच शासन केलें. या त्याच्या पराक्रमामुळें दिल्लीचे सुलतान मेवाडकडे ढुंकूनहि पाहिनासे झाले. घियासुद्दिन बालबनच्या सरदारांनीं या सुमारास गुजराथवर चाल केली. त्यावेळीं मेवाडचा राणा समरसिंह हा गुजराथच्या हिंदु राजांच्या मदतीस धांवला, त्यामुळेंच मुसलमान सेनेचा मोड होऊन गुर्जर देशाचें स्वातंत्र्य कायम राहिलें.

**(३४२) पद्मिनीची वीरताः**—दिल्लीच्या तख्तावर अल्लाउद्दिन खिलजीसारखा धर्मांध, खुनी, जुलमी, कपटी सुलतान राज्य करीत असतांना

मेवाडचा रक्तलांछित आदित्यध्वज मोठ्या डौलानें फडफडत होता. चितोडच्या गौरवाची शोभा पद्मिनी ही आपल्या सौंदर्यानें वृद्धिंगत करीत होती. पद्मिनीच्या मानभंगासाठीं अल्लाउद्दिन सारखा तडफडत होता. चितोडचा राणा रत्नसिंह याची पद्मिनी ही धर्मपत्नी होती. तिच्या रक्षणाकरितां चितोडवर लक्ष्मणसिंहादि तीस हजार रजपूत एकत्र झाले होते. पद्मिनीच्या लालसेनें दुष्ट अल्लाउद्दिनानें चितोडला वेढा दिला. रत्नसिंह अखंड सहा महिने किल्ला लढवीत असतांना मारला गेला. लक्ष्मणसिंहानें मोठ्या धैर्यानें आपले सातहि पुत्र एकामागून एक धारातीर्थी पतन पावत असतांनाहि मोठा पराक्रम केला आणि अखेर म्लेंछ संहार करीत करीत मातृभूचें चरणीं त्यानें आपलें शिरकमल अर्पण केलें. ता. २६ ऑगस्ट १३०३ रोजीं पद्मिनीसह चितोडवरील सर्व स्त्रिया तळघरांत जमल्या. सौभाग्यवायनांचे त्यांनीं संकल्प सोडले. दुष्टाच्या स्पर्शानें शीलभ्रष्ट होण्यापेक्षां अग्निकाष्ठें भक्षण करून नष्ट होणें चांगलें, या एकाच निर्धारानें त्या स्त्रिया तळघरांत एकत्र झाल्या. ज्वालाग्राही पदार्थांनें भरलेल्या त्या तळघरास त्यांनीं स्वहस्तें अग्नि लावला आणि धाडधाड पेटणाऱ्या त्या अग्निज्वालावर आरोहण करून ‘ जय एकलिंगजी, जय एकलिंगजी ’ असा घोष करीत करीत त्यांनीं स्वर्गारोहण केलें. सर्व रजपूत वीर प्रतिकार करीत करीत समरमंचकावर पहुडले. याप्रमाणें सर्वत्र भस्मसात् झाल्यावर नराधम अल्लाउद्दीन जों येतो तों सर्वत्र स्मशानशांतता दिसली ! तें पाहून त्याचेंहि अन्तःकरण क्षणभरच द्रवलें. अल्लाउद्दिनानें राजपूत शिल्पाचे राहिलेले अवशेष उध्वस्त केले आणि आपल्या मुलाला त्यानें मेवाडचा सुभेदार नेमलें. आठदहा वर्षें लोटलीं नाहीं तोंच मेवाडचें राज्य पुन्हा स्वतंत्र झालें, व मुसलमानी अम्मल झुगारून दिला गेला, त्याचा वृत्तान्त पुढीलप्रमाणें आहे.

(३४३) हम्मीरः—हम्मीर या नांवाचा कर्ता पुरुष मेवाडांत पुढें आला. त्यानें आपल्या स्वाभिमानी प्रजेचें अन्तःकरण आपणाकडे खेंचून घेतलें. सर्वांना घरेंदारें सोडून स्वतंत्र खेलवाड्यांत येऊन राहाण्याची आज्ञा केली. त्यामुळें मेवाड ओस पडलें व मुसलमानी राज्यावर कडकडीत बहिष्कार घातला गेला. हम्मीरची प्रजा पहाडी मुलखांत सुरक्षित होती. मेवाडच्या रहदारीचे सर्व रस्ते हम्मीरनें अडविल्यामुळें सुभेदार खिजरखान यास

मेवाडचा कारभार सोडून अल्लाउद्दिनाच्या आजाराचें निमित्त करून पळून यावें लागलें. सुभेदार खिजरखानानें पळून जातां जातां मेवाडच्या कारभाराचें उदक मालदेवाच्या हातावर सोडलें होतें. मालदेवानें लग्नाच्या निमित्तानें चितोडास प्रयाण केलें. त्यानें आपल्या मुलीचें लग्न हम्मीराशीं ठरविलें होतें. त्या मिषानें वर जाऊन चितोडवरील यवन रखवालदारास मालदेवानें पिटाळून तेथें आपला आदित्यध्वज फडकावला! अवघ्या पंचवीस वर्षांच्या आंत हम्मीरानें आपला मातृदेश स्वतंत्र केला. त्यामुळें अनेक प्रजाजन मेवाडांत येऊन राहिले. हा सर्व प्रकार वेड्या महंमद तुघलगाच्या कानीं पडतांच त्याची घारण पांचावर बसली. अल्लाउद्दीन व महंमद तुघलघ यांच्या जुलमानें त्रस्त झालेली प्रजा पुन्हां उत्साहानें हम्मीरच्या स्वतंत्र राज्यांत स्वातंत्र्याचा उपभोग घेत होती, हें पाहून त्यानें हम्मीरवर प्रचंड सेना पाठविली. हम्मीरनें त्या सेनेचा असा धुव्वा उडवून दिला कीं दिल्लीच्या सुलतानांनीं पुढें कित्येक वर्षें मेवाडच्या राज्याचा नादच सोडून दिला. मुसलमान सुभेदारांना चळचळा कांपावयास लावणारा व स्वप्नांतदेखील भयानें दचकून उठण्यास भाग पाडणारा मेवाडच्या गादीवरील राजा म्हणजे महाराणा क्षेत्रसिंह हा होय! हा हम्मीराच्या मागून गादीवर बसला. त्याच्या मागून चंद्रसिंह तथा भीष्मप्रतिज्ञ चुंडा यानें मेवाडचा लौकिक वाढविला.

(३४४) चंडप्रताप कुंभः—मेवाडच्या स्वातंत्र्यमंदिराचा भाग्यरवि म्हणजे महाराणा कुंभ होय! या भाग्यरवीनें दिल्ली, माळवा, गुजराथ येथील सुलतानांना निस्तेज करून टाकलें! कुंभाच्या ठिकाणीं युद्धचातुर्य, चिकाटी, दीर्घोद्योग, रसिकता आणि दूरदर्शीपणा हे गुण एकवटलेले होते. कुंभानें झपाट्यानें अबूचा किल्ला घेतला. माळव्यावर स्वारी करून सुलतानाला चितोडवर नजरबंदींत ठेवलें. महाराणा कुंभाचा हा वाढता जोर पाहून महंमद खिलजी पुन्हां लढण्याची तयारी करूं लागला. पण राणा कुंभ हा ‘शठं प्रति शाठ्यं’ या तत्त्वाचा पुरस्कर्ता होता. म्हणून त्यानें हिंदुधर्मांचा पूर्ण उच्छेद करूं इच्छिणाऱ्या माळव्याच्या सुलतानाला पाताळाचा मार्ग दाखविला! फिरोजखानानें उभारलेली उंच मशीद पाडून टाकली. यवनांना त्राहि भगवान् करून सोडलें, सुल-

तानाकडून हत्तींची खंडणी घेतली आणि गुजराथच्या सुलतानाला निष्प्रभ केलें. मुसलमानी सत्ता स्थापन झाल्यापासून राणा कुंभा इतका कट्टा धर्माभिमानी राजा झाला नव्हता. कुंभाचें हें संघटण म्हणजे मुसलमानी सत्तेस आव्हानच आहे, हें मुसलमानांनीं ओळखलें आणि माळवा व गुजराथ त्यांच्या सुलतानांनीं मिळून राणा कुंभावर चाल करण्याचें ठरविलें. राणा कुंभ हा त्यांचें बारसें जेवलेला होता. त्यानें या दोघांचीं सैन्यें एकवटण्यापूर्वींच एकेकाला गांठून पराभूत केलें. कुतुबशहाच्या फौजेचा पहिल्यानें त्यानें धुव्वा उडविला! तें पाहूनच महंमद खिलजी पळून गेला. कुतुबशहानें पळतां पळतां नागौरच्या हिंदुजनतेवर बरेच अत्याचार केले. त्यामुळें चिडून जाऊन राणा कुंभानें पंचवीस हजार स्वारांनिशीं तिकडे एकदम चाल केली आणि मुसलमानांची कत्तल उडविली. कुतुबशहास कुंभ आल्याची वार्ता कळतांच तो अहमदाबादेस पळून गेला. याप्रमाणें कुंभानें मुसलमानांचें संयुक्त बळ मोडून काढून मुसलमानांचा पराभव केल्यामुळें त्याचें वजन फारच वाढलें. या विजयाचें स्मारक म्हणून कुंभानें चितोड येथें एक मोठा विजयध्वज उभारला. हा विजयध्वज म्हणजे हिंदुसंस्कृतीच्या भाग्याचें स्मारक होय!

**(३४५) मोंगलाशीं संघर्षः**—राणा संग हा बाबराचा समकालीन होय. संगानें प्रथम ईडरच्या गादीवर रायमल्लास बसविलें व त्यास विरोध करणाऱ्यास हाकलून लावलें. गुजराथचा सुलतान हा त्यामुळें नम्र झाला. संगानें दिल्लीवर चाल करून इब्राहिम लोदीला पराभूत केलें. धोलपूरच्या लढाईत राणा संगानें मुसलमानावर मोठा जय मिळविला. मेदिनीरायाच्या सहाय्यानें सुलतान महंमदावर माळव्यांत चाल करून संगानें त्याला पराभूत केलें. माळव्याच्या सुलतानानें गुजराथच्या सुलतानाशीं संगनमत करून आक्रमणाची तयारी केली. मंदोसरजवळ तुंबळ युद्ध झालें. त्यांत पराभूत झालेल्या माळव्याच्या महमुदानें संगाला पुन्हां शरणचिठी दिली. राणा संग हा त्यावेळीं वीरता व पराक्रम यामुळें इतका प्रबळ झाला होता कीं माळवा, गुजराथ व दिल्ली या सर्व सत्ता एकवटूनहि त्याचा पराभव करूं शकल्या नाहींत. सुमारें दोनशें शहरांतील मशिदी तेथें गोहत्या होतात असें कळतांच त्यानें उध्वस्त केल्या व किती तरी मुसलमान त्यानें कैद केले. एकशेचार सरदार, सात

राजे, नऊ राव त्याच्या हाताखालीं होते असें म्हणतात. मुसलमानांना भारतांतून हाकलून देण्यासाठीं सर्व हिंदु सेना संघटित करणारा हा अंतिम हिंदु राजा होता. शरण आलेल्या शत्रूला पुन्हां सोडून देण्याचें औदार्य यानेंच दाखविलें. जीवदान दिलेले शत्रु कृतघ्नतेनें पुन्हां याचेवरच उलटले. या पराक्रमी वीराचा पराभव बाबराशीं लढतांना फत्तेपूर शिक्री येथें झाला.

(३४६) **राणी कर्मवतीचा जोहारः**—संग राण्याची राणी कर्मवती ही महाधोरणी व पराक्रमी होती. गुजराथच्या बहादूरशहानें चितोडला वेढा दिला असतां तिनें अनेक राजपूत वीर सरदारांना प्रोत्साहक व उत्तेजक पत्रें लिहून मदतीस बोलावलें. राणीच्या निमंत्रणावरून सर्व रजपूत सरदार व वीर एकवटून चितोडास धावून आले. बहादूरशहाशीं त्यांनीं मोठा संग्राम केला. शत्रूच्या गोलंदाजांनीं तटास मोठें भगदाड पाडलें होतें, तरी त्याच्या दाराशीं हाडा राजपुत्र अर्जुन हा सिंहाप्रमाणें उभा ठाकला आणि प्राण जाईपर्यंत त्यानें एकहि मुसलमान येऊं दिला नाहीं. शेवटीं दैवाचा फासा उलटा पडला. कर्मवती राणीनें पद्मिनीच्या उज्वल परंपरेला अनुसरून तेरा हजार स्त्रियांनिशीं मृत्यूला कवटाळलें. ज्वालाग्राही पदार्थांनें भरलेल्या एका राजमहालांत या सर्व स्त्रिया एकत्र जमल्या, दारूला आग लावून दिली आणि 'अग्नयेस्वाहा' असें म्हणत म्हणत त्या अग्निरूप झाल्या. हा चितोडचा दुसरा जोहार होय.

(३४७) **चितोडचा तिसरा जोहारः**—अल्लाउद्दिनपासून मुसलमानांचीं सारखीं आक्रमणें मेवाडवर होत होतीं. बाबर व बहादुरशहा आणि इतरांशीं झालेल्या संग्रामांत लक्षावधि राजपुतांचा संहार झालेला होता. हें दौर्बल्य पाहून अकबरानेंहि चितोडवर इ. स. १५६७ त स्वारी केली. चितोडचा राणा उदयसिंग यानें अकबराशीं लढण्याकरितां त्याहि स्थितींत प्रचंड तयारी केली होती. अकबरानें तर मोठ्या ईर्षेनें चितोड घेण्याचा चंगच बांधला होता. मोगल सेनेचा महासागर दिल्लीपासून चितोडपर्यंत सारखा पसरला होता. या महासागराला थोपवून धरण्याचें आणि वडवानलाप्रमाणें त्याला भक्षण करण्याचें अघोर कृत्य वीर जयमल्ल आणि वीर बहादूर पत्ता यांनीं

केलें. वीरबहादूर पत्ता हा सोळा वर्षांचें पोर होता. ओठ पिळला तर दूध येईल अशी त्याची स्थिति होती. पण त्यानें अभिमन्यूप्रमाणें चौफेर मारा होत असतांना गड लढविला. सिंह जसा हरणाच्या कळपावर तुटून पडून दाणादाण करून सोडतो, त्याप्रमाणें वीर पत्तानें मोंगल सैन्याची दाणादाण उडवून दिली. तें पाहून अकबरानें आश्चर्यानें तोंडांत बोट घातलें. लढतां लढतां, मार देत, झुंजत हे वीर रणांगणावर पडले, तथापि अशा पराक्रमी वीरांचें नित्य दर्शन व्हावें म्हणून आग्र्याच्या किल्ल्याच्या दाराशीं त्यांचे पुतळे उभे करून अकबरानें त्यांचा वीरोचित सन्मान गुणग्राहकतेनें केला.

मनुष्यबळ संपुष्टांत आलें, अन्नसामग्री संपली, शेवटीं उदयसिंगाच्या राण्या, पांच कन्या व हजारों सैनिकांच्या स्त्रिया यांनीं जोहार करून जाळून घेतलें. चितोडवरील या तिसऱ्या जोहाराचा घडघडणारा अग्नि पाहून अकबर विस्मित झाला. अकबर गडावर जातो तों काय सर्वत्र स्मशान! पण अशाहि स्थितींत अकबरानें अल्लाउद्दिन व बहाद्दुरशहा यांच्यावरहि ताण केली. हिंदु जातीनें आठशें वर्षे राखून ठेवलेलें संस्कृतीचें सारसर्वस्व व गौरवाचें स्थान जें चितोड त्याचा विध्वंस शेवटीं अकबरानें केला!!

(३४८) **महाराणा प्रतापः**—या हिंदु राष्ट्रांत हिंदु संस्कृतीचे जे आदर्श प्रतिनिधि आहेत, त्यांत राणा प्रताप याची गणना आहे. हा हिंदु संस्कृतीचा अस्ताचलावर जाणारा द्वादश आदित्यांपैकीं एक आदित्यच होता असें म्हणतां येतें. चितोडच्या महाभयानक विध्वंसनानंतर अकबराला प्रतापसिंहास अंकित करावें अशी इच्छा झाली. कारण जोधपूर, जयपूरच्या राजांनीं कन्या देऊन अकबरांशीं सोयरिक केली होती आणि प्रदेशहि मिळविला होता. बहुतेक रजपूत राजांनीं अकबराचें मांडलिकत्व मान्य केलें होतें. त्याचें दर्शक म्हणजे बहुतेकांच्या घोड्यावर गुलामगिरीचा डाग असे. विनाकलंक, विनाछाप, असा घोडा फक्त मेवाडांतच दिसत होता. राणा प्रताप गादीवर आला त्यावेळीं सर्व रजपूत राजे व सरदार स्वाभिमान्यशून्य, भ्रष्ट, लाचार व दीन झालेले पाहून त्याचें अन्तःकरण कळवळलें. धर्माभिमान, कुलाभिमान आणि स्वातंत्र्याची वृत्ति लोकांत जाज्वल्यतेनें उत्पन्न करण्याचा त्यानें यत्न केला. त्यामुळें स्वाभिमानी सरदारांत व प्रजाजनांत भ्रष्ट आणि बाटग्या लोकांशीं कोणताहि व्यवहार

करूं नये अशी वृत्ति उत्पन्न झाली. स्वतः राणा प्रतापनें अकबर बादशहाशीं संबद्ध झालेल्या आणि अंकित झालेल्या सर्व घराण्यांचे संबंध तोडून टाकले. हिंदुसंस्कृतीवर निखारे ठेवणाऱ्यावर कडक बहिष्कार घालण्यांत आला. त्याचें मोठें उदाहरण असें—एकदां राजा मानसिंग पाहुणा म्हणून राणा प्रतापकडे आला होता. राजा मानसिंगाच्या पंक्तीस इतरहि कांहीं उमराव होते. ते सर्व राणा प्रतापची वाट पहात होते. परंतु प्रताप मानसिंगाच्या पंक्तीस भोजनास तर बसला नाहींच, उलट असल्या बाटग्याच्या बैठकीमुळें भोजनाची जागा भ्रष्ट झाली असें समजून राणा प्रतापनें तिचें शुद्धिकरण केलें. प्रतापची ही तेजस्विता आणि त्याच्या बहिष्कारशस्त्राचें सामर्थ्य याच्या वार्ता अकबराच्या कानीं गेल्यामुळें तो चिडून गेला आणि त्यानें मानसिंगास प्रचंड सैन्यासह प्रतापावर पाठविलें. राणा प्रतापनें समोरासमोर न लढतां घुलवित घुलवित मानसिंगाला गनिमी काव्यानें नकोनकोसें केलें. मुसलमानांचें सैन्य शेळ्यामेंढ्याप्रमाणें कापलें. रसद मारून उपासमार केली आणि हुलकावण्या देत देत मृत्यूचा प्रत्यक्ष जबडाच अशा हळदी घाटाच्या खिंडींत मानसिंगाला गांठलें. तीन हजार रजपुतांच्या सैन्यानें मोंगलावर एकदम हल्ला केला आणि मानसिंगाची मानहानि करण्याकरितां त्याची वाट पहात प्रताप दबा धरून बसला. ही हळदीघाटची लढाई म्हणजे प्रसिद्ध थरमापिलीच्या लढाईपेक्षां कितीतरी पटीनें मोठी होय! मानसिंग दिसतांच विजेच्या गतीनें दौडणाऱ्या चेतक नामक घोड्यावर बसून प्रतापनें भाल्यासह एकदम झडप घातली. मोंगल सैन्यानें प्रतापाला वेढलें. मोठ्या शिताफीनें प्रतापसिंह बाहेर आला! दैवानेंच हात दिला म्हणून मानसिंग वांचला. या लढाईत मोंगलांचा मोठा पराभव झाला. त्यामुळें मानसिंगाची चांगलीच मानखंडना झाली. उपासमार तर इतकी झाली कीं, झाडाचीं पानें खाऊन पळतां पळतां मोंगल सैन्याला पुरेवाट झाली. तब्बल चार महिनेपर्यंत मानसिंगाच्या सैन्याची प्रतापानें अशी दुर्दशा उडविली. पुढें अकबर स्वतः चालून आला आणि एकामागून एक मोंगल सरदार जरी तो मेवाडवर पाठवीत होता तरी प्रताप त्या सर्वांना पुरून स्वातंत्र्याचें रक्षण करीत होता.

प्रतापनें अकबर बादशहास पेचांत आणण्याचे भगीरथ प्रयत्न केले. दळणवळणाचे मार्ग बंद केले. मेवाडचा सुपीक व सपाट भाग त्यानें उध्वस्त केला. गुजराथ, सिंध, सुरत भागांतील व्यापार बंद पाडून ना दाणा ना गोटा, अशी परीस्थिति उत्पन्न केली. राजपुतांतील भ्रष्टांवर जसा त्यानें जातीय बहिष्कार पुकारला, त्याप्रमाणें सतत चौदा वर्षे राजकीय बहिष्कारहि वरीलप्रमाणें कडकपणें पाळून मोंगल सैन्याला त्यानें संत्रस्त केलें. अकबर हा आपल्या मनांत साम्राज्याच्या कल्पना करण्यांत मग्न झाला असतांना प्रतापनें वरील प्रकारानें एकामागून एक सर्व किल्ले घेऊन मोंगलांना जेर केलें, अशाच बातम्या त्याच्या कानावर आदळल्या.

(३४९) **अमरसिंहाचा पराक्रमः**—हिंदुसंस्कृतीच्या दुर्दैवानें प्रतापसिंह इ. स. १५९७ मध्यें अल्पवयांतच वारला. त्याचा मुलगा अमरसिंह यास पराभूत करण्याकरितां सेलीमच्या अधिपत्याखालीं अकबरानें मोठें सैन्य पाठविलें. एका चुटकीसरशी अमरसिंहाला जिंकतां येईल अशी अकबराची कल्पना होती; परंतु अमरसिंहानेंच मोंगल सेनेला पराभूत करून मोंगलांचे कांहीं किल्लेहि सर केले. या दुःखद बातम्या ऐकत ऐकतच अकबराचा अंत झाला. त्याच्या मागून जहांगीरनें मेवाडच्या पराभवाची ईर्ष्या धरली. पण त्याचें दुर्दैव असें कीं ना एक ना दोन तर जवळ जवळ सतरा लढायांत जहांगीरच्या वांटणीस लागोपाठ पराभवच आले. याप्रमाणें अमरसिंहानें अकबर व जहांगीर यांना आपल्या पराक्रमानें दिपविलें. तथापि जहांगीरनें प्रचंड सेनेसह शहाजहानास मेवाडवर पाठविलें. सारख्या संहारामुळें अमरसिंहाचे बाजूस फार थोडेच लोक होते. कारण राष्ट्रांतील वीरांचा संहार झालेला होता. अमरसिंहानें क्षात्रधर्मोचित युद्धाची घोषणा केली, पण शहाजहाननें त्याचा पराभव केल्यामुळें नाइलाजानें त्याला मोंगलाचें मांडलिकत्व कबूल करणें भाग पडलें.

(३५०) **महाराणा राजसिंहः**—औरंगजेबाशीं टक्कर देण्यामध्यें दक्षिणेंत जसे शिवाजीमहाराज तसा राजपुतान्यामध्यें महाराणा राजसिंह हा होता. त्याच्या अन्तःकरणांत मोंगली पारतंत्र्याचें शल्य निरंतर सलत होतें. तें काढण्याकरितां त्यानें अनेक सरदारांची एकजूट केली आणि मोंगल साम्राज्यांतील बंडें मोडतो असेंहि भासविलें ! पुढें औरंगजेब दिल्लीपति

झाला त्यावेळीं मोंगल साम्राज्याची भरभराट होती. औरंगजेब हा कडवा हिंदुद्वेष्टा तर राजसिंह हा कट्टा हिंदुधर्माभिमानी अशी स्थिति होती. औरंगजेबाचें एकहि फर्मान राजसिंहानें मानलें नाहीं. देवळें पाडणें, मूर्ति फोडणें, धर्मग्रंथ जाळणें, पाठशाळा उध्वस्त करणें असले प्रकार औरंगजेब करूं लागला. त्यानें हिंदुप्रजेवर जिझिया नामक कर बसविला. या सर्व गोष्टींचा राजसिंहानें निषेध करून हिंदुमंदिरांना आश्रय दिला. मथुरेच्या श्रीनाथजीच्या मंदिराचें त्यानें संरक्षण केलें. मोंगली मुलखांत घुसून तेथून लूट आणली आणि ज्या चारुमतीची औरंगजेब इच्छा करीत होता तिचें पाणिग्रहणहि राजसिंहानें केलें. या सर्व प्रकारानें अत्यंत संतप्त झालेला औरंगजेब मोठ्या सेनासागरासह मेवाडांत उतरला. राजसिंहानें मोठ्या धैर्यानें व गनिमी कौशल्यानें प्रतिकाराची तयारी केली आणि औरंगजेब मागें असून पुत्र अकबर यास त्यानें पुढें पाठविलें आहे, असें समजतांच राजसिंहानें एकदम झंझावाताप्रमाणें मोंगलावर हल्ला केला. राजपुत्र अकबर हा विजयाच्या उन्मादांत उदेपुरांत नमाज पढत व मेजवान्या झोडत पडला होता. त्याला हा वृत्तांत कळतांच तो फार घाबरला. राजपुतांनीं मोंगली सैन्याची एकजात कत्तल केली. सर्व बाजूच्या पळवाटाहि बंद केल्यामुळें मोंगलांना मृत्यूच्या जबड्यांत शिरण्याशिवाय गत्यंतर नव्हतें. राजपुत्र अकबराची याप्रमाणें रेवडी उडविल्यावर राजसिंहानें दूर असलेल्या व मागून साहाय्य करणाऱ्या औरंगजेबावरहि हल्ला चढविला. या जोराच्या हल्ल्यामुळें औरंगजेबाला तीन वेळां जीव बचावून पळ काढतां काढतां भुई थोडी झाली. राजसिंहाच्या या पराक्रमानें बादशाही सेनेस इतकें भयाभीत केलें कीं मोंगलांची सरदारी व ठाणेंदारी पत्करण्यास कोणीहि धजेना. याप्रमाणें राजपुत्र अकबर व औरंगजेब यांना पराभूत केल्यावर राजसिंहानें मोंगली मुलखावर आक्रमण करून उसनें फेडलें. 'राजपुत संस्कृतीचा उदय व ऱ्हास' पृ. ११५ वर राजसिंहाविषयीं लिहिलें आहे तें असें:— 'याप्रमाणें राजपुत्र अकबर व औरंगजेब यांना पराभूत केल्यावर राजसिंहानें मोंगली मुलखावर आक्रमण केलें. औरंगजेबानें हिंदूविषयीं जो दावा बाळगला होता त्याचें उट्टेंच जणूं राजपूत सेनेनें काढलें. नर्मदा नदीपासून मोंगल मुलुखांत एकच हाहाःकार उडवून दिला. काजी व मुल्ला यांना

पकडून बांधून टाकण्यांत आलें, त्यांच्या दाढ्या जबरदस्तीनें मुंडण्यांत आल्या व कुराणाच्या प्रती विहिरींत फेंकण्यांत आल्या. इस्लामच्या स्मारक-चिन्हांचा विध्वंस करण्यासहि दयाळशहा यानें कमी केलें नाहीं. येणेंप्रमाणें राजसिंहानें औरंगजेबासारख्या दुष्ट बादशहाची अशी खोडकी जिरविली कीं, त्याला जन्मभर आठवण राहावी.'

हिंदु संस्कृतीचें दुर्दैव म्हणूनच मेवाडचा राणा राजसिंह हा इ. स. १६८० मध्यें अल्पायुषी मरण पावला व त्याच सालीं दक्षिणेंत श्रीशिवाजी महाराजांचाहि अंत झाला. हे दोघे जर दीर्घायुषी असते तर मोंगलाचें वर्चस्व सर्वस्वीं नष्ट करतां आलें असतें. इस्लामशीं सारखीं आठशें वर्षें झुंज दिल्यामुळें राजपुतांची शक्ति क्षीण झाली होती. औरंगजेबाच्या कारकीर्दीच्या अखेरीस मोंगलांचीहि स्थिति जवळ जवळ अशीच झाली होती. इ. स. १७०७ मध्यें मराठ्यांचा पराजय न करतांच औरंगजेबाला मोठ्या विषण्ण स्थितींत दुर्मरण आलें. त्याच्या पश्चात् गादीवर नादान लोक आल्यामुळें स्वाभाविकच हा विग्रह संपुष्टांत आला.

**(३५१) हाडावती व मारवाड**—मेवाडप्रमाणेंच हाडावती व मारवाड येथें राजपुतांचीं स्वतंत्र राज्यें होतीं. हल्लीं बुंदी व कोटा येथें त्यांचे वंशज आहेत. इस्लामच्या प्रतिकारांत ज्यांनीं तेजस्वितेनें रक्तसिंचन केलें त्यांत हाडावती व मारवाड यांचीहि गणना होते. हाडाराव सुजन यानें झुंज देत देत नाइलाज म्हणून शेवटीं अकबराचें मांडलिकत्व कबूल केलें. पण तें पत्करतांना त्यानें बादशहास आपल्या तेजस्वी अटी पत्करावयास लावल्या, त्या अशाः—'(१) आपल्या कन्या मोंगलाला देणार नाहीं. (२) जिझिया कर देणार नाहीं. (३) नवरोजचे सणांत हाडा स्त्री पाठविणार नाहीं. (४) दरबारांत साष्टांग नमस्कार घालणार नाहीं. (५) गुलामगिरीची कोणतीहि खूण स्वीकारणार नाहीं.'

**(३५२) नवरोज सण व रजपूत स्त्रियाः**—वर हाडाराव सुजन यानें अकबराला ज्या अटी घातल्या त्यांत नवरोजचे सणांत हाडा स्त्री पाठविणार नाहीं अशी एक अट आहे. तिचा अर्थ वाचकांच्या ध्यानीं यावा म्हणून टॉडच्या इतिहासांतील एक उतारा देतों.

' Yet there is not a shadow of doubt that many of the noblest of the race were dishonoured on the ' Noroza '; and the chivalrous Prithwiraj was only preserved from being of the number by the high courage and virtue of his wife, a princess of Mewar, and daughter of the founder of the Suktwats. On one of these celebrations of the Khooshroz, the monarch of the Moguls was struck with the beauty of the daughter of Mewar, and he singled her out from amidst the united fair of Hind as the object of his passion..............on retiring from the fair, she found herself entanglad amidst the labyrinth of apartments by which egress was purposely ordained, when Akber stood before her : but instead of acquiescence, she drew a poniard from her corset, and held it to his breast, dictating, and making him repeat, the oath of renunciation of the infamy to all her race.' ( Page 280 )

— The Annals and Antiquities of Rajastan–
Tod. Vol. I.

नवरोजच्या सणाच्या निमित्तानें अकबर हा मोठमोठ्या रजपूतांचा मानभंग करीत असे, याबद्दल तिळमात्रहि संशय नाहीं. एकटा पराक्रमी पृथ्वीराजच, मेवाडची राजकन्या जी त्याची धर्मपत्नी तिच्या धैर्यामुळें व पराक्रमामुळें, मानभंगांतून सुटला होता. एका खुशरोजच्या प्रसंगीं अकबर मेवाडच्या राजकन्येचें लावण्य पाहून उल्लू झाला. ती राजकन्या जत्रेंतून सायंकाळीं घरीं जाण्यास परत फिरते तों तिचा मार्ग बुद्धिपुरस्सर रोधलेला होता, असें तिच्या ध्यानांत आल्यामुळें ती गांगरली. इतक्यांत अकबर तिच्यापुढें प्रेमयाचना करीत उभा असलेला तिनें पाहिला. त्यासरशीं ती सिंहिणीसारखी चवताळली, तिनें म्यानांतून खंजीर उपसला आणि अकबराच्या छातींत भोसकूं लागली. स्त्रीजातीच्या आणि आपल्या घराण्याच्या वाटेस जाणार नाहीं अशी पश्चात्तापयुक्त शपथ तिनें त्याजकडून घेतली. तिच्या तेजामुळें अकबरानें तशी शपथ दिल्यावर तिनें त्याला सोडून दिलें.

मरुभूमीच्या राठोडांपैकीं अमरसिंहानें तर एकदां कांहीं प्रसंगावरून शहाजहान बादशाहास सिंहासन सोडून पळावयास लावलें होतें. औरंगजेबाच्या मृत्यूपर्यंत मारवाडांतील या वीरांनीं इस्लामशीं जोराचा संग्राम केला. अजितसिंहानें तर मोंगलाशीं तीस वर्षे लढून मोठ्या अभिमानानें हिंदुत्वाचा ध्वज फडकाविला! अजितसिंहाचे पश्चात् अनेक कर्त्या पुरुषांनीं इस्लामशीं संग्राम केले. पण अजितसिंहाच्या कारकीर्दीचें वर्णन इतिहासकार करतात तें असें:—'मंदिरें व देवालयें यांतून पुन्हां घंटा ऐकूं येऊं लागल्या, मशिदींतील नमाज बंद पडून कुराणांचे जागीं पुराण वाचण्यांत येऊं लागलें. मशिदींच्या जागीं मंदिरें उभारलीं, काजी व मुल्ला यांच्या जागा ब्राह्मणांनीं पटकावल्या आणि जेथें गोहत्या होत असे तेथें यज्ञीय वेदी उभारण्यांत आल्या.'

याप्रमाणें पराक्रमी राजपुतांचा थोडक्यांत इतिहास आहे. आतां त्यांच्या पराभवाची थोडी चिकित्सा करूं.

(३५३) **पराभवाचीं कारणें**:—रजपूत राजे मोठे दिलदार, शूर, निधड्या छातीचे, स्त्रियांच्या अब्रूकरितां सर्वस्वाची राखरांगोळी करणारे, पराक्रमी असे होते. या गुणांत त्यांची बरोबरी कोणी करीत नसत म्हणून हे शत्रूविषयीं बेफिकीर असत. मुसलमानाबद्दल यांचें अज्ञान असें. कपटानें कत्तली करणें, छापे घालणें, एकाएकीं हल्ला करणें, विश्वासघात करणें या गोष्टी ते करीत नसत. हातीं सांपडलेल्या शत्रूनें लुच्चेगिरीनें जरी शरणचिठ्ठी दिली तरी ते त्याला सोडून देत. चढाईचें धोरण न स्वीकारतां ते किल्ल्याच्या आश्रयानें बचावाच्या धोरणानें वागत. अनेक कारस्थानें करून शत्रूला चीत करण्याचें जें तंत्र असतें तें यांना अवगत नव्हतें. मुसलमानांच्या आक्रमणाला हिंदूंनीं त्याच वृत्तीनें तोंड द्यावयास हवें होतें. परंतु क्षात्रधर्म, अब्रूच्या भलत्या कल्पना, धार्मिक भ्रामक समजुती, शकुन, विटाळ यांमुळें राजपुतांचें धैर्य खचून जात असे. वरचेवर महंमद गिझनी व महंमद घोरी यांच्या स्वाऱ्या अफगाणिस्तानांतून होत असतांना त्यांच्या मुलखावर स्वारी करण्याची कल्पना कोणाच्याच डोक्यांत कशी आली नाहीं? पृथ्वीराज व जयपाळ यांनीं अफगाणिस्तान, इराण, अरबस्तान यांवर स्वाऱ्या करण्याचें धाडस करावयास हवें होतें. अशा चढाईच्या धोरणा-

मुळें शत्रूनीं कच खाल्ली असती. चढाईप्रमाणें कांहीं वेळां माघार घेणेंहि युद्धशास्त्रांतलें तंत्र आहे. यशस्वी माघार हें एक शास्त्र आहे. पण माघार घेणें ही नामुष्की, त्यापेक्षां मरण बरें अशा समजुतीनें राजपुतांनीं धारातीर्थी देह ठेविले. यशस्वी माघार घेणें, पराभव झाला तरी गोंधळून न जातां व्यवस्थितपणें पीछेहाट पत्करणें, पड खाऊन पुन्हां चढाई करणें, असें गनिमी युद्धशास्त्र आहे. धर्मयुद्धाच्या कल्पनेप्रमाणें राजपुत लढले पण ते फसले. जशास तसें वागण्याचें तत्त्व हें राजपुतांना अगदीं शेवटीं शेवटीं कळलें. मुसलमानाशीं वागतांना राजपूत लोक फार सरळपणानें आणि आपल्या धर्मयुद्धाच्या कल्पनेप्रमाणें वागले, हें सर्वस्वीं चुकलें असें टॉड-सारखा परस्थ इतिहासकार म्हणतो. राजपुतांनीं मुसलमानांशीं वागतांना सत्य, अहिंसा, औदार्य, दया इत्यादि सद्‌गुण जर दाखविले नसते तर हिंदु-स्थानचा इतिहास बदलला असता. सद्‌गुणांचा अतिरेक म्हणजे दुर्गुणच, अशा कित्येक सद्‌गुणांचा अतिरेक राजपुतांनीं दाखविला नि मुसलमानांनीं त्याचा लाभ घेतला. एककल्लीपणा, पराक्रमाच्या एकांतिक कल्पना आणि अन्य दोष यामुळें राजपूत वीरांना यश लाभलें नाहीं. परंतु पुढें जेव्हां श्रीशिवाजीमहाराजांना मुसलमानांच्या स्वभावाचें पूर्ण आकलन झालें त्या-वेळीं ते शस्त्र, शास्त्र, विज्ञान नि राजकारण अशा सर्व क्षेत्रांत मुसलमानांना पुरून उरले नि विजेते झाले.

(३५४) आपटे यांचें मत–राजपूतांच्या पराभवाची मीमांसा इति-हासभूषण कै. वा. दत्तोपंत आपटे यांनीं केली आहे ती अशीः—' राजपूत योद्धे मानधन, शूर, नीतीची चाड बाळगणारे होते. तथापि विदेशी लोकांशीं कसें वागावें याची कल्पना त्यांना नव्हती. आपसांतील भांडणांत परक्याची मदत घेतांना शेजारच्या राजापेक्षां कितीपटीनें त्यांच्या यशानें राजकीय संकट ओढवणार आहे हें राजपुतांना समजण्याजोगें नव्हतें. हा त्यांच्या अज्ञानाचा परिणाम त्यांना भोंवला. त्या उलट मुसलमानहि लोभी, धाडसी, माहितगार, चलाख, साहसी, स्वार्थाविषयीं सावध, न्यायनीतीची चाड न बाळगणारे व धर्मांध असे असल्यामुळें त्यांनीं हिंदुराजांचा पराभव करून त्यांचें सिंहासन बळकावलें. या क्रांतीचा परि-

णाम आधींच राजकारणविमुख असलेल्या हिंदु समाजावर अधिक दैववादी बनण्यास कारणीभूत झाला.

(३५५) **संस्कृतीची वाढः**—राजपूतांनीं इस्लामचा केवळ प्रतिकारच केला व युद्धें जिंकलीं असें नसून, तें करीत असतांना साहित्य, संगीत, कला, शिल्प, ज्योतिष, काव्य, नाट्य, धर्मशास्त्र, अशा सांस्कृतिक विविध अंगांची त्यांनीं वाढ केली. मनाच्या व बुद्धीच्या क्षेत्रांत राजपूतांनीं मोठीच कामगिरी केलेली आहे. चितोडचा कीर्तिस्तंभ, राजसमुद्र, जयसमुद्र हीं सर्व त्यांच्या उच्च संस्कृतीचीं स्मारकें आहेत. स्त्रीजीवन व स्त्रीपातिव्रत्य व त्यांचें शील याविषयीं राजपुतांच्या कल्पना फार उच्च होत्या. चितोड येथें ज्या सहस्रावधी स्त्रियांनीं तीन वेळां जोहार करून अग्निकाष्ठें भक्षण केलीं त्यांच्या वीरत्वाची आणि शीलसंरक्षणाची थोरवी गावी तेवढी थोडीच आहे. आजच्या जगांतील पराक्रमी राष्ट्राच्या तोडीचें राजस्थान हें एक प्रबळ राष्ट्र होतें आणि त्या राष्ट्रांत धर्माभिमान, स्वदेशाभिमान, पराक्रम, बल, तेज आणि ज्ञानलालसा इत्यादि गुण उत्कटत्वानें वास करीत होते, यांत शंका नाहीं.



प्रकरण विसावें

# दक्षिणेंतील विजयी साम्राज्य

उत्तरेंत एक सहस्र वर्षें राजपुतांनीं इस्लामशीं घनघोर संग्राम करून जसें आपलें स्वातंत्र्य टिकविलें त्याचप्रमाणें दक्षिणेंत स्वतंत्र हिंदुसाम्राज्य स्थापून हिंदु संस्कृतीचें संरक्षण ज्यांनीं केलें त्या महाभागांच्या इतिहासाचें थोडें दर्शन घेऊं.

(३५६) दक्षिणेंत इस्लामला प्रतिबंधः—एका कारणांतून दुसरें कार्य उत्पन्न होतें, त्याप्रमाणें एक ऐतिहासिक घटना पुढच्या घटनेस जन्म देत असते. मागील घटनांचा परिपाक पुढील घटनेमध्यें दृग्गोचर होतो. त्याप्रमाणें एका साम्राज्यांतून दुसरीं साम्राज्यें उत्पन्न होतात. इस्लामचा मारा पंजाब व गंगा प्रदेशावर पडल्यामुळें तेथील क्षत्रिय आर्यांनीं जसा राजस्थानचा व अरवलीपर्वताचा आश्रय केला त्याचप्रमाणें अल्लाउद्दिननें देवगिरीचें साम्राज्य नष्ट केल्यावर त्या ऱ्हासांतूनच कृष्णा व तुंगा यांच्या कांठीं विजयनगरचें साम्राज्य उद्भवलें. विजयनगरच्या स्थापनेपूर्वी होयसळ व वरंगळ येथेंहि साम्राज्यें होतीं. त्यांच्या अपुऱ्या घटनांतूनच विजयनगरचा जन्म झाला. श्रीशहाजीराजे हे दक्षिणेंत बरींच वर्षें होते. त्यांना विजयनगरच्या साम्राज्याच्या इतिहासानें महाराष्ट्रांत हिंदुपदपादशाहीची स्थापना करण्यास स्फूर्ति मिळालीच असली पाहिजे. सबंध हिंदुस्थानांत मुसलमानांची लोकसंख्या एकंदरींत एकपंचमांश असतांना तुंगभद्रेच्या दक्षिणेकडील प्रदेशांत त्यांचें प्रमाण शेंकडा एक ते शेंकडा पांच असें पडतें. याचें कारण विजयनगरचें साम्राज्य हेंच होय! संगम, सालुच, तुलुव व आरविडु अशा चार घराण्यांतील वीर पुरुषांनीं या विजयनगरच्या साम्राज्याच्या सत्तेनें इस्लामचें आक्रमण थोपवून धरलें. हिंदुसंस्कृतीच्या रक्षणाची या साम्राज्यानें फार मोठीच कामगिरी बजाविली आहे. विजयनगरच्या राजांच्या पराक्रमाची थोडी माहिती देण्यापूर्वी सांस्कृतिकदृष्ट्या विजयनगरच्या कामगिरीचें स्वरूप पुढें ठेवतों.

(३५७) विद्यारण्यः—विजयनगरचें पूर्वीचें नांव विद्यानगर हेंच होतें. इ. स. १३७२ सालीं दक्षिण विजयाचें स्मरण म्हणून बुक्कराजानें विजयनगर असें नांव ठेविलें. विद्येचा नि ज्ञानाचा संचय या दृष्टीनें विजयनगरच्या साम्राज्याची थोरवी फारच आहे. हिंदुस्थानच्या इतिहासांत ज्ञानसंचयाचे दोनच मोठे काल दृष्टीस पडतात. पहिला एक काल म्हटला म्हणजे भारतीय युद्धानंतरचा काल. भगवान् व्यासांनीं त्या कालीं वेदांचें संकलन केलें, पुराणें लिहिलीं, भारत लिहिलें. या सुमारास अनेक सूत्रग्रंथ तयार झाले.

दुसरा काल म्हणजे मुसलमानी संस्कृतीच्या दडपणाखालीं मरून न जातां हिंदूंनीं आपलें सत्त्व रक्षण करण्यासाठीं केलेल्या यत्नाचा म्हणजे विद्यारण्यांचा काल होय ! व्यासानंतर सर्व तऱ्हेच्या विद्येस चालना देणारा थोर पुरुष म्हणजे विद्यारण्य होय ! भगवान् व्यास हे संस्कृतिसंस्थापक होते तर विद्यारण्य हे संस्कृतीचे उद्धारक होते. विद्यारण्यांनीं वेदांवर भाष्यें लिहून ते सुबोध केले. निरनिराळ्या मतांचें व संप्रदायांचें संकलन करून धर्मशास्त्रांमध्यें एकसूत्रीपणा आणला व ज्ञानमार्गाचा प्रचार केला. वेद, वेदांगें, शास्त्रें, इत्यादीवर यांनीं पुष्कळ ग्रंथ लिहिलेले आहेत.

शृंगेरी येथील अद्वैत मताच्या पीठावर विद्याशंकर नांवाचे महान् तपस्वी स्वामी होते. त्यांनीं दिग्गजासारखे आठ शिष्य तयार केले. त्यांतील पट्टशिष्य विद्यारण्य होत. या महापुरुषाला (१३०२ ते १३८७) ८५ वर्षें दीर्घायुष्य लाभलें होतें. सायण व भोगनाथ असे विद्यारण्यांना दोन भाऊ होते. विद्यारण्यांचे पूर्वींचें नांव माधवाचार्य असें होतें. भोगनाथ यांनीं प्रथम आश्रम स्वीकारला. माधवाचार्यांनीं १३३१ या वर्षीं संन्यास घेऊन ५५ वर्षें शृंगेरी पीठाचें काम केलें. आपल्या कर्तृत्वानें त्या पीठाला त्यांनीं चिमुकलें साम्राज्य बनविलें, आणि अमोघ वक्तृत्वानें अद्वैततत्त्वज्ञानाचें केंद्रत्व आणलें. इस्लामचें आक्रमण, आणि दक्षिणेंतील पाखांडी मतांचा प्रादुर्भाव हीं ध्यानीं घेऊन शृंगेरी पीठानें आपली सर्व साधनसंपत्ति, आणि विद्यारण्य, वेदान्तदेशिक, अक्षोभ्यतीर्थ यांसारखे मुनि यांचें धार्मिक, आध्यात्मिक आणि बौद्धिक साह्य हरिहर व बुक्क यांना देऊन स्वतंत्र साम्राज्य उभारलें. कर्नाटक व आंध्र प्रांतांतील युयुत्सु लोकांना हिंदुत्वाच्या भावनेनें संघटित करणें, हिंदुसमाजांतील धार्मिक पंथोपपंथांचा समन्वय करून त्यांना धार्मिक स्वातंत्र्य देणें आणि इस्लामचा प्रतिकार करून राजकीय पारतंत्र्य नष्ट करणें याकरितां विजयनगरचें साम्राज्य उदयास आलें. माधवाचार्य हा राज्यभार-धुरंधर बुक्क राजाचा मुख्य प्रधान होता. माधवाचार्यांनीं 'पराशरमाधव' हा टीकाग्रंथ लिहिला. त्यांत पराशरस्मृतींत नसलेल्या व्यवहारकांडाचा समावेश केला आहे. त्याच्या प्रस्तावनेंत इंद्राचा जसा अंगिरस, नळाचा जसा सुमति, शैब्याचा जसा मेधातिथि, रामाचा जसा वसिष्ठ, तसा बुक्काचा माधव हा कुलगुरु व सचीव होता असें म्हटलें आहे. माधवानें बंधु सायणाकडून

वेदभाष्य लिहून घेण्याची आज्ञा राजाला केली. आणि त्या भाष्याला स्वतः प्रस्तावना लिहिली आहे. या वेदभाष्यानें वैदिक धर्माचें पुनरुज्जीवन करून पाखांड्यांचीं तोंडें बंद पाडलीं. हे दोघे बंधु अलौकिक विद्वान्, टीकाकार आणि प्रभावी वक्ते होते. राम, युधिष्ठिर, चंद्रगुप्त आणि विक्रमादित्य यांच्या कालाप्रमाणें विजयनगरच्या साम्राज्यकालीं हिंदुसमाजाचा धार्मिक, सांस्कृतिक आणि राजकीय उत्कर्ष झाला. वैदिक धर्माचा जाज्वल्य अभिमानी, वेदांचें अचूक ज्ञान असणारा हा आद्य भाष्यकार, अद्वैत वेदांताचा अध्वर्यु, ब्रह्मविद्यापारावारीण, हिंदुत्वाचा जिवंत झरा, बृहस्पतिसारखा वक्ता, पाखांड्यांना जिंकणारा दिग्गज, विजयनगरसाम्राज्याचा संस्थापक, सूत्रचालक व मुख्य प्रधान असा माधवाचार्य तथा विद्यारण्य ही एक महान् विभूति आणि शक्ति दक्षिण भारतांत चमकून गेली. त्या शक्तीनें व्यासानंतर संस्कृतीचा उद्धार केला आणि समर्थ व शिवाजीराजे यांना हिंदुपदपादशाही स्थापण्याची स्फूर्ति दिली.

(३५८) **विजयनगरची कामगिरी**:—हिंदूंची संस्कृति इस्लामपुढें कोलमडून जाण्याचा प्रसंग आला असतांना इस्लामशीं टक्कर देऊन दक्षिणेंत हिंदुत्वाची ज्योत जिवंत ठेवणें हीच विजयनगरच्या साम्राज्याची कामगिरी होय! रामचंद्रपंत अमात्यांनीं आपल्या 'राजनीति' ग्रंथांत या कामगिरीचें मोठें पोक्त व भारदस्त वर्णन पुढीलप्रमाणें केलें आहे. 'हरिहर-बुक्कण, माधव-सायण अशा बंधुद्वयांनीं विजयनगर स्थापिलें. जगत्-विप्लवासारख्या प्रसंगीं सूक्ष्मबुद्धि चालवून, जे संस्कृतिनिष्ठ परंपरासेवक कृतकर्में होते त्यांची मनोधारणा करून, विचारबुद्धि वाढवून त्यांस अधिकारानुरूप उद्योगतत्पर केलें. त्यांच्या पराक्रमानें अखिल भरतभूमि जिंकून महंमद तुघलघ पातशहास दक्षिणेंतून घालवून दिलें, आणि भारतीय संस्कृतीची अखंड ज्योत तशीच पुढें तेवत राखण्याचें श्रेय संपादिलें. हीच विजयनगर साम्राज्याची अविस्मरणीय कामगिरी!'

(३५९) **स्वतंत्र राज्यस्थापना**:—चौदाव्या शतकाच्या पहिल्या पंचविशींत इस्लामचा जोर वाढला होता. अल्लाउद्दिन खिलजी व मलिक-काफूर यांनीं दक्षिणेमध्यें देवालयें लुटणें, तीं भ्रष्ट करणें, खूप पैसा मिळविणें या उद्देशानें स्वाऱ्या केल्या होत्या. दक्षिणेंत राज्य स्थापण्याचें त्यांच्या मना-

त्यहि नव्हतें. कारण दक्षिणेंत नेहमीं बजबजपुरी राहाण्यांतच त्यांचा स्वार्थ होता. महंमद तुघलघाच्या अचाट कल्पनांपैकीं दिल्लीची राजधानी देवगिरीला हलविण्याची एक कल्पना होती. वेड्या महंमदाच्या अचाट व अघोर कल्पनांमुळें बंडें उद्भवलीं! दक्षिणेमध्यें गुलबुर्गा येथें बहामनी राज्य स्थापलें गेलें. आणि हरिहर व बुक्क या दोघांनीं मोठ्या कौशल्यानें तुंग-भद्रेच्या दक्षिण तीरावर आंध्र व कर्नाटक येथील सरदारांच्या साह्यानें विजय-नगरचें राज्य स्थापलें. हरिहर व बुक्क हे दोघे बंधु वरंगळच्या राजाच्या पदरीं होते. वरंगळ पडल्यावर ते अनागोंदीच्या आश्रयास गेले. त्याचाहि पाडाव झाल्यावर त्यांनीं हें राज्य स्वतंत्रपणें स्थापलें. तुंगभद्रेपासून सर्व दक्षिण हिंदु-स्थान आक्रमण करून अखिल हिंदूंची एकजूट करण्याचा यत्न विजयनगरच्या संस्थापकाचा होता. विजयनगरच्या गादीवर अंदाजें तीनशें वर्षें चार घरा-ण्यांनीं राज्य केलें. विजयनगरचा व बहामनी राज्याचा नेहमीं संघर्ष होत असे. कृष्णा व तुंगभद्रा यांच्या दुआबांतील प्रांतावर मालकी कोणाची हें मुख्य तंट्याचें कारण होतें. तो प्रांत बरींच वर्षें विजयनगरकडे होता. तालिकोटच्या लढाईंत मुसलमानांचा जय झाला, असें वरवर दिसलें तरी आपसांतील कलहामुळें बहामनी राज्याचे तुकडे उडाले होते, असाच निर्णय इतिहासकार देतात.

(३६०) **बुक्क व हरिहर**:—तुंगभद्रेपासूनचें सर्व हिंदुस्थान आपल्या ताब्यांत आणणारा व मुसलमानाची लाट मागें हटविणारा पहिला राजा म्हणजे बुक्कराय होय. बुक्कराय मोठा विद्वान होता. त्याचे कारकीर्दीत वेदांत, संस्कृत वाङ्मय आणि धर्मशास्त्र यांची भरभराट झाली. वरंगळच्या प्रतापरुद्राचा पुत्र कृष्णनाईक यानें द्वारसमुद्र येथील बल्लाळ राजे यांना बोलावून मोठ्या फौजेनिशीं मुसलमानावर जय मिळविला. शक्ति, संपत्ति, शौर्य आणि तेज या सर्व क्षेत्रांत तो श्रेष्ठ होता, म्हणूनच त्याचा निभाव लागला. बुक्करायाच्या पश्चात् दुसरा हरिहर गादीवर आला. त्यानें प्रधान सायणाचार्य याच्या मदतीनें कांहीं काल चांगलें राज्य चालविलें.

(३६१) **तुलव कृष्णदेवराय**:—तुलव कृष्णदेवराय हा इ. स. १५०९ मध्यें गादीवर बसला. याची कारकीर्द म्हणजे विजयनगरच्या साम्रा-ज्याचा कळस होय! यावेळीं बहामनी राज्याचे पांच तुकडे पडल्यामुळें

कृष्णदेवरायानें त्याचा चांगलाच लाभ करून घेतला. संस्कृतीचें स्मारक म्हणून पडकीं देवालयें दुरुस्त करणें आणि नवीं बांधणें हें काम कृष्णदेवरायानें केलें. हा मोठा वैभवशाली राजा होता. अशोक, समुद्रगुप्त, हर्षवर्धन यांच्या योग्यतेचा तो होता. हा विद्वानांचा भोक्ता होता. प्रसिद्ध विद्वान् आप्पयादीक्षित हा याचा आश्रित होता. कृष्णरायानें पंढरीहून विठ्ठलाची मूर्ति आणिली अशी आख्यायिका आहे. हा मोठा धर्मनिष्ठ होता. साम्राज्यस्थापनेचा हेतु कृष्णरायानेंच सफल केला. याच्या कारकीर्दींत शिल्पकला, चित्रकला, खोदकाम, नर्तन, गायनवादन, यांचा उत्कर्ष झाला. शेती, उद्योगधंदे, व्यापार, दळणवळण यांचीहि भरभराट झाली. हा हिंदुराजा आक्रमक मुसलमानांना कर्दनकाळ होता. त्यानें त्यांना ' त्राहि भगवन् ' करून सोडलें. कृष्णरायानें प्रथम आदिलशहाचा पराभव करून रायचूरचा किल्ला घेतला व खुद्द विजापुरांतहि त्यानें कांहीं दिवस तळ दिला. कृष्णदेवरायानें तेलंगणप्रांत काबीज केला. रायचूर व मुद्गल हे परगणे अत्यंत सुपीक असून ते कृष्णा व तुंगभद्रा यांच्या दुआबांत आहेत. या दुआबाकरितां रायचूरची लढाई होती. मुसलमानांच्या प्रबळ फौजांचा कृष्णदेवरायानें मोड केला. या पराभवानें आदिलशहाची कंबर खचली व सर्व मुसलमान एकवटून ते विजयनगरचें राज्य बुडविण्याच्या उद्योगास लागले. कृष्णदेवरायानंतर रामराजापर्यंत अनेक राजे राज्यावर बसले.

(३६२) **विजयनगरचें ऐश्वर्यः**-विजयनगरच्या ऐश्वर्याचें एकच गमक पाहिलें म्हणजे पुरें. विजयनगरची राजधानी चौदा मैल पसरली असून तींत ३० लाख लोकवस्ती होती ! नुसतीं प्रमुख देवळें चार हजारांवर होतीं ! शहरांत २० हजार पालख्या वाहत होत्या. मंदिराच्या सभामंडपांतून हिरे, माणकें व मोतीं यांचे घोंस लाविलेले लोंबत होते. व्यापारी पेठा धनधान्यसमृद्धीनें भरगच्च भरल्या होत्या. दारिद्र्याचें नांव नव्हतें. असंख्य विद्यालयें, राममंदिरें, सभामंदिरें समृद्धीनें नुस्तीं डोलत होतीं ! "या राज्याच्या खजिन्यास कित्येक खोल्या आहेत. त्यांत तळघरें खोदलीं आहेत. त्यांत भरलेल्या सोन्याचा जणुं काय वितळवून एक गोळाच केला आहे." "डोळ्यांनीं कधीं न पाहिलेलें आणि पृथ्वीवर कानांनीं कोणींहि

न ऐकलेलें असें विजयनगर हें एक शहर आहे." या राज्यांत कुठेंहि निर्भयपणानें हिंडतां येतें. या साम्राज्यांत देशोदेशींचे अनेक व्यापारी येतात, त्यांना कसलाहि उपद्रव होत नाहीं. येथें न्याय व सत्य कडकपणें पाळण्यांत येतात. कलाकौशल्यांची भरभराट, लोकांना सुख व समाधान आणि धर्मांत सहिष्णुता येथें मूर्तिमंत दिसते. ( –अनेक परकीय प्रवाशांच्या वर्णनाधारें.)

(३६३) **पराक्रमी रामराजाः**–हा मोठा मानी, पराक्रमी, मुत्सद्दी व कुशल राजा होता. यानें वयाच्या सत्तर वर्षांपर्यंत राज्य केलें. इ. स. १५६३ सालीं याचा उत्कर्षसूर्य अगदीं मध्यान्हावर होता. अनेक राजवट्या यानें पाहिल्या होत्या. यानें अनेक स्वाऱ्या करून मुसलमानांना जेरीस आणलें होतें. मुसलमानांमध्यें दुही उत्पन्न करून निरनिराळ्या पक्षांशीं मिळून तो आपलें वर्चस्व गाजवी. यामुळें आदिलशहा, कुतुबशहा व निजामशहा हे एकवटले. पराभूत राजास विजयी राजाचे पाय चाटण्यास भाग पाडण्याचें मोठें नामुष्कीचें कृत्य मुसलमान शहा करीत असत. एका प्रसंगीं रामराजानें निजामशहास पादवंदन करण्यास भाग पाडल्यामुळें तो सारखा जळत होता. अशा अनेक कारणांमुळें सर्व मुसलमान एकवटले व तालिकोट येथें इ. स. २२-१-१५६५ रोजीं रामराजाशीं त्यांनीं तुंबळ युद्ध केलें. रामराजा बेफिकीरपणें युद्धाची सिद्धता करीत होता. दोनशें वर्षे मुसलमानांना पाणी पाजलें आहे या कल्पनेनें लोकहि बेपर्वा होते. तालिकोटच्या लढाईचें वर्णन निरनिराळ्या इतिहासकारांनीं दिलेलें आहे. कै. वा. दत्तोपंत आपटे यांचा 'इतिहास मंजिरी' हा संग्रह ग्रंथ आणि इतर साधनें यांचे आधारें या युद्धाचें संकलित वृत्त पुढीलप्रमाणें देतां येईल.

(३६४) **राक्षसतंगडीचें युद्धः**–वयानें सत्तरीच्या घरांत आलेला रामराजा एक लक्ष घोडेस्वार व तीन लक्ष पायदळ घेऊन लढाईला आलेला होता. कृष्णानदीचा उतार अडवून धरण्याकरितां व मुसलमानांना रोखण्याकरितां त्यानें आपला भाऊ तिम्मराज यास पाठविलें होतें. विजयनगरचें सैन्य उतारावर वाट अडवून बसलें आहे असें पाहून मुसलमानांनीं रक्कसगीजवळच्या उताराकडे जाण्याची हुलकावणी दिली. तिम्मराजा हुलकावणीनें फसला. त्यानें आपला तळ हलविला. इतक्यांत मुसलमानी सैन्यानें माघार

घेतली व तंगडगीचा उतार उतरून नदी ओलांडली. हें रामराजास कळतांच तो शत्रूच्यापुढें येऊन उभा ठाकला. हिंदु सैन्यानें प्रथम इतका जोराचा हल्ला केला कीं, त्यामुळें मुसलमान सुलतान रणांगणांतून पळच काढूं लागले. पण निर्वाणीच्या वेळीं रामराजाच्या सैन्यांत फितुरी बोकाळली. दुर्दैवानें एक मस्त हत्ती एकदम धांवून रामराजावर आला. तें पाहून त्याची पालखी वाहणारे लोक पालखी टाकून पळाले. रामराजा पालखींतून उतरणार तों पकडला गेला. शत्रूनें त्याचें मुंडकें उडविलें व तें सर्वत्र फिरविलें. त्यामुळें हिंदूंचें धैर्य खचलें व सैन्य दशदिशा पळालें. साधनांची विपुलता, पण शिस्त, संघटना व व्यवस्था यांचा अभाव आणि फितुरी यांमुळें या लढाईत पराभव झाला.

(३६५) **पं. जवाहरलालांचें मतः**—या विजयानंतर मुसलमानांनीं विजयनगरचा विध्वंस केला. देवळें व वाडे जमीनदोस्त केले. सुंदर इमारती पाडून टाकल्या. एवढ्या मोठ्या शहराची लूट पांच महिनेपर्यंत चालू होती. श्रीनरसिंहाची प्रचंड दगडी मूर्ति आणि विठ्ठलस्वामींचें मंदिर यांची त्यांनीं नासधूस केली. विजयनगरच्या राजांनीं जेवढें कांहीं द्रव्य संपादन केलें होतें तें सर्व मुसलमानांनीं लुटलें. त्या लुटींत त्यांना कोंबडीच्या अंड्याएवढा एक हिराहि सांपडला. या विध्वंसाबद्दल पं. जवाहरलाल म्हणतात, "जगाच्या इतिहासांत असा धुमाकूळ अशा नामी शहरावर इतक्या आकस्मिक रीतीनें तर मुळींच माजलेला दिसत नाहीं!! आदल्या दिवशीं त्यांत श्रीमंत उद्योगी अशीं माणसें भरगच्च वैपुल्यांत बुजबुजून जाणारीं, पण दुसरे दिवशींच त्यांजवर हल्ला झाला, लुटालूट माजली, त्यांचा विध्वंस मांडला, झालेल्या क्रूर कत्तली आणि इतर भयानक कृत्यें यांचें वर्णन करतांना जीभ लुळी पडते!"

(—पं. जवाहरलाल नेहरूंचें आत्मचरित्र)

राक्षसतंगडीच्या लढाईत इ. सन १५६५ त मुसलमानांचा विजय झाला, त्यांनीं लूट मिळविली व ते परतले. परंतु साम्राज्याचा अंत झाला असें मात्र नव्हे. आरबिडु घराण्यांतील अनेक राजांनीं इ. सन १६६४ पर्यंत राज्य केलें. इ. सन १३३६ ते १५६५ पर्यंत विजयनगरचें राज्य पूर्ण

वैभवशाली होतें. राज्य गेलें तरी हिंदुतत्त्वज्ञान, हिंदुसंस्कृति हीं जीं दक्षिण भारतांत उज्ज्वलतेनें टिकून आहेत, त्याचें सर्व श्रेय विजयनगरच्या साम्राज्यालाच आहे.



## प्रकरण एकविसावें

# हिंदुसंस्कृतीच्या संकोचाची मीमांसा

हिंदुसंस्कृतीवर पहिला आघात बौद्धसंस्कृतीनें केला. त्या आघाताला तोंड देऊन हिंदुसंस्कृतीनें आपल्या पराक्रमास प्रारंभ केला, तों इस्लामशीं तिची गांठ पडली. इस्लामशीं हिंदुसंस्कृतीचा संघर्ष सातशें वर्षें सारखा चालला होता. त्या संघर्षांत रजपूत, विजयनगरचे राजे, मराठे आणि शीख यांनीं अत्यंत चिवट व जिवटपणानें अखेर इस्लामला मोडून काढलें. हें जरी सत्य असलें तथापि इस्लाममुळें दोनशें वर्षें अकबर ते औरंगजेबापर्यंत हिंदुसंस्कृतीचा संकोच कां व कसकसा झाला याची थोडी मीमांसा अवश्य केली पाहिजे. मुसलमानी सत्तेचा प्रसार हिंदुस्थानाबाहेर झपाट्यानें झाला व अवघ्या दोन शतकांत अरबांनीं इराण, आफ्रिका, स्पेन, इटली, सिसिली, क्रीट हे प्रदेश जिंकून युरोपांत प्रचंड साम्राज्य स्थापलें. पण इकडे हिंदुस्थानांत सिंध प्रांत जिंकल्यावर ते पुढें तीनशें वर्षेंपर्यंत सरकूंच शकले नाहींत, आणि हिंदुसंस्कृतीशीं झगडतां झगडतां अखेर त्यांना हार खावी लागली. यावरूनच हिंदूंचा चिवटपणा आणि जिवटपणा व्यक्त होतो.

(३६६) **संस्कृतिसंगमकारांची मीमांसाः**—संस्कृतिसंगमकार म्हणतात कीं, रांगडे लोक व रानटी लोक सुसंस्कृत लोकांवर कांहीं काल जय मिळवितात, त्यांतीलच हा विजय होय! इस्लामपुढें हिंदुसंस्कृतीला प्रथम थोडें दबावें लागलें याचें कारण मुसलमानांतील कडवेपणा, परस्पर बंधुभाव,

भटकेपणा, लुटारूपणा, नंगेपणा व रांगडेपणा हा होय. मुसलमानांत धर्मोत्साह व बंधुभाव फार दांडगा असे. सिंधच्या दाहिरच्या हाताखालीं पांचशें अरबांची एक तुकडी होती. तिच्या नायकानें महंमद कासीम-विरुद्ध म्हणजे इस्लामच्या सैन्याविरुद्ध आमची तरवार म्यानांतून बाहेर पडणार नाहीं असा दाहिर राजास जबाब दिला. स्वधर्मबांधवांविरुद्ध लढल्यास नरकांत जाऊं असें त्यांना वाटे. विजयनगरच्या रामरायाच्या फौजेंत मुसलमानी पथकें होतीं. त्यांनीं तर आयत्यावेळीं तालिकोटच्या लढाईत फितुरीनें शत्रूस मिळून स्वामिद्रोह केला.

जिकडे लूट मिळेल तिकडे टोळासारखी धांव घ्यावी, लूट संपेपर्यंत तेथेंच रमावें, राज्य स्थापण्यास सांपडलें तर तेथेंच बैठक मारावी. उद्यांची पर्वा नाहीं, प्राणाची फिकीर नाहीं, असल्या रांगडी लोकांत एक प्रकारचें सैतानी शौर्य संचरत असतें. सुसंस्कृत लोकांवर रानटी लोक पुष्कळ वेळां जय मिळवीत असतात त्यांतलाच हा विजय होय! गिबननें या बाबतींत रोमन लोकांच्या पराभवाची जी मीमांसा केली आहे तीच हिंदूंच्या बाबतींतहि लागू पडते. ( संस्कृतिसंगम पृ. २८७. )

(३६७) **डॉ. आळतेकरांचें मतः**—हिंदु विश्वविद्यालय बनारस येथील प्राध्यापक डॉ. आळतेकर यांचेंहि म्हणणें असेंच आहे. ‘एखाद्या रानटी अगर अर्धरानटी समाजानें इस्लामचा स्वीकार केला कीं त्यांच्यामध्यें उत्साह व विलक्षण चैतन्य उत्पन्न होई. अरब, तुर्क, घोर व अफगाण लोकांत इस्लामच्या स्वीकारामुळें कडवेपणा व नवचैतन्य हे गुण आले होते. या रानटी टोळ्यांचा लुटालुट करणें, मारामाऱ्या करणें, हा अनुवंशिक धंदा होता. रानटी व अर्धरानटी लोकांमध्यें सत्ता व ऐश्वर्य यांची फार हांव असते. लढाई जिंकल्यास असंख्य गुलाम, अनेक स्त्रिया व लूट मिळण्याचा संभव होता. युद्धांत मृत्यु आल्यास स्वर्गांतील हुऱ्या आपणास झेलून धरतात अशी समजूत होती. रानटी, लुटारू व सत्तालोलुप जमातींवर स्वर्गाच्या आमिषाचा जो परिणाम होतो, तसा सुसंस्कृत समाजावर होत नाहीं. लढाई जिंकून हिंदूंना कांहीं मिळवावयाचें नव्हतें. मुसलमानांप्रमाणें गुलामांचा व्यापार करतां येत नव्हता किंवा मुसलमानी स्त्रियांना जनानखान्यांतहि खेचतां

येत नव्हतें म्हणून कांहीं काल हिंदूंचा पराभव झाला. नवचैतन्य, उत्साह, घडाडी हे गुण मुसलमानांच्यांतच असूं शकतात, हिंदूंच्यांत नाहींत असें मात्र कोणीं समजण्याचें कारण नाहीं. थोड्याच अवकाशांत हे गुण मुसलमानांमध्येंहि लुप्त झाले व जेव्हां त्यांचीं मराठ्यांशीं युद्धें सुरू झालीं, त्यावेळीं ध्येयवादानें भारलेले व राष्ट्रप्रेमानें ओथंबलेले मूठभर मराठेहि सर्व हिंदुस्थानच्या बादशहास लीलेनें धुळीस मिळवूं शकतात, हें सिद्ध झालें. इस्लाममुळें रानटी टोळ्यांत आलेलें नवचैतन्य शेंदोनशें वर्षांपेक्षां अधिक काळ टिकूं शकलें नाहीं. दोनशें वर्षांनंतर हिंदूंमधले दुर्गुण मुसलमानांत शिरले आणि नवचैतन्य व घडाडी हे सद्‌गुण महाराष्ट्रांतल्या मराठ्यांत सतराव्या शतकांत उत्पन्न झाल्यामुळें ते मोंगल साम्राज्य धुळीस मिळवूं शकले.'

(–सह्याद्रि नोव्हेंबर १९४५.)

**(३६८) समष्टिधर्माचा अभावः**–आक्रमक व रानटी मुसलमान टोळ्यांचा एकच धर्म होता. इस्लामचे अनुयायी तेवढे बंधु व तदन्य ते काफीर, अर्थात् त्यांच्यावर विजय मिळविणें हें जीविताचें ध्येय व कर्तव्य अशी त्यांची समजूत होती. त्यामुळें ते सर्व एक होत, व स्वधर्मीयांशीं लढणें पाप समजत. इस्लामपूर्वी हिंदुसमाजांतील समष्टिधर्म शिथिल झालेला होता. समाजविषयक कर्तव्याची जाणीव नव्हती. वैय्यक्तिक सद्‌गुण, वैय्यक्तिक मोक्ष व आचार यांमध्यें सर्व धर्म येऊन बसलेला होता. आपलें राष्ट्र, आपला देश, आपली मातृभूमि, शासनशास्त्र, राज्य, कायदा, शस्त्रें, व शास्त्रें यांमुळें संपन्न व्हावें आणि आपण प्रबळ व्हावें अशी कल्पना सर्वसामान्य समाजांत तर नव्हतीच पण राजेलोकांतसुद्धां नव्हती. भरतखंड हा मोठा देश, त्यामध्यें अनेक हिंदु क्षत्रिय राजे राज्य करीत होते. शौर्यामध्यें हे राजे मुसलमानांपेक्षां वरचढच होते. या राजांमध्यें परस्पर प्रेम तर नसेच पण साम्राज्यासाठीं परस्पर युद्धें होत. प्रत्येक राजा दुसऱ्यावर संकट आलें कीं उदासीन असे. किंबहुना संकट आलेसें पाहून त्याच वेळीं परक्याची मदत घेऊन आपल्या शत्रूचा सूड घेण्यासहि त्याला दिक्कत वाटत नसे. स्वतःचा मान, बडेजाव व सुख यांपुढें त्यांना राष्ट्रहिताची पर्वा नव्हती. व्यक्तिद्वेष, मत्सर, सूडाची भावना व महत्त्वाकांक्षा यांमुळें या राजेलोकांच्या शौर्याचा आणि धैर्याचा फारसा उपयोग झाला

नाहीं. त्या कालीं सबंध हिंदुस्थानांत खालीलप्रमाणें हिंदु राज्यें होतीं. कनोजचे सम्राट् प्रतिहार, धारचे परमार, बुंदेलखंडाचे चंदेल्ल, चेदी ऊर्फ त्रिपूरचे कल्चूरी, दक्षिणचे राष्ट्रकूट, काश्मीरचा कर्कोटक वंश, वल्लभीचा मैत्रक वंश, भडोच येथील गुर्जर, बदामीचे चालुक्य, कांचीचें पल्लव घराणें, वेंगी व कलींचें प्राच्य चालुक्य, ओढ्याचें केसरी घराणें, गौडांतील गुप्त राजे, कनोजचें वर्म घराणें, कौसल देशांतील हैहय राजे, त्रिनमालचे गुर्जर चापराजे, पश्चिम माळव्यांतील (मोलापो) वर्धन राजे, मध्य–माळव्यांतील उज्जनीचे राजे, गजाक, मुक्ति, व महेश्वर येथील राजे, चितोडचे गुहिलोत आणि बाप्पा रावळ, सांबरचे चाहमनि; याशिवाय उत्तर हिंदुस्थानांत रतनपूर, ग्वाल्हेर, अबू, दिल्ली या ठिकाणीं महत्त्वाचीं घराणीं राज्य करीत होतीं. तशींच दक्षिणेमध्येंहि यादव, पांड्य, आंध्र, कदंब, शिलाहार या घराण्यांचीं राज्यें होतीं.

स्वसंस्कृतीवरील संकट ओळखून उत्तरेकडील राजांनीं महंमुद गझनीचा प्रतिकार करण्याची सिद्धता केली. उत्तरेकडील राजे दोनतीन वेळां तरी एकजुटीनें वागले, पण दक्षिणेकडील राजांनीं तसें केलें नाहीं. त्यावेळीं गुजराथेंत चालुक्य, माळव्यांत परमार, पैठणला यादव, वरंगळला काकतीय व द्वारसमुद्राला होयसळ यांचें राज्य होतें. हे आपापसांत भांडत असत. मुसलमान चालुक्यावर किंवा परमारावर कधीं हल्ला करतील व कधीं त्यांना जेरीस आणतील व त्या संधीचा कधीं फायदा घेऊं याची यादव राजे वाट पहात. महाप्रतापी सिंघण यादव (इ. स. १२०५ ते १२४६) यानेंसुद्धां मुसलमानांच्या हल्ल्यानें चालुक्य हैराण झालेले पाहूनच त्यांजवर हल्ला केला. इ.स. १२३५ मध्यें मुसलमानांनीं परमारांचा पराभव केला तर त्याच आपत्तीच्यावेळीं सिंघणाचा मुलगा कृष्ण यादव यानें पहिल्या सपाट्याला परमार राजावर स्वारी केली. आधींच पराभूत झालेल्यावर सहज विजय मिळेल एवढीच त्यांची महत्त्वाकांक्षा! रामदेवराव यादवानेंहि परमार व चालुक्य यांचेवर ते अडचणींत आहेत असें पाहून जणुं मुसलमानांना साह्य म्हणून दक्षिणेंतून हल्ले चढविले. इ. स. १२९५ मध्यें रामदेवरायाचा पराभव मुसलमानांनीं केल्यानंतर वरंगळच्या प्रतापरुद्रानें त्याच्यावर स्वारी करून अनंतपूर व बल्लारी हे त्याचे जिल्हे घेतले व द्वारसमुद्राच्या बल्लाळानें यादवांचा वनवासी प्रांत

बळकावला. या सर्व उदाहरणांवरून सर्व राजांना मिळून संस्कृतिरक्षण करावयाचें आहे, आपणां सर्वांवर मोठें संकट आलेलें आहे अशी कल्पना नव्हती. असें दुःखानें नमूद करणें भाग आहे.

( डॉ. आळतेकर—सह्याद्रि नोव्हेंबर १९४५ )

(३६९) **मुसलमानांतहि हे दोष होतेचः**—वर ज्या दोषांचें आविष्करण केलें ते दोष युरोपच्या इतिहासांतहि दिसतात आणि मुसलमानांमध्येंहि आढळतात. थोडे कमी अधिक इतकंच. मुसलमानांमध्यें प्रथम व त्यानंतर कांहीं प्रसंगीं जरी एकजूट दिसली तथापि मोंगल हें दक्षिणेंतील मुसलमानी राज्यें बुडविण्याकरितां यत्न करीतच होते. जे जे मुसलमान सरदार स्वतंत्र झाले त्या सर्वांत चुरस व मत्सर वाढे व ते विजयार्थ हिंदूंची मदत घेत. हिंदुसमाजाला आपल्या संस्कृतीवरील संकट एकदां कळलें म्हणजे त्यांची एकजूट होण्यास वेळ लागत नाहीं.

(३७०) **घरबुडवा चित्रपटः**—परधार्जिणेपणा, आत्मप्रत्ययशून्यता आणि अन्तःकलह यांमुळें हिंदुसंस्कृतीची अपरिमित हानि झालेली आहे. इस्लामचें आक्रमण यशस्वी होण्यास घरबुडव्या हिंदूंनींच कसें साह्य केलें तें पाहून संतापच उत्पन्न होतो. पौरसाचा व शिकंदराचा जो सामना झाला त्यावेळीं तक्षशिलेचा राजा अंभी हा शिकंदरचे बाजूनें देशबंधु पोरस राजाविरुद्ध लढत होता ! शकांच्या मिँनडर राजाला येथील बौद्धधर्मीयांची मदत झाली होती, म्हणूनच तो पुढें बौद्ध मिलिंद झाला. बौद्ध आणि वैदिक यांची स्पर्धा हिंदुस्थानांत कित्येक शतकें चालू होती. त्यांत बौद्धांनीं परकीय चिनी लोकांची मदत वैदिकांविरुद्ध घेतली होती, असें भविष्योत्तर पुराणांतील श्लोकावरून अनुमान संभवतें. अफाट हिंदुस्थानांत परस्पर युद्धें चालत. राजकीयदृष्ट्या सर्व राजांचा गट एक नव्हता. तथापि सांस्कृतिक एकत्वाची भावना हिंदुस्थानांत दृढमूल झालेली होती. पण परक्यांचें आक्रमण होत असतांना त्यांना साह्य करून आपल्या संस्कृतीची राखरांगोळी करण्यास आमच्या लोकांनीं साह्य केलें. या निंद्य परधार्जिण्या वृत्तीचा तिरस्कार करावा तेवढा थोडाच. महंमद कासीमच्या अफाट सैन्याला विशाल सिंधु नदी उतरून परतीरास कसें पोचावें हा मोठा प्रश्न होता. त्यावेळीं सिंधूच्या पात्रांतील

एका बेटाचा अधिकारी मोक्वा बसय्या यानें दाहीर राजाचें व त्याचें ठीक नव्हतें म्हणून नदी उतार करण्याचा मार्ग स्वतः होड्या व वाटाड्या पाठवून दाखविला व कासीमला घरांत घेतलें. महंमदनें त्याला त्या बेटाचा राजा केलें. अल्प स्वार्थाकरितां राष्ट्रबुडवेपणा करणें हें अधमपणाचें लक्षण होय! पृथ्वीराजानें शहाबुद्दिनला चांगलें लोळविलें असतांना पुढें तो बारा वर्षांनीं चाल करून आला. त्याचें कारण पंजाबचे चहामान आणि मथुरेचे गहडवाल यांचें कांहीं कारणानें बिनसलें होतें; आणि अविवेकी जयचंद गहडवाल यानें महंमद घोरीला स्वारी करण्यास बोलाविलें होतें. जयचंदानें निमंत्रण दिल्याचा समज सर्वस्वीं खोटा आहे असें चिं. वि. वैद्य यांनीं मध्ययुगीन भारतांत सिद्ध केलें आहे. महंमद खिलजीनें विक्रमशिला येथील विद्यालय बेचिराख केलें, त्यावेळीं त्याची माहिती देण्याचें काम बौद्ध भिक्षूंनींच केलें होतें. ( संस्कृतिसंगम पृ. ३०४ ते ३०९ चा सारांश. )

(३७१) नीतिनियमांतील तारतम्य सुटलें:—अहिंसा, सत्य, अस्तेय, दिलेलें वचन पाळणें, धर्मयुद्ध शास्त्राप्रमाणें करणें, शरणागताचें रक्षण करणें वगैरे नीतितत्त्वें आहेत. परंतु शौर्यधैर्यादि गुण आणि नीतितत्त्वें व्यक्तिविकास आणि धर्म व संस्कृति यांच्या रक्षणाकरितांच आहेत. मुसलमानांना उत्कर्ष लाभूं देण्याचे कामीं ज्या हिंदूंनीं पराक्रमाची शर्थ केली व स्वामिनिष्ठेनें प्राण खर्ची घातले त्यांचें तें कृत्य घातकच होय! राजा स्वधर्मी, स्वदेशी व स्वसंस्कृतिरक्षक जेव्हां असेल तेव्हां त्याच्याशीं स्वामिनिष्ठेनें वागणें योग्य असतें. विधर्मी, विदेशी स्वामीशीं एकनिष्ठ असणें व त्याचें राज्य दृढ करण्याकरितां आटापेटा करणें हें पुण्य नसून पाप होय. हें तारतम्य ध्यानांत न आल्यामुळें स्वामिनिष्ठेच्या सद्गुणाचा परदास्यशृंखला दृढ करण्यांत शेवट झाला. राजा हा विष्णूचा अंश असतो, पृथ्वीपति ना म्हणजे नर यास विष्णु समजून त्याची सेवा करावी, या कल्पना स्वधर्मी, स्वदेशी जेव्हां राजा असेल त्यावेळींच इष्ट असतात. कोणीहि राजा म्हणून उरावर बसावें आणि तो ईश्वराचा अंश म्हणून स्वामिनिष्ठेनें त्याला साह्य करावें हें अत्यंत अनिष्ट होतें. राजपूत याच भावनेनें अकबराशीं वागले. पुष्कळ मराठे सरदारहि याच भावनेनें पछाडले होते. भाऊसाहेबानें दिल्लीच्या तख्तावर जेव्हां घण घातला, तेव्हां मल्हारराव होळ-

करांना दिल्लीपतीविषयींच्या आदरामुळें फार वाईट वाटलें. भोसले, घोरपडे घराण्याचा मूळ पुरुष सुजनसिंह याची कल्पना अशी कीं, मुसलमानी राज्य ईशसंकल्पानुरूप आहे. त्याविरुद्ध लढणें हें पाप होय! पोटाला देईल त्याची नोकरी करावयाची व स्वामिनिष्ठेच्या नांवाखालीं स्वसंस्कृतिबांधवांच्या माना कापावयाच्या असलीं उदाहरणें त्याकालीं घडलीं. याचें कारण राष्ट्रहित व समाजहित याची जाणीव नसणें व स्वामिभक्तीच्या पराकाष्ठेंतील तारतम्य सुटणें हें होय! शरणागताचें रक्षण करणें, वचनास जागणें वगैरे नीतिनियम पाळतांना राष्ट्रहिताच्या दृष्टीनें जी काळजी घ्यावयास पाहिजे ती न घेतल्यामुळें कशी हानि झाली हें आतां सोदाहरण पुढें मांडतों.

(३७२) **ऐतिहासिक उदाहरणें**:–शरणागताचें रक्षण करणें हा आपला धर्म आहे असें समजून, रणथंबोरच्या राण्यानें अल्लाउद्दिनाचा शत्रू महमूद यास आसरा दिला व आपला नाश ओढवून घेतला. कांपिलच्या छोट्या राजानें बहाउद्दिन घुष्टापला आसरा दिला, म्हणून क्रोधाविष्ट झालेल्या महमुद सुलतानानें त्याच्यावर स्वारी करून त्याचा निःपात केला. महमद गादीवर बसला काय किंवा बहाउद्दिन बसला काय, कांपिलच्या राजास त्याचें काय सोयरसुतक? पण वचनास जागावयाचें म्हणून त्यानें व रणथंबोरच्या राण्यानें मरण ओढवून घेतलें. मेवाडवरील स्वारीमध्यें इ. सन १६७९ च्या सुमारास औरंगजेब राजपुतांच्या हातीं सांपडला होता; पण संकटामध्यें सांपडलेल्या शत्रूवर वार कसा करावयाचा, म्हणून चितोडचा राणा राजसिंह यानें गोहत्या न करण्याचें वचन घेऊन दिलदारापर्वताच्या घाटांतून औरंगजेबास व त्याच्या सैन्यास मार्ग दाखवून दिला! धर्मयुद्ध–नियम पाळून धर्मावरच संकट ओढवत आहे, तेव्हां अशा वेळीं शत्रूचा निःपात करणें जरूर आहे, एवढें जर त्यास समजलें असतें, तर कोट्यवधि हिंदूंचे अनेक वर्षांचे हाल वांचले असते. माळव्याचा महमद खिलजी मेवाडचा राणा संग याच्या हातीं इ. सन १५१९ सालीं कैदेंत सांपडला असतांना, त्यानें त्याच्या जखमांस मलमपट्टी बांधण्याची तजवीज केली व त्यास सन्मानानें पाठविलें!

(–डॉ. आळतेकर, सह्याद्रि नोव्हेंबर १९४५.)

नीतीकरितां नीति नसून समाजस्थैर्याकरितां नीतितत्त्वें आहेत, असें मान्य केलें म्हणजे व्यवहारांत सज्जनाशीं व दुर्जनाशीं वागतांना नीतितत्त्वांना मुरड घालणें हें क्रमप्राप्तच येतें. नीतितत्त्वांना मुरड घालणें म्हणजे स्वतःचें दौर्बल्य झांकणें असें नसून नीतीचा मूळ उद्देश सफल होण्याकरितांच अशी मुरड घालावी लागते, असा याचा सरळ अर्थ आहे.

'महंमद घोरी हा पृथ्वीराजाच्या तावडींत सांपडला असतां त्यानें शरण आलेल्याला मारणें उचित नव्हे म्हणून त्याला सोडून दिलें. पण शहाबुद्दिननें पृथ्वीराजाला ठार करूनच दिल्लीचें सिंहासन विश्वासघातानें बळकावलें. पृथ्वीराजाला विश्वासघात करण्याचें कारण नव्हतें. कारण त्यानें त्याला रणांगणावरच जिंकलें होतें. विजयी जेत्यांच्या दुर्दम्य आत्मविश्वासानें पृथ्वीराजानें मानीव नीतिकल्पनेला बळी पडून आपल्या राष्ट्राचा बळी दिला. पृथ्वीराज धर्माप्रमाणें वागला असें नाहीं. कारण आततायीला जिवंत सोडूं नये असें धर्मच सांगतो. धूर्त, कपटी, उरफाट्या काळजाच्या शत्रूशीं प्रसंग आला असतां कसें वागावें याची खरी नीति, व्यवहारकुशल नीति, मनुप्रोक्त, कृष्णप्रतिपादित, पांडवाचरित नीति, यांचा विसर पृथ्वीराजाला पडला होता. खऱ्या धार्मिक वृत्तीची जागा भोळसट बेसावधगिरीनें पत्करली होती म्हणून तो फसला. शरणार्थी व आततायी यांतील भेद तो विसरला. राक्षसतागडीच्या लढाईत सत्तर वर्षांचा जख्खड म्हातारा रामदेवराय शत्रूच्या हातीं पडला तेव्हां हुसेन निजामशहानें त्याचें डोकें उडविण्यास कमी केलें नाहीं. तो उद्गारला कीं, "मी तर सूड उगविला! आतां अल्ला कांहीं करो." असल्या उरफाट्या काळजाच्या लोकांशीं संबंध आला असतांना कसें वागावें हें महाभारतांतील नीतितत्त्व हिंदूंनीं अंमलांत आणलें नाहीं. चाणक्याच्या नीतिशास्त्राविषयीं हिंदूंचे विपरीत ग्रह आहेत! हूण राजा मिहिरगुल्ल हा अत्यंत राक्षसीवृत्तीचा होता. गुप्त सम्राटांपैकीं बालादित्यानें अनेक हिंदुराजे एकत्र केले व मिहिरगुल्लाचा सपशेल पराभव केला. पण तो हातीं गावला असतांना त्याचा पुरा निःपात न करतां बालादित्यानें त्याला सोडून दिलें! या उपकाराची फेड त्या दुष्टानें उपकारकर्त्याला स्वर्गांत पाठवूनच केली! आततायी शत्रूशीं झुंजतांना क्रूराचार

अवश्य हवा असतो, हें तत्त्व विसरल्यानें हिंदूंचें अपरिमित नुकसान झालेलें आहे.' ( –संस्कृतिसंगम पान २९६ )

(३७३) **विजेत्या मुसलमानांची नीतिमत्ताः**–मुसलमानांची नीतिमत्ता, लढाईची पद्धत आणि जिताशीं वागणूक या सर्व गोष्टी अगदीं निराळ्या होत्या. शत्रूवर दया दाखविणें, त्याच्याविषयीं मृदुपणा धारण करणें म्हणजे ते पाप समजत. जितावर वर्चस्व गाजविण्याकरितां कपट, विश्वासघात, क्रौर्य आणि कत्तल यांचा ते सहज अवलंब करीत. लढाऊ लोकांची कत्तल करणें, निरपराध्यांना गुलाम करणें, शहरें जाळणें, मूर्ति फोडणें हीं मुसलमान विजेत्यांचीं स्वभावकर्में होतीं. लढतांना ते तीक्ष्ण धार्मिक भावनांनीं उद्दीपित होत. सेनापति युद्धापूर्वी गुडघे टेकून अल्लाची प्रार्थना करी व काफराचा समूळ निःपात करणें म्हणजे मोठें पुण्यकृत्य आहे असें समजत. आपणास जयावर जय मिळत आहेत, स्वर्गांतून अल्लाची मदत होते, तेव्हां ईश्वराचें चक्र आपल्या रक्षणास आहे अशी भावना ते उत्पन्न करीत व ईश्वराच्या आज्ञेमुळें व कृपेमुळें या सर्व कत्तली करतों असें भासवीत. तैमूरलंग दिल्लीवर हल्ला करण्यास निघाला, त्यावेळीं त्याच्या छावणींत सुमारें एक लक्ष निःशस्त्र हिंदु कैदी होते. हल्ला करीत असतांना या लोकांनीं बंडाळी करून चालून येऊं नये म्हणून सर्व कैदी ठार करण्याचा तैमूरनें हुकूम सोडला. शत्रूवर जरब बसविण्याकरितां व एकंदर समाजाला दहशत देण्याकरितां मुसलमान या तऱ्हेचें वर्तन नेहमीं करीत.

महंमद कासीमनें देवाल घेतल्यावर त्या नगरांतील सर्व स्त्रीपुरुषांची सरसकट कत्तल केली. पुढें जेथें जेथें तो गेला, तेथें तेथें त्यानें कत्तली केल्या. गझनीच्या महमुदाला तर मूर्तिपूजकांना ठार मारण्यांत पुण्य वाटे; म्हणूनच स्मिथ नामक इतिहासकार त्याच्या स्वाऱ्यांना 'खुनी स्वाऱ्या' असें म्हणतो. महमद घोरीनेंहि पृथ्वीराजाला ठार केल्यावर निरपराधी लोकांची कत्तल केली. कुतुबुद्दिन हा क्रूर, माथेफिरू होता. बालबन हा हिंदुद्वेष्टा होता. त्यानें एकदां बारा हजार स्त्रीपुरुषांची कत्तल केली, आणि शंभर माणसांच्या अंगची कातडी सोडून त्यांत पेंढा भरून तीं दिल्लीच्या वेशीवर टांगून ठेवलीं. स्मिथ म्हणतो, 'मोठमोठ्या शहराबाहेर याच्या राज्यांत सुळी देण्याकरितां सुळांच्या रांगा असत.' बालबनबद्दल

बन्हाणी नामक इतिहासकार म्हणतो कीं ' त्याच्याइतका क्रूरपणा कोणी दाखविला नाहीं. जेथें जेथें हा बंदोबस्तास गेला, तेथें तेथें रक्ताच्या नद्या वाहूं लागल्या, प्रेतांचे ढीग पडले व दुर्गंधीनें देश व्यापून गेला. अल्लाउद्दिन व मलिककाफूर यांनीं हिंदूंना छळून, कत्तली करून दहशत बसविण्यास कमी केलें नाहीं. ' 'महमद तुघलघ हा क्रूर, खुनी व जुलमी होता. त्याच्या दुष्कृत्याचें वर्णन करण्यास लेखणी धजावत नाहीं, ' असें स्मिथ म्हणतो. फिरोज तुघलघनें बंगालवर स्वारी करून एकलक्ष ऐंशीहजार लोकांची कत्तल केली. काफीराला गुलाम करणें, त्यांच्या कत्तली करणें याचें त्याला वेड होतें. काफराला दिलेलें वचन न पाळणें, त्याचा विश्वासघात करून त्याला ठार मारणें हें कृत्य शेरशहानें केलें. ' अकबर विषयुक्त गोळ्या देऊन मोठ्या धूर्ततेनें नको असलेल्यांना मारीत असे ' असें व्हीलर लिहितो.

' He ( Akbar ) had another way of getting rid of his enemies which is revolting to civilization. He kept a poisoner in his pay. He carried a box with three compartments, one for betal, another for digestive pills, a third for poisoned pills. No one dared to refuse to eat what was offered him by the Padshah. The offer was esteemed an honour. How many were poisoned by Akbar is unknown. The practice was in full force during the reigns of his successors. '

( History of India–Wheeler Vol. IV Part I, Page 174–175 ).

जहांगीरनें तर आपल्या डायरींतच प्रतिवर्षी प्रत्येक परगण्यांत किती लोक मारले जात याचें वर्णन दिलेलें आहे, तें असें:—

' During the reign of my father and subsequently of my own there is scarcely a province in the empire in which either in the battle or by the sword of the executioner five and six hundred

thousand human beings have not at various periods fallen victims to this fatal disposition to discontent and turbulence '.

( Memories of the Emperor Jehangir, -Page 128
—Major David )

औरंगजेबाच्या कारकीर्दीतील शीख, सत्नामी, बुंदेल आणि राजपूत यांच्या छळांचा आणि कत्तलींचा उल्लेख करण्याचें कारणच नाहीं. दक्षिणेंत-सुद्धां बहामनी राज्यांत, निजामशाहींत आणि आदिलशाहींत दहशत बसविण्याकरितां कसे प्रकार होत असत हें आदिलशाहींतील हिंदूंशीं कसें वागावें यासंबंधाचें जें एक कडवें फर्मान* इंडियन हिस्टॉरिकल रेकॉर्ड कमिशन भाग १७ पान १२४ वर दिलें आहे त्यावरून दिसून येतें. पण हिंदु राजे हे सर्व प्रकार त्यांना माहित असतांना चक्रवर्तित्वाच्या अभिमानानें आपण प्रभु आहों तेव्हां दुर्बळास मारण्यांत काय पुरुषार्थ आहे अशा कल्पनेनें मृदुपणानें वागत. सत्य, विश्वास, अभय, औदार्य हे गुण दाखविले पाहिजेत असें त्यांना वाटे. हिंदूंच्या धर्मभावना गोडव्या होत्या, मुसलमानांप्रमाणें कडव्या नव्हत्या. त्यामुळें जितांना गुलाम करणें, त्यांना छळणें, त्यांच्या कत्तली करणें, रक्तपात करावयास लावून जरब बसविणें या गोष्टी त्यांचेकडून होत नसत. अहिंसेचा प्रबळ संस्कार, विश्वबंधुत्व यांमुळें मुसलमानांच्या क्रौर्यापुढें त्यांचा टिकाव लागत नसे. जिताशीं हिंदु सदयतेनें वागत त्यामुळें त्यांचा वचक बसत नसे.

**(३७४) दूरदर्शीपणाचा अभाव:**—इस्लाम व हिंदुसंस्कृति यांच्या संघर्षांत हिंदुराजांनीं जें दूरदर्शित्व दाखवावयास हवें होतें तें दाखविलें नाहीं असें म्हणावें लागतें. हुलकावण्या दाखविणें, छापे घालणें, गनिमी काव्यानें लढणें, सैन्याची व युद्धाची आगाऊ सर्व शिस्त ठरविणें, युद्धांत अपजय येणार असें दिसलें कीं बचावाची पूर्वतयारी करणें, शत्रूबद्दल सावध राहाणें व त्याची खडान् खडा माहिती ठेवणें, शत्रू बेसावध असतां त्याच्यावर हल्ला करणें, प्रतिपक्षी क्षीणबल झाला असतां त्याचा पूर्ण फायदा घेणें वगैरे

* या कडव्या फर्मानाचा मराठी अनुवाद प्रकरण बावीस येथें पहा.

युद्धशास्त्रांतील कौशल्य हिंदु राजांनीं दाखविलें नाहीं. त्याचें कारण स्वसामर्थ्याबद्दल फाजील अभिमान हें होय. स्वसामर्थ्याच्या घमेंडीनें ते वागले, दूरदर्शीपणा त्यांनीं दाखविला नाहीं म्हणून अगदीं लढाईच्या हातघाईंत हिंदूंच्या गळ्यांत विजयश्रीनें घातलेली माळ शत्रूनें काढून नेली असें दिसतें. ऐन लढाईच्या प्रसंगीं कुठें एकदम धुरळा दिसूं लागला, कुठें सेनापति पडला, कुठें हत्ती भडकला, कोठें आपल्या सैन्याचें निशाण दिसे-नासें झालें कीं हिंदु सैन्याची गाळण होई आणि मुसलमानांचा जय ठेवल्या-सारखा होई. जयपाळ व महंमद गिझनी यामध्यें इ. सन १००१ या वर्षीं जें युद्ध झालें त्यावेळीं जयपाळची तयारी नाहीं असें पाहूनच महंमदानें एकदम हल्ला करून लढाई जिंकली. त्यावेळीं महंमदाला हिरे, माणकें, मोतीं, पांच यांचे अलंकार पुष्कळ सांपडले. कारण जयपाळाकडचे सरदार व सैनिक हे दागिने घालून नट्टनथट्टन लग्नाच्या मिरवणुकीप्रमाणें लढाईला आले होते! पुष्कळ प्रसंगीं हिंदूंकडील गजदळ हें हिंदूंना मारक होई, पण केव्हां केव्हां त्याच हत्तींचा उपयोग मुसलमान करीत व हिंदूंना जिंकीत! आनंदपाल व गिझनीचा महंमद यांमध्यें इ. सन १००८ त जी लढाई झाली त्यावेळीं गख्खर लोकांच्या पराक्रमामुळें हिंदूंच्या बाजूला जय अगदीं ठेवला होता. पण आनंदपालाचा हत्ती कासमचा प्रतिस्पर्धी जो दाहीर ( सिंधचा राजा ) त्याच्या हत्तीप्रमाणें एकदम भडकला व रणांगण सोडून पळाला. झालें, सेनापति पडल्यावर किंवा पळाल्यावर हिंदुसैनिकांनीं लगेच पळ काढला व मुसलमानांचा जय झाला! महंमद घोरी पहिल्यानें पृथ्वीराजाच्या हातीं सांपडला असतां त्यानें युक्तीनें सुटका करून घेतली. पण त्या शरणचिठ्ठीच्या अपमानामुळें त्याला तिकडे झोंप येत नव्हती. तो आंतून सारखा जळत होता व जंगी तयारी करीत होता, तर इकडे पृथ्वीराज अगदीं स्वस्थ होता. पुढें महंमद घोरीनें पृथ्वीराजाशीं कसें वर्तन केलें हें सर्वश्रुत आहे. मुसलमान हे हिंदुविषयीं पूर्ण माहितगार असत. त्यांचा स्वभाव, धर्म-भोळेपणा व जातिवैमनस्य यांची माहिती बाटेहिंदुकडून त्यांना भरपूर मिळे, तिचा ते यथास्थित उपयोग करीत. हा दूरदर्शीपणा हिंदूंमध्यें नव्हता.

(३७५) **असावधपणाः**–सावधपणाचा अभाव हें हिंदुराजांचें लक्षण सिंध देशच्या दाहीर राजापासून तों विजयनगरच्या रामराजापर्यंत

सर्वत्र सारखेंच आढळतें. परकीय शत्रू हे सेना, मंत्री, कोश व युद्धशास्त्र यांनीं सदैव युक्त असत. युद्धांत पराभव झाला तरी ते आपल्या देशीं जाऊन दुप्पट तयारी करीत व जय झाला तरी हुरळून न जातां दक्षतेनें वागत. पण हिंदुराजांचें लक्ष सैन्यापेक्षां धर्माकडे अधिक होतें. लढाईच्यापूर्वीं हिंदुराजे असावध असत व प्रसंग आला म्हणजे जागे होत, हें तालिकोटच्या सुप्रसिद्ध लढाईवरूनहि दाखवितां येतें. तालिकोटच्या लढाईपूर्वीं रायचूरची लढाई झालेली होती, त्या लढाईत मुसलमानांचा पराभव झाल्यामुळें ते त्याचा वचपा काढण्याकरितां सारखे जळत होते. कुतुबशाहीचे व आदिलशाहीचे राजे एक झाले, त्यांनीं इतर मुसलमानांना आपल्याकडे घेतलें व युद्धाची प्रचंड तयारी चालविली. पण रायचूरच्या जयामुळें बेहोष झालेले हिंदुराजे अगदीं स्वस्थ व बेफिकीर होते. पुढें धोका येणार ही त्यांना कल्पना नव्हती. शेजारीं शत्रूचें सैन्य येऊन थडकलें तरी त्यांचे नित्याचे व्यवहार स्वस्थपणें चालले होते.

माळव्याच्या हुशंगशहास ओरिसामधील राजाकडून हत्ती उपटावयाचे होते. त्यानें सौदागराच्या रूपानें हजार घोडे घेऊन जयपूर गाठलें. घोडे विकणारा मी सौदागर आहें असें तो वाटेंत सांगे म्हणून त्याला कोठेंहि वाटेंत विरोध झाला नाहीं. जयपूरला पोंचल्यावर त्यानें राजाची गांठ घेऊन घोडे पाहाण्यास येण्याची विनंति केली. राजा थोड्या सैनिकांनिशीं घोड्याच्या तळावर जों जातो तों त्याला हुशंगशहानें कैद केलें; व त्यानें जेव्हां लढाऊ हत्ती देण्याचें आश्वासन दिलें त्यावेळीं त्यानें त्याची मुक्तता केली. बखत्यार–खिलजी यानें थोड्या सैन्यानिशीं लक्ष्मणावती गांठली. अल्लाउद्दीननें आपल्या चुलत्यास सांगितलें कीं हिंदु लोक सात्त्विक, दुसऱ्याच्या वाटेस न जाणारे, धर्मयुद्धाचे नियम पाळणारे, विश्वासघातानें हल्ला न करणारे असे सज्जन लोक आहेत तेव्हां मी त्यांना थापा देऊन सहज दक्षिण जिंकून येतों. चमत्कार असा कीं अल्लाउद्दीन दक्षिणेंत अचानक उतरला. चुलत्यानें हाकलून दिलें म्हणून वारंगळास नोकरीस जात आहे अशी त्यानें थाप दिली. तीवर अधिकाऱ्यांचा विश्वास बसला. तो एकदम देवगिरीच्या तटावर येऊन धडकला, तर देवगिरीला यादवांचें सैन्यच नव्हतें म्हणून अल्लाउद्दीनाचा विजय झाला. मिया हुसेन-

खानवर राणासंगानें विश्वास ठेविला पण ऐनवेळीं त्यानें विश्वासघात केल्यामुळें शिक्रीच्या लढाईंत त्याचा पराभव झाला. काश्मीरच्या हिंदुराजानें मिर्झाशहास दिवाण नेमलें. तो त्या दिवाणानेंच पुढें राजाचा खून केला. पुढें पंधरा वर्षांनीं याच मिर्झाशहानें कोटादेवीचा पराभव करून जुलमानें तिच्याशीं लग्न लावून राज्य बळकाविलें. अनेक शतकें स्वास्थ्य मिळाल्यामुळें हिंदूंच्या अंगीं हा गाफिलपणा शिरला होता. पुढें मुसलमानांनाहि जेव्हां स्वास्थ्य लाभलें तेव्हां त्यांच्यांतहि हाच दोष शिरला. शिवाजी महाराजांनीं चैनी, मिजासी व गाफील अशा मुसलमानांच्या सैन्यावर कशी मात केली हें प्रतापगडचा विजय, पन्हाळगडचा वेढा व आग्र्यांतून सुटका या प्रसंगावरून व्यक्त होतें. गाफीलपणा हा प्रथम जसा हिंदूमध्यें होता तसाच तो पुढें मुसलमानांमध्येंहि आला. असो.

(३७६) **धार्मिक वेडगळ समजुतीः**—धर्माच्या यथार्थ कल्पनाच समाजाला तारक होतात; पण समाजाचें मरण जर कशानें लौकर ओढवत असेल तर तें धार्मिक वेडगळ कल्पनांनींच ओढवतें. या वेडगळ समजुती हिंदूंना नेहमीं निरुत्साही करीत. पुराणांमध्यें धर्मोच्छेद होणार हें लिहिलेलें भविष्य, कलिप्रभाव, दैववाद, अवतार, शकुन, उल्कापात, दिनशुद्धि, अशा कित्येक अडचणी हिंदूंच्या मार्गांत धार्मिक वेडगळ समजुतीमुळें उत्पन्न होत. शिवाय पिंगळा ओरडला, पाल कुचकुचली, कुत्रें रडूं लागलें, कीं हिंदु विगतधैर्य होत व हातीं घेतलेले उद्योग सोडून देत. मुसलमानांना या गोष्टींचा कांहींच विधिनिषेध नसे, म्हणून ते अखेरपर्यंत नेटानें लढत व प्रसंगविशेषीं हिंदूंच्या धार्मिक वेडगळ कल्पनांचा फायदा घेत. युद्ध हातघाईवर आलें व त्यांत पराभव होणार असें दिसूं लागलें कीं, मुसलमान एकदम एकादी गाय आणून सैन्याच्या मध्यभागीं उभी करीत, किंवा तिचें रक्तमांस विहिरींत किंवा अन्नांत टाकून हिंदु सैनिकांना अडवीत. तें पाहून धर्मभोळे हिंदुसैनिक मृदुपणानें धर्मभावनांना वश होत व शत्रूला जय मिळे. गाय कापली कीं डुक्कर कापावें, गोमांस टाकलें कीं वराहमांस टाकावें, देऊळ पाडलें कीं मशीद उध्वस्त करावी, अशा प्रकारचें शेरास सव्वाशेर-

पणाचें वर्तन हिंदूंनीं युद्धाच्या वेळीं म्हणजे आणीबाणीच्या प्रसंगींहि केलें नाहीं हें पाहून मन संताप व उद्वेग यांनीं ग्रस्त होतें !

**(३७७) हिंदुजनतेचा उदासीन व सोशिक स्वभावः**–हिंदुजनतेचा स्वभाव अनेक शतकांपासून अतिशय सोशिक व जगाविषयीं उदासीन असा झालेला आहे. कोणीहि यावें, लुटावें, मारावें तरी हा स्वस्थच ! जुलमाचा प्रतिकार करण्याची वृत्ति हिंदुजनतेमध्यें फारच थोडी आढळते. जनतेनें राजाचा प्रतिकार केला असें क्वचितच आढळेल! राजा चांगला असला तर म्हणे ईश्वराची कृपा, तो जुलमी असला तर तो ईश्वराचा क्षोम, कांहीं बरें वाईट झालें तर ती देवाचीच मर्जी ! "तुका म्हणे उगी रहावें। जें जें होईल तें तें पहावें ॥ आलें देवाजीच्या मना। तेथें कोणाचें चालेना ॥" ही वृत्ति कित्येक शतकें हिंदुसमाजाच्या हाडींमासीं खिळलेली आहे. खेडेगांवच्या शेतकऱ्याला चोरचिलट व श्वापद यांपासून संरक्षण करणारा कुत्रा, एक रखवालदार महार व एक ग्रामपंचायत असली कीं मग कांहीं नको ! सरकार म्हणजे त्यांच्या समजुतीनें एक उपटसुंभ चोरांची टोळी ! ! त्यांचें देणें म्हणजे चोरांचें देणें. तें एकदां दिलें म्हणजे वर्षभर पीडा टळली. सारांश या शेतकरीवर्गाचा राज्यसंस्थेशीं अत्यंत उदासीनतेचा संबंध असे ! ! जनतेनें राज्यसंस्थेविषयीं केव्हांहि उत्सुकता दाखविलेली नाहीं. आजपर्यंत अनेक राजवट्या झाल्या त्यांचें सूक्ष्मपणें अवलोकन केल्यास असें दिसतें कीं, जुन्या राजवटींतील राजा व त्याच्या भोंवतालचे लोक, आणि नवी राजवटी स्थापूं इच्छिणारा व त्याच्या भोंवतालचे लोक असे दोनच पक्ष काय ते राज्यक्रांत्यामध्यें पडत. त्याशिवाय प्रामुख्यानें दोन्ही बाजूला पोटभरू सैनिक जे काय असतील ते सोडून इतरांचा संबंध राज्यक्रांत्यांमध्यें काडीचाहि नसे. कोणी आला गेला तरी आपल्याकडून कर घेणार आणि आम्हांला लुटणार असेंच त्यांना वाटे. इसापनीतींतल्या गाढवाच्या "कोणी धनी झाला तरी तो माझ्या पाठीवर गोण्या देणारच" या वृत्तीशींच जनतेच्या वृत्तीचें सादृश्य होतें. या सोशिक वृत्तीचा फायदा मुसलमानांना मिळाला. घरें लुटलीं, बायका पळवल्या, मूर्ति फोडल्या, देवळें भ्रष्ट केलीं, शेवटीं तोंडांत कोणी थुंकलें, तरी या समाजाची आ करण्याची वृत्ति !!! पूर्वींचा

सोशिक स्वभाव व त्यावर मुसलमानांच्या अतिरिक्त जुलुमांचा थर, त्यांतच निवृत्तिपर तत्त्वज्ञानाची भर यामुळें प्राण गेला तरी क्षिती नाहीं अशा हिय्यानें समाजानें जुलमी राज्यसंस्थेवर आक्रमण कधींहि केलेलें नाहीं. मुसलमानांशीं झगडतांना ही उणीव दूर करण्याचा प्रयत्न पंडितांनीं किंवा राजांनीं केलेला आढळत नाहीं असें मोठ्या कष्टानें म्हणावें लागतें.

(३७८) **क्षत्रियांनींच लढावें**:-हिंदुजनतेचा हा उदासीन व सोशिक स्वभाव यांमुळें समाजांतील सर्व लोकांनीं अन्यायाचा प्रतिकार केला पाहिजे आणि लढलें पाहिजे, अशी भावना उत्पन्न झाली नाहीं. राज्य करावें क्षत्रियांनीं, लढावें क्षत्रियांनीं, कोणी परकी आला गेला तर त्याचें पारिपत्य करावें क्षत्रियांनींच अशी समजूत म्हणून एकट्या क्षत्रिय जातीवरच लढाईचा मारा पडला! क्षत्रिय राजांमध्यें आपआपसांत फारसें रहस्य नसल्यामुळें ते एकमेकांच्या मदतीला क्वचितच येत. म्हणून त्यांचा पराभव वरचेवर होई व एकंदरींत लढवय्यांचा तुटवडा पडे. मुसलमानांपैकीं झाडून सर्व लोक लढाईला येत. हिंदूंपैकीं एकटी क्षत्रिय जातच लढाईचें काम करी. मुसलमानांनीं हिंदु राजांना जिंकल्यावर त्यांनींच राज्य करावें, हिंदूंची योग्यता राज्याची नाहीं, परमेश्वरानें मुसलमानांना राज्यकर्ते नेमले आहेत, अशा समजुती झाल्या व त्यामुळें हिंदूंतील लढाऊ जाती फार कमी झाल्या. प्रतिपक्षांशीं लढतांना सैनिकांचा तुटवडा पडतो हें वैगुण्य धारणावान् दूरदर्शी मनुष्यांच्या लक्षांत आलें नाहीं काय? "शस्त्रं द्विजातिभिर्ग्राह्यं यत्र धर्मोपरुध्यते" अशी मनूची धर्माज्ञा असतांनासुद्धां सर्व लोकांना धर्माकरितां लढण्याची स्फूर्ति झाली नाहीं.

(३७९) **हिंदु सैनिकांचा पोट हाच पुरुषार्थ**:-तत्कालीन हिंदुसमाज व मुसलमान समाज यांच्या मनोवृत्तींचें परीक्षण केल्यास मुसलमानांमध्यें लुटीची लालूच, धर्माचा आवेश या गोष्टी प्रामुख्यानें दिसतात. धर्माकरतां मरणामध्यें कांहीं विशेष आहे, स्वर्ग आहे, असे विचार त्यावेळीं हिंदुसमाजामध्यें उत्पन्न करावयास पाहिजे होते. जातिवंत रजपूत लोकांशिवाय इतर जे लोक लढाईला जात ते धन्याची नोकरी म्हणून प्राण देण्यास व घेण्यास तयार असत. त्यांना धर्म व राष्ट्र यांपैकीं कशाचीहि

जाणीव नव्हती. पोटाला भाकरी दिली कीं त्याच्या बाजूला लढावें, तो पाठीवर असेल तोंपर्यंत लढावें, तो मेला कीं लगेच पळून जावें, असा यांचा क्रम असे. या लोकांत पोट हीच काय ती भावना होती. त्याशिवाय दुसरी कोणतीहि जिवंत भावना नव्हती. पोटाला जो देईल त्याच्या बाजूनें हे लोक लढणारे आहेत ही गोष्ट गिझनीच्या महंमुदाच्या ध्यानांत आली व त्यानें हिंदुराजांशीं लढण्याकरितां हिंदुसैन्यच जवळ ठेवलें.

शिकंदरच्या स्वारीपासून तों इंग्रजांनीं हिंदुस्थानचें राज्य घेतलें तोंपर्यंत हिंदुसमाजाची नीति हीच कीं, त्यांना पोटाशिवाय दुसऱ्या कशा-करतांहि लढावेंसें वाटत नसे! याला अपवाद फक्त श्रीशिवभूपतीपासून राजाराम महाराजांच्या कारकीर्दीपर्यंतचाच होय. सामान्य हिंदुजनतेमध्यें जी वृत्ति तीच पाटील, पटवारी, देशमुख, देशपांडे यांमध्येंहि होती. गांवची पाटिलकी व वतन राहिलें म्हणजे बस्स, मग कोणाचीहि नोकरी करण्यास यांना कसलीहि दिक्कत वाटत नसे! वतनवाडी जर जात असेल तरच, हे जागे होत. प्रसंगीं धर्मांतर झालें तरी पुरवलें, पण वतनवाडी जातां कामा नये, अशा वृत्तीचीं उदाहरणें अनेक दाखवितां येईल. तात्पर्य, हिंदुराजांच्या वतीनें लढणाऱ्या सैनिकांपैकीं पुष्कळांना पोट, शेत व वतन यांचाच लाभ असे. म्हणून ते निकरानें केव्हांहि लढत नसत. राजा आपला, धर्म आपला लढाईच्या विजयानंतर होणारें राज्य आपलें, कदाचित् युद्धांत मेल्यास स्वर्ग आपला, अशा उत्साहाच्या लहरी त्यांच्या अंतःकरणावर केव्हांहि उसळलेल्या दिसत नाहींत! सेनापति पडल्यावर चिकाटीनें युद्ध केल्याचीं उदाहरणें सूर्या-जीच्या प्रसंगासारखीं फार थोडीं देतां येतील! भारतीययुद्धप्रसंगीं दुर्योधन रणांगणांत पडल्यावर सैनिक जेव्हां सेनापतीची चौकशी करूं लागले, त्यावेळीं 'आधीं तुम्ही लढा व मग सेनापतीची चौकशी करा' असें उत्तर व्यासांनीं तेथील संवादांत घातलें आहे. चिकाटीनें लढा, जय मिळवा हें भारतांतील तत्त्व प्रथमतः मुसलमानांशीं लढतांना हिंदुसैनिकां-मध्यें आणावयास पाहिजे होतें. मनुष्यप्राणी सामान्यतः स्वार्थी, त्यांत सामान्य माणसांना पोटापेक्षां दुसरें कांहींहि दिसत नसतें; तथापि अशाहि लोकांमध्यें धर्म, राष्ट्र, स्वर्ग, लूट व राज्य अशा तऱ्हेचे उंच उंच विचार उत्पन्न करून मुसलमानांशीं टक्कर देण्याची सिद्धता करावयास पाहिजे

होती. तशी सिद्धता झाली नाहीं याबद्दल त्यावेळचे विद्वान ब्राह्मण, पंडित, राजे व त्यांचे मंत्री हेच दोषास पात्र आहेत.

—*—

## प्रकरण बाविसावें

# कर्मयोगी श्रीसमर्थ

(३८०) **कर्मयोगी परंपरेचें पुनरुज्जीवनः**—श्रीराम, श्रीकृष्ण, जनक व याज्ञवल्क्य आणि त्यापूर्वींचे ऋग्वेदकालीन मंत्रद्रष्टे ऋषि या सर्वांची कर्मयोगी परंपरा अलीकडील काळांत श्रीसमर्थांनीं चालविली. बुद्धकालापासून चालत आलेली, शुकवामदेवप्रणीत निवृत्तिपरंपरा बंद करून, कर्मयोगी परंपरेचें पुनरुज्जीवन श्रीसमर्थांनीं केलें. आर्यचाणक्य, चंदगुप्त, पतञ्जलि, समुद्रगुप्त यांसारखे कर्मयोगी श्रीशिवछत्रपति व रामदास यांच्या कालापर्यंत सर्व भरतखंडांत उत्पन्न झालेले होते. विजयनगरकडील सायण व माधव, माहीम प्रांतांतले केशवाचार्य व नायकोराव, काश्मीर, माळवा, राजपुताना, बंगाल इत्यादि भागांत झालेले अनेक कर्मयोगी यांनीं जी श्रीकृष्णजनकादिकांनीं अनुष्ठिलेली, राजर्षींची वैदिक परंपरा चालविली होती, तीमुळेंच हिंदुसंस्कृतीचा अभ्युदय झाला. ‘ कुर्वन्नेवेह कर्माणि जिजीविषेच्छतँसमाः । ’ इहलोकीं कर्में करूनच शंभर वर्षें जगण्याची इच्छा करावी, चतुर्विध पुरुषार्थप्राप्ति, परस्पर प्रेम, सहकार्य वाढवून सापेक्ष नीतिधर्माचें आचरण केलें पाहिजे. उदंड असे जे दुर्जन म्लेंच्छ झाले होते, त्यांचा प्रतिकार शुकवामदेवप्रणीतपरंपरेनें होणें अशक्य आहे हें श्रीसमर्थांनीं राष्ट्राला पटविलें. समाजामध्यें वैदिक आक्रमणशील वृत्ति उत्पन्न केली. बुद्धानें जसें हजारो भिक्षु जगभर पाठवून धर्मप्रसार केला, शंकराचार्यांनीं जसे वैदिक यतिसंघ धर्मप्रसारार्थ पाठविले, त्याहिपेक्षां महत्त्वाचें कार्य समर्थांनीं आपल्या शेंकडो महंतांचे द्वारें केलें. समर्थांनासुद्धां पूर्वकालच्या निवृत्तीच्या प्रवाहाविरुद्ध एकदम

जातां आलें नाहीं हें दासबोधरचनेवरून जरी उघड होत असलें, तथापि दासबोधाचा उत्तरार्ध आणि स्फुट काव्यें हीं पाहिलीं असतां समर्थांनीं बुद्धाळलेल्या हिंदु समाजाला वैदिक हिंदु, आर्य हिंदु, प्रतिकारी हिंदु, आक्रमणशील हिंदु बनविण्याचा यत्न केला, यांत मुळींच शंका नाहीं. गीतेंतील कर्मयोगाचें सार समर्थांनीं रामभक्तीच्या द्वारें राष्ट्राला सांगितलें. आणि हिंदुसमाज जयिष्णु, वर्धिष्णु, तेजस्वी, मनस्वी, तपस्वी, सहस्वी, ओजस्वी होईल, असा संदेश दिला. निवृत्तिपरतेमुळें उत्पन्न झालेले सर्व दोष झडझडून काढण्याकरितां वन्ही चेतवा, विचार जागवा, प्रसंग ध्यानीं आणा, यत्न करा, तो अचुक करा, तो अखंड करा. समाज, राष्ट्र व विश्व यांच्याकरितां सतत फलाशा सोडून कर्तव्य करा. ईशसंकल्पाप्रमाणें जगच्चक्र चालवा. कर्माला विसरूं नका. ईश्वर जवळ आहे, तो तुमची थोडी परीक्षा पहातो, कृपाळूपणें धारिष्ट पहातो, अशा गर्जनेनें राष्ट्र दुमदुमून ज्यानें सोडलें आणि ज्यानें आपल्या डोळ्यांनीं म्लेंच्छसंहार करून स्थापिलेल्या हिंदुपदपादशाहीचें वैभव पाहिलें, त्या श्रीसमर्थांच्या सामर्थ्याचें, संघटनेचें आणि कार्याचें दर्शन या प्रकरणांत घ्यावयाचें आहे.

(३८१) **भाग्यवान संतः**—श्रीसमर्थ हे मोठे भाग्यवान संत होते. संतांमध्यें अभागी आणि दुर्भागी असें वर्गीकरण करणें जरा चमत्कारिक असलें तरी ज्यानें आपलें ऐहिक व पारलौकिक ध्येय आपल्या डोळ्यांदेखत सिद्धीस गेलेलें पाहिलें, तो संत भाग्यवानच होय. श्रीसमर्थांच्या बालपणीं लोकांवर कल्पांत आला होता. दुष्काळानें लोक पीडले होते, कित्येक अन्नाकरितां भ्रष्ट झाले! तर कित्येकांनीं अन्न नाहीं म्हणून प्राणहि दिले! म्लेंच्छ येऊन कान नाक कापीत, स्त्रिया भ्रष्ट करीत, तर कोणाची मोट बांधून त्याला बुडवीत! कित्येक गांवेंच्या गांवें ओस झालीं होतीं. परचक्राच्या धाडीवर धाडी येत होत्या. चिंतेच्या प्रवाहांत लोक पडले होते. आपआपसांत खून, मारामाऱ्या यांचा सुकाळ होता. समर्थ म्हणतात—

तिळभरि स्थळ कोठें पाहतांही दिसेना ।
बहुत विषमकाळें दाटणी थोर झाली ।
निशिदिनिं जन–चिंता लागलीसे उदारा ।

पराधीनता वेळ नाहीं मराया। वृथा शीण संसार करीती रडाया॥ कांहींच पाहतां घड नाहीं। विचार सुचेना कांहीं॥ अखंड चिंतेच्या प्रवाहीं। पडले लोक॥

इतिहासाचार्य राजवाडे यांनीं त्या परिस्थितीचें चित्र पुढीलप्रमाणें रेखाटलें आहे.

**(३८२) इस्लामनें केलेला कहरः**—हिंदुमात्राला नेऊन मुसलमान सुंतेची दीक्षा बलात्कारानें देऊं लागले. देवळें मोडिलीं गेलीं, देव फोडले गेले, बायका भ्रष्ट केल्या गेल्या, साधुसंत छळले गेले; आणि लक्षावधि लोक दुष्काळानें मृत्युमुखीं पडले! स्वधर्म चोरून पाळणें, ब्राह्मणाच्या कपाळीं आलें, आणि क्षत्रियांचें शौर्य वांझ झालें. पुनः चातुर्वर्ण्य संस्थेला उतरती कळा लागली. वैश्यवर्ग नागवला गेला आणि शेट महाजन हें नांव मात्र राहिलें! महाराष्ट्रांतून वैश्यवर्ग अजीबात नाहींसा झाला. अतिशूद्रांपैकीं खाटीक, तांबोळी, रंगारी, चांडाळ हे लोक स्वतः होऊन मुसलमान झाले. मराठ्यांत एक भाऊ हिंदु तर दुसरा बिरादर मुसलमान दिसूं लागला! काजी न्यायासनावर बसला आणि खाटीक बलुतेदार झाला! देवळाच्या मशिदी झाल्या आणि पर्वत्यांचे पीर झाले! घाटांचे दर्गे बनले आणि राउळांचे महाल झाले, अशी सर्वत्र उलटापालट झाली. धर्म केवळ लोपून गेला. अशी मुसलमानी अमलांत धर्माची हैराणगत झाली. फार काय सांगावें, ब्राह्मण दावलमलकादि पीरांना भजूं लागले. ही धर्मभ्रष्टतेची परा सीमा झाली, असें कोणी समजेल तर तसें नाहीं. कित्येक अग्निहोत्री पीरांचे मुजावरहि बनले. ब्राह्मण्य बहुतेक सफा बुडाले. कोठें कानाकोपऱ्यांत स्वधर्मानें चालणारा एखादा दुसरा ब्राह्मण राहिला!

( राजवाडे लेखसंग्रह भाग ३, पान १००–१० )

**(३८३) समर्थकालीन परिस्थितिः**—समर्थांनीं आयुष्याला प्रारंभ केला तो या परिस्थितींत! आणि आयुष्याच्या उत्तर भागांत आनंदवन-भुवनाचें जें आनंदानें वर्णन केलें त्यावरून या महात्म्याचें ध्येय खास सिद्धीस गेलें असें म्हणतां येतें. समर्थ म्हणतात, 'स्वधर्माच्या आड जीं जीं विघ्नें आलीं होतीं आणि जे उत्पात उठले होते ते ते सर्व ईश्वरानें नष्ट केले.

जणुं धर्मरक्षणार्थ ईश्वरच खवळून उठला ! आनंदवनभुवनामध्यें देवांची गर्दी झाली, दैत्यरूपी म्लेंच्छ त्यांनीं बुडवून टाकिला, अभक्त व पापी यांचा क्षय झाला, पापी औरंग्या बुडाला, म्लेंच्छांचा संहार झाला. मोडलेलीं क्षेत्रें पुन्हां मांडलीं गेलीं आणि ज्या ठिकाणीं स्नानसंध्येला तिळभरहि जागा नव्हती, त्या आनंदवनभुवनामध्यें जिकडे तिकडे स्नानसंध्या करण्यास विपुल जागा झाली. समर्थांच्या बाळपणचें दुःख, दैन्य, दारिद्य यांनीं भरलेलें तें जीवन कोणीकडे ! आणि आपल्या साठीनंतरच्या वयांत सुख, आनंद, सत्ता, आणि स्वातंत्र्य यांनीं युक्त असलेलें जीवन कोणीकडे ! समर्थ म्हणतात—

**स्वधर्मा आड जें विघ्नें। तें तें सर्वत्र उठिलीं ॥ लाटिलीं कुटिलीं देवें। दापिलीं कापिलीं बहु ॥ कल्पांत मांडला मोठा। म्लेंच्छ दैत्य बुडावया ॥ कैपक्ष घेतला देवीं। आनंदवनभुवनीं ॥ बुडाले सर्वही पापी। हिंदुस्थान बळावलें ॥ अभक्तांचा क्षयो जाला। आनंदवनभुवनीं ॥ बुडाला औरंग्या पापी। म्लेंछसंहार जाहला ॥ मोडिलीं मांडिलीं क्षेत्रें। आनंदवनभुवनीं ॥ उदंड जाहलें पाणी। स्नानसंध्या करावया ॥ जपतप अनुष्ठानें। आनंदवनभुवनीं ॥** *

---

* टीप—वरील कवितेंत जो औरंगजेबाचा उल्लेख आहे त्याचें थोडें स्पष्टीकरण अवश्य आहे.

" **बुडाला औरंग्या पापी** " अशी घोषणा श्रीसमर्थांसारख्या सर्वत्र समदृष्टि असणाऱ्या सत्पुरुषाला कां बरें करावी लागली ? त्याचें कारण हिंदूंचा त्यानें केलेला अनन्वित छळ, देवालयांचा विध्वंस, जिझिया कराची वसुली आणि स्त्रियांचें भ्रष्टीकरण हें होय ! जिझिया कराच्या असह्य जाचामुळें व अनन्वित छळामुळें हिंदु लोक पटापटा मुसलमान होत असत हें समर्थांनीं पाहिलें होतें. तसेंच देवालयाचा विध्वंस आणि स्त्रियांचेवरील आक्रमणें हीं ऐकून त्यांना पदोपदीं संताप येत होता. म्हणूनच त्यांनीं 'पापी औरंग्या बुडाला, फार चांगले झालें' असे उद्गार काढले. औरंगजेबाच्या राजवटींत त्याचे अधिकारी कसा कहर करीत याची अनेक उदाहरणें आहेत, त्यापैकीं जदुनाथ सरकार यांनीं दिलेलें 'हिस्टरी ऑफ औरंगजेब' या ग्रंथांतील एक उदाहरण देतों.

(३८४) म्लेंच्छांच्या दुर्जनत्वाचीं उदाहरणें:—श्रीसमर्थांनीं ग्रंथराज दासबोधामध्यें " म्लेंच्छ दुर्जन उदंड । बहुता दिवसांचें माजलें बंड ॥ या कारणें अखंड । सावधान असावें ॥" अशी धोक्याची सूचना दिली आहे. याचें कारण काय असावें ? म्लेंच्छ हे दुर्जन आहेत व त्यांचे फारा दिवसापासून बंड चालत आलेलें आहे आणि ते उदंड आहेत असा त्यांना अनुभव कां आला असावा ? आजच्यासारखीं वृत्तपत्रें त्यावेळीं नव्हतीं, छापखाने नव्हते, इतिहासहि लिहून ठेवले जात नसत. परंतु कर्णोपकर्णी परंपरेनें चालत आलेल्या गोष्टी श्रीसमर्थांना समजत असल्याच पाहिजेत. समर्थांनीं उदंड देशाटन करावें, आणि 'ब्राह्मणु हिंडता बरा' असें म्हटल्याप्रमाणें संबंध हिंदुस्थानभर पर्यटन केलें होतें आणि परिस्थितीचें व समाजाचें सूक्ष्म अवलोकनहि केलें होतें. ते सिंधमध्यें गेले असतांना महंमद कासीमनें देबाल नगरांतील सरसकट सर्व स्त्रीपुरुषांची कत्तल कशी केली, दुबळे लोक "दया करा, ' म्हणून विनवूं लागले असतांना 'मला दया करण्याची आज्ञा नसून कत्तल करण्याची आज्ञा आहे असें कसें उत्तर दिलें, नेरून, राऊर, मुलतान, ब्राह्मणाबाद वगैरे भागांत त्यानें कसा कहर उडवून दिला, हें सर्व त्यांना समजलेंच असलें पाहिजे. सौराष्ट्रांतील सोमनाथाच्या दर्शनास गेल्यावर महंमद गिझनीनें केलेल्या स्वाऱ्या, लुटलेलीं देवालयें, रक्तपिपासेमुळें केलेल्या कत्तली आणि भ्रष्टीकरण यांची माहिती त्यांना मिळालीच

---

" On the birthday of Krishna, a vast gathering of Hindu men and women, takes place at Govardhan on the Jamuna opposite Mathura. The Khan, painting his forehead and wearing a dhoti like a Hindu, used to walk up and down in the crowd. Whenever he saw a woman whose beauty filled even the Moon with enby, he smashed her away like a wolf pouncing upon a flock, and placing her in the boat which his men had kept ready on the bank, he sped to Agra. The Hindu ( for shame ) never divulged what had happened to his daughter. " ( Page 291 )

असली पाहिजे. श्रीसमर्थ जेव्हां दिल्लीच्या भागांत गेले असतील तेव्हां कुतुबुद्दिन ऐबक, बालबन, कैकुबाद, अल्लाउद्दीन, मलिक काफूर इत्यादि सुलतानांनीं राक्षसांना लाजविणारीं केलेली कृत्यें कशीं केलीं, हिंदूंना कशा तऱ्हेनें छळलें, पद्मिनीच्या लालसेनें चितोडवर कोणता प्रसंग आणला, कमलादेवीची कशी विटंबना केली वगैरे वार्ता त्यांच्या ऐकण्यांत आल्या असतील म्हणूनच त्यांनीं म्लेंच्छ दुर्जन आहेत, असें म्हटलें आहे.

अल्लाउद्दिन खिलजीचे वेळीं हिंदूंचे हाल किती परमावधीस गेले होते याचें वर्णन त्यावेळचें फर्मान देऊन यदुनाथ सरकार आणि रावबहादूर सरदेसाई यांनीं केलें आहे, तेंहि त्यावेळीं समर्थांना कर्णोपकर्णीं विदित असलेंच पाहिजे.

" हिंदूंना बसावयास घोडा मिळूं नये, त्यांनीं हत्यारें बाळगूं नयेत, उंची पोषाख करूं नये, छानछोकीनें राहूं नये, त्यांनीं जमिनींचें अर्धें उत्पन्न सरकारांत भरावें, गाई म्हशींचा सुद्धां कर द्यावा. हिंदु अंमलदारांच्या बायकांनीं मुसलमानांच्या घरीं नोकरी करावी, सरकारी अंमलदार पाहिला कीं दुरून नमस्कार करावा, असेहि हुकूम होते."

अल्लाउद्दिनाची हिंदूबद्दल अत्यंत तुच्छ, दुष्ट आणि सूडाची वृत्ति होती. एकदां अल्लाउद्दिनानें काजीला विचारलें, " आपल्या धर्मग्रंथान्वयें

---

औरंगजेबानें नेमलेला फौजदार मुर्सिद कुलीखान हा एखादें खेडें जिंकल्यावर त्यांतील सर्व सुंदर स्त्रियांना पुढें आणून उभें करण्याचा हुकूम करी. आपली पाशवी तृष्णा शमन करण्याकरितां तो त्यांतील सुंदर स्त्रियांना आपल्या जनानखान्यांत पोचविण्याचा हुकूम करी.

यमुनेच्या तटावर मथुरेशेजारीं गोवर्धन येथें जन्माष्टमीचे दिवशीं हिंदु स्त्रीपुरुषांचा फार मोठा मेळावा जमत असे. त्यावेळीं हा मुर्सिद कुलीखान धोतर नेसून, गंध फासून एखाद्या हिंदूप्रमाणें त्या गर्दींतून हिंडे, व ज्यावेळीं त्याला एखादी सुंदर, सुस्वरूप तरुणी आढळे, त्यावेळीं तो एखाद्या लांडग्यासारखी तिजवर झडप घालून तिला पळवीत असे आणि अशा स्त्रियांना आग्र्याकडे पळवून नेण्याकरितां सज्ज ठेवलेल्या नावाकडे पाठवीत असे. याच कामावर नेमलेले त्याचे लोक हीं कृत्यें करीत.

हिंदूंचें वर्तन कसें असावें ? " काजी बोलला, " हिंदूंचें काम कर देण्याचें आहे. सरकारच्या अधिकाऱ्यांनीं चांदी मागितली असतां हिंदूंनीं मोठ्या अदबीनें तक्रार न करतां सोनें द्यावें. अधिकारी बोलला, मी तुमच्या तोंडांत थुंकणार, तर लगेच त्यांनीं कांकूं केल्याशिवाय तोंडाचा ' आ ' करावा असें वर्तन करतील तरच ते शरण आले असें समजावें. (*काफरावर सक्ति करून कर वसूल होणार नाहीं तर त्याची कत्तल करावी. काफराचें रक्त सांडल्यास तें विनाकारण सांडलें असें नाहीं; कारण कर न देणें हा गुन्हा आहे. ) अशा प्रकारें इस्लामचा बोज राखणें हें आपलें कर्तव्य आहे. ' पर. धर्मी लोकांस नीच व निंद्य समज; ' असें ( कुराणी ) धर्म आपणांस शिकवितो. " –( हिस्टरी आफ औरंगजेब जदुनाथ सरकार पृ. २५२ मु. रि., भा. १ पृ. १४२ )

दिल्लीच्या आसपास हिंडतांना श्रीसमर्थांनां वेड्या महमदाची क्रूर कृत्यें, फिरोज तुघलकाची हिंदूवरील वक्रदृष्टि, त्यानें हिंदूनां बाटवण्या-

---

हिंदूंचीं देवालयें पाडण्याचे कामावर ' दरोगा ' नांवाचा स्वतंत्र अधिकारी नेमला होता व त्याचे अनेक हस्तक होते. The destruction of Hindu places of worship was one of the chief duties and so large was the number of officers employed.... ( Page 267. )

हिंदूवर औरंगजेबानें जिझिया नांवाचा जबर कर बसविला. दिल्लींतील सर्व हिंदु लोक बादशहाला विनविण्याकरितां गेले. त्यानें त्यांचें म्हणणें ऐकून घेतलें नाहींच उलट गर्दी मोडावी म्हणून लोकांच्या अंगावरून हत्ती घालण्याचा हुकूम केला. राज्यांतील एकंदर उत्पन्नाचा १/३ इतकी रक्कम या कराच्या रूपानें हिंदूंकडून वसूल केली जाई. Jaziya meant for the Hindus an addition of fully one-third to every subjects' direct contribution to the state. (Page 274)

मुसलमान समाजाला या अशा जुलमी राज्यकारभारामुळें लुटालूट, खून, व्यभिचार, भ्रष्टाकारादि कृत्यें पुण्यकारक वाटूं लागलीं ! ! म्हणूनच समर्थांनीं मोठ्या संतोषानें " औरंगजेब बुडाला, पापी चांडाळ नष्ट झाला " असे उद्गार काढले.

करितां केलेला अचाट यत्न, शिकंदर लोदीचा खुनशीपणा, यांची माहिती मिळालीच असली पाहिजे. त्याचप्रमाणें शेर शहाचें प्राणमल्लाशीं विश्वास-घातकी वर्तन, अकबरानें रजपूत तरुणीशीं लग्नें लावण्याकरितां केलेलीं कार-स्थानें, माणसें मारण्याकरितां त्यानें केलेल्या युक्त्या, जहांगीरनें केलेला हिंदूचा छळ आणि औरंगजेबानें केलेले अनन्वित अत्याचार, हें जेव्हां समर्थांनीं ऐकले असतील त्यावेळीं त्यांचें अंतःकरण थरारून गेले असेल आणि म्हणूनच त्यांनीं दुर्जन म्लेंच्छापासून सावध रहा सावध रहा, असें उच्च स्वरानें सांगितलें असलें पाहिजे.

उत्तरेंत मुसलमानांनीं असा कहर केला. पण दक्षिणेंतील मुसलमान कडवे नव्हते, त्यांनीं हिंदूना बऱ्या तऱ्हेनें वागविलें असाहि समज समर्थांचा नसावा. कारण बहुतेक शहा हिंदु प्रजेला छळीत. हिंदूंना राजदरबारीं मान व अधिकार नसे, फौजेंत हिंदूंना प्रवेश मिळत नसे, जिकडे तिकडे मुसलमानांचें वर्चस्व, असह्य जुलूम, अनन्वित छळ, आणि जिजिया-सारख्या करांच्या बोजामुळें आलेलें दारिद्र्य, यांना कंटाळून हिंदुलोक भरभरा बाटत होते. ही परिस्थिति श्रीसमर्थांच्या ध्यानीं तेव्हांच आली. आदिलशाहींतील शहा गुजराथ, काश्मीर, खानदेश, बंगाल, बिहार इत्यादि भागांतील मुसलमानी शहांचीं जुलमीकृत्यें, समर्थांना ज्ञात झालीं होतीं. म्हणूनच तो सत्पुरुष धीर धरा धीर धरा। हडबडुं गडबडुं नका ॥ धरावा धीर तो मोठा । विचारें पाहतां बरें ॥ असें कळवळ्यानें सांगत आहे. दक्षिणेंतील आदिलशाहीमध्यें हिंदूवर कसा जुलमाचा अतिरेक झाला होता आणि समर्थांच्ें विधानाप्रमाणें त्यावेळचे म्लेंच्छ हे कसे दुर्जन होते याचें यथार्थत्व पटविण्याकरितां आदिलशाहींतील एक फर्मान जे अलीकडे उजेडांत आलेलें आहे तें सारांश रूपानें देतोः—

कुरान शरीफच्ें हुकुमावरून व ईश्वराचे आज्ञेवरून एकंदर सुखवस्तु लोकांपासून व मूर्तिपूजा करणाऱ्या म्हणजे हिंदु लोकांपासून खंड घेणे ठरलें आहे. तपशिलाप्रमाणें खंड घेण्याविषयीं आज्ञापत्रें लिहावीं.

जो हिंदु व्यापार व कसब न करतां एक वर्ष किंवा एका वर्षावर कांहीं दिवस प्रपंच-निर्वाह करील असा असेल, त्यापासून दरमहा एक तोळा पावणेपांच गुंजा रुपें घेत जावें.

जो हिंदु सरासरी द्रव्यवान् आहे, परंतु व्यापार अगर कसब करून निर्वाह करूं शकत नाहीं त्यापासून वर सांगितल्याचें निमें रुपें घ्यावें.

ज्या हिंदूजवळ द्रव्य संचय नाहीं व जो कांहीं तरी व्यापार अगर कसब करून निर्वाह करतो त्यापासून चतुर्थांश द्रव्य घ्यावें.

**मुसलमानापासून कधींहि खंड घेऊं नये.** ब्राह्मण, भट मंडळी व जंगम लोक सर्वांशीं देवधेवीचा व्यापार करतात, सबब ते खंड घेण्यास पात्र आहेत.

जे हिंदु लोक कांहींच कसब किंवा धंदा करीत नाहींत, आणि द्रव्य बाळगून असतात, त्यांपासून द्रव्यहरणाविषयीं **जशी युक्ति चालेल** तशी चालवून घेतां येईल तितका खंड त्यापासून घ्यावा.

खंड देणाऱ्यांनीं खुद्द जातीनें येऊन खंडाचा ऐवज आपले हातानें द्यावा, आपले मुखत्याराचे हस्तें पाठवूं नये. खंड वसूल करणारा कामगार बसलेला असावा. खंड देणारानें उभें राहून ऐवज द्यावा. ( भा. इ. सं. मं. त्रैमासिक वर्ष २ ).

समर्थांनीं बारा वर्षें देशपर्यटन करून जें निरीक्षण केलें, यावनी जुलुमाचें आणि हिंदूंच्या असहाय्यतेचें जें त्यांना प्रत्यंतर आलें, त्यामुळें त्यांच्या अंगाची लाहीलाही झाली. म्हणूनच त्यांनीं **म्लेंच्छरूपानें दुर्जन जे उदंड वाढलेले होते,** त्याविषयीं सावध रहाण्याची सूचना राष्ट्राला दिली. म्लेंच्छांचें म्लेंच्छत्व अथवा उदंडत्व समर्थांना खुपत नव्हते तर **त्यांचें दुर्जनत्व खुपत होतें म्हणून** त्याच्या प्रतिकाराकरितां त्यांनीं आपल्या शिकवणीमध्यें राजकारणाचा उपदेश केला.

**'दैत्य ते पीडिती लोकां । तदांश जाणिजे तया । कोपी ते दैत्य जाणावे । निष्ठुर परम घातकी ।।'**

जे परपीडक दैत्य होते, जे आसुरी संपत्तीनें माजलेले होते, त्यांचा प्रतिकार केल्याविना संस्कृतिरक्षण, धर्मरक्षण, होणें अशक्य असें पाहून समर्थ म्हणतात–मुख्य हरिकथा निरूपण। दुसरें तें राजकारण। तिसरें तें सावधपण। सर्व विषयीं ।। श्रीसमर्थांनीं दासबोधामध्यें निरनिराळ्या प्रसंगीं नेमस्तपणानें राजकारण करावें, तें उदंड करावें, गुप्तरूपानें करावें असें सांगितलें आहे.

त्यावेळची परिस्थितिच अशी बिकट होती कीं केव्हां काय प्रसंग येईल याचा नेम नसे. म्हणून समर्थ म्हणतात —

इशारतीचें बोलतां नये । बोलायाचें लिहों नये ।
लिहावयाचें सांगो नये । जबाबीनें ॥

समर्थांनीं समाजाला जो राजकारणाचा उपदेश केला तो असाः— मर्दें तकवा सोडूं नये । म्हणजे प्राप्त होतो जय । कार्यप्रसंग समय । वोळखावा । देवमात्र उच्छेदिला । जित्यापरीस मृत्यु भला । आपुला स्वधर्म बुडविला । ऐसें समजावें । मराठा तितुका मेळवावा । आपला महाराष्ट्रधर्म वाढवावा । येविषयीं न करितां तकवा । पूर्वज हांसती ॥ देवद्रोही तितुके कुत्ते । मारूनि घालावे परते । देवदास पावती फत्ते । यदर्थीं संशय नाहीं ॥ देव मस्तकीं धरावा । अवघा हलकल्लोळ करावा । मुलुख बडवा कां बुडवावा । स्वधर्मस्थापनेसाठीं ॥

(३८५) समर्थ व शिवाजीः—श्रीसमर्थांनीं महाराष्ट्रधर्म वाढवावा व त्याकरितां अस्सल मराठा तितका मिळवावा अशी घोषणा केली. समर्थांचा महाराष्ट्रधर्म म्हणजे म्लेंच्छांच्या दुर्जनत्वाचा प्रतिकार करण्याकरितां केलेली संघटना होय. रामावतारी जे मारलेले होते तेच आतां बळावले आहेत; म्लेंच्छ दैत्य बुडविण्याकारितां ईश्वरानें मोठा आकांत मांडला आहे, असा टाहो फोडून त्यांनीं मोठी लोकजागृति केली. म्लेंच्छ राज्य म्हणजे रावणराज्य आणि रामराज्य म्हणजे हिंदवी स्वराज्य ही कल्पना समाजाच्या हाडींमासीं भिनाविली आणि हरएक प्रसंगीं हिंदवी स्वराज्य संस्थापक छत्रपति श्री शिवाजी राजे यांना समर्थांनीं गौरवपूर्वक उत्तेजन दिलेले आहे. अफजुलखानाचे वधानंतर जेव्हां छत्रपति शिवाजी राजे भेटीस आले त्यावेळीं श्रीसमर्थ त्यांचा गौरव करतात तो असाः—

निश्चयाचा महामेरु । बहुत जनांसी आधारु ॥
अखंड स्थितीचा निर्धारु । श्रीमंत योगी ॥
यशवंत कीर्तिवंत । सामर्थ्यवंत वरदवंत ।
पुण्यवंत नीतिवंत । जाणता राजा ॥

आचारशील विचारशील । दानशील धर्मशील ।
सर्वज्ञपणें सुशील । सकळा ठाईं ॥
देवधर्म गोब्राह्मण । यांचे करावया संरक्षण ।
हृदयस्थ जाला नारायण । प्रेरणा केली ॥
या भूमंडळाचे ठायीं । धर्म रक्षी ऐसा नाहीं ।
महाराष्ट्रधर्म राहिला कांहीं । तुम्हांकरितां ॥

शिवाजी महाराजांचे पश्चात् संभाजी राजे यांनाहि समर्थांनीं जें पुढील पत्र लिहिलें तेंहि असेंच उत्तेजनाई आहे.

सकल लोक एक करावे । गलीम निवटून काढावें ।
ऐसे करितां कीर्ति धांवे । दिगंतरीं ॥९॥
आधीं गाजवावे तडाखे । मग भूमंडळ धाके ।
ऐसें न होता धके । राज्यास होती ॥१०॥
बहुत लोक मेळवावें । एक विचारें भरावे ।
कष्ट करोन घसरावे । म्लेंच्छावरी ॥१३॥
आहे तितुकें जतन करावें । पुढें आणिक मिळवावें ।
महाराष्ट्र राज्य करावें । जिकडे तिकडे ॥१४॥
लोकीं हिंमत धरावी । शर्तीची तलवार करावी ।
चढती वाढती पदवी । पावाल येणें ॥१५॥

(३८६) समर्थांचा महारष्ट्र धर्मः–समर्थांनीं जो महाराष्ट्रधर्म महाराष्ट्रांत उत्पन्न केला त्याची परंपरा मूळ वैदिक धर्मापासून आहे. मूळ वैदिकधर्म, त्याविरुद्ध बौद्ध क्रांति, त्याविरुद्ध आचार्यप्रणीत धर्म, त्यानंतर संतांचा भक्तिमार्ग व त्यानंतरचा प्रवृत्तिपर व प्रतिकारयुक्त धर्म म्हणजे महाराष्ट्र धर्म होय. समर्थ पूर्वकालांत गोब्राह्मण, देवधर्म, यांवर आक्रमण झालें तर संतापानें प्रतिकार करण्याची वृत्ति लोकांमध्यें नसे. ईश्वरावर भार घालून लोक सर्व कांहीं सहन करीत. त्यांमध्यें प्रतिकारशक्ति उत्पन्न करून कांहींतरी मिळविण्याची आकांक्षा समर्थांनीं उत्पन्न केली, हेंच त्यांचें वैशिष्ट्य होय.

समर्थपूर्वकालीं जे मुत्सद्दी आणि साधु झाले त्या सर्वांमध्यें अभावरूपानें जो महाराष्ट्रधर्म नांदत होता म्हणजे प्रतिकारशक्तिविरहित जो जळफळाट होता त्याला समर्थांनीं तोंड फोडलें.

“कलि मातला, दैन्य आलें, स्वस्थ असावें, जें जें होईल तें तें सहावें,” असें रडगाणें गाणारे ऐदी पुष्कळ होऊन गेले होते. विठोबा सर्व कांहीं नीट करील, त्याला जनतेची काळजी आहे, असेंहि म्हणणारे भक्तिमार्गी होते. यवनावर रुसून, असहकारिता करून त्यांचे व्यवहार बंद पाडावे व पारिपत्य करावें असेंहि म्हणणारे कांहीं लोक होते. मंत्रतंत्रांनीं स्तंभित करण्याचा, यज्ञयागांनीं हतबल करण्याचा, गोरक्षण करून पुण्याई वाढविण्याचा, नामस्मरणानें समर्थ करण्याचा उद्योग पुष्कळांनीं केला. पण समर्थ एकटेच असें म्हणणारे निघाले कीं, ज्यांनीं जशास तसें ‘शठं प्रति शाठ्यम्’ असें सापेक्ष तत्त्वज्ञान जोरानें सांगितलें. प्रतिपक्षाचें हत्यार व त्याची संघटना ही जेवढी जोरकस असतील त्याला पुरून उरण्याजोगी आपली सिद्धता असली पाहिजे असें ठणठणीतपणें एकट्या समर्थांनींच सांगितलें.

महाराष्ट्र धर्म म्हणजे सर्व मराठ्यांचा कर्तव्यधर्म असा अर्थ आहे. जेवढा म्हणून अस्सल मराठा त्याकाळीं होता तो जरी यवनसेवेंत असला तरी त्यानें महाराष्ट्र धर्माला साहाय्य करावें अशी त्यांची योजना होती. कारण अस्सल मराठ्यामध्येंच धर्माविषयीं थोडा कणखरपणा राहिलेला होता. संतमंडळींच्या भक्तिपंथांत—त्या पंथाचें मोक्ष हें ध्येय असल्यामुळें हिंदु, मुसलमान, आणि तदन्यांचासुद्धां समावेश होत असे. पण समर्थांचें ध्येय भिन्न आणि रावणवत् चाललेल्या राज्यपद्धतीला नष्ट करण्याचें त्यांचें धोरण यामुळें त्यांनीं महाराष्ट्रधर्मांत निवडक आणि जातिवंत अशा लोकांचाच समावेश केला.

समर्थकालीं पूर्वापार चालत आलेला जो हिंदुधर्म होता, त्यापेक्षां समर्थांचा महाराष्ट्रधर्म व्यापक होता. भरतखंडांतील हिंदुप्रजा यवनांचा त्रास सोसून, देवावर भार घालून, व्रतें, उद्यापनें, उपासना, पूजा, निमूटपणें चालवीत होती; पण महाराष्ट्रांतील जनता देव फोडणाऱ्या, धर्मभ्रष्ट करणाऱ्या यवनांचा उच्छेद करावयास सिद्ध झालेली होती. धर्म-

रक्षणार्थ नुसते उच्छेदानें काम भागण्याजोगें नव्हतें. तर स्वराज्याची स्थापना करणें, त्याकरितां मराठ्यांचें एकीकरण करणें, त्यांचें पुढारीपण पत्करणें हीं कामेंही महाराष्ट्रांतील हिंदुधर्माचीं अंगें बनलीं होतीं. ब्राह्मण-मंडळ्या, संतमंडळ्या, भक्तमंडळ्या, मराठामंडळ्या स्थापून त्यांचें पुढारीपण श्रीशिवाजी महाराजांनीं पत्करलें व धर्मस्थापनेकरितां त्यांनीं आपल्या प्राणाचा व वित्ताचा अपरंपार व्यय केला. भरतखंडांतील हिंदुधर्म हा सहिष्णु होता; पण महाराष्ट्रधर्म हा जयिष्णु होता, एवढें म्हटलें म्हणजे दोन्ही धर्मांतील भेद स्पष्ट होतो.

समर्थांच्या महाराष्ट्र-धर्मांत हिंदुधर्माचा व भक्तिमार्गाचा द्वेष्टा जो यवनवर्ग त्यास त्याच्या दुर्जनत्वामुळें पराभूत करणें हें मुख्य अंग होतें. बौद्धिक क्रांतीनंतरच्या आचार्यप्रणीत धर्मांत व त्या पुढच्या भक्तिपंथांत हें अंग नव्हतें. महाभारतांतील गीताधर्म सोडल्यास समर्थांच्या महाराष्ट्र धर्मापर्यंत निवृत्तिपर उपदेशाचीच परंपरा जोरानें चालू होती. पण समर्थांची शिकवण त्या उलट प्रवृत्तिपर आणि नेटका प्रपंच करावा असें सांगणारी होती. " प्रपंच सांडून परमार्थ कराल । तरी तुम्ही कष्टी व्हाल " "तसेंच प्रपंची जो सावधान । तोचि परमार्थ करील जाण ।। असा त्यांचा संदेश आहे. राजवाडे म्हणतात—

" प्रपंच व समाज सहज असून कदापिहि सुटण्यासारखे नाहींत. प्रपंचांत राहूनच, प्रपंच उत्तमोत्तम करूनच, परमार्थाचें साधन करावयाचें आहे. परमार्थाचें साधन करण्यास, परमार्थाची सिद्धि होण्यास, प्रपंच हाच एकटा अनन्यमार्ग आहे. प्रपंच सोडल्यावर, परमार्थ ही वस्तूच रहात नाहीं. प्रपंच आहे तोंपर्यंतच परमार्थ ह्या वस्तूंत हांशील आहे. सारांश, प्रपंच साधून परमार्थाचा लाभ करून घेणें, हाच परम पुरुषार्थ होय. तेव्हां बद्धांना व मुमुक्षूंना सन्याशाचें एकदेशी तत्त्व अमलांत आणावयास सांगणें केवळ मौर्ख्य आहे. प्रपंच सुटावयाचा नाहीं व संन्यास साधावयाचा नाहीं, अशी त्रिशंकुवत् अवस्था समर्थांना नको होती.

( ऐतिहासिक प्रस्तावना पृष्ठ ३४४. )

(३८७) **समर्थ व समर्थपूर्व संत यांची तुलनाः**–इतिहासाचार्य राजवाडे यांनीं समर्थ व समर्थपूर्व संत यांची तुलना मोठी मार्मिक केली आहे. तीवरून दोन्ही संप्रदायांचा उत्तम बोध होतोः–

| समर्थपूर्व संत. | समर्थ. |
|---|---|
| ( १ ) उदासीन | ( १ ) लोकसंग्रह |
| ( २ ) अप्रातिकारी | ( २ ) प्रतिकारी |
| ( ३ ) सहिष्णु | ( ३ ) जयिष्णु |
| ( ४ ) रामरहीमोपासक | ( ४ ) केवळ रामोपासक |
| ( ५ ) कर्मसंन्यासी | ( ५ ) लोकोपकारी |
| ( ६ ) भागवत संप्रदाय | ( ६ ) महाराष्ट्र संप्रदाय |
| ( ७ ) वाटेल त्याचा समावेश | ( ७ ) निवडकांचा समावेश |
| ( ८ ) निवृत्तिमार्गी | ( ८ ) प्रवृत्तिमार्गी |
| ( ९ ) निरुपाधिक | ( ९ ) मठोपाधि निर्माण करणारे |
| (१०) दैवनिष्ठ | (१०) यत्ननिष्ठ |

श्रीसमर्थांनीं नवें तत्त्वज्ञान निर्माण केलें. त्यामुळें समाजाच्या विचारांत क्रांति झाली. पूर्वापार चालत आलेल्या देशघातक व राष्ट्रघातक अशा तत्त्वज्ञानाचा ओघ त्यांनीं बदलला. यवनादींची सेवा करण्यांत भूषण मानणाऱ्या चंद्रराव मोऱ्यासारख्या मातबर माणसाचा कांहीं उपयोग नाहीं असा अनुभव आल्यावर समर्थांनीं श्रीशिवाजीराजांना जातिवंत व अस्सल मराठ्यांना आपल्या विश्वासांत व राजकारणांत घेण्याची सल्ला दिली. मराठे पोटाकरितां कोठेंहि नोकरीस रहात. त्यांच्यामध्यें म्लेंच्छांच्या दुर्जनत्वाविषयीं समर्थांनीं द्वेष उत्पन्न केला आणि राष्ट्रियत्वहि उत्पन्न केलें, कारण केवळ द्वेषानें काम भागणारें नव्हतें. स्वधर्मस्थापनार्थ व त्याचें रक्षणार्थ स्वराज्याची अत्यंत आवश्यकता आहे, हें तत्त्व त्यांनीं समाजास पटविण्याकरितां मठयंत्र निर्माण केलें.

(३८८) **समर्थांचें मठयंत्रः**–हें मठयंत्र मोठें निस्पृह होतें. भिक्षेवर निर्वाह करून धर्म रक्षील अशा राजास साह्य करणें हें या संस्थेचें ध्येय होतें. प्रवास, तपश्चर्या, कल्पकता, ब्रह्मवर्चस्व, विद्वत्ता, आणि लोकसंग्रह

या गुणांमुळें श्रीसमर्थ आणि त्यांचें मठयंत्र हें प्रभावी बनलें होतें. समर्थ-पूर्वकालीन संत समर्थांइतकें चतुरस्र नव्हते. हिंदुस्थानभर समाजाचें बारकाईनें निरीक्षण करीत त्यांचा प्रवास झाला नव्हता. समर्थांना लोकांपुढें आदर्श ठेवण्यास एकटा रामावतारच इष्ट वाटला. उत्तम पुत्र, उत्तम भ्राता, असुरहन्ता, लढवय्या व उत्तम भर्ता, असा किता रामचरित्रांत आहे. रामराज्य म्हणजे स्वराज्य व स्वधर्म रक्षणार्थ राज्यस्थापना म्हणजे धर्म-स्थापना अशी कल्पना जनमनावर श्रीसमर्थांनीं मठसंस्थेच्या द्वारें आरूढ केली. दादोजी कोंडदेव, श्रीशहाजी व शिवाजी राजे यांच्या राज-कारणाला या मठांची फार मदत झाली. राजकारण, धर्मकारण व वर्तायाचें लक्षण अशी त्रिसूत्री या महंतांच्या मागें असे. तीस तीस वर्षें मोठ्या विपत्तीमध्यें या महंतांनीं केवळ धर्मस्थापना व्हावी याकरितां घालविली. शिवाजीमहाराज आग्र्याहून सुटल्यानंतर दक्षिणेमध्यें सुखरूपपणें येण्यास समर्थांच्या या महंतांचा फारच उपयोग झालेला आहे. समर्थ-प्रतापाच्या दहाव्या समासांत महंतांची यादी त्यांच्या निवासस्थानासह दिली आहे. तीवरून कर्नाटक, कोंकण, गुजराथ, नागपूर, गोमंतक, तेलंगण, अंत-र्वेदी, मल्याळ या प्रांतांत व उज्जयनी, सौराष्ट्र, सोमनाथ, रामेश्वर बद्री-केदार, द्वारका, काशी, मथुरा, अयोध्या, गोकर्ण इत्यादि क्षेत्रांत समर्थांचे निस्पृह शिष्य वस्ती करून होते असें स्पष्ट दिसतें. प्रापंचिक शिष्य एकाच ठिकाणीं ठाण मांडून लोकांना उपासनादि कार्यक्रमांमध्यें गुंतवीत असत. निस्पृह शिष्य सारखे हिंडत रहात आणि प्रबोधशक्तीनें लोकांचीं मनें ध्येयैकनिष्ठ करीत. तीक्ष्ण बुद्धीचीं मुलें व खानदानी घराण्यांतील स्त्री-पुरुष आपल्या संप्रदायांत घेण्याविषयीं श्रीसमर्थांचा कटाक्ष असे. पुरुषाप्रमाणें स्त्रियांचाहि उपयोग समर्थांना राजकारण व धर्मकारण या दोन्ही कामाकडे करून घेतां आला. महाराष्ट्रांत या मठयंत्रानें जें कार्य केलें तें अन्य प्रांतांत घडलें नाहीं. स्वराज्यसंस्थापनेच्या दृष्टीनें समर्थसंप्रदायाचे कार्य फार महत्त्वाचें आहे. इतिहासाचार्य राजवाडे म्हणतात—

" समर्थांचे हे शिष्य कुलकर्णी व देशपांडे यांच्याच घराण्यांपैकीं प्रामुख्यानें होतें. वैराग्यांत प्रत्यक्ष शुक व वामदेवाप्रमाणें त्यांचें वर्तन असावें. क्षत्रियांवर निस्सीम प्रेम करणारे, कोणाचाहि द्रोह न करणारे, केवळ कोरड्या

भिक्षेवर रहाणारे व ती भिक्षाहि एकाच गांवीं एकदोन दिवस मागणारे, स्वधर्मनिष्ठ तपोबलानें केवळ अपरसूर्य, लोकस्थिति बारकाईनें अवलोकणारे सर्वांना हवेसे, परंतु कोणालाहि उपसर्ग न देणारे, सर्वांचे हितकर्ते असे हजारों शिष्यप्रशिष्य समर्थांनीं स्वतःच्या देखरेखीखालीं ठेवून तयार केलें व प्रांतोप्रांतीं स्थापिले. या हजारों शिष्यप्रशिष्यांच्या समुदायाला रामदासी संप्रदाय अशी संज्ञा आहे. या संप्रदायांत एक खास शिष्यांचा व दुसरा मंत्रोपदिष्टांचा असे दोन वर्ग होते. रामराज्याकांक्षी स्वधर्माभिमानी ब्राह्मणक्षत्रियांचा त्यांत समावेश झाला होता. याप्रमाणें हजारों स्वधर्मनिष्ठ कर्ते पुरुष महाराष्ट्रांत निर्माण झाले. क्षत्रियांतील तरुण पिढीवरहि दासवृत्ति करूं नये, या उपदेशांचा परिणाम झाला. याप्रमाणें सामाजिक क्रांतीची सिद्धता झाल्यावर, राज्यक्रांतींत तिचें रूपांतर झालें. राष्ट्रांतील सर्व घटक जेव्हां अन्योन्योपकारक होतात तेव्हांच त्यांच्या हातून एखादी अद्भुत राष्ट्रीय कामगिरी होते. तेच अन्योन्योपकारक घटक समाज व राष्ट्र या पदवीस पात्र होतात. ( —रा. ले. भा. ३ पान ११४. )

(३८९) समर्थांचा संदेश कालबाह्य झाला काय ? :—श्रीसमर्थांचें धोरण, त्यांचें राजकारण आणि मठयंत्राचें निःस्पृहपण हें समर्थांचे पश्चात् जितक्या उज्ज्वलतेनें राहावें तितकें राहूं शकलें नाहीं. श्रीसमर्थांचेनंतर महाराष्ट्रधर्माचें तत्त्वज्ञान पहिल्या बाजीरावांचे गुरु म्हणून आलेले श्रीब्रह्मेंद्रस्वामी यांनीं थोडेंबहुत सांगितलें. परंतु त्या कालांत समर्थशिकवणीचा हिरीरीनें प्रचार झाला नाहीं. पहिल्या बाजीरावापासून पुढें हिंदवी साम्राज्य सारखें वाढत होतें. त्यावेळीं सबंध भारतखंडभर महाराष्ट्रधर्माची जागृति करण्याकरितां दहा रामदास हवे होते, पण एकहि झाला नाहीं. आणि शिष्यप्रशिष्यांनीं कशाबशा गाद्या चालविल्या. तथापि समर्थांचा संदेश कालबाह्य झाला आहे असें नाहीं. वैदिक संहिता, मनुस्मृति, गीता, कौटिलीय अर्थशास्त्र यांत प्रतिपादिलेली, श्रीराम, श्रीकृष्ण, जनक व याज्ञवाल्क्य यांनीं आचरलेली, राजर्षींची परंपरा श्रीसमर्थांनीं चालविली होती. अभ्युदयार्थ संन्यास, निवृत्ति, दुःखवाद व जगन्मिथ्यात्वादि कल्पनांचा उपयोग होणार नसून समर्थांचा पुढील त्रिकालाबाधित संदेश हाच तीनी कालीं

सदैव उपयोगीं पडणारा आहे. हा संदेश कालबाह्य झाला; असें समजणारा करंटाच समजला पाहिजे.

वन्ही तो चेतवावा रे । चेतवीतांचि चेततो ।
विवेक जाणिजे तैसा । वाढवीतांचि वाढतो ॥
केल्यानें होत आहे रे । आधीं केलेंचि पाहिजे ।
यत्न तो देव जाणावा । अंतरीं धरितां बरें ॥
अचुक यत्न तो देवो । चुकणें दैत्य जाणिजे ।
न्याय तो देव जाणावा । अन्याय राक्षसी क्रिया ॥
शक्तीनें पावती सुखें । शक्ति नस्ता विटंबना ।
शक्तीनें नेटका प्राणी । वैभवें भोगितां दिसे ॥
सार संसार शक्तीनें । शक्तीनें शक्ति भोगिजे ।
शक्त तो सर्वही भोगी । शक्तिवीण दरिद्रता ॥
शक्तीनें मिळती राज्यें । युक्तीनें यत्न होतसे ।
शक्ति युक्ति जये ठाईं । तेथें श्रीमंत धांवती ॥

ज्या श्रीसमर्थांच्या शिकवणीनें आख्खा महाराष्ट्र उत्थान पावला आणि ज्या कर्मवीरांनीं मोठ्या पराक्रमानें श्रीसमर्थांच्या उपदेशानुसार हिंदुपद–पादशाहीची स्थापना केली त्यांच्या स्फूर्तिदायक व अभिमानास्पद अशा इतिहासाचें समालोचन पुढील प्रकरणांत करितों.

—*—

## प्रकरण तेविसावें

# हिंदुपद-पातशाही

(३९०) शककर्ता शिवाजीः—छत्रपति शिवाजीमहाराजांसंबंधीं इतिहासविषयांतील महान् अभ्यासी दिवंगत वि. का. राजवाडे एका खंडाच्या प्रस्तावनेंत लिहितातः—

स्वराष्ट्राचा उद्धार करून, स्वदेशाला स्वतंत्र, सुखी करण्याच्या कृत्यानें या भूमंडळाला अक्षय ऋणी जर कोणीं करून ठेवलें असेल, तर तें शिवाजीनेंच होय! तुलनेकरितां जी जी म्हणून व्यक्ति घ्यावी ती ती या ना त्या गुणानें शिवाजीहून कमतरच दिसेल. 'तयाचे गुणमहत्त्वाशीं तुलना कैची!' यशवंत, कीर्तिवंत, सामर्थ्यवंत, वरदवंत, नीतिवंत, जाणता, आचारशील, विचारशील, दानशील, कर्मशील, सर्वज्ञ, निश्चयाचा महामेरु, अखंड निर्धारी इत्यादि जीं विशेषणें रामदासांनीं श्रीशिवाजीला लावलीं आहेत, त्यापेक्षां या थोर पुरुषाचें वर्णन कोणता पामर अधिक करूं शकणार? (ऐ. प्र; पृ. २९०)

महाराष्ट्र-भूषण इतिहासकार रा. ब. सरदेसाई म्हणतात "परस्त्री मातेसमान मानणारा, निर्व्यसनी, शत्रुशींहि औदार्यानें वागणारा, सर्वांचें आधीं जिवावरच्या संकटांत उडी घालणारा, स्वधर्म आणि स्वदेश यांचा अभिमानी, नयनिष्ठुर, दुष्टांचा काळ, गरीबांचा कनवाळू, प्रजावत्सल, सावध, उद्योगी, मातृभक्त, पापभीरु, रणशूर, असा हा आधुनिक काळचा अद्वितीय स्वराज्यसंस्थापक छत्रपति शिवाजी प्राचीन पुण्यश्लोकांचें पंक्तीस बसण्यास सर्वथैव योग्य आहे. (शककर्ता शिवाजी पृ. २६८)

(३९१) राज्यस्थापनेचा हेतुः—"जें वडिलांनीं मेळविलें तेंच खाऊन राहाणें योग्य नाहीं. आपण हिंदु, सर्व देश यवनांनीं ग्रासला. देव, ब्राह्मण, गाई व क्षेत्रें यास पीडा जहाली. धर्म बुडविला, हा रक्षणार्थ प्राणहि वेंचून धर्म रक्षूं व आपले पराक्रमें नवीन दौलत संपादूं. तें अन्न भक्षूं. नवें साधावें

हें या कुळांत जन्मल्याचें सार्थक, दैवावर भार न घालूं. पुरुषयत्न बलवत्तर होय. दैव पंगु, देव परिणामास नेणार समर्थ आहे. (शककर्ता शिवाजी पा. २८) असा संकल्प करून महान् पराक्रम केला त्याचें वर्णन

सरित्पतीचें जल मोजवेना । माध्यान्हिचा भास्कर पाहवेना ॥
मुष्टींत वैश्वानर बांधवेना । तैसा शिवाजी नृप जिंकवेना ॥

कवींनीं याप्रकारें यथार्थ केलें आहे.

शिवाजी महाराजांच्या राज्याभिषेकानें या आनंदवनभुवनांत म्हणजे महाराष्ट्रांत हिंदुस्थान बळावलें, हिंदुत्वाचा उत्कर्ष झाला, हिंदुत्वाचा भगवा झेंडा डौलानें डोलूं लागला, सर्व पापी बुडाले, अभक्तांचा क्षय झाला, म्लेंच्छ दैत्य नष्ट झाले असें घोषित केलें. शिवाजी जर उत्पन्न झाला नसता तर काय झालें असतें? भूषण कवि म्हणतो:—

काशीजीका कला जाती, मथुरा मशीद होती,
शिवाजी न होते तो सुनत होती सबकी ॥

हा मावळांतील बच्चा, देशमुखदेशपांड्यांचा पुढारी, स्वराज्य व स्वातंत्र्य यांचा कैवारी, स्वधर्माचा सेवक, महाराष्ट्राचा नियंता, सार्वभौमत्वाचा उच्छेदक, स्वदेशाचा उद्धारक, हिंदुपदपातशाहीचा संस्थापिता झाला, त्याबद्दल प्रत्येक हिंदूचें अंतःकरण कृतज्ञतेनें कां बरें भरून येणार नाहीं?

सर्वत्र यवनांनीं आक्रांत केलेला, तीर्थक्षेत्रें मोडलेलीं, अखिल हिंदूंचा छळ चाललेला, सर्वत्र हाहाःकार उडालेला, स्त्रियांचें पावित्र्य संशयांत पडलेलें अशा स्थितींत—

या भूमंडळाचे ठायीं । धर्मरक्षी ऐसा उरला नाहीं ॥

अशी स्थिति झाली असतांना एका लहानशा कोपऱ्यांत एक हिंदु तरुणांचें मंडळ एकदम उद्भूत झालें व त्यानें मुसलमानांच्या भारतविजयाच्या भरतीच्या लाटेला खड्या स्वरांत अशी आज्ञा केली कीं, "एक पाऊलहि पुढें येशील तर सांभाळ." या तरुण मंडळाचे अग्रेसर हिंदवी स्वराज्यसंस्थापक, हिंदुराष्ट्रवीर श्रीशिवाजी महाराजच होत.

श्रीरोहिडेश्वराच्या देवालयांत हिंदवी स्वराज्यसंस्थापनेच्या या तरुणांनीं शपथा घेतल्या; आणि मग रात्रीचा दिवस करून, थोडक्याच अवधींत बारा मावळें हस्तगत केलीं. तोरणा किल्ला आटोपला, महत्त्वाचे गड हस्तगत केले. अफझुलखानावर बिनतोड जय मिळवून प्रत्यक्ष मोंगलाशींहि उघड सामना आरंभिला. शाइस्तेखानावर रात्रींचा छापा घाल, राजापूर लुटून इंग्रजांना कैद कर, सुरतेची बेसुरत कर, सिंधुदुर्गाची उभारणी कर, जयसिंगाचे डोळ्यांत अंजन घाल, औरंगजेबाच्या भेटीस गेल्यानंतर त्याच्या हातावर तुरी देऊन निसटून ये, दक्षिणेंत आल्यावर सर्व मुलूख बळकावून बादशहाला पुरे पुरे कर, असा प्रताप गाजविल्यावर शिवाजीमहाराजांनीं हिंदुपदपातशाहीचा प्रतिनिधि या नात्यानें स्वतःला राज्याभिषेक करून घेतला व हिंदुत्व व हिंदुराष्ट्र हीं जिवंत आहेत असें औरंगजेबाला व सर्व जगाला दाखविलें.

(३९२) **उग्रप्रकृति संभाजीः**—श्रीशिवाजीराजे यांनीं आपलें कार्य अपुरें ठेवून १६८० मध्यें देह ठेविला. त्यांचें कार्य पुरें करण्याकरतां महामानी उग्रप्रकृति संभाजी राजे पुढें सरसावले. त्यांनीं जंजिऱ्याच्या शिद्दीशीं युद्ध केलें, पोर्तुगिजांना चांगली अद्दल घडविली आणि औरंगजेबपुत्र अकबर याच्याशीं संधान लावून एक राजकारण उभारलें. हें सर्व सहन न होऊन हिंदुपदपातशाही बुडविण्याच्या जिद्दीनें औरंगजेब अडीच लाख सैन्यासह दक्षिणेंत उतरला. येवढ्या मोठ्या सैन्याशीं झुंज देण्याचा प्रसंग शिवाजीमहाराजांवर देखील आला नव्हता! तथापि त्या बहाद्दरानें श्रीसमर्थांनीं केलेल्या उपदेशाप्रमाणें धैर्यानें तोंड देण्याचें ठरविलें. संभाजी राजे यांनीं

सकळ लोक एक करावे । गलीम निवटून काढावे ।
ऐसे करितां कीर्ति धांवे । दिगंतरीं ॥
आधीं गाजवावे तडाखे । मग भूमंडळ धाके ।
ऐसें न होतां धके । राज्यास होती ॥
बहुत लोक मिळवावे । एकविचारें भरावे ।
कष्टें करोन घसरावें । म्लेंच्छावरी ॥

या स्फूर्तिदायक उपदेशाप्रमाणें पराक्रमाची शर्थ करून शत्रूस झुंज दिली. दैवाचा फांसा उलटा पडला, तो वीर शत्रूच्या हातीं सांपडला आणि निर्वाणीच्या प्रसंगीं त्याला अपेश आलें. रानटी शत्रूंनीं राजबंदी करून त्याला पुढें आणला असतां तो सिंहाचा छावा मान ताठ व छाती पुढें करून उभा राहिला व इंद्रपदापेक्षांहि श्रेष्ठ असें हिंदुत्वजीवनाचें मोल घेऊन विकण्याचें त्यानें स्पष्ट नाकारलें. त्यासरशीं तापवून लाल केलेल्या सळयांनीं आणि सांडसांनीं त्याचे डोळे भोसकून बाहेर काढण्यांत आले, शरीराची त्वचा सोलण्यांत आली, जिभेचे तुकडे करण्यांत आले आणि शेवटचे शिरच्छेदाचे घाव मानेवर झेलीत असतां 'हिंदु हिंदु,' अशी घोषणा करीत हा धैर्याचा मेरु भंग न पावतां अचलपणें तेथेंच उभा राहिला.

(३९३) **स्थिरबुद्धि राजाराम:**–संभाजी राजे यांचा मृत्यु म्हणजे हिंदुसाम्राज्यावर मोठें संकट होतें. पण संभाजी राजांच्या जाज्वल्य निष्ठायुक्त उज्ज्वल प्राणत्यागामुळें महाराष्ट्रांत धर्माभिमान आणि देशाभिमान ओसंडून बाहेर पडूं लागला. जिकडे तिकडे एकच घोष, एकच विचार, एकच स्फूर्ति आणि एकच ध्येय. तें हेंच कीं

धर्मासाठीं मरावें । मरोनि अवघ्यासि मारावें ।
मारितां मारितां घ्यावें । राज्य आपुलें ॥
मराठा तितुका मेळवावा । महाराष्ट्रधर्म वाढवावा ।
येविशीं न करितां तकवा । पूर्वज हांसती ! ॥

या ध्येयाकरतां "देव मस्तकीं धरून हरहर गर्जनेचा कल्लोळ उडवून", तरवारी पराजून, छातीचा कोट करून सर्व महाराष्ट्र औरंगजेबाशीं लढण्यास सज्ज झाला. श्रीराजाराम महाराज, निळो मोरेश्वर, प्रल्हाद निराजी, रामचंद्रपंत, संकाजी मल्हार, परशुराम त्रिंबक, संताजी घोरपडे, धनाजी जाधव, खंडेराव दाभाडे, निंबाळकर, नेताजी, परसोजी इत्यादि (ब्राह्मण, मराठे, प्रभु, राजे, आणि शेतकरी)–संपूर्ण राष्ट्रच–मुसलमानी शत्रूच्या विरुद्ध युद्धार्थ उभें ठाकलें ! आपत्कालीं शत्रू अंगावर आला असतां त्याला शिंगावर घेऊन जिंजीस राजधानी नेणें, तेथें अष्टप्रधानांच्या नेमणुका करणें, खूप शर्तीनें राज्य चालविणें, पृथ्वी निर्यवन करण्याची

प्रतिज्ञा करणें, जिंजीला वेढा पडला असतां युक्तीनें निसटून साताऱ्यास येऊन राज्य स्थापणें, हीं सर्व कृत्यें मराठ्यांच्या शहाणपणाचीं, युक्तीचीं, बुद्धीचीं, जाज्वल्य देशाभिमानाचीं आणि मुत्सद्देगिरीचीं द्योतक आहेत.

औरंगजेब दक्षिणेंत आला, तों त्याला वाटलें दख्खन आपल्या हातांत आली ! पण मराठ्यांनीं गनिमी काव्यानें, विद्युद्वेगानें, अतुलनीय युद्ध-कौशल्यानें आणि दुर्दम्य शौर्यानें छातीचा कोट करून मोंगलाचा पराभव केला. एकदां तर हे मराठे गडी थेट बादशहाच्या शिबिरावर चालून गेले आणि अक्षरशः त्यांनीं सिंहाच्या गुहेंत जाऊन त्याची दाढी ओढली !! प्रत्यक्ष बादशहाच मराठ्यांच्या हातीं सांपडला असता, पण दुर्दैवानें तो तेथें नव्हता. सुवर्ण कळस कापून मराठे तर विजयमदानें ते घेऊनहि गेले आणि त्यांनीं औरंगजेबाला भग्नमनोरथ, उपहासित आणि निराश अशा स्थितींत यातना भोगण्याकरितां मृत्युलोकांत पाठविलें.

(३९४) पुण्यश्लोक शाहू:–शाहूमहाराज गादीवर आले तों कर्तब-गार पंतप्रधान बाळाजी विश्वनाथ यांना आपल्या कर्तृत्वानें व गुणग्राहकतेनें पुढें येण्याची संधि मिळाली. बाळाजी विश्वनाथांनीं प्रथम महाराजांचे विचारें घरची व्यवस्था लाविली. यावेळीं मोंगल बादशहा प्रबल व बंडखोर सरदारांपासून आपलें संरक्षण व्हावें म्हणून मराठ्यांकडे याचना करूं लागला होता. मराठ्यांनीं पराक्रमानें मुसलमानी सत्तेची कंबर मोडून टाकल्यामुळें मोंगलांच्या दक्षिण सुभ्यांत चौथाई व सरदेशमुखी वसूल करण्याचा मराठ्यांचा अधिकार सय्यद बंधूंनीं मान्य केला होता. तीं अधिकारपत्रें आणण्या-करितां पन्नास सहस्र सैन्य घेऊन पंतप्रधान दिल्लीवर चालून गेले. हा प्रवेश मुसलमानांना संतापजनक होता. म्हणून त्यांनीं सनदा घेऊन जात असतांना वाटेंतच पंतप्रधानांचा घात करण्याचा निश्चय केला. ही वार्ता कळतांच मराठा साम्राज्यांत जीव देण्याकरितां भानु पुढें आले. पंतप्रधानांच्या वेषानें मिरवीत मिरवीत पालखींतून भानु चालले असतां त्यांना बाळाजी समजून यवनांनीं कापून काढलें. इकडे पंतप्रधान अधिकारपत्रें खाकोटींत मारून भिक्षुकाच्या वेषानें सुखरूपपणें शिबिरांत प्रविष्ट झाले. आपल्या राष्ट्राप्रीत्यर्थ केलेल्या आपल्या प्राणांच्या अमल्या महायज्ञानें महाराष्ट्राच्या इतिहासाला महाकाव्याचें वैभव प्राप्त झालेलें आहे.

(३९५) मराठा साम्राज्याच्या मध्यान्हीचा सूर्यः—बाळाजी विश्वनाथांचे मागून गुणग्राहक शाहू राजांनीं बाजीरावास पेशवाईचीं वस्त्रें दिलीं. श्रीशिवछत्रपतींच्या अखिल हिंदुराष्ट्रांच्या स्वातंत्र्याची कल्पना कृतींत आणण्याकरितां थोरले बाजीराव पुढें सरसावले. बाजीरावानें एका प्रसंगीं दिल्लीवर थेट चाल करून तो वृक्ष कसा उपटणें शक्य आहे हें पटवून दिलें. शाहू महाराजांनीं भगवा झेंडा थेट अटकेपार नेऊन रोवण्यास आज्ञा दिली. बाजीरावानें प्रथम निजामाची रग जिरवून चौथाई सरदेशमुखीचें पूर्वीचें सर्व येणें चुकतें करून घ्यावयाचा करार केला. माळव्यावर स्वाऱ्या करून तेथील हिंदु राजाशीं सख्य जोडलें. माळव्यांतील बुंदेलखंडाचा राजा छत्रसाल यानें महंमदखान बंगषानें बुंदेलखंडावर स्वारी केली असतां बाजीरावाला हृदयस्पर्शी पत्र लिहिलें.

“ जो गति ग्राह गजेंद्रकी सो गत भयि है आज ।
बाजी जात बुंदेलनकी राखो बाजी लाज ॥ ”

लागलीच बाजीरावानें बंगषावर चाल केली, आणि त्याला पळवून लावलें.

(३९६) ज्याचें आरमार त्याचा समुद्रः—या राजनीतीप्रमाणें सेनापति आंग्रे हे समुद्रावर इंग्रजांना, फिरंग्याना व वलंदाजांना आणि शिद्यांना गांठून पराभूत करीत होते. खंदेरी बेट हें आंग्र्याच्या स्वाधीन असल्यामुळें इंग्रज तर त्यांना अगदीं वचकूनच असत. जंजिऱ्याच्या शिद्दीनें ब्रह्मेंद्रस्वामींच्या ध्यानधारणेची जागा जें परशुरामाचें मंदीर तें पाडून टाकलें. या अत्याचारानें ब्रह्मेंद्रस्वामीचा सात्त्विक संताप प्रखरतेनें जागृत झाला. स्वामी साताऱ्यास आले, वृत्तांत निवेदन केला. महाराजांनीं पेशव्यास ससैन्य शिद्दीवर चालून जाण्याची आज्ञा केली. मराठा सैन्यानें सह्याद्री उतरून हबसाण सैन्यावर जय मिळविला. रायगडहि शिद्दयांच्या हातांतून सोडवून घेतला. ज्यानें परशुरामाचें मंदीर पाडलें त्या शिद्दयाचा शिरच्छेद करून प्रतिशोध घेण्यांत आला. मुसलमानांच्या अकरा सहस्र सैनिकांना यमसदनास पाठविलें. या विजयाचा आनंद शाहू महाराजांना हर्षविता झाला ! त्यांनीं लिहिलें कीं ‘ शिद्दी हा दैत्य केवळ रावणाची प्रतिमा, त्याला आपण मारिलें, तुमचा कीर्तिपरिमल सर्वत्र पसरो. ’

(३९७) **वसईचा संग्राम:**–यानंतर चिमाजी अप्पांचा मोर्चा पोर्तुगीजाकडे वळला. त्यांनीं वसई भागांत स्त्रियांना भ्रष्ट करणें, जुलमानें बाटविणें, कित्येकांना जिवें मारणें, असले अनन्वित व अमानुष प्रकार चालविले होते. मालाडचे सरदेसाई अंताजी रघुनाथ काळे हे शूर, लोकप्रिय आणि कडवे हिंदु होते. त्यांनीं पोर्तुगीजांच्या कारागृहांतून पुणें गांठलें. सर्व वृत्तांत निवेदन केला. चिमाजीअप्पा कावळे यांचेसह वसई प्रांतांत आले. त्यावेळीं अणजूरकरांची त्यांना फार मदत झाली. वसईला मराठ्यांनीं वेढा दिला, पण टिकाव धरवेना ! कारण किल्ला मजबूत व फिरंग्याचें शस्त्रहि प्रखर ! मराठ्यांनीं अठरा वेळां पोर्तुगीजांना मागें रेटलें. शेवटीं चिमाजीनें त्वेषानें गर्जना केली कीं " माझें डोकें तोफेच्या तोंडीं देऊन तें तटावरून आंत उडवा " हे शौर्याचे उद्गार निघतांच मराठ्यांनीं पराक्रमाची पराकाष्ठा केली व वसईवर भगवा ध्वज रोविला.

(३९८) **नादिरशहाचें प्रयाण:**–वसईचा संग्राम चालला असतां बाजीराव बुंदेलखंड जिंकून चंबळापार गेले होते. त्यांनीं दिल्लीवर जाण्याचें ठरविलें. मराठ्यांच्या पराक्रमाच्या भरतीची लाट थेट दिल्लीच्या द्वारावर येऊन आदळली. तें यश निजामाला असह्य झालें. तो चौतिस हजार सैन्यासह सर्वोत्कृष्ट तोफखाना घेऊन दिल्लीस येऊं लागला असतां भोपाळच्या आसपास बाजीरावानें त्याला गांठून पुरें पराभूत केलें व संधिपत्रावर त्याचेकडून स्वाक्षरी घेतली. याच सुमारास मुसलमानांच्या एका कटामुळें निजामाशीं कारस्थान करून नादिरशहा सिंधुनद उतरून हिंदुस्थानांत आला ! दिल्लींत लुटालूट केली. पण मराठ्यांचीं सैन्यें दौडत येत आहेत, असें ऐकतांच सर्व परिस्थिति ध्यानीं घेऊन नादिरशहानें दिल्लीच्या मयूरासनासह प्रयाण केलें. बाजीरावसाहेब नर्मदापार झाले होते, पुढें हा मराठी साम्राज्याचा मध्यान्हसूर्य अस्तास गेला.

(३९९) **नानासाहेब व भाऊसाहेब:**–थोरल्या बाजीरावांच्या पश्चात् आपल्या कर्तृत्वानें मराठी साम्राज्याच्या विस्ताराकरितां व हिंदुपदपातशाहीच्या अभिमानानें पुढें सरसावणारे वीर नानासाहेब व भाऊसाहेब हे होत. अर्काटचा नबाब तंजावरच्या प्रतापसिंह राजाला उपद्रव देत असे. रघूजी भोसल्यानें पेशव्यांच्या संमतीनें त्याजवर चाल केली व दहा लाख

रुपये खंडणी घेऊन अर्काटच्या नबाबाला वठणीवर आणलें. उत्तरेकडे पठाण पुढारी कादरगंज मोठा माजला होता. त्याजवर शिंदे–होळकरांना पाठविलें. त्यांनीं पठाणांचा बंदोबस्त केला. मल्हारराव होळकरांनीं काशी व प्रयाग हीं क्षेत्रें अयोध्येचा नबाब व दिल्लीचा वजीर याजकडून परत मागितली. अनुकूल उत्तर न आल्यामुळें मल्हारराव चवताळले व त्यांनीं काशींतील मशीदी जमीनदोस्त करण्याचा बेत केला. पण काशींतील ब्राह्मणांच्या विनंतीवरून त्यांनीं तो बेत सोडून दिला !

बंगाल, बहार व ओरिसा या पूर्वेकडील प्रांतांत मुसलमानांमध्यें यादवी माजली होती. ती मोडण्याकरितां मीर हबीब यानें मराठ्यांना पाचारण केलें. भास्करभट कोल्हटकर या वैदिक ब्राह्मणानें आपल्या अक्कल-हुषारीनें भोसले यांचेकडून प्रधानपद मिळविलें होतें. त्या महत्त्वाकांक्षी ब्राह्मणाला मीर हबीबचें निमंत्रण ही सुवर्णसंधि वाटली व दहा हजार घोडेस्वारांच्या टापांखालीं जणुं मुसलमानी वर्चस्वाला तुडवीतच विद्युद्वेगानें बंगाल प्रांतांत घुसून हुगळी, मिदनापूर, राजमहाल हीं शहरें त्यानें जिंकलीं. पश्चिम बंगाल पायाखालीं घालून अलिवर्दीखानाला अगदीं नको नकोसें केलें. अलिवर्दीनें चवताळून विश्वासघातानें भास्करपंताला ठार केलें. पुढें मराठ्यांनीं अलिवर्दीखानाला असें सतावून सोडलें, कीं तो बिचारा अगदीं कंटाळून गेला. शेवटीं त्यानें भास्करपंताच्या मुंडकटाईसाठीं ओढ्याप्रांत मराठ्यांना तोडून दिला व बंगाल बहारच्या चौथाईबद्दल प्रतिवर्षी दहा लाख रुपये देण्याचा करार केला.

याप्रमाणें उत्तर व पूर्व या दोन दिशांवर विजय मिळाल्यावर मराठ्यांनीं दक्षिणेकडे लक्ष दिलें. सावनूरचा नबाब बराच उपद्रव देत असे. मराठ्यांनीं त्याला जिंकलें व एक लक्ष रुपये खंडणी घेतली. भाऊरावांनीं साठ हजार सैन्यानिशीं श्रीरंगपट्टणला वेढा देऊन पस्तीस लाख रुपये त्याजकडून घेतले. कडाप्याच्या मुसलमान नबाबावर बळवंतराव मेहेंदळे चालून गेला व त्यानें त्याचें अर्धें राज्य मराठा साम्राज्यास जोडलें. शेवटीं हैदर एक मातबर राहिला होता. त्यावर स्वारी करून चौतीस लाख रुपये घेऊन मराठ्यांनीं अर्काट व चिन्नापट्टम् हीहि जिंकली.

(४००) अटकेपार झेंडेः—राघोबादादानें गुजराथवर स्वारी करून अहमदाबादचा बंदोबस्त केला. जाट व राजपूत यांना सामानें व दंडानें आत्मसात् केलें. जयाप्पा शिंदे यानें नागोरला वेढा दिला असतां ते विश्वासघातानें मारले गेले! राघोबा भरारीनें मथुरा, वृंदावन, गडमुक्तेश्वर, पुष्कर इत्यादि सर्व क्षेत्रें हस्तवश्य केलीं. शेवटीं काशींतहि प्रवेश करून तेथें आपली सत्ता स्थापून भरतखंडांतील प्रत्येक क्षेत्रावर भगवे ध्वज लावले. आणि ते डौलानें फडकलेले पाहून मुसलमानांची घारण पांचावर बसली! मलकाजबानी व नजीबखान रोहिला या धूर्त, शठ व पाताळयंत्री माणसांनीं मराठ्यांचा मोड करण्याकरितां अनेक कारस्थानें उभारलीं व शेवटीं अहमदशहा अबदालीला हिंदुस्थानांत बोलाविलें. यावेळीं मराठे दक्षिणेंत गुंतलेले पाहून आबदाली ऐंशी हजार सैन्यासह सिंधुनद ओलांडून पुढें सरकला. मथुरा लुटली, दिल्ली जिंकली व गोकुळवृंदावनाचा त्यानें नाश केला. या वार्ता नानासाहेबांच्या कानीं पडतांच त्यांनीं प्रचंड सैन्यासह राघोबादादाला उत्तरेंत पाठविला. मराठे येत आहेत, ही वार्ता ऐकतांच आबदल्लीनें शहाणपणानें गाशा गुंडाळला! फक्त सरहिंदच्या बचावाकरितां कांहीं सैनिक ठेवून तो चालता झाला. अबदालीच्या मागोमाग राघोबादादानें त्वरेनें आक्रमण करून त्याचा अंमल झुगारून दिला व थेट अटकेपार अगदीं सीमा प्रांतावर त्यांनीं आपला हिंदुध्वज डौलानें फडफडत ठेवला. या महान् पराक्रमाची वार्ता महाराष्ट्रांत कळतांच जिकडेतिकडे आनंदीआनंद झाला. यावेळीं मराठ्यांचा भाग्यसूर्य मध्यान्हीवर होता. अखिल भारतांतच नव्हे पण इराण, काबूल, कंदाहार इत्यादि परप्रांतांतूनहि मराठ्यांना मदतीकरतां निमंत्रणें येत असत.

(४०१) बचेंगे तो और बी लढेंगेः—नानासाहेबांनीं दख्खन जिंकण्याचें काम आपणाकडे घेतलें. पुत्र विश्वास व भाऊसाहेब हे त्यांच्या मदतीस होते. दत्ताजी शिंदे व राघोबा यांना पंजाब, मुलतान व सबंध उत्तरप्रांत स्ववश करण्यास पाठविले. उद्गीरच्या लढाईत पेशव्यांनीं निजामाची अशी रग जिरविली कीं तो वाटेल त्या अटीवर संधी करण्यास तयार झाला. त्याजकडून संधीवर हवी तशी स्वाक्षरी घेऊन हैदरअलीला नरम करण्याकरितां भाऊसाहेबांनीं म्हैसूरला वेढलें. पण इतक्यांत उत्तरे-

कडील बातम्यांमुळें भाऊसाहेबांना तिकडे वळावें लागलें. नजीबखान रोहिल्यानें पुन्हा कारस्थान करून आबदल्लीस बोलाविलें. तो प्रचंड सैन्यासह सिंधुनद उतरून लाहोरास येऊन थडकला. लाहोर सर करून तो जो पुढें येतो, तोंच दत्ताजी शिंदे यांनीं कुरुक्षेत्राच्या रणभूमीवर त्याला गांठून अलौकिक शौर्यानें मार्गे हटविलें. आबदाल्ली मोठ्या मुष्किलीनें यमुना उतरला व शुक्रतालजवळ नजीबखानाच्या सैन्याला मिळाला. आबदल्लीच्या मदतीस मुसलमानांचें सर्व मंडळ जमलेलें पाहून यमुनेचा घाट लढविण्यासाठीं व सर्व मुसलमानांस झोडण्यासाठीं मराठे बाहेर पडले. कत्तल करीत जात असतां गर्दीमध्यें दत्ताजी शिंदे यांना वर्मी गोळी लागून ते समरभूमीवर पडले. पण मरतां मरतां शत्रूस त्यांनीं 'बचेंगे तो और बी लढेंगे' असें आव्हानच दिलें.

(४०२) **स्वप्न खरें ठरलें**:—दत्ताजी शिंदे यांच्या मृत्यूची वार्ता कळतांच भाऊसाहेब मोठ्या त्वेषानें उत्तरेकडे धांवले. होळकर व गोविंदपंत बुंदेले भाऊंच्या मदतीस येऊन ठाकले. भाऊंनीं शिंदे, होळकर व मेहंदळे या सर्वांना प्रचंड सैन्यासह दिल्लीवर पाठविलें. तेथील पठाणांच्या प्रतिकाराला कस्पटासमान लेखून मराठ्यांचीं सैन्यें मोठ्या अभिमानानें दिल्लींत म्हणजे पांडवांच्या राजधानींत घुसलीं. एक दिवस तरी कां होईना दिल्ली (इंद्रप्रस्थ) हें हिंदुपदपातशाहीचें राजधानीचें शहर झालें. आणि दिल्ली जिंकून तेथें हिंदुपदपातशाही स्थापण्याचें भाऊसाहेबांचे मनांत असणारें स्वप्न त्यांनीं आपल्या डोळ्यांदेखत साक्षात् अनुभविलें. सदाशिवराव भाऊंनीं विश्वासरावांना दिल्लीच्या तख्तावर बसवून राज्याभिषेक करण्याचेंहि योजिलें होतें. पण त्यापूर्वी त्यांना दिल्लीच्या तख्तावर घण घालून त्याचा चुराडा केल्याचें समाधान मनसोक्त भोगावयाचें होतें.

(४०३) **दिल्लीच्या तख्तावर घण**:—भाऊंनीं प्रथम अबदाल्लीला कुंजपुऱ्यांतून हुसकून देण्याचा निश्चय केला. द्रव्य हें युद्धाचें बल आणि हें युद्ध बरेंच लांबणार असें पाहून सैन्याच्या हालचालीकरतां द्रव्याचा पुरवठा हवाच होता. स्वाभाविकच भाऊंची दृष्टि बादशाही सिंहासनाकडे आणि लक्षावधि रुपये मूल्याचें चांदीचें जें भरगच्च छत त्याकडे वळली. भाऊंनीं

दिल्लीच्या तख्तावर स्वतः घण घालून मोंगल पातशाहीच्या विध्वंसाची घोषणा केली. हिंदुसम्राटांनीं भूषविलेल्या तख्तास मुसलमानांनीं जें भ्रष्ट केलें होतें त्याला पावित्र्य आणण्याचा एकमेव मार्ग या हिंदुवीरांनीं अवलंबिला. भाऊचा तो घण म्हणजे इस्लामनें आजवर केलेल्या अत्याचाराची ती प्रतिक्रिया होती. त्या घणाच्या मागें त्वेष, द्वेष, संताप आणि प्रतिशोध या वृत्ति होत्या. भाऊंनीं घण घालतांच घणावर घण त्या तख्तावर पडले व त्याची सर्व चांदी काढून ती टांकसाळींत पाठविण्याची आज्ञा सोडली. त्यावेळीं हा दिल्लीच्या तख्ताचा अपमान म्हणजे ईशसंकेताचा अपमान असल्या भोळ्या व दासमनोवृत्तीच्या मित्रांनीं भाऊंना घण घालण्यास विरोध केला. पण तो बिलकूल न जुमानतां भाऊसाहेबांनीं बादशाही सिंहासन व त्यावरील छत चूर्ण करून हिंदुपदपातशाहीच्या स्वर्गस्थ संस्थापकांना आपल्या वीर्यशाली भावनांच्या रूपानें तीलांजलि दिली !!

छत फोडून हातीं द्रव्य आलें, सैनिकांचीं थकलेलीं वेतनें भागविलीं, 'हरहर महादेव' या प्रचंड गर्जनेनें मराठे पुढें घुसूं लागले. एका चकमकींत कुतुबशहाला ठार करून पुढें कुंजपुऱ्याचा पाडाव करून अबदालीला शह बसविला. पानिपतचा हा घोर समरप्रसंग भारतीय युद्धाप्रमाणेंच झाला. या युद्धांत मराठे हरले, पण अबदालीहि हरला. युद्धानंतर जो अब्दाली गेला तो कांहीं पुनः परत आला नाहीं. आणि मराठ्यांनीं पुनः उत्तरेकडील सर्व प्रांतांत आपला अंमल बसविलाच. पानिपत जिंकल्यावरसुद्धां अबदालीला पूर्व समुद्रापासून अटकेपर्यंत सर्व हिंदुस्थानचें स्वामित्व हिंदूकडे राहिलेले डोळ्यांनीं पहावें लागलें.

(४०४) **मुसलमानी सत्तेचा अन्तः**—पानिपतनंतर 'कीं तोडिला तरु फुटे अणखी भरानें' या न्यायानें अवघे सतरा वर्षांचे श्रीमंत थोरले माधवराव पेशवे हिंदुपदपातशाहीच्या रक्षणार्थ पुढें येते झाले. प्रथम राक्षसभुवन येथें निजामावर जय मिळवून ८२ लक्षाचा मुलूख त्याचेकडून घेतला. हैदरवर स्वारी करून २२ लक्ष रुपये खंडणी घेतली. पुढें काकांचा (राघोबाचा) बंदोबस्त केला. पानिपतचा प्रतिशोध घेण्याकरितां विसाजी कृष्ण बिनीवाले प्रचंड सैन्यासह नर्मदा उतरून चंबळेपर्यंत पोंचले. भरतपूर येथील जाट विरोध करूं लागतांच त्यांशीं लढून पासष्ठ लक्ष रुपये खंडणी घेऊन

दिल्लीकडे त्यांनीं मोर्चा वळविला. कारस्थानी वृद्ध नजीबखानानें दुआबांतील सर्व लूट व प्रदेश मराठ्यांना देऊन दिल्लीस जाण्याचा मार्ग सुकर करून दिला. गोगलगायवत् झालेला नजीबखान पुढें लागलीच मेला. मराठ्यांनीं दिल्लींत प्रवेश करून सार्वभौम सत्ता हिंदूंची आहे, असें सिद्ध केलें. अबदालीनें आपले वकील पाठवून मराठ्यांच्या सत्तेस मान्यता दिली. मराठे दुआबांत घुसले, तेथील रोहिले व पठाण यांचा त्यांनीं बंदोबस्त केला. नजीबखानाचा मुलगा झबेतखान यास असंख्य रोहिल्यासह नरम करून सीमाप्रांतावर थेट आक्रमण करून मराठ्यांनीं हिंदुध्वज फडकाविला ! दिल्लीचा बादशहा यावेळीं केवळ मराठ्यांच्या हातचें बाहुलें बनला होता. त्यानें समग्र हिंदुस्थानचें साम्राज्य रक्षण करण्याचा अधिकार मराठ्यांकडे दिला. याप्रमाणें १७७१ मध्यें मुसलमानी सत्तेचा प्रत्यक्ष अंत झाला.

(४०५) साम्राज्याच्या वैभवाचा कळसः–उत्तरेंतील बादशाही मराठ्यांनीं हस्तगत केली. दक्षिणेकडे पटवर्धन सरदारांसह श्रीमंत माधवराव तुंगभद्रा उतरले. पेठे, पटवर्धन, पानशे यांनीं मोतीतलाव येथें हैदरला गांठून रडकुंडीस आणलें. विशेषतः गोपाळराव पटवर्धन यांनीं हैदरवरील लढाईंत फार विस्मयकारक पराक्रम केला. पन्नास लक्ष रुपये खंडणी घेऊन त्याला सोडून दिलें. उत्तरेस वरीलप्रमाणें पानिपतचा प्रतिशोध घेऊन आणि दक्षिणेंत सर्वत्र हिंदुध्वज फडकवून अखिल हिंदुराष्ट्र आनंदांत असतांना अल्पवयांत श्रीमंत माधवरावांना मृत्यूनें गांठलें. नारायणरावाच्या खुनामुळें कांहीं काळ चिंतेंत जातो न जातो तोंच गंगाबाईचे पोटीं सवाई माधवराव जन्माला आल्याची नौबत जिकडे तिकडे दुमदुमली. सवाई माधवरावाची कारकीर्द म्हणजे मराठी साम्राज्याच्या वैभवाचा कळस होय. सवाई माधवरावांचे उजवे डावे हात पंतप्रधान नाना फडणीस व अलिजाबहाद्दर माधवराव शिंदे होते. पंतप्रधानांनीं टिपूच्या पारिपत्याची आज्ञा परशुराम-भाऊंना दिली. टिपूनें दक्षिणेंत भ्रष्टीकरणाचा कहर केला होता. ही वार्ता कळतांच परशुरामभाऊ टिपूवर चित्यासारखे तुटून पडले. त्याजकडून तीस लाख रुपये रोख घेऊन एका वर्षांत पंधरा लाख रुपये देण्याचा करार लिहून घेऊन त्याला सोडून दिलें.

अलिजाबहाद्दर माधवराव शिंदे यांना कवायती फौजेचें महत्त्व पटलें होतें. डिबॉयन् नामक फ्रेंच सेनानायकास नोकर ठेवून त्यांनीं एक बलिष्ठ सैन्य तयार केलें आणि त्याच्या जोरावर दिल्लीचें राजकारण आणि सर्व उत्तर हिंदुस्थान त्यांनीं आपल्या हातांत ठेविलें. राजकारणाचीं सर्व सूत्रें मुसलमान व युरोपियन या दोघांना जळफळत ठेवून शिंद्यांनीं आपल्या हातांत ठेविलीं होतीं. दिल्लीच्या वृद्ध बादशहाला पांसष्ठ हजाराचें वेतन देऊन पेन्शनर बनविलें. बादशहानें पंतप्रधानांना **वजीर–ई–मुतालीक** ही सर्वश्रेष्ठ पदवी दिली व हिंदुराष्ट्रांत गोवध होतां कामा नये अशी राजाज्ञा काढली.

बादशहाच्या राजवाड्यांत आणि दिल्लींत नजीबखानाचा नातु गुलाम कादर यानें क्रूरपणानें व रानटीपणानें अनन्वित प्रकार केले. ते असह्य झाल्यामुळें मुसलमानसुद्धां सर्व नागरिकांनीं मराठ्यांना बोलाविलें. हिंदुसाम्राज्याच्या सैन्यानें दिल्लींत प्रवेश करतांच मुसलमानासह सर्व नागरिकांनीं प्रार्थनापूर्वक मराठ्यांचें स्वागत केलें. अलिजाबहाद्दर शिंदे, आप्पा खंडेराव, राणाखान आणि डीबॉयन् यांनीं राजधानी हातीं घेतली व नराधम गुलाम कादरला पकडून हालहाल करून त्यास ठार केले यामुळें बादशहा अतिशय खूष झाला व त्यानें **वकील–ई–मुतालीक** ही सर्व श्रेष्ठ पदवी आणि महाराजाधिराजपदाचा मान शिंद्यांना देऊं केला. शिंदे यांनीं तो मान पंतप्रधानांचें नांवें स्वीकारला.

(४०६) **सार्वभौमत्वाचा सन्मानः**–उत्तरेकडे मराठे गुंतलेले पाहून टिपूनें दक्षिणेंत पुंडाई आरंभिली. यावेळीं नानांनीं इंग्रज व निजाम यांच्याशीं मैत्री जोडून पटवर्धनांना दक्षिणेंत पाठविलें. मराठे श्रीरंगपट्टणवर चाल करून निघाले. कॉर्नवॉलीसच्या इंग्रजी सैन्यानें टिपूशीं युद्ध चालू केलें होतें. त्याला फडके व पटवर्धन ह्यांचीं सैन्यें मिळालीं. टिपूचा पराभव झाला व टिपूला अर्धें राज्य मराठयांच्या स्वाधीन करावें लागलें. तीन कोट रुपये खंडणी देऊन व दोघा मुलांना ओलीस ठेवून टिपूनें कशीबशी सुटका करून घेतली. याप्रमाणें टिपूला नामशेष करून दक्षिण दिग्विजयाच्या उत्साहानें मराठा सैन्य मोठ्या सन्मानानें राजधानींत प्रविष्ट झालें. उत्तरेकडील विजयानें हृष्ट झालेलें पाटीलबुवांचें सैन्य

पुण्यास आलें. पुणें हें मुख्य नगर व दिल्ली हें उपनगर झालें. नाना व महादजी हे दोन मोठे कर्ते पुरुष यावेळीं हातांत हात घालून व खांद्यास खांदा भिडवून सहकार्य करीत होते. दिल्लीच्या मोंगल बादशहाकडून आणलेल्या सर्वश्रेष्ठ पदव्या श्रीमंतांना अर्पण करावयाच्या होत्या. लोकांच्या जयगर्जना, तोफांचे गडगडाट, बंदुकांतील गोळ्यांचे सूं सूं आवाज, तरवारीचा खणखणाट आणि घोड्यांचें खिंकाळणें अशा या वीर्यशाली वातावरणांत तो महान् समारंभ साजरा झाला. कारण श्रीमंत पेशव्यांना दिलेल्या त्या पदव्या म्हणजे मराठ्यांच्या सार्वभौमत्वाचा तो सन्मान होता. उत्तर हस्तगत केली, दख्खन स्ववश केली, पूर्वपश्चिम आपल्या ताब्यांत आणल्यावर जिकडे तिकडे मराठ्यांच्या पराक्रमाचें गान होऊं लागलें.

दिल्लीका तक्त फोडा, घोडा उडा मैदान ।
देखो उसका जान छोटी उसका गेरुवा निशाण ॥
दिल्ली लूटा, आग्रा लूटा और लूटा मुलतान ।
देखो उसका जान छोटी उसका गेरुवा निशाण ॥
एक तोफके फेरसे भागा टिपु सुलतान ।
देखो उसका जान छोटी उसका गेरुवा निशाण ॥

उत्तरेंत ज्याचें त्याचें तोंडीं हे दोहे होते तर दक्षिणेंत शाहीर पोवाडे रचून मराठ्यांच्या पराक्रमाचें वर्णन करीत होते.

(४०७) **हें हिंदूंचेंच स्थान:**—मुख्य प्रधानकी आपणाकडे असावी अशी शिंद्यांची इच्छा दिसतांच नानांनीं मोठ्या प्रसन्न मनानें काशी यात्रेस जाण्याची तयारी दर्शविली. महादजी शिंदे यांना ही वार्ता समजतांच त्यांनीं हिंदु साम्राज्याच्या वैभवाकरितां आपली इच्छा मागें घेतली.

नाना व महादजी या दोघा कर्त्या पुरुषांतील मनोमालिन्य नष्ट झाल्याच्या वार्ता सर्वत्र पसरतांच अखिल हिंदु राष्ट्राला फार समाधान वाटलें. त्यावेळीं गोविंदराव काळे यांनीं अंतःस्फूर्तीनें हृदयंगम असें जें पत्र लिहिलें आहे तें येथें दिल्याशिवाय राहवतच नाहीं.

“पत्र पाहातांच रोमांच उभे राहिले. अति संतोष झाला. अटक नदीच्या अलीकडे दक्षिण समुद्रापावेतों हिंदूंचें स्थान—तुर्कस्थान नव्हे.

हे आपली सीमा पांडवापासून विक्रमाजितपावेतों त्यांनीं राखून उपभोग घेतला. त्यामागें राज्यकर्ते नादान निघाले. यवनांचें प्राबल्य झालें. चकत्यांनीं ( बाबरच्या वंशजांनीं ) हस्तिनापूरचें राज्य घेतलें. शेवटीं आलमगिराचे कारकीर्दींत यज्ञोपवीतास साडेतीन रुपये जेजया बसवून ओलें अन्न विकत घ्यावें अशी नौबत गुजरली !

" त्या दिवसांत कैलासवासी शिवाजीमहाराज शककर्ते व धर्मराखते निघाले. त्यांनीं किंचित् कोन्यांत धर्मरक्षण केलें. पुढें कैलासवासी नानासाहेब व भाऊसाहेब प्रतापसूर्य असे झाले कीं, असे कधीं झाले नाहींत. हल्लीं श्रीमंतांच्या पुण्यप्रतापेंकरून व राजश्री पाटीलबुवांच्या बुद्धीच्या व तरवारीच्या पराक्रमेंकरून सर्व घरांस आलें. परंतु झालें कसें ? प्राप्त झालें तेणेंकरून सुलभता वाटली. अगर मुसलमान कोणी असते तरी मोठे मोठे तवारीखनामे झाले असते. यवनांच्या जातींत इतकी गोष्ट चांगली झाल्यास गगनाबरोबर करून शोभवावी. आमचे हिंदूंत गगनाइतकी झाली असतां उच्चार न करावा हे चाल आहे. असो. अलभ्य गोष्टी घडल्या. उग्याच दौलती पुसत घरांस आल्या. त्याचें संरक्षण करणें परमकठिण. दोस्त दुष्मन फार, यवनांचें मनांत कीं, काफरशाही जाली हे बोलतात. 'लेकिन ज्यांनीं हिंदुस्थानांत शिरें उचललेलीं त्यांचीं शिरें पाटीलबावांनीं फोडलीं. कोणाच्याहि मनांत हे वाहाडले ते शेवटास जाऊं नये यास्तव नाना स्वरूपें व युक्ती करून नाश करावे ऐसे आहेत. न लाभाव्या त्या गोष्टी लाभल्या. त्यांचा बंदोबस्त शककर्त्याप्रमाणें होऊन उपभोग घ्यावे पुढेंच आहे. कोठें पुण्याईत उणें पडेल आणि काय दृष्ट लागेल न कळे. झाल्या गोष्टी ह्यांत केवळ मुलुख, राज्य प्राप्त इतकेंच नाहीं तरी वेदशास्त्ररक्षण, गोब्राह्मणप्रतिपालन, सार्वभौमत्व हातीं लागणें, कीर्ती, यश यांचे नगारे वाजणें इतक्या गोष्टी आहेत ! हे किमया संभाळणें. हक्क आपला व पाटील बुवांचा. त्यांत वेत्यास पडला कीं, दोस्त दुष्मन मजबूत !! दुष्मन उशापायथ्याशीं लागून आहेत. चैन नव्हतें. आपण लिहिल्यावरून मन स्वस्थ झालें. "

या एका पत्रांत हिंदुपदपादशाहीचें ध्येय सिद्धीस गेल्याचें यथातथ्यपणें सांगितलें आहे.

(४०८) **खड्यांची लढाई**:–पाटीलबुवांच्या मृत्यूनें ( १७९४ ) सर्व महाराष्ट्र शोकसागरांत बुडला. त्याच वेळीं निजामानें चौथाई देण्याचें टाळून उर्मटपणाचें वर्तन केलें. त्यासरशीं तेजस्वी गोविंदराव काळे भरसभेंत प्रतिज्ञा करून पुण्यास आले. शिंदे निवर्तले होते तरी नानांनीं आपल्या बुद्धिमत्तेनें चौखूर पसरलेलीं मराठी सैन्यें जमविलीं. शिंदे, बक्षी, होळकर, गायकवाड, पटवर्धन, रास्ते, विंचूरकर, डफळे, पवार वगैरे सर्व आले. स्वतः तरुण पंतप्रधान सैन्याचें नेतृत्व स्वीकारून प्रथमच लढाईस सिद्ध झाल्यामुळें सर्वांमध्यें विलक्षण स्फूर्ति चढली. शिंद्यांचा तोफखाना प्रलयकाळची आग ओकूं लागला. शेवटीं खड्यांच्या लढाईत निजामाला इतके खडे चारले कीं, ते खातां खातां त्याचे दांत पडले. तीन कोट रुपये दक्षिणा देऊन मशीर उल्मुल्काला स्वाधीन करून निजामानें नाक घासून तह केला. हातीं आलेल्या मशीरची नानांनीं अधिक विटंबना केली नाहीं. मोठ्या विजयसमारंभानें मराठ्यांच्या सैन्यानें पुढें पुण्यास आगमन केलें. त्यावेळीं देशोदेशींचे थवेच्या थवे पुण्यास लोटले होते. विजयी पेशव्यांचें प्रचंड स्वागत त्यावेळीं पुण्यनगरीनें केलें. देशोदेशींच्या राजांचीं व प्रजांचीं अभिवादनें घेत पंतप्रधान वाड्यांत प्रविष्ट झाले. हिंदु साम्राज्याचा अत्यंत भाग्याचा तो दिवस होता.

याप्रमाणें महान् पराक्रमी मराठ्यांनीं दिल्लीपतीला होता कीं नव्हता असें केलें व निजामाची रग जिरविली. मराठ्यांप्रमाणेंच ज्या शीखांनीं मोठ्या बहादुरीनें मोंगल बादशाहीच्या उत्तर कालांत स्वतंत्र राज्य स्थापिलें आणि विजयानगर राजपुत आणि मराठे यांच्याबरोबर ज्यांनीं हिंदुस्थानच्या इतिहासांत आपलें कार्य अमर करून ठेविलें आहे त्या शीखांच्या पराक्रमाचे पोवाडे पुढच्या प्रकरणामध्यें गाऊं.

—*—

## प्रकरण चोविसावें

# शीखांचें स्वतंत्र राज्य

(४०९) बाबा नानकः—शीख धर्माचा संस्थापक बाबा नानक ऊर्फ नानकशहा हा इ. स. १४६९ मध्यें रावी नदीचे कांठीं लाहोरजवळ जन्मला. पहिल्यापासून हा धार्मिक प्रवृत्तीचा होता. यानें राजपूताप्रमाणें किंवा मराठ्यांप्रमाणें इस्लामविरुद्ध तलवार उपसली नाहीं तर साधुत्वाच्या जोरावर एक निराळा संप्रदाय काढून इस्लामला शह देण्याची अजब युक्ति केली. गुरुनानकाचा हा प्रयत्न प्रथमतः धार्मिक स्वरूपाचा, सलोख्याचा व सामदानाचा होता, नंतर त्याला क्रमप्राप्त राजकीय स्वरूप आलें. या पंथाचा हेतु इस्लामपासून हिंदुसंस्कृतीच्या बचावाचा होता, पण पुढें मुसलमानांकडून छळ होऊं लागल्यामुळें धर्माकरितां स्वतंत्र राज्य स्थापण्याची त्याला आवश्यकता वाटली. वायव्येकडून येणाऱ्या इस्लामच्या टोळ्यांचा मारा पंजाबवर पडतो व त्या आक्रमणांना विरोध करण्याचें स्थान वायव्य सरहद्द हेंच आहे! मुसलमानांच्या असह्य आक्रमणामुळें या भागांतील क्षत्रिय अबूच्या पहाडांत शिरले. पण शीखांनीं नेट धरून, सरहद्दीवर उभे राहून, छातीचा कोट करून मोठ्या बहादुरीनें इस्लामला विरोध केला. एका बाजूनें ते दिल्लीपतीकडून चेपले जात तर दुसरीकडून अफगाणांचीं आक्रमणें त्यांचेवर होत. या दोन्ही आक्रमणाच्या तडाख्यांत नामशेष न होतां त्यांनीं आपलें अस्तित्व व राष्ट्रीयत्व कायम ठेवलें, ही गोष्ट फारच अभिमानास्पद आहे.

गुरु नानक हा धर्माच्या कामांत आग्रह नसावा, ईश्वराची सेवा मनोभावें करावी, असें सांगे. परमेश्वर निराकार, प्रेमस्वरूप व सत्-तत्त्वस्वरूप आहे, जातिभेद व मूर्तिपूजा या आपणाला मान्य नाहींत, असेंहि तो सांगे. त्याच्या उपदेशाचा परिणाम पंजाबांत विशेष झाला. नानकाच्या अनुयायांना शिष्य म्हणजे शीख असें म्हणतात व शिष्यांचा समूह म्हणजे शीखसंप्रदाय होय. नानकानें हिंदु व मुसलमान धर्मांतील ग्राह्य तत्त्वें

घेतल्यामुळें दोन्ही समाजांतून त्याला अनुयायी मिळाले. नानकाच्या उपदेशामुळें मुसलमानांत फूट पडूं लागली. हें वर्तमान बाबरला समजतांच त्यानें अमिनाबाद येथें नानकाला पकडलें. पण बादशहा बाबरची समजूत नानकानें चांगल्या तऱ्हेनें घातल्यामुळें शेवटीं त्यानें त्याला सोडून दिलें. नानकाच्या पश्चात् त्याचा शिष्य अंगदशहा हा शीख गुरु झाला. शीख संप्रदायाचे एकंदर दहा गुरु आहेत. ते असेः–( १ ) नानक, ( २ ) अंगद, ( ३ ) अमरदास, ( ४ ) रामदास, ( ५ ) अर्जुन, ( ६ ) हरगोविंद, ( ७ ) हररायदेव, ( ८ ) हरकिसन, ( ९ ) तेजबहादूर, ( १० ) गुरु गोविंदसिंग.

(४१०) **अमरदासः**–त्याग, सहनशीलता व परोपकार या गुणांनीं आदरणीय झालेला व गुरु नानकाची प्रथा शांतपणें उच्च भूमिकेवरून चालविणारा तिसरा शीख गुरु अमरदास हा होय ! स्त्रियांनीं सती जाऊं नये असें तो म्हणे. अमरदासाचे वेळीं शीखामध्यें उदासी व निर्मल असे दोन भेद झाले. त्याचें कारण धर्मप्रसाराला हातीं सत्ता असावी, गड, कोट व किल्ले बांधावे, असें अमरदासाला वाटे व त्यानें कजरावळ नांवाचा किल्लाहि घेतला; पण सत्ताभिलाषानें धर्म बुडतो म्हणून राज्यप्राप्तीचा नाद सोडून द्यावा असें दुसऱ्या पक्षाचें मत होतें.

(४११) **गुरु रामदासः**–अकबराला हिंदुमुसलमानांचें ऐक्य अभिप्रेत होतें. शीखपंथ दोन्ही धर्मांतील ग्राह्य भाग घेऊन त्याचा प्रसार करीत असल्यामुळें अकबर जेव्हां जेव्हां पंजाबांत जाई, तेव्हां तो मोठ्या आदरानें शीख गुरूंचें दर्शन घेई. गुरु अमरदासाला तो पायांत न घालतां चालत जाऊन भेटे. कारण सात्विकता, निःस्पृहता व निरिच्छता यांची छाप त्याच्या मनावर बसली होती. अकबरानें अमरदासाच्या मुलीला कांहीं जमिनीहि इनाम करून दिल्या होत्या. चौथा गुरु रामदास हा अमरदासाचा जांवई होता व त्यावर अकबराची विशेष मर्जी होती. रामदासानें आपल्या स्त्रीच्या नांवानें अकबरानें दिलेल्या इनाम जमिनींत मोठा तलाव खोदला. त्यास उत्तम पाणी लागलें म्हणून अमृत–सरोवर–अमृतसर असें त्यास नांव मिळालें. तेंच आज शीखांचें पवित्र स्थान झालें आहे.

पांचवा गुरु अर्जुनमल्ल. याचा व अकबराचा परिचय होता. अकबराच्या अंतापर्यंत शीखांच्या पांच गुरूंकडून धर्मप्रसाराचें काम सुरळीत चाललें होतें. अर्जुनमल्लानें आदिग्रंथाची रचना केली. त्यांत आपले व आपल्या धर्मगुरूंचे लेख गोवले. त्याच्या विद्वत्तेमुळें अकबराची त्याचेवर निष्ठा होती. अकबराचे पश्चात् धर्मवेडानें शीखांचा छळ सुरू झाला. त्यामुळें त्यांच्यामध्यें हळुहळु प्रतिकारवृत्ति जागृत झाली. जहांगीरच्या कारकीर्दींत त्याचें व त्याचा मुलगा खुश्रू याचें सारखें वांकडें येत असे. खुश्रू हा पळून जाऊन अर्जुनमल्लाकडे आश्रयास राही. त्यामुळें जहांगीर, अर्जुनमल्लावर चिडून गेला. मुलास पळण्यास मदत केली, बदसल्ला दिला, पैसे दिले, असले आरोप करून जहांगीरनें अर्जुनमल्लाला दोन लाख रुपये दंड केला. पण अर्जुनमल्लानें एक कपर्दिकहि न दिल्यामुळें त्याचे हाल करण्यास त्यानें प्रारंभ केला. तें पाहून तरवारीच्या जोराशिवाय आपला पंथ टिकणार नाहीं, अशी त्यानें आपला मुलगा हरगोविंद यास आज्ञा केली व जहांगीरकडून होणाऱ्या अमानुष हालामुळेंच अर्जुनमल्लाचा जीव गेला.

(४१२) गुरु तेजबहाद्दरः—अर्जुनमल्लानंतर साहवा गुरु हरगोविंद, सातवा हररायदेव व आठवा हरकिसनदेव असे गादीवर आले. त्यांनीं अर्जुनमल्लाच्या आज्ञेप्रमाणें लढाऊ तऱ्हेची संघटना केली. हरगोविंदनें तर आपल्या पित्याच्या उपदेशाप्रमाणें आपल्या भोंवतीं प्राणाचीहि पर्वा न करणारे असे शिष्य जमा केले. त्वेष व क्रौर्य येण्याकरितां त्यांनीं मांसाहाराची परवानगी दिली. जहांगीर व शहाजहान यांच्याशीं हरगोविंदनें मोठ्या धैर्यानें टक्कर दिली. उत्तरेकडील पहाडांत आपलें बस्तान चांगलें बसवून शीख हे लष्करी बाण्यानें वागूं लागले. औरंगजेबापर्यंत मुसलमान अधिकाऱ्यांचें लक्ष शीखांच्या संघटनेकडे फारसें नव्हतें. पण मत्सरी व कडव्या औरंगजेबास शीखांचा तो उत्कर्ष कसा सहन होणार? औरंगजेब हा हिंदूंचा कट्टा द्वेष्टा होता त्यामुळें तेजबहाद्दर व औरंगजेब यांच्यामध्यें वैमनस्य उत्पन्न झालें. औरंगजेबानें तेजबहाद्दरला पकडून त्याच्या तीनशें शिष्यांसह बंदींत टाकलें व त्या सर्वांवर मुसलमान होण्याची सक्ति केली. तीनशें शिष्यांना आठ दिवसाची अवधी इस्लामधर्म स्वीकारण्यास दिली. करवतीला धार देण्याकरितां लोहारांचे ताफेच्या ताफे आणून बसविले

आणि जो मुसलमान होत नसेल त्याला डोक्यापासून उभा चिरण्याची आज्ञा केली. हातपाय बांधून शिष्याला उभा करीत, 'बोल, हिंदु कां अहिंदु', असा प्रश्न विचारीत, हिंदु म्हणून उच्चारतांच इकडे चार व तिकडे चार असामी तीक्ष्ण करवत डोक्यावर धरून घसाघसा घांसूं लागत. याप्रमाणें ना एक ना दोन, तीनशें शिष्यांनीं दहा दिवसपर्यंत करवतीच्या धारेखालीं स्वतःला हिंदुत्वाकरितां चिरून घेतलें. आपल्या डोळ्यांसमक्ष तीनशें शिष्यांचा करवतीच्या धारेखालीं हा भयंकर व अमानुष झालेला मृत्युप्रसंग पाहून तरी तेजबहादूर मुसलमान होईल असें औरंगजेबास वाटलें होतें. परंतु तीनशें शिष्यांचाच तो उज्ज्वल गुरु असल्यामुळें वीर तेजबहादुरानेंहि हिंदुत्वाकरितां तरवारीच्या धारेखालीं आपलें बलिदान केलें.

**(४१३) गुरु गोविंद:**–शीख धर्मांत मोठ्या सुधारणा करणारा आणि शीख समाजांत नवें मन्वंतर सुरू करणारा दहावा गुरु म्हणजे गुरु गोविंदसिंग होय! त्यानें लष्करी पद्धती चालू करून शीखांचें प्रजासत्ताक मंडळ चालू केलें व सर्वांना समतेनें वागविणेचे नियम केले. अनुयायांमध्यें त्यानें उत्साह केला. कृपाण, कंगवा, केस व कंकण अशा चोहोंचें बंधन घातलें. लष्करी पोषाख वापरण्यास सांगितलें. गोवधाची बंदी केली. हिंदु देवतांना व हिंदु वीरांना मान देण्याची प्रथा पाडून त्यानें हिंदूंचा विश्वास संपादन केला. तो चंडीचा मोठा भक्त होता. तिचा साक्षात्कार म्हणून तो आपल्या हातांत नंगी तलवार धारण करी. गुरुगोविंद हा शीखांचा शेवटचा व दहावा धर्मोपदेशक होय! त्यानंतरचे पुरुष धर्मोपदेशक नव्हते, तर ते सेनानायक होते. लढाईच्या प्रसंगीं "वाः गुरुजीका खालसा, वाः गुरुजीकी फत्ते" अशा गर्जना करण्याची त्यानें रीत पाडली. खालसा या घोषणेचा अर्थ एकी असा होय! सर्व लोक एक असून गुरूशीं आपलें संगनमत आहे, असा याचा अर्थ. म्हणून शीख फौजेला खालसा फौज म्हणतात. गुरुगोविंद व औरंगजेब यांच्यामध्यें मोठें युद्ध सुरू झालें. सरहिंद येथें मोठी लढाई झाली. त्या लढाईत गुरुगोविंदाचे दोन मुलगे मारले गेले आणि दुसरे दोन मुलगे मुसलमान होईनात म्हणून त्यांना भिंतींत छिणून ठार करण्यांत आलें. आपल्या नातवांची अशी वाट लागलेली ऐकून गुरुगोविंदाच्या आईनें डोकें आपटून प्राण दिला. मोंगल फौजेनें गुरुगोविंदाच्या फौजेची

वाताहत करून ठाणीं घेतलीं. गुरुगोविंद सेनाविहीन झाल्यामुळें रानोमाळ भटकूं लागला व भटकतां भटकतां तो दक्षिणेंत नांदेड येथें आला. आपल्या बापाच्या वधाचा सूड घेण्याच्या इच्छेनें दोन पठाण गोविंदसिंगाला मारण्याकरितां आले. वझिरखान नामक सुभेदाराचें त्या पठाणांना साह्य होतें. गोविंदसिंग निजला असतांना बेसावध स्थितींत पठाणांनीं त्याच्या पोटांत कट्यार खुपसली. त्यासरशीं गोविंदसिंग जागा झाला. हातांतल्या तलवारीनें गोविंदसिंगानें दोघा पठाणांचे मुडदे पाडले. पण जब्बर जखमेनें तो विव्हल झाल्यामुळें त्या ठिकाणींच त्याचा अंत झाला.

(४१४) **बंदा बहादर**:—याचें पूर्वचरित्र मोठें उमदें आहे. हा वीर शिकारीस गेला असतां गाभण्या हरिणीची यानें शिकार केली. तिच्या पोटांतील पाडसाचें तडफडणें पाहून त्याची वैराग्यवृत्ति जागृत झाली. गुरु गोविंदाचें व्यक्तिमत्व व उपदेश यांनीं बंदाच्या मनाची पकड घेतली व बंदा त्याचा शिष्य बनला. सामान्य जनतेची मुसलमानांच्या छळापासून सुटका करणें, गुरुवधाचा सूड उगविणें, गुरुपुत्रवधाचें उट्टें काढणें, जुलमाचा नायनाट करणें, असें त्यानें आपल्या आयुष्याचें ध्येय ठरविलें. स्पृश्यास्पृश्यता व उच्चनीचता नाहींशी करून, समता उत्पन्न करून, गनिमी काव्यानें युद्ध करण्याकरितां प्रत्येक शिष्यास धर्मयुद्धार्थ मिळकतीचा दहावा हिस्सा देण्याचा त्यानें आदेश दिला. औरंगजेबाचे पश्चात् त्यानें केलेल्या छळाची प्रतिक्रिया होऊं लागली. बहादुरशहाच्या असह्य जुलमामुळें संतप्त झालेले शेतकरी बंदाच्या हांकेस 'ओ' देऊन एकत्र जमले व त्यांनीं एकदम मुसलमानावर चाल केली. सरहिंदच्या आसपास बंदाच्या या सैन्यानें मुलुख उध्वस्त केला, मशिदी पाडल्या, मुल्ला मौलवींना स्वर्गास पाठविलें व शेतकरी जसा कणसें कापतो, त्याप्रमाणें मुसलमानांचीं मुंडकीं त्वेषानें चराचर चिरून त्याचा ढिगारा रचून मनस्वी क्रौर्य दाखविलें. मुसलमानांचीं प्रेतेंहि जमिनींतून उकरून पशूंना खावयास दिलीं. अशा या संतप्त झालेल्या सैन्यासह बंदाबहाद्दर आपल्या गुरूचा व गुरुपुत्राचा अमानुषपणें व क्रूरपणें वध करण्याकरितां वजीरखानावर सिंहासारखा चालून जाऊं लागला. वझीरखानाचें तें पूर्व कृत्यच तसें अघोर होतें. इंग्रज ग्रंथकारसुद्धां मुसलमान सुभेदार वझीरखान याच्या त्या दुष्कृत्याची

तिरस्कारानें माहिती देतात. बंदानें अशी रणधुमाळी उडविली कीं वझीरखानाचें एकदम मुंडकें उडवून, 'वही गुरूजीकी फत्ते' अशी त्यानें गर्जना केली. त्यानंतर त्यानें दोन कोट रुपयांची लूट, उमाप युद्धसाहित्य, हत्ती, घोडे वगैरे पुष्कळच मिळविलें. तें सर्व त्यानें आपल्या अनुयायांना वांटून दिलें. या जयानंतर पूर्वीं मुसलमानांनीं इतरांवर जितके अत्याचार केले होते तितके सव्याज शीख शिष्यांनीं मुसलमानांवर केले. विशेष हें कीं, मुसलमानांकडूनच मुसलमानांच्या मशिदी पाडविल्या. मुसलमान लोक इतके घाबरले होते कीं, त्यांनीं भराभर शीखधर्म स्वीकारला. दिल्लीकडे बंदा येणार असें कळतांच तिकडील मुसलमान शीखधर्म पत्करून त्याला येऊन मिळाले. जे शीख झाले तेवढ्यांनाच त्यानें जीवदान दिलें व बाकीच्यांना त्यानें स्वर्गास पाठविलें. पूर्वीं मुसलमानांनीं ज्या तरुणींना भ्रष्ट करण्याचा यत्न केला होता व ज्यांनीं पावित्र्यरक्षणार्थ आत्महत्त्या केल्या होत्या, अशा स्त्रियांचीं थडगीं उकरून त्यानें बाहेर काढलीं व शीखधर्माच्या शास्त्रोक्त विधीनें त्यांचा पुन्हां अंत्यविधि केला. बेहट येथें भर रस्त्यावर मुसलमान गोहत्त्या करीत म्हणून त्यांना यमसदनास पाठविलें. बंदानें गुरूच्या नांवानें नवा संवत् सुरू केला, नवें नाणेंहि गुरूच्या नांवानें पाडलें आणि सच्चा पादशहा, असें तो म्हणवून घेऊं लागला.

(४१५) **बंदाचें बलिदानः**—बादशहा फिरुकशिअर याला बंदाचें हें पातशाहीपण सहन होण्याजोगें नव्हतें. त्यानें त्याच्या बंदोबस्ताकरितां अबदुलसमीद नांवाचा हुषार सेनापति पाठविला. त्यानें लोहगडच्या किल्ल्यास कडेकोट बंदोबस्तानें वेढा दिला. तेथून बंदा खालीं येऊन धुमाकूळ घालीत असे. हें ठाणें लाहोरच्या ईशान्येस शंभर मैलांवर आहे. वेढा इतका यशस्वी झाला कीं शीखांना आठ महिन्यांपुढें तग धरवेना, अन्न मिळेना, व धान्य तर तीन रुपयास एक शेरहि दिसेना. झाडाचीं पानें खावून जगावें लागलें. बंदा बहाद्दरानें नाइलाजानें किल्ल्याचे दरवाजे उघडले. मग काय विचारतां, सिंहाला जसें पिंजऱ्यांत कोंडतात त्याप्रमाणें बंदाला लोखंडी पिंजऱ्यांत कोंडून टाकलें. एकजात शीखांची कत्तल सुरू केली व साडेसातशें शीखांना युद्धबंदी म्हणून पकडलें. मारलेल्या शीखांचीं मुंडकीं पुढें गाड्या भर भरून चाललेलीं, त्याच्या मागें हत्तीवर बंदाचा

पिंजरा आणि त्याच्याहि मागें साडेसातशें युद्धबंदी अशी ही मिरवणूक दिल्लीस पोंचली. तेथें ५ मार्च १७१६ पासून कोतवालीच्या आसपास 'वही गुरु, वही गुरु' अशा धन्यतेच्या घोषणा ऐकूं येत असत. या घोषणा शीख करीत. बादशहानें नरमेध सुरू केला. तरवारी व करवती परजणाऱ्यांचे दोहीबाजूस दोन ताफे बसविले आणि ओढ शीखाला, विचार मुसलमान होतोस कीं नाहींस, आणि नकार आला कीं छाट त्याचें मुंडकें, असा प्रकार सात दिवस चालू होता! रोज एकशेंएक प्रमाणें युद्धबंदीची कत्तल आठवडाभर चालू होती. १९ जून १७१६ हा वाईट दिवस उजाडला. कुतुबमिनारजवळ सकाळीं बंदाला आणलें. बरोबर त्याचे चार पुत्र व राहिलेले शिष्यहि होते. बादशहाचा अधमपणा आज कळसास पोंचला. बादशहानें बंदावीराला 'इस्लाम कां मृत्यु' असा स्वतः सवाल केला. 'नाहीं, नाहीं, इस्लाम नाहीं' असा नकार येतांच बादशहानें बंदाच्या पुत्रवधास आज्ञा केली, आणि राहिलेल्या सर्व शिष्यांचीं मुंडकीं कापून त्याच्यापुढें रचलीं. या अमानुष रक्तपातामुळें बंदा द्रवला नाहीं, असें पाहून बादशहानें मानव्याला कलंक आणण्याचें कृत्य करण्याची आज्ञा केली. बंदाच्या बाहूंत त्याच्या अजयसिंह नामक अर्भकाला देण्यांत आलें व त्याला ठार कर, असा हुकूम सोडला! बंदा अशा या प्रसंगीं सत्त्वापासून ढळणारा नव्हता. त्यानें तो हुकूम पायाखालीं तुडविला. बंदाच्या देखत बादशहानें त्या अर्भकाचे तिळा तिळा एवढे तुकडे करून ते बंदापुढें पसरले आणि त्याच्या पोटांतील आंतडीं काढून बंदाच्या तोंडांत तीं कोंबलीं. पण स्थितप्रज्ञ बंदा बर्फाप्रमाणें थंड, आणि समाधिसुखांत निमग्न असलेला पाहून एका खाटकानें त्याचा डावा डोळा तापलेल्या चिमट्यानें बाहेर काढला तर दुसऱ्यानें उजव्या डोळ्यांत सुरा खुपसला. हातापायाची त्वचा खाटीक सोलूं लागले. एकानें जिव्हाच्छेद केला!! एकेक अवयव असे छाटले जात होते, अत्यंत तीक्ष्ण वेदना होत होत्या, मानवी क्रूरतेच्या अधमपणाचें तें हिडीस प्रदर्शन होतें. शरीरांत सर्व बाजूंनीं तापलेले सांडस भोंसकण्यांत येत असतांना दुःखाचा श्वासहि न टाकतां ईश्वरावर भरंवसा ठेवून धर्मसेवेच्या समाधानांत बंदा ईश्वराच्या मांडीवर बसण्याकरितां स्वर्गांत गेला.

स्वर्गस्थ देवतांनीं 'वही गुरु वही गुरु' अशा धन्यवादानें त्याला वर झेलून घेतलें.

(४१६) रणजितसिंग व अखेरः—या कत्तलीनंतर शीखांनीं कांहीं काल कच खाल्ली. पुढें नादिरशहाच्या स्वारीनें जेव्हां 'त्राहि भगवन्' केलें, त्या संधीचा फायदा घेऊन शीखांनीं पुन्हां मुसलमानांना उपद्रव देण्यास प्रारंभ केला. अहमदशहा अबदाली मेल्यावर शीख लोक लाहोरच्या सुभेदारास न जुमानतां लोकांकडून करहि घेऊं लागले आणि पंजाब प्रांत ताब्यांत घेऊन त्यांनीं आपल्या राज्याचें पुनरुज्जीवन केलें. पुढें रणजितसिंग या नांवाचा पराक्रमी पुरुष इ. स. १७८०मध्यें जन्मला. त्यानें अवघ्या तेराव्या वर्षीं शिवाजी-प्रमाणें पराक्रमास प्रारंभ केला आणि एकोणिसाव्या वर्षीं सर्व आधिपत्य आपल्या हातीं घेऊन, लाहोर, लुधियाना, अमृतसर हीं जिंकून, सतलज ओलांडून इ. सन १८०७ मध्यें सरहद्द प्रांतांतूनहि त्यानें खंडणी गोळा केली. इ. सन १८२३ सालीं रणजितनें पेशावर प्रांत जिंकला. लॉर्ड मिंटो हा त्याच्या पराक्रमामुळें त्यास फार भीत असे. त्यानें रणजितशीं तह करून त्याच्या राज्याची सरहद्द सतलज नदी ही ठरवून दिली. अफगाणिस्थानच्या धामधुमींत रणजितसिंगानें तिकडेहि कारस्थान चालविलें होतें. गुरु नानका-पासून चालत आलेली इस्लामच्या प्रतिकाराची परंपरा मोठ्या बाण्यानें चालविणारा शेवटचा पुरुष म्हणजे रणजितसिंग हा होय! या बहादूर शीखांनीं इस्लामवर बहादुरी गाजवून आपलें अस्तित्व टिकविलें आहे. शीखांनीं हिंदुत्वाकरितां किती कष्ट सोसले, किती बलिदान केलें, स्वार्थाचा कसा होम केला, हें सर्व अद्भुत रोमांचकारीच आहे. आजसुद्धां ठिकठिकाणीं शीख हे आपल्या बाण्यानेंच वागतात. मोंगलाईच्या उत्तर काळांत स्वतंत्र राज्याची स्थापना करून हिंदुत्वरक्षणाचें कार्य जें शीख समाजानें केलें, आणि आज-सुद्धां शहीदगंज प्रकरणाचे वेळीं जें त्यांनीं तेजस्वीपण दाखविलें, तें नुसतें अभिनंदनीयच नव्हे तर अनुकरणीयहि आहे. शीख व मराठे यांचे हे असे पराक्रम चालले असतां आणि इस्लामवर त्यांनीं विजय मिळविला असतांना ज्या पाश्चात्य संस्कृतीनें हिंदुसंस्कृतीला ग्रासलें त्या ख्रिस्तप्रणीत संस्कृतीचा विचार पुढील प्रकरणांत करितों.

—*—

## प्रकरण पंचविसावें

# ख्रिश्चन संस्कृतीचें आक्रमण

(४१७) ख्रिस्तपूर्व कालः–येशू ख्रिस्त ज्या कालांत जन्मला व ज्या लोकांत जन्मला ते लोक अडाणीच होते. त्यांचीं प्रार्थनालयें म्हणजे केवळ लुटारूंच्या गुहा बनलेल्या होत्या. लोकांमध्यें धर्माची चाड बिलकुल नव्हती. धर्मग्लानि घालविण्याकरतां येशूनें चाळीस दिवस उपास केले. बुद्धभिक्षूकडून त्यानें ज्ञान संपादन केलें. बुद्धानें भिक्षूंना केलेल्या आज्ञा ख्रिस्ताच्या दशाज्ञांमध्यें आलेल्या आहेत. बौद्धांचें 'पातिमौख्य, म्हणजे स्वपातकनिवेदन वाचून ख्रिस्त्यांच्या कन्फेशनचें स्मरण होतें. बुद्धानें काशीमध्यें जीं आर्यसत्यचतुष्टयें सांगितलीं, त्यांचा व गिरिगीतेचा संबंध जमतो. ख्रिस्तपूर्वकालीं यहुद्यांमध्यें अनीतीचें, तंट्याबखेड्याचें व विषमतेचें बीज होतें. तें नष्ट करण्याजोगाच त्याचा उपदेश होता. ख्रिस्तपूर्व कालीं डोळ्याचा बदला डोळ्यानें, दातांचा बदला दातानें घ्यावा असा दंडक होता. म्हणून त्यानें प्रथम "I came not to send peace but a sword" अशी गर्जना केली. परंतु पुढें जसजशी परिस्थिति बदलत गेली तसतसे त्यानें आपल्या उपदेशांत बदल केले. शत्रूवरहि प्रीति कर, दुरुत्तरें बोलूं नकोस, राग धरूं नकोस, परमेश्वर सर्वांचा पिता आहे, सर्व माणसें आपण बंधू आहों म्हणून एका गालावर कोणीं थप्पड दिली तर दुसरा गाल पुढें कर, असें त्यानें प्रतिपादन केलें.

But I say unto you, that ye resist not evil, but whosoever shall smite thee on thy right cheek turn to him the other also.

(४१८) सामाजिक समता:–चर्चमध्यें शिरतांच अमीर व मजूर, राजा व सामान्य मनुष्य, उच्च व नीच हे सर्व बरोबरीच्या नात्यानें वागूं लागले. अस्वाभाविक जी विषमता होती, ती ख्रिस्तानें घालवून ख्रिश्चनांपुरतें तरी बंधुत्व उत्पन्न केलें. ख्रिस्ती धर्मांत विश्वबंधुत्व नाहीं. तर अन्यधर्मीयांसंबंधीं असहिष्णुताच आहे. मी सांगतों तोच मार्ग बरोबर, त्याच

मार्गानें ईश्वर भेटेल; म्हणून मजवर, माझ्या मार्गावर आणि ईश्वरावर जे विश्वास ठेवणार नाहींत ते अधोगतीला जातील असें त्यानें म्हटलेलें आहे. ईश्वर मलाच भेटला, मीच काय तो शहाणा असें अहंकारानें म्हणणें हें चमत्कारिकच दिसतें. खिस्ताचा हा अहंकार पुढील उताऱ्यांत स्पष्ट दिसतो.

'He that believeth on him is not condemned. But he that believeth not is condemned already, because he hath not believed in the name of the only begotton son of God.'

(४१९) अन्यधर्मासंबंधीं वृत्तिः—खिस्ताच्या उपदेशांत अन्यधर्मियांची निंदा आहे. त्यांविषयीं तिरस्कार आहे. जुन्या आचारधर्माप्रमाणें वागणाऱ्या तत्कालीन परुषी व शास्त्री लोकांवर तर त्यांनीं कशी झोड उठविली आहे, हें ज्ञानकोशांतील पुढील उताऱ्यावरून वाचकांचे ध्यानीं येईल.

तो म्हणतो, " इतरांसारखी व्यर्थ बडबड करूं नका. बहुभाषणामुळें आपलें मागणें मान्य होईल असें त्यांना वाटतें. खोट्या प्रवक्त्याविषयीं जपा. ते मेंढराच्या वेषानें तुम्हाकडे येतात, तरी अंतरीं ते क्रूर लांडगे आहेत; उगाच हे प्रभो, हे प्रभो म्हणणाऱ्यांना स्वर्ग मिळत नाहीं. माझ्या स्वर्गांतील बापाच्या इच्छेप्रमाणें जो वागतो, त्याला स्वर्ग मिळतो. ( म्हणजे स्वर्गांतील बाप मलाच ठाऊक आहे. इतरांना नाहीं असा आशय. ) माझें ऐकून जो त्याप्रमाणें वर्तत नाहीं तो मूर्ख. त्यानें आपलें घर वाळूवर बांधलें आहे असें समजावें. मी पृथ्वीवर शांतता चालवावयास आलों; पिता, पुत्र, सासू, कन्या यांस विरोध करण्यास आलों. असें समजूं नका. जो माझ्याकरितां जीव गमावील तो जीव राखील; व जो आपला जीव इतराकरितां राखील, तो आपला जीव गमावील."

"हे लोक ओठानें माझा सन्मान करितात परंतु त्यांचें अंतःकरण माझेपासून दूर आहे. हे ढोंग्यांनो, तुम्ही स्वर्गाचें द्वार लोकांनीं आंत जाऊं नये म्हणून बंद करतां. तुम्ही स्वतः आंत जात नाहीं. व जाणाऱ्यांना जाऊं देत नाहीं. शिष्य मिळविण्याकरतां समुद्र व भूमि फिरतां, पण मिळालेल्या शिष्याला नरकांतच ढकलतां. तुम्ही स्वतः आंधळे व लोकांसहि अंधमार्गांतच पाडतां." ( ज्ञा. को. वि. ४ पृ. २९०–२९३ )

(४२०) ख्रिस्ताचें तत्त्वज्ञानः—अन्य धर्ममतांविषयीं उदारता दाखविण्याजोगें ख्रिस्ताचें उच्च तत्त्वज्ञान नाहीं. ख्रिस्तांतक नीत्शे यानें तर 'ख्रिस्तीधर्म म्हणजे मानवजातीला तो एक शाप आहे. त्यांत जें चांगलें आहे, तें दुसऱ्या धर्मांतून घेतलें आहे,' असें म्हटलें आहे.

'The Christian concept of God is one of the most corrupt concepts of God, ever arrived at on earth.'

'In Christianity neither morality nor religion is in contact with any point of actuality.'

बायबलांतील तत्त्वज्ञान सामान्यतः पुढीलप्रमाणें आहे.

(१) मनुष्यसमाज ईश्वरानें आठ हजार वर्षांपूर्वीं आदम नांवाचा मनुष्य उत्पन्न करून चालू केला. (२) एन्जल नांवाचे देवदूत मनुष्याचें रक्षण करीत असतात. (३) सैतान नांवाचा एन्जल मनुष्याला भ्रष्ट करतो. (४) ख्रिस्तानें सर्व भूत, भविष्य व वर्तमान कालचे ख्रिस्ती मानवप्राण्यांचें पाप स्वतः प्रक्षाळून टाकलें आहे. (५) ईश्वर स्वर्गांत राहातो. (६) मृत मनुष्यें पुढें एकदां एकदम सदेह पुनरुज्जीवित होणार आहेत व त्यावेळीं पापपुण्याचा झाडा होणार आहे.

वरील सर्व विधानें तर्कदुष्ट आहेत. मनुष्य हें पापाचें फल आहे, ही कल्पनाच त्याज्य आहे. आदाम आणि ईव्ह यांनीं (आदमी व आवा) ईश्वराच्या आज्ञेचा भंग करून ज्ञानफल भक्षण केलें. म्हणजे पाप मानव-जोडप्याचें, दंड सबंध मानवजातीला, व प्रायश्चित्त येशूला! असा हा तिरबागडी न्याय आहे! पुनर्जन्मच जर नाहीं तर पुनरुत्थान कशाला! ईश्वराकडून निवाडा तरी कशाला? सर्वच वायफळ नव्हे काय? पुनर्जन्म नसेल तर नैतिक आचरण कां करावें? ईश्वराची करुणा कां भाकावी? पुण्याचरण कां करावें? याची उपपत्ति नीट लागत नाहीं. बायबलांतील ईश्वर आणि तत्त्वज्ञान तत्कालीन अल्पज्ञ व जंगली समाजसापेक्षच दिसतें, व तसें होणें स्वाभाविकच आहे.

ख्रिस्ताची शिकवण ही एका गालावर मारलें असतां दुसरा गाल पुढें करावा, अशा आशयाची असली तरी ख्रिस्ताच्या अनुयायांची वागणूक

सर्वस्वीं त्याविरुद्ध झालेली आहे. अनुयायी अनुदार व असहिष्णु असले म्हणजे धिकवर्णीतही कसा बदल होत असतो, हें पाहाण्याजोगें आहे. ख्रिस्त-प्रतिपादित सहिष्णुता ही ख्रिस्तानुयायांपुरतीच होती. इतरांकरितां ती नव्हती म्हणूनच त्याचे अनुयायी अन्याविषयीं अनुदारतेनें वागले. धर्मतत्त्वावर भौतिक आणि भौगोलिक परिस्थितीचा जसा परिणाम घडतो तसाच अनुयायांच्या वृत्तीचा व स्वभावाचाहि धर्मतत्त्वावर परिणाम होतो. एकंदरींत समाजाचा सुसंस्कृतपणा व रानटीपणा आणि धर्मतत्त्व यांचा बराचसा संबंध आहे.

(४२१) शास्त्रज्ञांचा छळ:–बायबल हा एकमेव ग्रंथ. तें ईश्वरदत्त पुस्तक, त्यांतील ज्ञान परिपूर्ण, अशा भावनेनें येशूच्या अनुयायांनीं विज्ञान-सिद्ध नवीन ज्ञान सांगणाऱ्यांचा छळ केला. भौतिकशास्त्र व विज्ञान जसजसें युरोपांत वाढूं लागलें तसतसें बायबलांतील ज्ञान डळमळीत झालें. पाद्र्यांना विज्ञानांतील शोधांनीं घाबरें केलें! त्यामुळें त्यांनीं युरोपांत मोठा कहर केला. त्यासंबंधीं एक दोन उदाहरणें देतों:—

पृथ्वी सूर्याभोंवतीं फिरते कां सूर्य पृथ्वीभोंवतीं फिरतो, ती वाटोळी आहे का चौकोनी आहे, यासंबंधीं कोपर्निकेस, गॅलीलिओ, व त्याचा शिष्य ब्रूनो ह्यांनीं शोधपूर्वक पृथ्वी सूर्याभोंवतीं फिरते व ती वाटोळी आहे असें प्रतिपादन केलें. या तिघावर पोपनें पाखंडीपणाचा आरोप केला आणि गॅलीलिओ व ब्रूनो यांचा अनन्वित छळ केला. यूरोपखंडांत या धर्मगुरूंनीं धर्ममतसंशोधनाचीं कोर्टें स्थापून सुमारें तीन लक्ष चाळीस हजार लोकांना ठार केले. सन १४८१ ते १८०८ पर्यंत त्यांनीं हा असा हाहाःकार उडविला! विज्ञानाचे सिद्धांत नष्ट करण्याकरितां व धर्मप्रसाराकरितां येशूच्या शांतताप्रिय धर्मानें जेवढा संहार केला तेवढा पुढें मुसलमान सोडल्यास कोणींहि केला नाहीं. ख्रिस्ती धर्मामुळें युरोपची प्रगति झाली नसून शास्त्रज्ञांनीं धर्मगुरूंचा भयंकर छळ सोसून व आत्मबलिदान करून जें ज्ञानप्रसाराचें कार्य अविच्छिन्न चालू ठेविलें त्यामुळेंच युरोपचा उत्कर्ष झाला.

(४२२) हिंदुस्थानचा शोध:–युरोपांतील लोक एकंदरींत बुभुक्षित म्हणून त्यांना हिंदुस्थानसारख्या समृद्ध व संपन्न देशाची हांव सुटली-

कोलंबसाचा पहिला प्रयत्न फसला, तरी वास्कोडिगामानें १४९८ मध्यें हिंदुस्थानांत प्रवेश केला. त्यानें कालिकतच्या झामोरीन राजाजवळ मसाल्याचें सामान विकत घेण्याची परवानगी मागितली. त्या भावड्याच्या ध्यानांत फिरंग्याचा कावेबाजपणा आला नाहीं. पश्चिम किनाऱ्यावर अरबलोक छलबलानें व्यापार करीत व हिंदूंना बाटवीत. वास्कोदिगामानें ते दोष टाळून हळुहळु बस्तान बसवून अल्बुकर्कला राज्य स्थापन करण्यास मार्ग मोकळा केला. पोर्तुगीजामागून डच, फ्रेंच व इंग्लिश असे आले. त्यांच्या झटापटी हिंदुस्थानांत झाल्या, त्यांत शेवटीं इंग्रजच समर्थ ठरले.

(४२३) **सेंट टॉमसः**—हा खिस्ती धर्मोपदेशक प्रथम हिंदुस्थानांत धर्मप्रसारार्थ आला. पोतुगीजांचा अंमल हिंदुस्थानांत स्थापन झाल्यावर 'सर्व पृथ्वीचें राज्य तुम्हाला देईन' हें खिस्त वाक्य सत्य ठरलें असें सेंट टॉमसला वाटलें. इमॅन्युअल राजानें सन १५०० मध्यें आरमाराबरोबर पुष्कळ पाद्री पाठवून दिले. राजानें त्यांना " धर्माची गोळी देऊन व्यापाराची झोळी अडकवा, व त्यानें काम न भागल्यास बंदुकीची गोळी घाला" असा मंत्र दिला होता. धर्माच्या नांवावर क्रौर्यानें कत्तली करणारे मुसलमान व पोर्तुगीज हे दोघेहि सारखेच क्रूर, रानटी व रक्तपिपासू होते.

(४२४) **झेवीयरची कामगिरीः**—वास्कोदिगामाला व्यापारांत यश येतांच फ्रॅन्सिस झेविअरनें १५४२ त जेसुईट पंथाची स्थापना केली. हा झेवियर साधूचें ढोंग करी, अनवाणी चाले व शाबरी विद्येनें चमत्कारहि करी. त्यानें गोवा येथें धर्ममतसंशोधनाचें कार्य इ. स. १५६० मध्यें सुरू केलें. धर्माच्या नांवाखालीं अनन्वित प्रकार करून त्यानें एकेका दिवसांत हजारों हिंदूंना खिस्ती केलें. सर्व हिंदुस्थान खिस्ती करण्याकरतां सेंट पॉल कॉलेज काढून हजारों विद्यार्थी तयार केले. मनुष्य भिन्न धर्माचा आहे येवढें समजलें मग तो पुरुष असो, स्त्री असो, त्याचे अनन्वित हाल करीत व अंधारकोठडी अगर उपासमार या शिक्षा करीत! अनेक प्रकारच्या यमयातनांनाहि लाजवतील अशा शिक्षा त्यांनीं भिन्नधर्मीयांना ठेवल्या. त्यामुळें मुंबई व वसई भागांतील लोकांवरहि गोव्याप्रमाणें कहर गुदरला.

(४२५) **वसईवर पेशव्यांची स्वारीः**—फिरंग्यांनीं साष्टी, वसई व मुंबई भागांत तीर्थें भ्रष्ट केलीं, देवळें पाडलीं, धर्मग्रंथ जाळले, हिंदूंचे

संस्कार बंद पाडले, शेंडी व जानवें यांवर ८ रुपयापर्यंत कर बसविला आणि कित्येकांना दावणींत बांधून जाळूनहि टाकलें! सन १७३४ च्या सुमारास फिरंग्यांनीं झाडून हिंदू माणसांची टीप घेतली. चौक्या, पहारे ठेवून माणसांना फिरकूं देण्याचेंहि बंद केलें. सर्वांना एकदम बाटवावयाचें अशा संकेताचा सुगावा लागतांच पेशव्यांनीं वसईवर मोहीम केली.

(४२६) **गोमांतकांतील जुलमी ख्रिस्ती कायदे**:–पोर्तुगीजांनीं सत्तेच्या जोरावर सूक्तासूक्त मार्गांनीं अनन्वित प्रकार कसे केले, सन १५४६ पासून १६७८ पर्यंत हिंदूंना जाचक असे हुकूम व कायदे कसे केले याची माहिती पं. सातवळेकरांच्या पुरुषार्थ मासिकाच्या १९३४ मधील ७ व्या व ८ व्या अंकाच्या आधारें देतों.

– मार्च १५४६ रोजीं गोव्याच्या अधिकाऱ्यास हुकूम आला तो असा:—

गोव्यांतील मूर्तिपूजेचा नाश करा, हिंदूंचीं देवळें पाडून टाका, हिंदूंना उत्सव करण्यास बंदी करा, ब्राह्मणांना हद्दपार करा व जो कोणी लांकूड, दगड किंवा धातु यांची मूर्ति करील, त्याला शक्य असेल तितकें कडक शासन करा व राज्यांतील अधिकाऱ्यांच्या सर्व जागा फक्त किरिस्तावांसच द्या. त्यांपैकीं एकहि जागा हिंदूस देऊं नका.

**२५ मार्च १५५९ चा हुकूम**:–(१) गोवें शहरांत किंवा लगतच्या प्रदेशांत जीं हिंदूंचीं देवळें असतील, तीं जाळून भस्म करण्यांत यावीं. (२) सर्व मूर्ती फोडून टाकण्यांत याव्या. यापुढें कोणीहि लांकडाची, दगडाची, मातीची, धातूची अगर कसलीहि मूर्ति करूं नये. (३) हिंदूंना यापुढें खासगी किंवा सरकारी उत्सव करूं देऊं नयेत. (४) जर एखाद्या खासगी जागेंत मूर्ति असल्याचा संशय येईल तर त्याची सर्व मालमत्ता जप्त करण्यांत यावी. (५) जे हिंदु इतकेंहि करून मूर्तींची पूजा करतील, त्यांस पकडून जबरदस्तीनें गलबतावर खलाशी करण्यांत येईल.

४ डिसेंबर १५६७ चा हुकूम:–हिंदूंनीं आपले धर्मग्रंथ आपणाजवळ बाळगूं नयेत; घरांत ठेवूं नयेत. जे ख्रिस्ती प्रवचनास हजर न राहातील

त्यांनीं अमुक दंड द्यावा. ज्यास दंड भरण्याचें सामर्थ्य नसेल त्यांना उघड्या पाठीवर वेताचे फटके मारण्यांत येतील !!

१५ डिसेंबर १५७५ चा हुकूमः—कोणीहि हिंदू शहरांतून घोड्यावर बसून, वाहनांत बसून किंवा छत्री घेऊन फिरेल तर त्याच्या त्या त्या वस्तू जप्त केल्या जातील, व वर ५० रु. दंड होईल.

१५ फेब्रुवारी १५८१ चा पोर्तुगाल राजाचा हुकूमः—एकादा हिंदु मेला तर त्याची मालमत्ता त्याचा मुलगा खिस्ती झाला तरच त्यास मिळावी. नाहींपेक्षां जो त्याचा नातलग खिस्ती होईल त्यास मिळावी.

१६७८ चा कायदाः—हिंदूंनीं आपले लग्नविधि आपल्या घरांत करावे. त्यावेळीं त्यांनीं आपल्या घराचीं सर्व दारें लावून घ्यावीं. घराबाहेर सरकार सशस्त्र पहारा ठेवील व पुरोहित वगैरेंना आंत जाण्यास बंदी केली जाईल.

याही कायद्याची दुरुस्ती झाली ती अशीः—हिंदूंनीं आपलीं लग्नें गोवें प्रांतांतील जमिनीवर करूं नयेत, तर नद्यांमध्यें होड्या घालून त्या होड्यांत करावीं, होड्यांत लग्न केलें तर त्यास सरकारची हरकत नाहीं. फक्त आसपासच्या कोणाहि किरिस्तावास हा सोहळा दिसतां कामा नये.

(४२७) अल्प प्रतिकारः—परमतसहिष्णुतेच्या उच्च कल्पनांमुळें हिंदुसमाज एकंदरींत स्वस्थच होता. हिंदुसमाजानें प्रतिकार मुळींच केला नाहीं असें नाहीं. कांहीं ब्राह्मणांनीं व राजांनींहि केलेला प्रतिकार लुला पडला. तीर्थें भ्रष्ट कर, पाणी अपवित्र कर, वाटेल तेथें क्रूस लाव असले हे प्रकार हिंदुसमाजाला अपरिचित होते. त्यामुळें मुंबई, वसई, साष्टी व चौल या भागांत पाद्र्यांनीं हिंदुसंस्कृतीवर कायमचा आघात केला. पुढें डच व फ्रेंच यांनींहि वेळ पडेल त्याप्रमाणें क्रौर्य दाखवून, हिंदूंना बाटवून राज्यस्थापना केली.

(४२८) जशास तसें वर्तनः—हिंदुसमाजानें अलीकडे शुद्धिकार्यास प्रारंभ केला आहे. त्यामुळें खिस्त्यांची संख्या आतां पहिल्यासारखी वाढणार नाहीं. मिशनऱ्यांचे यत्न मुसलमानांप्रमाणें स्त्रिया भ्रष्ट करणें, देव फोडणें, गुंडगिरीनें सतावून सोडणें असे नाहींत. तथापि शाळा, दवाखाने

व मिशनें यांचे द्वारां ते हिंदुसमाजावर छाप बसवितात. म्हणून यापुढें हिंदुसमाजानें तोडीस तोड करूनच त्यांना तोंड दिलें पाहिजे. युरोपांतील मिशनरी शिक्षक व डॉक्टर हे येथें येऊन अक्कल, कर्तृत्व, चिकाटी आणि लोकांच्या उपयोगी पडणें, यामुळें ते हिंदूंच्याच पैशावर मोठमोठ्या संस्था उभारतात. हिंदुसमाजांतील जाणत्यांनीं तोच कित्ता गिरविला पाहिजे. अखिल भरतखंडांत हिंदुसमाजांतील शूर व कर्तृत्ववान् असा आर्यसमाज मुल्ला व मिशनरी यांना तोंड देऊन शाळा, कॉलेजें, दवाखाने, अनाथालयें व महिलाश्रम इत्यादि संस्था उघडवून अटीतटीनें हें कार्य करीत आहे. परकीय सरकार ख्रिस्त्यांना सहानुभूति दाखवितें तर आर्यसमाजाला अखिल हिंदूंकडून पाठिंबा मिळत आहे. आधीं बायबलचा उपदेश, नंतर मिशन संस्था, त्यापुढें तागडी व शेवटीं मानेवर तलवार असा ख्रिस्ती कावा आहे. हिंदुस्थानांत हजारों मिशनसंस्था बाह्यतः लोकोपयुक्त कार्य करीत असल्या तरी अंतर्यामींचा हेतु ख्रिस्ती धर्मप्रसाराचा आहे. हें सर्व नीट ध्यानांत घेऊन हिंदु संस्थानिकांनीं, हिंदु धनिकांनीं आणि इतरांनीं मिशनऱ्यांच्या संस्थांना पैसा आणि जागा मुळींच देतां कामा नये. तसा आश्रय देणें म्हणजे अखंड एकजिनसी हिंदुसमाजाचे हृदयांत कायमच्या सुऱ्या खुपसण्याचें पातक करणें होय. पैसा हा अशा सर्व कार्यांचा पाया होय आणि जागा व इमारती यांमुळें त्यांचें आसन स्थिर होतें. यास्तव अशा संस्थांच्या मालकीच्या जागा, मिळकती मुळींच न होतील अशा दृष्टीनें हिंदुसमाजांतील जाणत्यांनीं आपल्या विविध संस्थांकडून त्यांचे द्वारें मिशनऱ्यांना शह दिला पाहिजे.

(४२९) **धर्म ख्रिस्ती पण संस्कृति हिंदु:**—ख्रिस्त्यांची भाषा, पोषाख चालीरीती या सर्व बाबतींत ते हिंदूशीं एकरूपच आहेत. ख्रिस्ती लोक मुसलमानांप्रमाणें हिंदुसमाजाच्या एकजिनसीपणांत भाषा, पोषाख यांमध्यें फारसा बिघाड करीत नाहींत. जातिसंस्थेची पकड तर त्यांचेवर इतकी बळकट आहे कीं ख्रिस्ती झाल्यावरसुद्धां त्यांनीं आपल्यांतील पूर्वजाति कायम ठेवल्या आहेत. ब्राह्मण कॉनव्हर्ट, क्षत्रिय कॉनव्हर्ट, शारदो कॉनव्हर्ट, सूदर कॉनव्हर्ट असे त्यांच्यामध्यें भेद आहेत. चर्चमध्यें भजन, सामुदायिक प्रसंगीं सहभोजन आणि अंतयात्रेच्या प्रसंगीं सर्व एकत्र

जमतात, जेवतात, प्रार्थना करतात पण विवाह मात्र सर्रास पाहिजे त्या जातींमध्यें होतात असें नाहीं. ब्राह्मण, क्षत्रिय, शूद्र कॉनव्हर्ट हे आपआपल्या जातीशींच लग्नें करतात. पारमार्थिक दृष्ट्या व धार्मिक दृष्ट्या सर्व ख्रिश्चन सारख्या योग्यतेचे म्हणजे सांस्कृतिक दृष्ट्या ते एक आहेत असें नव्हे. विद्या, वय, रूप, संस्कार, शिक्षण, सांपत्तिक स्थिति आणि मानमान्यता यांवरून ख्रिस्त्यां-मध्येंहि उच्चनीचता आहे. ख्रिश्चनांमध्यें जीं घराणीं पुढारलेलीं व सुसंस्कृत आहेत त्यांच्या मुलांमुलींना अनुरूप वधुवरें मिळत नाहींत. अशाशीं हिंदु-समाजांतील तत्सदृश घराण्यांनीं ख्रिस्त्यांना शुद्ध करून विवाहबद्ध होण्यास शास्त्राची मुळींच अडचण नाहीं. अखिल हिंदुसमाजांतील ज्या विविध जातींतील लोक आज ख्रिस्ती झाले आहेत त्यांच्याशीं त्या हिंदु जातींनीं हळु-हळु विवाहबद्ध होऊन त्यांना आत्मसात् केले पाहिजे. हिंदी ख्रिश्चनांच्या मागचें असलेलें द्रव्यबळ आणि मनुष्यबळ तुटलें तरी त्यांची उपेक्षा कर-ण्याची सोय नाहीं. द्रव्यबल तर तोडलेंच पाहिजे व अनेक रीतीनें शह दिला पाहिजे. पण अल्पसंख्य म्हणून उपेक्षा न करतां अखंड व एकजिनसी हिंदुसमाजांतील काळजांत रक्तशोषण करणाऱ्या ह्या जळवा आहेत, हें ध्यानीं घेऊनच हिंदुसमाजानें वागलें पाहिजे. कारण अग्नि, शत्रु व रोग ह्यांची उपेक्षा करणें चुकीचें आहे, असें नीतिशास्त्र सांगतें.

(४३०) **प्रभावी संघटनाः**–हिंदुसमाजानें ख्रिस्ती व मुसलमान यांचीं आक्रमणें जाणून ज्या वैगुण्यांमुळें तीं आक्रमणें होतात, तीं वैगुण्यें नष्ट करून प्रभावी आणि बलशाली अशी संघटना केली पाहिजे. सुसंस्कृत ख्रिश्चन व मुसलमान यांना हिंदु होण्यांत कांहीं विशेष आहे असें आकर्षक प्रलोभन उत्पन्न केलें म्हणजे अन्यधर्मियांना अहिंदु राहाण्याची लाज वाटेल ! हिंदुसमाजानें सर्व दृष्टीनें प्रबल, समर्थ, संपन्न, प्रज्ञावान, पौरुष-वान् होण्याचा यत्न केल्यास या प्रबळ समाजाचे घटक होण्यास सर्व विधर्मी लोक अहमहमिकेनें पुढें येतील. मुसलमान व ख्रिश्चन यांनीं छलबलानें हिंदूंची संख्या घटविली हें कांहीं खोटें नाहीं. पण त्याबरोबरच हिंदुसमाजांतील कांहीं खालच्या जातींना हिंदुसमाजा-पासून होणाऱ्या त्रासांतून सुटण्याकरतां ख्रिश्चन व मुसलमान होणेंच बरें वाटलें हें कांहीं खोटें नाहीं. उच्चता, नीचता, शिवाशीव,

अस्पृश्यता यांचा जन्माशीं कडक संबंध ठेवल्यामुळें हिंदुसमाजाची संख्या घटलेली आहे! व्यथाशल्यामुळें हिंदुसमाजाचे अनेक घटक दुरावले आहेत. हीं सर्व शल्यें, हे सर्व दोष, ही सर्व बोच नष्ट करून समता, बंधुता व स्वातंत्र्य या सूत्रत्रयीवर अखंड हिंदुसमाज अधिष्ठित झाला पाहिजे. तरच त्याचें बल वाढेल.

(४३१) **आक्रमक वृत्तिः**–खिश्चन व मुसलमान या आक्रमक धर्मांशीं टक्कर देण्याकरतां आपला धर्म दुसऱ्यास देण्याचें धोरण पतकरलें पाहिजे. पूर्वी हिंदुधर्म हा आक्रमणशील होता. विश्वाला आर्य करण्याची त्याची महत्त्वाकांक्षा होती. सर्व मानवांना वेद, धर्म आणि संस्कृति देऊन मानव्याचा विकास करणें हें ध्येय एका काळीं होतें. पण बुद्धोत्तर कालांत संकुचित विचार, सहिष्णुता आणि व्यष्टिधर्म हीं फार वाढल्यामुळें हिंदुसमाज दुर्बल बनलेला आहे. मुल्लांना व मिशनरींना, कुराण व बायबल हे ग्रंथ सर्वांना देऊन धर्मप्रसार करण्यास मोठा उत्साह वाटतो. ते त्याकरतां बद्धपरिकर होऊन मोठ्या अभिनिवेशानें पुढें येत आहेत. अशा वेळीं हिंदूंतील तरुणांनीं वेद व गीता हे ग्रंथ हातांत घेऊन मानव्याच्या विकासाकरतां मोठ्या अहमहमिकेनें पुढें आलें पाहिजे. हिंदुसमाजाला आक्रमणशील करण्याकरतां एका बाजूनें हिंदुसमाजांत सांस्कृतिक दृष्ट्या एकरूपता आणली पाहिजे. अखिल हिंदूंना वेदाधिकार, सर्वांचा एक ग्रंथ, एक मंत्र, एक संस्कार, असे ठरवून ते कृतींत आणावयास पाहिजेत. हिंदु समाजांतील सामाजिक विषमता नष्ट करून आणि सांस्कृतिक समता उत्पन्न करून प्रत्येक घटक स्वाभिमानी आणि तेजस्वी झाला तरच शेजारच्या आक्रमकांना तोंड देतां येईल. खिश्चन व मुसलमान समाजांत सामाजिक व सांस्कृतिक दृष्ट्या बरीच समता आहे हें विसरून चालणार नाहीं. याप्रमाणें हिंदुसमाज बाहेर आक्रमणशील आणि आंत संघटित व समर्थ बनला तर अन्यधर्मियांची संख्या मुळीं रहाणारच नाहीं आणि जी थोडी राहील त्यांना अल्पसंख्य समजून शेजारधर्माप्रमाणें त्यांना बायबली हिंदु किंवा खिस्ती हिंदु या नांवानें राहाण्यास पूर्ण मोकळीक द्यावी.

राष्ट्रसंघानें ठरविलेले अल्पसंख्याकांचे नियम अशा विधर्मियांना लागू करावेत. कारण रक्त, वंश, संस्कृति, आचार, भाषा व पोषाक या सर्व

दृष्टींनीं ख्रिश्चन हे अखंड हिंदुसमाजांतील हिंदुसदृश घटक आहेत. यास्तव त्यांना हिंदुसमाजाशेजारीं शेजारधर्मानें "बायबली हिंदु" म्हणून नांदण्याचा हक्क आहे. त्याच्या आड हिंदुसमाज कधींहि येणार नाहीं.

पाश्चात्य संस्कृतीचे प्रतिनिधि जे इंग्रज त्यांनीं राज्य कसें जिंकिलें व हिंदुसंस्कृतीला खग्रास ग्रहण कसें लावलें याचा विचार क्रमप्राप्त म्हणून पुढील प्रकरणांत करतों.

—*—

## प्रकरण सव्विसावें

# इंग्रजांशीं लढाई व स्वातंत्र्यनाश

गेल्या प्रकरणांत ख्रिश्चन संस्कृतीचें पोर्तुगीजांच्या द्वारें प्रथम कसें आक्रमण झालें तें सांगितलें. प्रस्तुत प्रकरणांत ख्रिश्चन संस्कृतीनें इंग्रजांचे द्वारें हिंदुसंस्कृतीला कसें खग्रास ग्रहण लावलें, हें पहावयाचें आहे.

**(४३२) इंग्रजांचे दोन शत्रु:**—१७७० च्या सुमारास इंग्रजांनीं बंगाल प्रांत हस्तगत केला. दिल्लीच्या बादशहाला शह दिला. फ्रेंचांचा मोड केला व निजामाला त्यांनीं आपलासा केलें. यापूर्वी त्यांचा पेशा केवळ व्यापारी होता. हिंदुस्थानांतील राजेरजवाड्यांकडे नजराणे पाठवावे, वकील पाठवावे, जकाती माफ करा असें म्हणावें व व्यापारी सवलती मिळवाव्या असें त्यांचें धोरण होतें. हिंदुस्थानांतील कोणाच्याहि भांडणांत आम्हांस पडावयाचें नाहीं आणि कोणाचाहि मुलूख हस्तगत करावयाचा नाहीं, असें ते भासवीत असत. दक्षिणेंत हैदर व वर उत्तरेंत मराठे असे हे दोनच इंग्रजांना १७७० च्या पुढें शत्रु उरले होते.

**(४३३) इंग्रजांचा पराभव:**-वडगांवची लढाई राघोबाचा पक्ष घेऊन इंग्रजांनीं मराठ्यांशीं केली. त्या लढाईत इंग्रज हरले. युनियन जॅकला

भगवा झेंडा व जरीपटका यापुढें वाकणें भाग पडलें. इंग्रजांनीं नाइलाजानें मराठ्यांशीं तह केला व राघोबास पेशव्यांचे स्वाधीन केलें. या तहास कलकत्त्याच्या इंग्रजांनीं अमान्यता दर्शविली. राघोबा पुन्हा पळून इंग्रजांना जाऊन मिळाला. त्याला हाताशीं धरून इंग्रजांनीं मराठ्यांशीं पुन्हां युद्ध चालू केलें. पुण्यावर चालहि करण्याचा यत्न केला, पण दोन्ही वेळां त्यांना मार खावा लागला. इंग्रज–मराठ्यांच्या या पहिल्या युद्धांत इंग्रजांना साष्टी-शिवाय सर्व मुलूख आणि राघोबाला मराठ्यांच्या स्वाधीन करावें लागलें. यावेळीं हिंदुसंस्कृति ही प्रबळ होती म्हणून तिनें इंग्रजांशीं टक्कर दिली.

(४३४) चार कालखंडः–'मराठे व इंग्रज' या ग्रंथाचे कर्ते श्री. केळकर यांनीं पान ४५ वर इंग्रज व मराठे यांच्या झटापटीचे चार कालखंड दिले आहेत ते असेः—

(१) १६४८ ते १७७४ या कालांत इंग्रज अधिक लगट करूं लागले. मराठ्यांच्या वरचढपणाला त्यांनीं शह दिला आणि साष्टी बळकाविली.

(२) १७७४ ते १७८४ वडगांवास इंग्रजांनीं मार खाल्ला. त्यामुळें ते सावधपणें दोन पावलें मागें सरले.

(३) १७८४ ते १७९६ मराठ्यांकडील नामवंत वीर महादजी शिंदे, हरिपंत फडके मृत्युमुखीं पडले. डिवाईन स्वदेशीं गेला. त्यामुळें मराठे कमजोर झालेले पाहून इंग्रजांनीं चढाईची सिद्धता केली.

(४) १७९६ ते १८१८ शेवटीं मराठ्यांवर डाव येऊन मराठेशाही समाप्त झाली. १७८४ ते १७९६ या कालांत इंग्रज व मराठे दोघे बरोबरीचे होते. दोघांनीं मिळून टिपूला मार दिला होता. सवाई माधव-रावाच्या कारकीर्दींत निजामचा मोड झाल्यामुळें हिंदुसंस्कृतीच्या उत्कर्षाचा कळस झाला होता. इंग्रजांनीं आपला दोस्त निजाम याला पेशव्यांच्या भीतीमुळें कांहीं साह्य केलें नाहीं. टिपूच्या निःपातामुळें इंग्रजांना दक्षिण निष्कंटक झाली होती. उत्तरेकडे सत्ता महादजी शिंदे यांच्या हातांत व व्यापार इंग्रजांच्या हातांत अशी स्थिति होती! नाना व महादजी यांच्या मृत्यूनंतर रावबाजीच्या नादानपणामुळें आणि शिंदे–होळकरांच्या अंतःकलहाग्नीमुळें हिंदुसंस्कृतीला पाश्चात्य संस्कृतीपुढें नामोहरम व्हावें लागलें.

(४३५) मराठेशाही बुडाल्याचीं कारणें:-अनेक विद्वानांनीं या विषयाची विचिकित्सा करून सुमारें बारातेरा कारणें दिलेलीं आहेत. त्यांपैकीं कांहीं कारणांचीच चर्चा प्रस्तुत प्रकरणांत करावयाची आहे. तीं कारणें अशीं:—

(१) मराठ्यांनीं इंग्रजांची मदत घेतली. (२) मराठ्यांचें व्यापारी धोरण चुकलें. (३) मराठे व ब्राह्मण यांचा परस्परांत मत्सर होता. (४) ज्ञातिभेद. (५) मध्यवर्ती सत्तेचा अभाव. (६) सरंजामी पद्धति. (७) स्वार्थाची बेसुमार हांव. (८) सवत्या सुभ्याची आवड. (९) जुटीचा व शिस्तीचा अभाव. (१०) समूहानें कार्य करण्याची नालायकी. (११) परस्परांवरील अविश्वास. (१२) देशाभिमानाचा अभाव. (१३) भौतिकशास्त्रें व पल्लेदार शस्त्रें यांचा अभाव. इ.

(४३६) स्वार्थाची बेसुमार हांव:-ही जशी मराठ्यांत होती तशी इंग्रजांतहि होती. कंपनीचे नोकर म्हणून आलेल्या इंग्रजांनीं जसा कंपनीचा अर्थ साधला तसाच स्वतःचाहि अर्थ साधला! बंगालमध्यें इंग्रजांनीं केलेले सर्व व्यवहार अत्यंत लबाडीचे आणि लांछनास्पद असे होते. इंग्रज बंगालची नबाबगिरी एकाकडून काढून लांच खाऊन ती दुसऱ्यास विकीत. नबाबाला बादशहाविरुद्ध चेतावणी देऊन पैसे काढीत. कंपनीच्या व्यापाऱ्याला जकातीची माफी असे. पण प्रत्येक इंग्रज त्या माफीचा फायदा घेऊन खासगी व्यापार करूं लागले आणि पैसे घेऊन माफीचीं दस्तकेंहि विकूं लागले. प्रत्येक इंग्रजाची द्रव्याची हाव किती अनावर झाली होतीं हें पुढील उदाहरणावरून समजेल:—

लेस्टर्न हचिन्सन् या लेखकानें शॉर्ट हिस्ट्री ऑफ ब्रिटिश इंडिया ह्याच्या सेरीजमध्यें दि एंपायर ऑफ नबाबस् असें एक पुस्तक लिहिलें आहे. त्यांतील पान ७९ ते १०२ पर्यंत इंग्रजांनीं केलेल्या लुटीची माहिती दिलेली आहे. कंपनीच्या ऑफिसांत एक पत्रव्यवहारज्ञ लेखक लागत असे, त्याला पगार किती व कसा द्यावयाचा याबद्दल तो म्हणतो,

"Writer's place to Bengal.........for which one thousand guineas will be given. There is not a third

person in this business and the money is ready to be paid down without any written negotiation."

'लेखकाला १००० गिनी कोणालाहि न कळत आणि कोणत्याहि लेखी करारमदाराशिवाय देण्यांत येतील' असा याचा आशय आहे. इंग्रजांच्या अशा द्रव्याच्या हावेमुळें बंगाल प्रांत भिकारी झाला. लॉर्ड क्लाईव्ह व त्याच्या प्रभावळींतील अधिकारी यांनीं इतकी लांच खाल्ली कीं विश्वासघात, नीच कर्मे आणि लांचखाऊपणा यांमुळें लॉर्ड क्लाइव्हवर शेवटीं गहजब झाला. आणि त्याच नाचक्कीमुळें त्यानें शेवटीं आत्महत्या केली.

(४३७) कोष्ट्यांचे आंगठेहि तोडले:–वॉरन् हेस्टिंग्ज व त्याचा साथीदार इंपे यांचीं कृत्यें तर कपटानें, स्वार्थानें, आणि नीचपणानें इतकीं भरलेलीं आहेत कीं हेस्टिंग्ज याला आत्महत्येसारख्या दुःखाच्या वेदना होऊनच तो त्यांत वारला ! लॉर्ड कॉर्नवालीसचे वेळेस ईस्ट इंडिया कंपनी म्हणजे भांडवलवाल्यांची एक सोनेरी टोळी होती. दरमहा एक हजार रुपये पगारावर नेमलेल्या बनारसच्या रेसिडेंटची पगाराखेरीज दरसालची प्राप्ति चार लक्ष होती. कंपनीच्या नोकरांनीं लठ्ठ लठ्ठ पगार खिशांत टाकून आणि लांच खाखाऊन स्वार्थांधतेनें देश लुटून फस्त केला ! नबाबाचें जकातीचें उत्पन्नहि नष्ट करून व्यापार सफा बुडविला. संपत्तीस तर ते इतके लालचावून गेले होते कीं त्याकरतां ते कंपनीचा बोजवाराहि उडविण्यास सिद्ध असत. मराठ्यांपेक्षां कंपनीच्या इंग्रज नोकरांचा स्वार्थ इतका बेसुमार होता कीं त्यांनीं व्यापारवृद्धीकरतां बंगाल्यांतील कारागिरांना दंड करून, कैदेंत टाकून, फटके मारून आणि शेवटीं त्यांचे आंगठे तोडूनहि त्यांस निकामी केलें. याप्रमाणें बंगालची दैना उडवून चार दोन वर्षांत जन्मोजन्मीं पुरेल इतकी संपत्ति त्यांनीं मिळविली.

रमेशचंद्र दत्त यांनीं इंडिया अंडर ब्रिटिश रूल या ग्रंथाच्या दुसऱ्या भागांत पान १८ वर पुढील माहिती दिली आहे. त्यावरून हे कंपनीचे नोकर किती निर्दय होते, याची कल्पना येईल.

The roguery practised in this department is beyond imagination. But all terminality in the defrauding the poor weaver for the prices which the

company's gumastas fix upon the goods. Weavers also upon their inability to perform such agreements as have been forced upon them by the company's agents universally known in Bengal by the name of Mutchulka have had their goods seized and sold on the spot to make good the deficiency and the winders of raw silk called nagodas have been treated also with such injustice that instances have been known of their cutting off their thumbs to prevent their being forced to wind silk.

तात्पर्य मराठे हे स्वार्थी होते, असें नसून इंग्रजहि स्वार्थी होते. मराठ्यांमध्यें फूट होती आणि इंग्रजांमध्यें एकजूट होती असेंहि नाहीं. इंग्रजांमधील एकजूट ही चोर व लुटारू यांच्यासारखी होती. हिंदुस्थानला लुटण्यापुरते ते सर्व एक होते. आपआपसांत मत्सर, मारामाऱ्या, द्वेष, कोणी कोणाचें न ऐकणें, हे सर्व दोष इंग्रजांमध्यें होतेच म्हणून केवळ स्वार्थामुळें व मत्सरामुळेंच मराठेशाही बुडाली असें विधान करतां येत नाहीं.

(४३८) **देशाभिमानाचा अभावः**—देशाभिमान ही वृत्ति विशिष्ट यांत्रिक परिस्थितीमुळें उत्पन्न होते. एक यंत्र हजारों लोकांना निकामी करतें. शास्त्रें व शोध यांमुळें उत्पादन खूप होतें व तें दुसऱ्या देशाच्या गळ्यांत अडकवून स्वतःचा देश संपन्न करण्याच्या खटाटोपास देशाभिमान म्हणतात. राष्ट्राभिमान, देशाभिमान आणि राष्ट्रियता या सर्व वृत्तींचा विकास सर्व जगांतच १५ व्या शतकापासून झालेला दिसतो. देशाभिमान उत्पन्न होण्यास जी एक भौतिक व भौगोलिक परिस्थिति असावी लागते ती युरोपांत निर्माण झाली होती म्हणून इंग्रजांमध्यें देशाभिमान होता. तशी परिस्थिति हिंदुस्थानांत नव्हती. इंग्रजांप्रमाणें मराठ्यांत देशाभिमान मुळींच नव्हता असें नाहीं. धर्माभिमान तर मराठ्यांमध्यें चांगलाच होता.

(४३९) **शास्त्रीय ज्ञानाचा अभावः**—इंग्रजांमध्यें शास्त्रीय ज्ञान, पल्लेदार शस्त्रें वापरण्याचें ज्ञान, संघटना आणि यंत्रणा यांचें ज्ञान विशेष होतें. इंग्रजांच्या उच्चतर शास्त्रीय ज्ञानापुढें ब्राह्मणमराठ्यांचें ज्ञान फिकें

पडलें. इंग्रजांच्या नसानसांमध्यें शास्त्र व शिस्त हीं खेळत होतीं. मराठ्यांचा पिंड शास्त्रीय नव्हता. मराठ्यांचें बल परकीयांच्या शस्त्रावर उभारलें होतें, तर इंग्रजांचें बल त्यांच्या आंगचें होतें. कल्पकता, घोरण, दूरदृष्टि आणि शास्त्रीयज्ञानसंपन्नता या गुणांनींच इंग्रजांनीं मराठ्यांना नामोहरम केलें. मराठ्यांप्रमाणें इंग्रजांमध्येंहि स्वार्थ, लोभ, मानभावीपणा, कपटपटुता, अन्यायीवृत्ति इत्यादि दुर्गुण होते. तर मराठ्यांमध्येंहि इंग्रजांप्रमाणें चातुर्य, मुत्सद्देगिरी, बुद्धिमत्ता, कर्तृत्व व चतुरस्रता हे सद्‌गुण होते. पण मराठ्यांपेक्षां इंग्रजांमध्यें शिस्त, दूरदृष्टि, धिमेपणा, करारीपणा, चिकाटी, कर्तव्यनिष्ठा इत्यादि गुण खरोखर लोकोत्तर असे होते. म्हणूनच इंग्रजांनीं अत्यंत प्रतिकूल परिस्थितीमध्यें येथील राज्य बळकाविलें. शस्त्रास्त्रां-मधील श्रेष्ठत्व व सुधारलेल्या शस्त्रांचा प्रभाव मराठे जाणत नव्हते, असें नाहीं. पण तीं शस्त्रें पाश्चात्यांपासून विकत घेण्यापलीकडे त्यांनीं कांहीं केलें नाहीं. आजचे आपले शस्त्रदाते जर उद्यां आपले शत्रु झाले तर ते शस्त्रास्त्रें विकत देतील काय ? आणि जरी त्यांनीं दिलीं तरी तीं कमी शक्तीचींच देतील म्हणून शस्त्रांचे कारखाने व भौतिकशास्त्रप्रयोगांच्या शाळा काढून राष्ट्र शास्त्रें व शस्त्रें यानें संपन्न केलें पाहिजे. ही कल्पना तत्कालीन मुत्सद्यांच्या मनांत येऊन मोठमोठे कारखाने निघाले असते, तर हिंदुस्थानच्या नकाशाचा रंग बदलावा लागला असता. महादजी शिंदे व नाना फडणीस या दूरदृष्टि मुत्सद्यांच्यासुद्धां डोक्यांत पाश्चात्य शास्त्रें व विद्या यांचें शिक्षण देण्याकरतां विद्यालयें काढण्याची कल्पना आली नाहीं. कवायती पलटणी अधिक उपयुक्त असें ध्यानीं येतांच पाटीलबुवांनीं अनेक परक्यांना आपल्या पदरीं नोकरीस ठेविलें. कवायती सैन्याच्या जोरावर त्यांनीं उत्तरेंत दरारा बसविला, परंतु राष्ट्राचें दुर्दैव म्हणूनच त्यांना शस्त्रें व शास्त्रें तयार करण्याची बुद्धि झाली नाहीं.

(४४०) ईश्वरी प्रकोपः—मराठेशाहीच्या ऱ्हासाला ईश्वरी प्रकोप, दुर्दैव अशीं कारणें कोणी देतात. अंशतः तीं खरींहि आहेत. हरिपंत फडके, नाना फडणवीस, महादजी शिंदे, असे थोर थोर मोहरे एकामागून एक दिवंगत झाले तर दुसऱ्या बाजूनें इंग्रजांचे मोठमोठे मुत्सद्दी व लढवय्ये पुढें आले. मराठ्यांतील कर्ती माणसें भराभरा नष्ट झालीं आणि त्याच

वेळीं इंग्रजांपैकीं महान् कर्तृत्ववान् माणसें एकामागून एक पुढें आलीं. कोण-त्याहि समाजांत एकामागून एक, एकसारखीं कर्तीं माणसें उत्पन्न होतात असें नाहीं, तथापि शिस्त, संघटना, यंत्रणा व नियम यांमुळें म्हणजे संस्था-यंत्रामुळें नाकर्ता मनुष्यहि कर्ता होतो. इंग्रजांतील नाकर्त्यांना कर्तृत्ववान् बनविण्याला त्यांच्या संस्था कारणीभूत झाल्या. शिस्त व नियमबद्धता यांचें संस्थायंत्र जर मराठ्यांमध्यें असतें, तर त्या संस्थेनें कर्तीं माणसें पुरविलीं असतीं. थोरल्या माधवरावांचा अकालीं मृत्यु हा दुर्दैवाचा घाला होता. इंग्रजांशीं युद्धकलेंत तोडीस तोड देणाऱ्या फ्रेंचांनीं मराठ्यांस मदत करण्याचें एकदम बंद केलें. त्यावरून त्याला काळमहिमा असें म्हणतां येणार नाहीं. पेशवाईच्या अंतकाळीं थोर थोर मुत्सद्दी एकामागून एक मृत्युलोकीं गेले. हा दुर्दैवाचा घाला निःसंशय होताच, परंतु अव्यवस्थितपणा, अंतःकलह, भोळसटपणा, देशाभिमानाचा अभाव, युद्धकौशल्य, शिस्त व संघटणा यांचा अभाव हीं खरोखरीच हिंदुसंस्कृतीच्या ऱ्हासाचीं इंग्रजांच्या संघर्षांत मुख्य कारणें होतीं, हें नाकबूल करण्यांत अर्थ नाहीं.

**(४४१) धर्मवेडे नबाबः**— इंग्रज आले त्यावेळीं त्यांचे ग्रह खरो-खरीच इतके उच्चीचे होते कीं त्यांचें स्वागत भरतखंडांतील सर्व लोकांकडून केलें गेलें. शेवटचा रावबाजी हा नाकर्ता होता; त्याच्या राज्याला सर्व प्रजा कंटाळली होती. आपसांतील वैमनस्यामुळें मराठ्यांविरुद्ध सर्वसामान्य जनता धुमसत होती. बंगाल, अयोध्या, कर्नाटक, हैद्राबाद, अशा ठिकाणींहि धर्मवेड्या व जुलमी मुसलमानांचीं राज्यें होतीं. त्यांना दूरदृष्टि मुळींच नव्हती. इंग्रजांसारखा प्रबळ शत्रु मानगुटीवर बसत असतांना या धर्मवेड्या नबाबांना हिंदूंना छळण्याशिवाय कांहीं दिसत नव्हतें. क्लाइव्ह तर एका पत्रांत लिहितो कीं "नबाब व त्याचे सुभेदार यांविषयीं लोकांना मुळींच आदर वाटत नव्हता, कारण त्यांच्या हातीं सत्ता असतांना लोकांना जीविताची व वित्ताची मुळींच शाश्वती वाटत नव्हती. कारण हे नबाब हिंदुप्रजेचा अनन्वित छळ करीत." ( ब्रि. रि. उ. पृ. २३ ) या सर्व जुलमाला कंटाळलेल्या लोकांना इंग्रजी राज्य बरें वाटलें यांत आश्चर्य तें काय?

**(४४२) अंदाधुंदीचें राज्यः**—धर्मवेड्या आणि मूर्ख नबाबांच्या

राज्यामध्यें कशी अंदाधुंदी चाले, यासंबंधीं इतिहासकार सरदेसाई यांच्या ग्रंथांतून दोन उतारे देतों.

'व्यसनें, उधळपट्टी, कर्जबाजारीपणा या दैन्यांत प्रत्येक नबाब होता. दारू व अफू यांचीं व्यसनें सर्वांना होतीं. अयोध्येचा असफउद्दौला तर संध्याकाळ झाली कीं झिंगून पडे. कोंबड्यांची झुंज, हत्तीच्या टकरा, घोड्यांच्या शर्यती, व भोंवतालीं सर्व हलकटांचें मंडळ हे त्यांचे करमणुकीचे प्रकार होते. या नबाबांना इंग्रज सावकार कर्ज देत व कर्जफेडीकरितां प्रांताचा वसूल लावून घेत. वसूल करीत असतांना इंग्रज सावकार रयतेचा अनन्वित छळ करीत. व्याजाचा दर दरसाल दर शेंकडा छत्तीस ते अठ्ठेचाळीसपर्यंत असे. पामर कंपनी व निजामांचें कर्ज, सर जॉन शोअर व अर्काटच्या नबाबाचें कर्ज, अयोध्येच्या चैनी व विलासी नबाबाचें कर्ज हे विषय त्यावेळीं पार्लमेंटमध्यें चर्चेला आले होते. राज्यांत अंदाधुंदी अतिशय होती. रजपूत व मराठे यांच्या राज्यांत अव्यवस्था असली तरी, या मुसलमान नबाबांच्या मानानें कांहींच नव्हती असें म्हणावें लागेल.

( ब्रि. रि. उ. पृ. २२३ )

या नबाबाच्या राज्यांत कसा कारभार चाले याबद्दल डलहौसी लिहितो, "अयोध्या प्रांताची दुःस्थिति फार जाहली आहे. जिकडे तिकडे अव्यवस्था, खून, मारामाऱ्या, अंदाधुंदी इत्यादींचा नंगा नाच सुरू आहे. तो डोळ्यांनीं पाहवत नाहीं."

( ब्रि. रि. उ. पृ. ४७२ )

इंग्रज आले त्यावेळीं लोक तत्कालीन परिस्थितीला किती कंटाळले होते याचें एक मुख्य उदाहरण देतां येईल. सन १८२३ सालीं राजा राममोहन रॉय वगैरे बंगाली पुढाऱ्यांनीं इंग्लंडच्या राजाकडे मुद्रणस्वातंत्र्याकरितां जो अर्ज केला त्यांत "अनेक शतकें मुसलमानांच्या प्रभुत्वाखालीं मूळच्या रहिवाश्यांचे नागरिक हक्क वरचेवर तुडविले जात होते, ते इंग्रज आल्यामुळें आतां भोगण्यास मिळत आहेत," असें लिहिलें आहे. मानवी हक्क व नागरिकत्वाचे हक्क कोणते होते, याची कल्पनाहि पूर्वीं नव्हती, असा त्याचा अर्थ आहे.

(४४३) **निजाम व तैनाती फौजः**—निजामअली व त्याचा दिवाण हे तर मराठ्यांविषयीं अगदीं द्वेषानें जळत असत. मराठ्यांचा पाडाव करण्याकरितां निजाम वाटेल तें नुकसान सोसण्यास सिद्ध आहे, हें पाहतांच कर्नल वेलस्लीनें रेसिडेंटमार्फत त्याजवर मोहिनी टाकली आणि दोस्तीच्या मिषानें तैनाती फौज त्याच्या गळ्यांत अडकविली. केवळ मराठ्यांचा पाडाव करावा म्हणून निजामानें पंख उपटलेल्या पक्ष्याप्रमाणें ही स्थिति कबूल केली, पण शेवटीं मराठ्यांचा पाडाव होऊं शकला नाहीं ! !

(४४४) **ब्राह्मण व इंग्रजः**—इंग्रजांनीं येथील परिस्थितीचें सूक्ष्म निरीक्षण करून एकेका वर्गाला हाताशीं धरलें. ब्राह्मणवर्ग हा सोवळें ओवळें व व्रतें—उद्यापनें यांत गुरफटलेला होता. जो राज्यकर्ता आहे, तो विष्णूचा अंश असें समजून हा वर्ग स्वस्थ असे. आपल्या स्नानसंध्येंत, कर्मठपणांत आणि सोवळ्यांत व्यत्यय न आला म्हणजे मग राष्ट्राचें कांहीं होवो ! आपलें घर सोवळें ठेवून भागत नाहीं, देश सोवळा राखला पाहिजे. परक्यांचा विटाळ देशाला होऊं देतां कामा नये हें ब्राह्मण विसरले होते. रावबाजीच्या अंदाधुंदीच्या कारकीर्दीनंतर इंग्रजांची सुव्यवस्थित कारकीर्द स्नानसंध्याशील ब्राह्मणांना फारच प्रिय वाटली.

(४४५) **क्षत्रिय व इंग्रजः**—इंग्रजांच्या सैन्यांत बहुसंख्य हिंदु होते, क्षत्रिय व रजपूत होते. हे सर्व लोक शूर, धीर, पराक्रमी व स्वामिनिष्ठ होते. इंग्रजांची नोकरी हे इमानेंइतबारें करीत. लढाऊ वर्गांत देशाभिमान नव्हता. देशाभिमान व देशप्रेम या कल्पनाच या वर्गांत नव्हत्या. हे क्षत्रिय स्वामिनिष्ठ होते. जो पगार देईल त्या स्वामीकरितां ते निष्ठेनें लढत. ती निष्ठा नष्ट झाली म्हणजे वाटेल तिकडे जात. अशा या सैनिकांना खूष ठेवण्याची इंग्रजांनीं दोन साधनें शोधून काढलीं होतीं. तीं म्हणजे भरपूर व महिना संपतांच नियमित पगार देणें आणि त्यांच्या जातीय धर्माला व वेडगळ भासणाऱ्या समजुतींना धक्का बसेल असें कोणतेंहि कृत्य न करणें. इंग्रजांनीं हीं दोन तंत्रें संभाळून लढवय्या वर्गाला म्हणजे क्षत्रियांना खूष ठेवल्यानें त्यांना इंग्रज हा आपला शत्रु आहे असें कधींच वाटलें नाहीं.

(४४६) **वैश्यवर्ग व इंग्रजः**—इंग्रज आले त्यावेळीं वैश्यवर्ग राजकारणविमुख होता. कोणी का राजा असेना आपला व्यापार व आपलीं

देवळें जो कोणी सुरक्षित राखील त्यास ते साहाय्य करीत. बंगालमधील व्यापार तर पूर्णांशानें जैन पेढ्यांच्या हातीं होता. हे पेढीवाले मुसलमानी सत्तेला व अंदाधुंदीला अगदीं कंटाळले होते. त्यामुळें व्यापाराकरितां आलेल्या युरोपियनांशीं हितसंबंध एक झाल्यानें त्यांची व्यापारी गट्टी जमली! कंपनीच्या नोकरांनीं या सधन व्यापारी वर्गाला हाताशीं धरलें आणि मुसलमानांविरुद्ध त्यांच्या धर्मभावनेचा त्यांनीं उपयोग करून घेतला. जैन व्यापाऱ्यांनीं इंग्रज व्यापाऱ्यांना कशी मदत केली यासंबंधीं ( भा. इ. सं. मं. त्रैमासिक वर्ष ६ पृ. १५७ मध्यें ) श्री. शेज्वलकरांनीं दिलेली माहिती पुढीलप्रमाणें आहे:—

'गुप्त या नांवाचें एक जैन पेढीवाल्याचें घराणें ब्रिटिशांचा राज्यविस्तार हिंदुस्थानांत करण्यास उपयोगी पडलें. यानें देवालयें बांधण्यांत खूप पैसा खर्च केला होता. प्रत्येक लढाईचे वेळीं आधीं व नंतर इंग्रजांना माहिती पुरवून द्रव्याचें साहाय्य देण्याचा आणि त्यांचा शांततेचा अम्मल स्थिर करण्याचा उद्योग या घराण्यानें केला. लॉर्ड क्लाइव्हपासून तों लॉर्ड कॅनिंगपर्यंतच्या सर्व अधिकाऱ्यांनीं या गुप्त घराण्याच्या पेढीनें माहिती देण्याची जी कामगिरी केली, तिजबद्दल प्रशंसा केली आहे. या पेढीचें जाळें सर्व हिंदुस्थानभर पेरलें होतें. आमच्या धर्मांत हात घालूं नये, आमचीं देवळें सुरक्षित ठेवावीं व आमच्या व्यापारास उत्तेजन द्यावें एवढीच यांची इच्छा असे. उमीचंद, जगत्शेट हे मारवाडी या गुप्त घराण्याचे संबंधी होते. या गुप्त पेढीनें अन्य व्यापाऱ्यांकडून आपापसांत पन्नास लक्ष रुपये जमवून इंग्रजांना माहिती देण्याकरितां टपाल—खातें उघडलें. इंग्रजांच्या अंमलाखालीं रयतेला आणण्याचा यत्नहि यांनींच केला. ग्वाल्हेरचा किल्ला घेण्यास सवाई शिकंदर स्वरुपचंदानें चोरवाट सांगून मदत केली. १८१७ सालीं खडकीच्या लढाईत महत्त्वाच्या व गुप्त बातम्या या गुप्तांनींच दिल्या, म्हणूनच त्यांना जय मिळाला असें जॅकिन्स लिहितो. तात्पर्य, व्यापार वाढविण्याच्या आशेनें इंग्रजांस साह्य करण्यांत व्यापारी वर्ग राष्ट्रद्रोह करून पुढें सरसावला होता. कंपनीचें राज्य होतांच या वर्गाला फार आनंद झाला. गुजराथच्या व्यापाऱ्यांनाहि इंग्रजी राज्य सुखाचें वाटलें.'

(४४७) **सरंजामदार व इंग्रजः**–इंग्रजांनीं दुसऱ्या बाजीरावाचा पराभव करून त्यास ब्रह्मावर्तास ठेविलें. त्यामुळें महाराष्ट्रांतील संस्थानिक, जहागिरदार, इनामदार, सरंजामदार या सर्वांना आनंद झाला. बाजीरावाविषयीं या सर्वांना तिटकारा उत्पन्न झाला होता. पेशव्यांची ताबेदारी पुष्कळांना नको होती म्हणूनच त्यांनीं फितूर होऊन पेशव्यांना दगा दिला व इंग्रजांकडून आपले सरंजाम, जहागिरी, इनामें सुरक्षित करून घेतलीं! इंग्रजाबद्दल या वर्गांत द्वेष नव्हता म्हणूनच त्यांना बाजीरावाची उचलबांगडी होतांच परमहर्ष वाटला. मुंबईचा दुसरा गव्हर्नर सर जॉन मालकम् यानें या राष्ट्रद्रोही, धर्मद्रोही व स्वामिद्रोही सरदारांची त्यांनीं ब्रिटिशांशीं एकनिष्ठता दाखविली म्हणून प्रशंसा केलेली आहे.

(४४८) **छत्रपति व इंग्रजः**–सातारचे छत्रपतिहि पेशव्यांचेवर असंतुष्टच होते. इंग्रजांनीं मोठ्या धूर्तपणानें त्या असंतोषाचा लाभ घेतला. सातारच्या छत्रपतींचें राज्य आहे तसेंच आहे, त्यांचे प्रधान भट पेशवे यांना दूर करून आम्ही आलों आहों, याशिवाय दुसरें स्थित्यंतर कोणतेंहि घडलेलें नाहीं, असा धूर्तपणाचा जाहीरनामा इंग्रजांनीं काढला. तो भावे यांनीं मराठे दप्तर रुमाल २ ले. ४ मध्यें प्रसिद्ध केला आहे. तात्पर्य, इंग्रजांच्या वर्चस्वाला याप्रमाणें ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य, संस्थानिक, जहागिरदार, सरंजामदार यांनीं मान्यता दिली. सामान्य जनतेला इंग्रजांविषयीं द्वेष वाटण्याचें कारणच नव्हतें. याप्रमाणें पाश्चात्य संस्कृतीच्या संघर्षांत हिंदुसंस्कृति पराभूत झाली.

(४४९) **सर्वभक्षक पाश्चात्य संस्कृतिः**–इंग्रजांनीं शास्त्रसंपन्नता, ख्रिस्ती धर्माचा प्रचार, देशाभिमान, संघटितपणा व शिस्त यांनींच केवळ राज्य मिळविलें असें नाहीं. तर कपट, क्रौर्य, विश्वासघात, मानभावीपणा, अमानुषता, लबाडी या सर्वांचा अवलंब करून कणिकनीतीनेंच राज्य मिळविलें. ख्रिस्ताची शिकवण अन्यधर्मांविषयीं इस्लामइतकी अनुदार नसली तरी विज्ञान व भौतिकशास्त्रसंपन्नता यामुळें ती राक्षसाप्रमाणें क्रूर झाली आहे. म्हणूनच सर जॉन वुडरॉफसारखा इंग्रज ग्रंथकार व न्यायाधीश म्हणतो कीं, पाश्चात्य संस्कृति सर्वभक्षक आहे. "Western culture is a great eater" ( इज इंडिया सिव्हिलाईज्ड? पृष्ठ ३४५–४६) गोऱ्याच्या

शेजारीं कोणी फार काळ जिवंत राहूं शकत नाहीं असा अनुभव अमेरिका, ऑस्ट्रेलिया व आफ्रिका खंडांत आलेला आहे. क्रौर्य, दगाबाजी, फसवेगिरी, आर्थिक पेच, रोगबीज–प्रसार या साधनांनी या संस्कृतीनें अमेरिकेंतील मूळचे लोक नष्ट केले. पेरु, मेक्सिको इत्यादि देशांतील गांवचे गांव ओस पाडले. इंग्रजांचें राज्य येथें गेलीं शंभर वर्षें चालू आहे तेवढ्या कालांत पाश्चात्य संस्कृतीनें हिंदुसंस्कृतीचें अपरिमित नुकसान केलें आहे. शिक्षणसंस्था, कुटुंबसंस्था, समाजव्यवस्था, धर्मसंस्था व शासनसंस्था या सर्वांमध्यें अतिशय क्रांति केली आहे. हिंदुसंस्कृतीचे दैवी व आध्यात्मिक संस्कारहि नष्ट केलेले आहेत आणि सर्व बाजूंनीं तिला अवकळा आणलेली आहे. बौद्धांच्या बौद्धिक व सामाजिक क्रांतीला पचवून राहाणारी इस्लामच्या कडव्या धार्मिक आक्रमणाला पराभूत करून जिवंत राहिलेली ही हिंदु-संस्कृति पाश्चात्य संस्कृतीच्या व्यापारी व शास्त्रीय आक्रमणाला आत्मसात् करून नव्या थाटामाटानें व नव्या स्वरूपानें सर्व जगाला आर्यत्वाचा संदेश देत देत, हिंदुस्थानची सर्वांगीण उन्नति करीत, स्वातंत्र्याच्या मार्गावर कशीं झपाझप पावलें टाकीत आहे, याचा विचार करण्यापूर्वी अनेक विद्वान् आणि विचारी गृहस्थांनीं हिंदुसंस्कृतीच्या उत्कर्षापकर्षांची जी मीमांसा केली आहे, तिचें स्वरूप कथन करितों.



प्रकरण सत्ताविसावें

## हिंदुसंस्कृतीच्या उत्कर्षापकर्षांचीं कारणें

(४५०) ग्रंथकाराचा यत्नः–हिंदुसमाज, हिंदुराष्ट्र, हिंदुधर्म व हिंदुसंस्कृति यांचा इतिहास नाहीं म्हटलें तरी गेल्या दहा हजार वर्षांपेक्षां अधिक कालाचा आहे. येवढ्या दीर्घ कालाचा इतिहास डोळ्यांपुढें

वागविणारा समाजशास्त्रवेत्ता धर्मज्ञ आणि देशकालज्ञ असा पुरुष आज भरतखंडांतच दुर्मिळ आहे. तसा तो असतां तर त्या एकट्यालाच विचारून अपकर्षाचीं कारणें व उत्कर्षाचे उपाय शोधून काढतां आले असते. तें अशक्य म्हणून पूर्वींच्या विद्वानांनीं लिहिलेल्या ग्रंथावरून आणि आज विद्यमान असलेल्या विचारी आणि विद्वान यांच्या साह्यानें हिंदुसंस्कृतीच्या उत्कर्षापकर्षाच्या कारणांचा आढावा घ्यावयाचा आहे. प्रस्तुत लेखकानें याबाबत अनेकांना पत्रें पाठविलीं, अनेकांशीं चर्चा केली, आणि कांहीं विद्वानांचेकडून लेखी मतेंहि मिळविलीं. त्यांतील बरीचशीं या प्रकरणांत त्यांच्या त्यांच्या नामोल्लेखानें समग्र देत आहेच. नामोल्लेखाशिवाय, द्यावयाचा कारणसमुच्चय म्हणजे अवकृपा, दुर्दैव, वर्णाश्रमाचा ऱ्हास, नास्तिकता, शिक्षणाचा बिघाड, मतस्वातंत्र्य, स्वेच्छाचार, विज्ञानाचे अभाव, निवृत्तीचा अतिरेक, जगन्मिथ्यात्व, शस्त्र आणि शास्त्र यांकडे दुर्लक्ष हा होय.

(४५१) **विचारवानांचीं मतें:**—परमहंस श्रीकेवलानंदस्वामी महाराज, वाई:—आर्यसंस्कृतीचा उत्कर्ष दाशराज्ञ-युद्धानंतर झाला. हें युद्ध भारतीययुद्धापूर्वीं निदान एक हजार वर्षें झालें असावें. या कालापासून आर्यसंस्कृतीला उत्कर्षाचें स्वरूप येऊं लागलें. भारतीय युद्धानंतर उत्कर्ष पूर्ण होऊन पाणिनिकालीं ( ख्रिस्तपूर्व आठशेंच्या सुमारास ) उत्कर्षाला स्थिरता आली.

उत्कर्ष होण्याचीं कारणें म्हटलीं म्हणजे (१) समाज आणि राज्य यांना विशिष्ट प्रदेशांत स्थिरता. (२) कुटुंबाचा निर्वाह सुकर असणें. (३) ज्ञानप्रसाराला पूर्ण अनुकूलता. (४) विद्वान् लोकांना धर्म, समाज, राज्य यांचा आणि अध्यात्म, कायदा, अर्थशास्त्र, चतुर्विध पुरुषार्थ यांचा विचार नि प्रचार करण्यास पूर्ण स्वास्थ्य. (५) सत्तेचें पाठबळ.

आर्यसंस्कृतीच्या अपकर्षास साधारणतः सूत्रकालापासून ख्रिस्तपूर्व ६०० ते १५० च्या सुमारास प्रारंभ झाला. उत्कर्षाच्या कालींच स्वास्थ्यामुळें अपकर्षाचीं बीजें उत्पन्न होत असतात. चंद्रगुप्ताच्या कालापासून अपकर्षास तीव्र स्वरूप येऊं लागलें.

अपकर्षाचीं कारणें पुढीलप्रमाणें आहेतः—(१) आर्थिक चढाओढ. (२) शेंकडों धार्मिक जटिल, कडक नियम. (३) वर्णजातिभेदानें वैषम्य-

युक्त समाजव्यवस्था. (४) धार्मिक आणि अध्यात्मिक मतमतांतरें. (५) वेदापौरुषेयत्वाच्या सिद्धांतामुळें प्रज्ञावृद्धीला अडथळा. (६) समाजामध्यें विशेषतः विद्वान् आणि प्रतिष्ठित अशा लोकांमध्यें स्तुति, दंभ आणि इतर दुर्गुण यांची उत्पत्ति. (७) राजकीय उलाढाली. (८) राजसत्ता आणि विद्वत्परिषद यांची फारकत.

**परमहंस केशवानंद सरस्वती,** बडोदें:— वर्णाश्रमधर्माप्रमाणें चालणारे जेव्हां ब्राह्मणक्षत्रिय होते तेव्हां इसवी सनाच्या पूर्वींच्या कालांत आर्यसंस्कृतीचा उत्कर्ष होता.

हिंदुस्थानावर यवनांचें आक्रमण झालें, तेव्हांपासून अपकर्षास प्रारंभ झाला. बलहीन, शीलहीन राजे झाले, मत्सर व तंटे उद्भवले, बंध सुटला, शिस्त बिघडली. इतर कारणें म्हणजे निरक्षरता, अज्ञान, आळस, स्वैराचार, द्वेष, भोगलालसा, जातिभेदाचा अतिरेक, अस्पृश्यतेचा अतिरेक, स्वाभिमानशून्यता, बेगडी वेदान्त वगैरे आहेत. निवृत्तिपर वेदांत, वेदांचें अपौरुषेयत्व हीं कारणें खोटीं आहेत. कारण वेद काय आहेत हें पंचवीस कोट प्रजेपैकीं फार थोड्यांना माहीत आहे; व निवृत्तिपर वेदांत असतांना बौद्धधर्मीय जपाननें आपली उन्नति करून घेतलीच आहे. समाजाचे नेते आस्तिक, आचारसंपन्न, सदाचारी, दैवी संपत्तीनें युक्त, सत्यवक्ते, शिस्तीचे भोक्ते असे पाहिजेत. त्यांच्यामागें समाज जाऊं शकेल. भडकलेल्या समाजाला साधुसंतच ताळ्यावर आणतील. सामान्य धर्मोपदेशक आणूं शकत नाहींत.

श्री. ज. र. घारपुरे, प्रिन्सिपॉल, लॉ कॉलेज, पुणें:—वैदिक कालांत व सूत्रकालच्या पहिल्या दोनशें वर्षांत आर्यसंस्कृतीचा उत्कर्ष झाला. त्यावेळीं वैषम्याचा अत्यंत अभाव होता. समाजांतील सर्व घटक समतेनें व एकमेकांच्या सुखदुःखासंबंधानें सहिष्णुतेनें वर्तन करीत होते. स्त्रियांनासुद्धां त्या काळीं वैषम्याची वागणूक नव्हती. इसवी सनापूर्वी दोनशें वर्षांपासून संस्कृतीचा ऱ्हास होण्यास प्रारंभ झाला. त्याचें कारण समाजांत विविध घटकांचें आविष्करण झालें व त्यांतूनच विषमतेचा उदय झाला. तें वैषम्य नष्ट करणें व आजच्या जगांतील राष्ट्रांच्या बरोबरीचें होणें हा एकच भविष्यकालाचा उत्कर्ष जवळ आणील.

विद्वद्रत्न के. ल. दप्तरी, नागपूरः—भारतीय युद्धापासून बुद्धापर्यंतचा काल तो उत्कर्षकाल असावा. पुढें गुप्त साम्राज्याचा काल हा अत्यंत उत्कर्षांचा काल होय.

गुप्तकालाच्या अंतींच शबरस्वामींचें जैमिनीय सूत्रावरील भाष्य झालें, व त्यांत अपौरुषेय वाद प्रतिपादला गेला. वेदांचें अपौरुषेयत्व, अवतारवाद व संन्यास हीं आर्यसंस्कृतीच्या अपकर्षाचीं मुख्य कारणें होत. शबरस्वामींनीं प्रतिपादिलेलें वेदांचें अपौरुषेयत्व इतर सर्व शास्त्रांत शिरलें, व त्यांची वाढ बंद झाली, धर्मामध्यें विचारपूर्वक कालानुरूप बदल करण्याचें कार्य त्यामुळें बंद झालें. अवतारवादामुळें समाज निष्क्रिय बनला. संन्यासवादामुळें समाज उद्योगी, जिज्ञासु व कर्तृत्ववान् माणसांस मुकला. शंकराचार्यांच्या संन्यासवादानें संस्कृतीचा अपकर्ष केला. बुद्धिगम्य शुद्धधर्माचें आचरण, भगवद्गीतोक्त कर्मयोग, यांमुळेंच उत्कर्ष होईल.

श्री. पां. वा. काणे, हायकोर्ट वकील, मुंबईः—भारतीय संस्कृतीच्या उत्कर्षाची परमसीमा इ. स. पूर्वी २००–३०० च्या सुमारास झाली. त्यानंतर अपकर्षास प्रारंभ झाला. मधून मधून गुप्त, हर्षवर्धन व चालुक्य यांच्या साम्राज्याच्या कालीं कांहीं बाबतींत सुधारणा झाल्या. अध्यात्मिक उन्नतीहि इ. स. १२०० पर्यंत होत होती. सर्वांगीण उत्कर्षाचा काल पाहावयाचा म्हणजे इ. स. पूर्वीच्या काळांत गेलें पाहिजे.

स्वतंत्र विचार करण्याची प्रवृत्ति, जातिभेदाची शिथिलता, वर्णव्यवस्थेचीं उच्च तत्त्वें अंमलांत आणण्याची तयारी, परकीय स्वाऱ्यांचा अभाव, उत्तर व मध्य हिंदुस्थानांतील सुबत्ता, सुलभ जीवनोद्योग इत्यादि उत्कर्षाचीं कारणें आहेत.

अपकर्षास प्रारंभ ख्रिस्तपूर्व ३०० पासून म्हणजे अलेक्झँडरच्या स्वारीपासून झाला. त्यानंतर सहाव्या शतकापर्यंतच्या काळांत शकहूणांच्या स्वाऱ्या झाल्या, बौद्धधर्माचा पगडा बसला व जातिभेदाला तीव्र स्वरूप आलें, तोच अपकर्षाचा प्रारंभ होय.

मुसलमान येण्यापूर्वी जातिभेदाची तीव्रता, अहिंसेचें तत्त्वज्ञान, शिवाशिव, परदेशगमनाला बंदी यांमुळें समाज दुर्बल झाला होता. ब्राह्मणांच्या

विचारांत नावीन्य राहिलें नव्हतें. टीका व भाष्यें लिहीत, व्रतें व दानें यांचें माहात्म्य सांगत, भिक्षुकीच्या लटपटी करीत ब्राह्मण जगूं लागले. त्यांच्या मत्सरानें क्षत्रिय, वैश्य विद्याहीन बनले. एका काळीं अनेक धंद्यांत ब्राह्मण असावेत. ब्राह्मणांनीं धंद्यांतून अंग काढल्यामुळें विज्ञान मागें पडलें व धंद्यामध्यें निर्बुद्ध माणसें शिरलीं.

धर्माचे बाबतींत चढाई करून येणाऱ्या मुसलमानांची एकजूट होती, तशी त्या वेळीं हिंदूंची नव्हती. मुसलमानांइतकें कडवें आक्रमण पूर्वीं हिंदूंवर झालें नव्हतें. धार्मिक बाबतींत हिंदु हे सहिष्णु व उदार, तर मुसलमानांची वृत्ति त्याउलट होती. पुढें शीखांनीं व मराठ्यांनीं हा कडवेपणा स्वीकारला व ' शठं प्रति शाठ्यं ' असें वागून त्यांनीं मुसलमानांवर मात केली.

इंग्रजांशीं लढतांना वाढत्या शास्त्रीय ज्ञानाचा व लढाईच्या साधनांचा अभाव, देशाभिमान व जूट यांच्या अभावामुळें आपण पराभूत झालों.

भविष्यकालीं संस्कृतीच्या बऱ्याच भागांत परिवर्तन झालेलें दिसेल. आधुनिक शिक्षण व शोध यांमुळें जगांत साम्य उत्पन्न होत असून अखिल मानवांची एक संस्कृति उत्पन्न होण्याचा संभव आहे. खाणी राष्ट्राच्या मालकीच्या होणें, मजुरांचें हित पाहणें इत्यादि समाजसत्तावादांतील तत्त्वें स्वीकारावीं लागतील. तसेंच संततिनियमनाचें तत्त्वहि मान्य करावें लागेल.

श्री. भा. वा. भट, वकील, धुळें:—भरतखंडाचा तीनचार हजार वर्षांचा इतिहास उपलब्ध आहे. त्याचें विहंगमदृष्ट्या अवलोकन केल्यास इसवी सनाच्या अकराव्या शतकांत मुसलमानांचा शिरकाव झाल्यापासून राजकीय दृष्ट्या अपकर्षास प्रारंभ झाला. मुसलमान येण्यापूर्वीं परकीय संस्कृतीच्या लोकांनीं आक्रमणें केलीं होतीं. भारतांतील क्षत्रिय राजांनीं ग्रीक, हूण, पारसिक इत्यादिकांना पराभूत करून पिटाळलें. अकराशेंपावेतों भारतांत अनेक क्षत्रिय राज्यें होतीं. त्यांचीं परस्परांत युद्धें होत व त्यामुळें उलथापालथीहि होत.

वेदकालापासून अकराव्या शतकापर्यंत आर्यसंस्कृतीचा विकासच होत होता. विरोधी जबरदस्त संस्कृति उदयास येते, तेव्हांच पूर्वींच्या संस्कृतीचा अपकर्ष होऊं लागतो. विरोधी संस्कृति नसल्यास एकाद्या देशांत जी संस्कृति अस्तित्वांत असते, तिचा विकासच होत असतो.

भारतीय संस्कृतीच्या अपकर्षाचें प्रमुख कारण एकच व तें म्हणजे परदास्य हें होय! राजकीय परदास्यामुळें सर्व आपत्ति उत्पन्न होतात. मराठ्यांनीं स्वराज्याची स्थापना करतांच हिंदुसंस्कृति बलिष्ठ झाली.

आर्यसंस्कृतीच्या उत्कर्षाचा उपाय एकच आहे व तो म्हणजे भौतिक शास्त्रीयज्ञानसंपन्नता हा होय! इंग्लंड, फ्रान्स, जर्मनी, जपान इत्यादि राष्ट्रें जशीं शास्त्रसंपन्न झालीं आहेत तसें आपलें राष्ट्र भौतिक शास्त्रानें संपन्न झालें पाहिजे. म्हणजे युनायटेड स्टेट्स् ऑफ अमेरिका या राष्ट्राचा दर्जा आपल्या राष्ट्राला प्राप्त होईल.

प्रो. शं. दा. पेंडसे, नागपूरः—बुद्धपूर्व काल हा आर्यसंस्कृतीचा उत्कर्षकाल होय. उत्कर्षाचीं कारणें पुढील आहेतः—

प्रवृत्तिनिवृत्तींचा योग्य समन्वय, वर्णपरत्वें व वयपरत्वें, प्रवृत्तिनिवृत्तींचा समतोलपणा राखण्याची घेतलेली काळजी, जगांतील सुखें भोगण्याची अपार हौस, ऐश्वर्यसंपन्न होण्याकरितां पराक्रम, धाडस करण्याची तयारी, हिंदुस्थानाबाहेर सर्व जगांत केलेलीं राजकीय व व्यापारी आक्रमणें, कलासंपन्नता, कलाप्रियता, उत्कृष्ट आरोग्य, सामर्थ्यसंपन्न शरीरें आणि मनें हीं सर्व आमच्या उत्कर्षाचीं कारणें होत.

बुद्धकालापासून आक्रमणशीलता थांबली, प्रवृत्तिनिवृत्तींचा तोल बिघडला, समाज निवृत्तिप्रधान बनला, हिंदुस्थानाबाहेर सैनिक पाठविण्याऐवजीं अहिंसोपदेशक संन्यासी बाहेर गेले. हिंदुस्थानाबाहेर हिंदु राजांचीं आक्रमणें होण्याऐवजीं ग्रीकादींचीं हिंदुस्थानावर आक्रमणें सुरू झालीं. ग्रीक, शक, यवन, हूणादींचा प्रतिकार यशस्वी तऱ्हेनें केला, पण पुढें दिग्विजय थांबले व आपापसांतील लढाया सुरू झाल्या. अरबस्थानांत प्रवृत्तिप्रधान धर्म अस्तित्वांत आला व अरबांच्या आक्रमणापासून अपकर्षाला प्रारंभ झाला.

अपकर्षाचीं कारणें अनेक असलीं तरी त्यांतील मुख्य अशीं आहेतः— समाजधारणेचा धर्म व स्वकर्तव्य यांविषयींचें अज्ञान, आलस्य, विषयासक्ति, लोभ, मत्सर, असंघटितपणा, अव्यवस्थितपणा, वर्णधर्म आणि आश्रमधर्माकडे दुर्लक्ष्य, महत्त्वाकांक्षेचा अभाव, कूपमंडुकवृत्ति, मूर्खपणाच्या धार्मिक

समजुती; भौतिकशास्त्राच्या ज्ञानाचा अभाव, व इतर राष्ट्रांत चाललेल्या घडामोडींकडे दुर्लक्ष्य, अशा अनेक कारणांमुळें आपला अपकर्ष झाला. हीं अपकर्षाचीं कारणें नष्ट केलीं तरच भविष्यकालीं उत्कर्षाची आशा आहे.

श्री. के. ल. ओगले, डोंबिवली:—आर्यसंस्कृतीचा उत्कर्ष आर्यलोक उत्तरेंत होते तोंवर होता. दक्षिणेंत आल्यावर अपकर्षास प्रारंभ झाला. त्याचें कारण इतर लोकांशीं संबंध वाढला. निरनिराळे लोक आर्यांच्या कक्षेंत आले. त्यांना समानतेनें आपल्यांत समाविष्ट करून घेतां आलें नाहीं. स्वतः आर्यांतच चातुर्वर्ण्यामुळें उच्चनीच भावाची कल्पना वाढूं लागून भांडणाचें बीज पेरलें गेलें. पहिला जोम होता तोंवर सर्व दबून होतें. अंतःकलह पुढें वाढले, व वैय्यक्तिक मोक्षाचें ध्येय पुढें आलें. खाल्डियन, इजिप्शियन, ग्रीक व रोमन या संस्कृति इतिहासांत मात्र दिसतात. आर्य-संस्कृति मूळच्या स्वरूपांत नसली तरी मुरड घालून टिकली आहे. यापुढें आर्यसंस्कृतीचा उत्कर्षकाल कधींच येणार नाहीं. आज जी हिंदुसंस्कृति आहे ती टिकून राहावी आणि आपलें राजकीय दैन्य नष्ट व्हावें एवढीच सर्वांची इच्छा आहे. ज्या प्रमाणांत राजकीय दृष्ट्या आपली उन्नति होईल त्याच प्रमाणांत अवस्थांतर झालेली हिंदु संस्कृति वाढूं लागलेली दिसेल.

आपल्या भावी संस्कृतींत समानतेचा भाग जास्त असावा. वैषम्याला थारा मिळूं नये. व्यक्तिभावना प्रबल न होतां समाजभावना प्रबल झाली पाहिजे.

आम्हीं धर्म सोडला म्हणून आमचा अपकर्ष झाला हेंहि एका अर्थानें खरें आहे. धर्म म्हणजे समाजधारणेचे नियम. ते आपण सोडले म्हणून आपला अपकर्ष झाला; पण समाजधारणेला आवश्यक असलेला धर्म तरी सोडलाच कसा ? तो सोडला कीं सुटला ? तो सुटला असें म्हटलें तर केव्हां तरी ऱ्हास स्वाभाविक होतो. 'History repeats itself' ही म्हण अनुभवानेंच आली आहे.

श्री. दा. न. शिखरे, सहसंपादक केसरी, पुणें:—अभ्युदयाची सीमा गांठल्यामुळें निःश्रेयसाकडे समाजाचा इतका कल झुकला कीं, त्यामुळें अभ्युदयाकडे दुर्लक्ष्य झालें. अशा स्थितींत यंत्रयुगाच्या बळावर परके लोक आले व त्यांनीं वेदांती बनलेल्या आर्यांना दास करून सोडलें. रानटी

संस्कृतीनें आर्यसंस्कृतीचा भौतिक दृष्ट्या पराभव केला. त्यामुळें हिंदु-समाजाची संरक्षक व आक्रमक शक्ति नष्ट झाली. यास्तव अभ्युदयाकडे त्याला साधनीभूत असणाऱ्या विज्ञानाकडे, त्याला पायाभूत असणाऱ्या बुद्धिवादाकडे हिंदु समाजानें लक्ष पुरविलें पाहिजे व भौतिक सृष्टींत यश मिळविलें पाहिजे.

श्री. वा. कृ. भावे, सहसंपादक केसरी, पुणें:—आर्यसंस्कृतीचा अपकर्ष-काल बराच जुना आहे. परदेशांत आर्यसंस्कृतीचा प्रसार करण्याचे जेव्हां आर्यांनीं सोडून दिलें व भारतीय आर्य देशांतल्या देशांत आत्मसंरक्षण करीत राहिले, हें ऱ्हासाचें आरंभस्थान होय! आर्यांकडून सांस्कृतिक आक्रमण बंद होतांच आर्यांशीं विसदृश किंबहुना विरुद्ध अशा धर्मांचे आणि आक्रमण-शील स्वभावाचे लोक हिंदुस्थानांत आले व ते कायमचें ठाणें देऊन बसले. त्यामुळें वैचारिक प्रगति खुंटली व बौद्धिक आणि सांस्कृतिक परागति झाली. आधिभौतिक शास्त्रें व देशाभिमान यांच्या अभावाचा आमच्या मूळ ऱ्हासाशीं संबंध नाहीं. जातिसंस्थेनें एवढ्या अवाढव्य समाजाची व्यवस्था लावली. गटागटांमध्यें शिस्त, सहकार्य व संघटितपणा आणला.

खरें ऱ्हासाचें कारण म्हणजे क्षत्रिय व वैश्य यांनीं ज्ञानप्राप्तीचा मार्ग सोडला. त्यामुळें ब्राह्मणी संस्कृतीचा फाजील पगडा सर्व लोकांवर बसून सात्त्विकपणा समाजांत प्रमाणाबाहेर वाढला, हें होय. क्षत्रिय व वैश्य ज्ञानसंपन्न असते तर, देशरक्षणाचे व व्यापारवृद्धीचे उपाय त्यांनीं शोधून काढले असते व पारतंत्र्याची लाट थांबविली असती.

आतां यापुढें तरणोपाय म्हणजे वर्ण व तदंगभूत मुख्य जाति कायम ठेवून त्यांची उभारणी केवळ जन्मावर न करतां ती कर्मांवर व प्रवृत्तीवर करण्यांत यावी. म्हणजे आजचा ब्राह्मण त्याची लायकी असेल तर ब्राह्मण राहावा व जे ब्राह्मण नसतील त्यांची लायकी गुणांनीं व कर्मांनीं ब्राह्मण होण्याची असल्यास त्याला ब्राह्मण करण्यांत यावें. ज्या जातीचा व वर्णाचा जो आचार व विचार असेल तो करण्याची सक्ति त्या जातीवर व्हावयास पाहिजे. हा नियम सर्व जातींना व वर्णांना लावावा, म्हणजे अखिल समाज ताजा तवाना व कार्यक्षम राहील. उत्कर्षाचें बीज यांतच आहे.

**श्री. गो. वि. भाटे,** वकील, हुबळीः–बुद्धपूर्व व बुद्धोत्तर काळीं म्हणजे इस्लामचा संबंध येईपावेतों आर्यसंस्कृतीचा उत्कर्ष होता. आर्य-संस्कृतीचें श्रेष्ठ व सखोल तत्त्वज्ञान मनुष्यमात्रावर छाप पाडण्यासारखें होतें; म्हणूनच तलवार अथवा बंदूक यांचा उपयोग न करतां आपण इतरांना आपली संस्कृति दिली.

अपकर्षाचीं मुख्य कारणें दोन आहेत. त्यांपैकीं एक ‘ उपास्यानां अनियमः ’ व दुसरें जातिभेद हें होय! प्राचीन काळीं भिन्न संस्कृतीच्या लोकांना आत्मसात् करते वेळीं संग्राहक वृत्तीनें अनेक देव व अनेक उपास्यें मान्य केलीं. पण त्यांत एकसूत्रीपणा न आल्यामुळें अन्य संस्कृतीचा संघर्ष होतांच या बाजारबुणग्यांचा धुव्वा उडाला. अनेक देव, अनेक पंथ यांना वाव देण्यांत लोकसंग्रही बुद्धीनें जी सहिष्णुता दाखविली तीच संघटनेस मारक झाली. खिस्ती व इस्लामी संस्कृतीपुढें श्रेष्ठ असलेली आर्यसंस्कृति नामोहरम झाली, यांचें कारण एक उपास्य, एक ईश्वर असें नव्हतें. आज आर्यसमाज बलशाली आहे, याचें कारण एकोपासना व शिस्त हेंच आहे.

निरनिराळ्या गटांना आत्मसात् करतांना उपासनास्वातंत्र्य दिलें, तसेंच निराळेपणानें आपापल्या चालीरीतीसह राहाण्याचें स्वातंत्र्य दिलें. त्यामुळें जाती वाढल्या. चार वर्ण असतांना वरील कारणांमुळें अनेक जाति झाल्या. प्रत्येक मनुष्य आतां चार वर्णांच्या वृत्तीचा झाला पाहिजे. जाति-भेदानें आमचें सांस्कृतिक व राजकीय दृष्ट्या नुकसान केलें आहे.

हिंदु मग तो या भूतलावर कोठेंहि असो, तो येथून तेथून एक-सारखा. त्या सर्वांचा देव एक; उपासनापद्धति एक; ग्रंथ एक; मंत्र एक; तंत्र एक असा प्रचार धर्मपीठांनीं केला पाहिजे.

**श्रीमंत सरदार मा. वि. किबेसाहेब,** इंदोरः–आर्यसंस्कृतीचा उत्कर्ष मेहेंजोदारोच्या काळीं आणि महाभारतांत वर्णन केलेल्या राजसूय यज्ञाच्या काळीं शिखरास पोंचला होता. त्या कालांत युद्धशास्त्रामध्यें क्षत्रिय तज्ज्ञ होते व वर्णाश्रमाचें परिपालन यथातथ्य होत होतें.

भारतीय युद्धानंतर अपकर्षास प्रारंभ झाला. त्याचीं कारणें क्षत्रिय ज्ञातीचा विनाश, भौतिक सुधारणांची इतिश्री, एकवर्ण नष्ट झाल्यामुळें

आर्येतरांतील चळवळीस जोर येणें, ब्राह्मणांची एकांगी उन्नति, संरक्षणाचीं साधनें विस्कळीत झाल्यामुळें परकीयांस आंत शिरण्यास वाव, पंथाच्या व धर्मांच्या चढाओढी, आपसांतील फूट इत्यादि आहेत. आर्यसंस्कृतीचा उत्कर्ष स्वराज्य मिळविल्यानेंच होणार आहे.

**श्री. शां. कृ. सूर्यराव देसाई,** गोवाः–भारतीय युद्धकालापर्यंत आर्यसंस्कृतीचा उत्कर्ष होता.

आर्यावर्तांत आल्यावर येथील मूळच्या अनार्यांशीं व निसर्गाशीं आर्यांना झगडावें लागलें. त्यामुळें कर्तृत्वशक्तीचा विकास झाला. कर्तृत्व-शक्तीच्या आविष्कारांतूनच संस्कृतिपोषक तत्त्वें निघतात. पुढें झगड्याचें स्वरूप सौम्य होतांच सुखासीनता वाढली व संस्कृति निश्चल झाली. तेथूनच ऱ्हासाचीं बीजें उद्भूत झालीं. पुढें परकीयांच्या आक्रमणामुळें पारतंत्र्य येऊन आणखी ऱ्हास झाला. साक्षरता, शस्त्रें, विद्या, कला, धंदे, व्यापार हीं वाढलीं पाहिजेत. संपत्तीची ओहोटी बंद झाली पाहिजे. अस्पृश्यता, जातिभेद, बालविवाह, समुद्रबंदी असले सामाजिक दोष नष्ट झाले पाहिजेत. आपली समाजरचना आमूलाग्र बदलली पाहिजे.

**श्री. शि. ह. तेंडुलकर,** वकील, जव्हारः–भारतीय कालापर्यंत आर्यसंस्कृतीचा उत्कर्ष होता.

उत्कर्ष होण्याचीं कारणें म्हणजे समष्टिधर्माची व व्यष्टिधर्माची योग्य प्रमाणांत उपासना, प्रवृत्ति व निवृत्ति यांची सांगड, सर्व शास्त्रांची उपासना, वर्धिष्णु व जयिष्णु अशी असलेली समाजाची प्रवृत्ति, व प्रतिकारक्षमता हीं होत !

अपकर्षास बुद्धोत्तर कालापासूनच प्रारंभ झाला. अपकर्षाचीं अनेक कारणें असलीं तरी निवृत्तिपर वेदान्त व वेदांचें अपौरुषेयत्व हींच मुख्य होत. सर्व क्रिया माणसाच्या मनबुद्धीवर अवलंबून असतात. निवृत्तिपर वेदांतानें मनाला मरगळ आणली. वेदाच्या अपौरुषेयत्वामुळें विचारशक्ति खुंटली.

**डॉ. कैकिणी,** मुंबईः–परदेशगमननिषेध, सोवळ्या–ओवळ्याचे व खाण्यापिण्याचे फाजील निर्बंध, यांमुळेंच आपला अपकर्ष झाला. कोणीं

काय खावें हा प्रश्न गौण आहे. ज्या वेळीं जें मिळेल, पचेल व रुचेल तें खाऊन धष्टपुष्ट होऊन राष्ट्र जगविण्याची प्रवृत्ति वाढविली पाहिजे. मुसलमान व इंग्रज वाटेल तेथें जाऊन वाटेल तें खाऊन वाटेल तीं क्षेत्रें हस्तगत करतात. हिंदूंना बंधनें फार म्हणून त्यांची कुचंबणा होते. मुसलमान व इंग्रज यांना बंधनें कमी म्हणून त्यांना सर्व प्रदेश मोकळा असतो.

## चोरवाडचा एक खेडवळ

या गृहस्थांनीं पूर्ण नांव व पत्ता नीटसा लिहिला नाहीं. हा खेडवळ ख्रिश्चन व मुसलमान यांच्या सहवासांत बरींच वर्षें होता. इतर संस्कृतींत काय 'पॉवर' व 'स्पिरिट' आहे व आपल्यांत काय नाहीं याचें विवेचन या खेडवळानें मोठें मार्मिक केलें आहे.

(१) आम्ही आमचा प्राण व जीव वांचविण्याकरितां स्वसंस्कृति जतन करतों. इतर संस्कृतीवाले स्वसंस्कृतीकरितां प्राण देण्यास तयार असतात. (२) आम्ही बलापेक्षां ज्ञान श्रेष्ठ समजतों, तर इतर ज्ञानापेक्षां बल श्रेष्ठ आहे असें समजून बलवान होतात. (३) इतर संस्कृतीवाले सर्व माणसें सारखीं असें समजतात. हिंदु मनुष्यें पूर्वजन्माच्या पापपुण्याच्या कल्पनेवर माणसामाणसांत उच्चनीचता उत्पन्न करतात. (४) इतर धर्मीय रज्जु एकवटून दोरखंडाप्रमाणें राहतात. हिंदु दोरखंडाच्या ताता निरनिराळ्या करून अनेक जाति उत्पन्न करून राहतात. (५) इतर संस्कृतीवाले दुसऱ्या प्राण्यांचे जीव घेऊन राहतात, तर हिंदु लांकडा—पाषाणांत, फळांतसुद्धां प्राण घालण्याचा यत्न करतो. (६) इतर संस्कृतीवाले निराकार ईश्वराशिवाय पायां पडण्यास कोणीहि लायक नाहीं असें समजतात, तर हिंदु सजीव निर्जीव सर्वांच्या पायां पडतो व त्यामुळें भित्रा होतो. (७) इतर संस्कृतीवाले जिवंत असतांनाच सुख भोगण्यास झटतात, तर हिंदु जन्मभर दुःख सहन करून मेल्यानंतर सुख भोगण्याची इच्छा करतो.

—*—

## प्रकरण अठ्ठाविसावें

# स्वातंत्र्याच्या मार्गावर

(४५२) बुद्धिवादाचा उदयः—गेल्या प्रकरणांत हिंदुसंस्कृतीच्या अपकर्षाचीं कारणें आणि उत्कर्षाचे उपाय अनेक विद्वानांच्या मतांसह दिले. अपकर्षाचीं कारणें आणि उत्कर्षाचे उपाय यांची बेरीज जवळ जवळ सारखीच आहे. हिंदुसमाजाच्या सांप्रतच्या आंदोलनाकडे पाहिल्यास हा समाज धार्मिक, सामाजिक, सांस्कृतिक, सैनिक, औद्योगिक, शैक्षणिक, औपासनिक दोष नष्ट करून स्वातंत्र्याच्या निश्चित ध्येयाकडे सर्वांगीण उन्नतीसह झपाझप पावलें टाकीत आहे, असें निश्चित म्हणतां येतें. हिंदुसमाजामध्यें प्रखर बुद्धिवादाचा आणि राष्ट्रवादाचा उदय झालेला आहे. बुद्धिवादाच्या प्रखर सूर्यापुढें मायावाद, जगन्मिथ्यात्ववाद, कलिवाद, वेदापौरुषेयवाद, अवतारवाद, देववाद, दैववाद हे सगळे काजवे निष्प्रभ होत आहेत. धर्माचा विचार करण्याची वचनप्रामाण्याची मीमांसापद्धति मागें पडत चालली असून बुद्धिवादावर अधिष्ठित अशी तर्कशुद्धपद्धति ( इतिहासपद्धति ) रूढ होऊं पहात आहे. धर्माचीं जटिल बंधनें, कर्मठपणा, अदृष्ट, अपूर्व यांना महत्त्व राहिलें नसून समाजधारणेला व राष्ट्रधारणेला पोषक असा धर्म रूढ होत आहे. धर्म म्हणजे व्यक्तिविकासाचे नि समाजधारणेचे नियम. व्यक्तीचा विकास, समाजाचें स्वास्थ्य आणि राष्ट्रोत्कर्ष ज्या योगानें साधेल तो धर्म होय. धर्म हा एक पुस्तकप्रणीत किंवा व्यक्तिप्रणीत नाहीं. या विचारानें हिंदुसमाज मोठ्या हिरीरिनें वेदबंदी, परदेशबंदी, स्पर्शबंदी, रोटीबंदी, लोटीबंदी आणि बेटीबंदी अशा सर्व बंद्या उठवून कुराणी हिंदु आणि बायबली हिंदु यांनाहि पचवीत पचवीत विश्वाला आत्मसात करण्यास निघालेला आहे.

(४५३) औपासनिक क्रांतिः—उपासनेच्या क्षेत्रांतहि हिंदुसमाजानें क्रांति केली असून मंत्रकालांतील यज्ञ, तंत्रकालांतील देवदेवता यांना मागें ठेवून यंत्रकालाला उचित अशा स्वराष्ट्ररूपी ईश्वराच्या प्रतीकाचें पूजन

हिंदुसमाज करूं लागला आहे. बुद्धिवादामुळें अनेक क्षेत्रांतील ईश्वराची पक्कड ढिली होत आहे. श्रीमंत आणि गरीब होण्याचीं आर्थिक कारणें व भांडवलशाहीचीं कारणें या महायुद्धांतील चलनाच्या वाढीमुळें समजूं लागलीं आहेत. मनुष्य सशक्त कां व अशक्त कां रहातो, त्याचा जीवनसत्त्वाशीं व हवापाण्याशीं कसकसा संबंध पोंचतो, मनुष्य काळा व गोरा होण्यास आनुवंशिकता आणि थंड व उष्ण हवा हीं कारणें कशीं लागू पडतात, याचें ज्ञान होऊं लागल्यामुळें हिंदुसमाज बऱ्याच क्षेत्रांत स्वावलंबी होऊं लागला आहे. मरणोत्तर आत्म्याचें अस्तित्व, पुनर्जन्म वगैरे विषय सोडल्यास आणि विज्ञानशास्त्रांतील मूलभूत तत्त्वांचा प्रश्न सोडल्यास हिंदुसमाजानें बऱ्याचशा क्षेत्रांतील ईश्वराचें दास्य सोडून दिलेलें आहे ! दगडांचे देव व मूर्ति यांच्या पूजनापेक्षां वीरपूजन व राष्ट्रसेवा यांचेकडे समाज आकर्षिला जात आहे. अखिल हिंदूंचा एकच ईश्वर, सर्वांची एकच सामुदायिक प्रार्थना, गायत्री हा एकच मंत्र; गीता हा एकच ग्रंथ आणि उपनयन हा एकच संस्कार करण्याचे यत्न चालू असून त्यामुळें उपासनेच्या क्षेत्रांतील विषमता फार झपाट्यानें नष्ट होत आहे. अखिल हिंदु एक, ते सर्व बंधुबंधु, वीरता, धीरता, आक्रमकता, विद्वत्ता आणि बुद्धिमत्ता या पंच लक्षणांनीं युक्त प्रत्येक स्त्रीपुरुषानें होणें म्हणजेच ईश्वराची उपासना, अशी उपासनेची व्याख्या हिंदुसमाजानें बदलून टाकली आहे. देशकाल पाहून परिस्थिति ध्यानीं घेऊन, प्रत्येक क्षेत्रांत बुद्धिवादावर अधिष्ठित अशी क्रांति करण्याचा विडाच जणूं हिंदुसमाजानें उचलेला आहे.

(४५४) **विजिगीषु तत्त्वज्ञानः**—माणसाला मुख्य अन्न लागतें. त्याच्या सौलभ्याशीं व दुर्लभतेशीं तत्त्वज्ञान निगडित झालेलें असतें. अन्नाची सुलभता असली कीं अल्पसंतुष्टपणाचें तत्त्वज्ञान उत्पन्न होतें. या महायुद्धामुळें अन्नाचा प्रश्न फारच बिकट झाला. महागाई चौपटीनें वाढली. अन्नाचें उत्पादन आपल्या राष्ट्रांत कमी होतें असें दिसून आलें. त्यामुळें जीवनाचें एकंदर तत्त्वज्ञानच बदलून गेलें. जीवनाच्या गरजा भागविण्याकरतां खटाटोप पडूं लागला, अल्पसंतुष्टपणा नष्ट झाला, गरजा वाढल्या, राहाणी खर्चाची झाली, त्यामुळें अन्नाच्या सुलभतेच्या वेळचें अल्पसंतोषी

तत्त्वज्ञान तुच्छतेला पावलें आणि जीवनाचें नवें तत्त्वज्ञान हिंदुसमाजानें अंगिकारलें ! गेल्या पंचवीस वर्षांत तत्त्वज्ञानाच्या क्षेत्रांत फारच आंदोलनें झालीं. आणि त्या सर्वांवर महायुद्धानें कळस चढविला. मिथ्यात्वाचें, क्षणभंगुरत्वाचें, अल्पसंतुष्टतेचें, नैराश्याचें, वैय्यक्तिक मोक्षाचें, इहलोकपराङ्मुखतेचें, सहिष्णु तत्त्वज्ञान हिंदुसमाजानें डावललें असून प्रवृत्तिमय, आनंदमय, पौरुषयुक्त, आक्रमणशील, जयिष्णु, सत्य, शाश्वत, महत्त्वाकांक्षी व उत्साही अशा आर्यतत्त्वज्ञानाचा हिंदुसमाजानें स्वीकार केलेला आहे. समाधानानें कसें मरावें हें सांगणारें तत्त्वज्ञान हिंदुसमाजाला नापसंत असून जगांतील सर्व उलाढाली आनंदानें, शुद्धबुद्धीनें, निर्हेतुकतेनें, निष्कामतेनें करावयास सांगणारें गीताप्रणीत वैदिक तत्त्वज्ञान हिंदुसमाजाला पसंत पडत चाललें आहे.

(४५५) **अखंड एकजिनसी हिंदुसमाजः**–हिंदुसमाजांत आज विषमता आहे. जातिभेद, अस्पृश्यता, जन्मजात उच्चनीचता, आणि समष्टिधर्माचा अभाव यांमुळें हिंदु समाजाची रचना वैषम्ययुक्त झाली आहे. हिंदुसमाजांतील सर्व घटकांमध्यें समानसंस्कृति उत्पन्न करण्याचे यत्न यापूर्वी झालेले आहेत. बुद्ध, शंकराचार्य, महावीर, बसवेश्वर आणि साधुसंत यांनीं त्या त्या कालांत समानसंस्कृति उत्पन्न करण्याचा यत्न केला आणि जन्मजात उच्चनीचपणाचें महत्त्व कमी केलें. या सर्व धर्मवीरांचें अपुरें राहिलेलें कार्य आज ब्रह्मसमाज, आर्यसमाज, सत्यसमाज, हिंदुमहासभा, धर्मनिर्णयमंडळ आणि या तऱ्हेच्या हिंदुसमाजांतील अनेक संस्था पुरे करण्याच्या उद्योगास लागलेल्या आहेत. गेल्या पाव शतकाचा आढावा घेतल्यास असें दिसतें कीं सामाजिक विषमता, अनिष्ट रूढि, भ्रामक समजुती या सारख्या नष्ट होत आहेत. अस्पृश्यता तर आतां संपूर्णतया लयाच्या मार्गास लागली आहे. त्यांचेकरतां देवालयें उघडलीं जात आहेत; उपाहारगृहें मोकळीं होत आहेत, सहभोजनें झडत आहेत; शिक्षण वाढत आहे, आणि नोकऱ्यामध्यें जागा राखून ठेविल्या जात आहेत. जातिबंधनें शिथिल होत असून पोटजातींतच नव्हे तर समानसंस्कृति ज्यामध्यें आहे अशा हिंदु वधुवरांमध्यें स्वजातीबाहेर लग्नें होऊन तीं मान्यता पावत आहेत. मूळच्या अहिंदूंना हिंदू करून, त्यांचें संस्कारानें जातिकरण करून, त्यांना जाति–आचार देऊन त्यांच्याशीं विवाह होत आहेत आणि ते पचत आहेत. हिंदुत्व हें

खाण्यापिण्यावर नसून तें बुद्धि व संस्कार यावर आहे. धर्माचें स्थान पोट नसून डोकें आहे, हें तत्त्व उदित झाल्यामुळें "खाऊन पिऊन हिंदु बाटतो हा भ्रम नष्ट झाला आणि शुद्धिकार्याचा धडाका चालू झाला." संग्राहकता हा जो आर्यसंस्कृतीचा गुण त्याचा फैलाव अधिक होत असून कुराणी हिंदु, बायबली हिंदु अशा सर्वांना पूर्ण हिंदुत्वाकडे झुकण्याचें आकर्षण उत्पन्न झालें आहे. रानटी, अर्ध रानटी अशा समजल्या जाणाऱ्या अनेक वन्य हिंदुजातींना सुधारण्याचे दीर्घ प्रयत्न हिंदुसमाजानें ठिकठिकाणीं चालू केले आहेत. भिल्ल-सुधारमंडळ, टिकारी सुधारमंडळ, छत्तीसगडी सुधारमंडळ अशीं किती तरी मंडळें खूप काम करीत आहेत. त्यामुळें सरकार व विधर्मी लोक हिंदूंची संख्या कमी दाखविण्याचा जो यत्न करतात त्याला पायबंद बसत आहे. बंगाल, पंजाबादि प्रांतांत हिंदूंची संख्या कमी दाखविण्याचा जो यत्न चालू आहे, त्याविरुद्ध फार जोराची प्रतिक्रिया चालू आहे. दलित वर्ग, दुबळे वर्ग, मागासलेले वर्ग हे सर्व नामशेष होत असून पूर्वास्पृश्यासह सर्व वर्ग आतां एकाच पातळींत येत आहेत. मागासलेला किंवा दडपलेला वर्ग हा शब्दप्रयोगहि हिंदुराष्ट्राला आतां खपत नसून अखंड एकजिनसी हिंदु-समाज हे भावी उच्चतर समाजव्यवस्थेचें रूप आहे.

सत्ता, संपदा व संस्कृति या तीन केंद्राभोंवतीं समाज भ्रमण करीत असतो. हीं तीनही द्वारें सर्व घटकांना हिंदुसमाजानें सताड मोकळीं ठेविलीं असून हिंदुसंस्कृतीच्या उदारता या गुणाचा अवलंब केलेला आहे. त्यामुळें हिंदुसंस्कृतीचीं उच्च व उत्तम अंगें अखिल हिंदूंना सुलभ होत आहेत.

समाजाचें अर्धें अंग स्त्रिया होत. स्त्रियांविषयीं मध्ययुगांत जरी अनुदार कल्पना उत्पन्न झाल्या तरी त्या आतां नष्ट होत असून स्त्रियांना पुरुषांच्या बरोबरीनें धार्मिक, सामाजिक, शैक्षणिक, आर्थिक, असे सर्व हक्क आहेत, अशा घोषणा होत आहेत. हिंदु स्त्रियांना स्वाभिमानानें आपल्या हक्काची जाणीव झाली असून त्या स्वतः सर्व दृष्टीनें समर्थ होण्याकरतां आणि हिंदुराष्ट्राचा संसार समर्थपणें चालविण्याकरितां अनेक व्याप आणि चळवळी करीत आहेत. विवाहसंस्था, विवाहसंस्कार यामध्येंहि सुधारणा होत असून स्त्रीजीवन स्वावलंबी आणि स्वाभिमानी करण्याचा यत्न चालू आहे. स्त्रियांचें शिक्षण, घरांतील उद्योग, अर्थोत्पादन, अपत्यसंगोपन

अशा सर्व क्षेत्रांत वैचारिक क्रांति होत असून हिंदुसमाजाचें हें अर्धें अंग समर्थ बनत आहे.

अखिल हिंदु हे रक्तानें, वंशानें, जातीनें, ध्येयानें, स्फूर्तीनें एक आहेत, अशी प्रबळ भावना उत्पन्न होत असून अखिल हिंदूंची सामुदायिक प्रार्थना एक, देव एक, ध्येय एक, मंत्र एक व तंत्र एक असे ऐक्याचे व समानतेचे विचार वाढत आहेत. सामाजिक समता लाभण्यास आजचा काल फारच अनुकूल आहे. वर्णसंस्था जुन्या धर्मशास्त्रांत आहे. जातिसंस्था आज व्यवहारांत आहे. पण यापुढें जागतिक आंदोलनामुळें आणि निरनिराळ्या विचारप्रवाहामुळें **अखंड एकजिनसी हिंदुसमाज** या ध्येयाकडे समाज चालला आहे.

**(४५६) शिक्षण व उद्योगधंदे**:—इंग्रजी राज्य सुरू झाल्यापासून हिंदुस्थानाला स्वाभिमानशून्य आणि प्रज्ञाहत करण्याचा यत्न झाला. शिक्षण सर्व परकीय भाषेंतून आणि तेंहि प्रत्यक्ष व्यवहाराशीं असंबद्ध असें दिलें गेल्यामुळें हिंदुस्थानची अपरिमित हानी झालेली आहे. परंतु आतां राष्ट्रानें उलट खाल्ली असून निरक्षरता घालविण्याचा आणि शिक्षण निर्दोष करण्याचा यत्न चालू आहे. इतिहासाचें ज्ञान, भूगोलाचें ज्ञान, भौतिक शास्त्रांचें ज्ञान, यांमध्यें प्रगति भराभर होत असून उद्योगधंद्याची वाढ तर पुष्कळच होत आहे. भौतिकशास्त्रें पूर्वीं आपल्याकडे होतीं. ज्ञान व विज्ञान अशा दोन्ही विद्या होत्या. वास्तुशास्त्र, करणविद्या, गुरुत्वाकर्षण, विमानें, बॅटऱ्या यांचे उल्लेख भृगु, कश्यप, अगस्ति इत्यादि संहितांमध्यें आलेले आहेत. बुद्धोत्तर कालांत या विज्ञानावर मिथ्यात्वाची छाप पडली व त्यामुळें हीं शास्त्रें लोपलीं.

युरोपखंडांतहि पंधराव्या शतकापर्यंत तेथील लोकांची प्रवृत्ति हिंदुस्थानासारखी अध्यात्मप्रवण होती. तिकडील तत्त्ववेत्तेहि वादविवाद आणि तत्त्वाचा काथ्याकूट करण्यांत धन्यता मानीत. पण पुढें त्याचा वीट येऊन भौतिक शास्त्रांचा उदय झाला आणि वाफेचीं यंत्रें निघून यंत्रयुग सुरू झालें. जपानची स्थिति १८५३ पर्यंत अशीच होती. वैद्यकाशिवाय इतर कोणचेंहि शास्त्र शिकण्यास परवानगी नसे. भौतिक शास्त्रांतील शोध लावणें हा गुन्हा समजला जाई. परंतु **आबेइस्नोकायी** या थोर मुत्सद्यानें कमोडर

पेरीशीं तह करून एकदम क्रांति केली. यद्दोच्या बंदरांत अमेरिकेच्या आरमारी जहाजानिशीं कमोडरपेरी युद्धास उभा ठाकला व त्यानें व्यापारा-करतां कांहीं बंदरें खुलीं करण्याचा तगादा लावला. युद्ध न करतां तह करून जपानमध्यें नव्या युगाची त्या दिवाणानें प्रतिष्ठा केली आणि हजारों तरुण अमेरिकेंत जाऊन भौतिक शास्त्रांत तज्ज्ञ होऊन आले.

हिंदुस्थानामध्यें इंग्रजांनीं उदार शिक्षणाच्या नांवाखालीं धंदे व भौतिक शास्त्रें यांचें शिक्षण मुळींच दिलें नाहीं. तथापि लोकहितवादी, आगरकर, टिळक, राजवाडे इत्यादि लोकाग्रणींनीं भौतिक शास्त्राचें महत्त्व चांगलें जाणलें होतें व तरुणांचें लक्ष या विषयाकडे वेधण्याचा यत्न त्यांनीं यथा-शक्ति चालविला होता. परिस्थिति आणि लोकाग्रणींचे यत्न यांमुळें पूर्वी आय. सी. एस. व बॅरिस्टर होण्याकरितां येथील तरूण परदेशांत जात असत तर आतां भौतिक शास्त्रें व उद्योगधंदे यांच्या शिक्षणाकरितां तरुणांचे ताफेच्या ताफे परदेशांत जात आहेत. कै. वा. सर जगदीश चंद्र बोस, सर प्रफुल्लचंद्र राय, सर चंद्रशेखर रामन् यांच्यासारखे जगांतील शास्त्रज्ञांच्या बरोबरीचे शास्त्रज्ञ आज हिंदुसमाजांत उत्पन्न झाले आहेत. निरनिराळ्या क्षेत्रामध्यें संशोधन करण्याकरतां निरनिराळ्या संस्थाहि उत्पन्न होत आहेत आणि राष्ट्राच्या नसानसांत हें भौतिकशास्त्र भिनविण्याचा यत्न चालू आहे. राष्ट्रांतील कच्याचा पक्का माल तयार करणें, उद्योग-धंद्यांची वाढ करणें, कारखाने नव्या पद्धतीनें वाढविणें आणि त्याकरितां लागणारी शास्त्रांची प्राणशक्ति उत्पन्न करणें हें काम मुख्य समजलें जात आहे. आजचें हें सर्व जग इंजिनें, विमानें, मोटारी, आगबोटी, तोफा, बंदुका, बॉंब, अॅटम् बॉंब यांवर चाललेलें आहे. अर्थात् हीं सर्व साधनें आपल्या देशांत उत्पन्न झालींच पाहिजेत. आपल्या राष्ट्राला जगांतील राष्ट्रांबरोबरीचें करण्याकरितां तरुणांनीं कचाप्रमाणें संजीवनी विद्या हस्तगत करून बंदुका, तोफा, विमानें, इंजिनें, पाणबोटी इत्यादि सर्व क्षेत्रांत पुरून उरण्याजोगें सामर्थ्य वाढविलें पाहिजे. भौतिक शास्त्राकडे पाहाण्याची पूर्वीची तुच्छतेची वृत्ति गेली आणि स्वेच्छेनें असो वा तुच्छतेनें असो, इंग्रजाला या महायुद्धामुळें सर्व तऱ्हेचे कारखाने काढण्यास हिंदु-स्थानास संधि द्यावी लागली. या महायुद्धामुळें हिंदुस्थान हा आतां

कृषिप्रधान देश राहिला नसून उद्योगधंदे आणि कारखाने यांचा हा देश झालेला आहे. जीवनोपयोगी सर्व वस्तू, अन्नवस्त्र, चैनीच्या व करमणुकीच्या सर्व वस्तू, युद्धोपयोगी साहित्य अशा एक ना दोन हजारों वस्तू तयार करण्याचे कारखाने निघाले आहेत. ते सर्व आतां बंद होऊं शकत नाहींत. तिसऱ्या महायुद्धाकरतां जरी नसलें तरी हिंदुस्थान हें राष्ट्र स्वावलंबी होण्याच्या दृष्टीनें हे सर्व कारखाने आणि उद्योगधंदे आज स्थापन झालेलें राष्ट्रीय सरकार कधींहि नाश होऊं देणार नाहीं.

स्वभाषेंतून शिक्षण, स्वसंस्कृतीचें शिक्षण, स्वदेशाभिमानाचें शिक्षण, शिस्त, शील, आणि संघटना यांचें शिक्षण यावर आतां जोर दिला जात आहे. म्हणजे शैक्षणिक क्षेत्रांतील इंग्रजांनीं उत्पन्न केलेले दोष नष्ट करून तें अद्यावत् करण्याचा यत्न चालू झाला आहे. हिंदुसंस्कृति ही परिस्थितिसापेक्ष अवश्य तें परिवर्तन करूनच टिकलेली आहे. अर्थात् नव्या युगाला योग्य अशा तऱ्हेचा पेहराव धारण करून ती जगाला आदर्श या स्वरूपांत राहणार यांत शंका नाहीं. आहारशास्त्र, आरोग्यशास्त्र, व्यायामशास्त्र, क्रीडाक्षेत्र, मनोरंजनाचीं साधनें, खान, पान, पोषाख, राहाणी, आचार, शिष्टाचार, स्वच्छता, भाषा, सण, व्रतें, वैकल्यें, दानें इत्यादि शेंकडों क्षेत्रांत बुद्धिपूर्वक सुधारणा हिंदुसमाज करूं लागला आहे. आहारांतील जुने विधिनिषेध जाऊन आर्थिक दृष्ट्या परवडणारा आणि धकाधकीच्या मामल्याला समर्थ करून दीर्घायुष्य देणारा आहार मान्यता पावत आहे. आरोग्यकारक व्यायाम व गृहरचना हीं रूढ होत आहेत. क्रिकेट, टेनिस, हॉकी हे जे परकीय खेळ पण तेहि जागतिक झाल्यामुळें हिंदु खेळाडु त्या क्षेत्रांत नैपुण्य दाखवून जगाला थक्क करीत आहेत. ललितकला, गायन, वादन, नर्तन यांचाहि विकास होत असून त्यांतहि सर्वत्र क्रांति, जागृति आणि उलथापालथ दिसत आहे.

(४५७) **हिंदुसंस्कृतीचें भविष्यकालीन स्वरूप**:–कोणतीहि संस्कृति मूळच्या स्वरूपांत सतत असूं शकत नाहीं. किंबहुना परिस्थितीला जमवून घेण्याचें आणि परिस्थितीशीं तोंड देण्याचें कौशल्य ज्या संस्कृतींत असतें तीच टिकते. हिंदुसंस्कृतीचा आजवरचा इतिहास पाहिला तर तिनें निरनिराळ्या काळीं परिस्थितीप्रमाणें अवश्य तें परिवर्तन केलें आहे, म्हणूनच

ती टिकली असें सप्रमाण सिद्ध होतें. वेदकालचें, सूत्रकालचें, स्मृति व पुराण या कालचें स्वरूप भविष्यकाळीं पुनः हिंदुसंस्कृतीला येणार व तोच खरा उत्कर्ष अशी जर कोणाची समजूत असेल तर ती चुकीची आहे. हिंदुसंस्कृतीचा भविष्यकालांत जो उत्कर्ष होणार तो आतां जुन्या स्वरूपांत होणार नसून नव्या स्वरूपानेंच होईल. यज्ञयागांच्या वेदी आणि देव-देवालयें यांच्या जागीं आतां राष्ट्रदेवता येऊन बसतील! अग्निहोत्राच्या पवित्र धुराचे लोटचे लोट जे आकाशांत पूर्वी जात असत त्या ठिकाणीं गिरण्या व कारखाने यांच्या धुराचे लोट आतां आढळतील! वेदघोषानें कान पवित्र करणारे, गायींनीं व हरिणांनीं भरलेले असे ऋषींचे आश्रम भविष्य-कालांत दिसणार नसून आजच्या राष्ट्रीयत्वाला, नागरिकत्वाला, मनुष्यत्वाला पोषक अशा तऱ्हेचें शिक्षण देणारीं विद्यापीठें यापुढें उत्पन्न होतील! नाम-स्मरणाच्या गदारोळांत तल्लीन होणाऱ्या भगवद्भक्ताच्या ऐवजीं मजुरांच्या चाळींतील कोलाहलाशीं, त्यांच्या दुःखांशीं व भावनांशीं समरस होणारे मनुष्यभक्त आतां उत्पन्न होतील! भूदेव म्हणून ब्राह्मणाच्या पायावर यापुढें कोणींहि लोटांगण घालणार नाहीं. तर जाति, पंथ यांचा विचार न करतां जो हिंदुराष्ट्राच्या व हिंदुसंस्कृतीच्या उत्कर्षाकरितां आपली बुद्धिमत्ता, आपलें कर्तृत्व खर्ची घालील अशा बुद्धिमान्, त्यागी, कर्तृत्ववान् अशा कोण-त्याहि हिंदूच्या मागें हिंदु तरुणांचे थवेच्या थवे लोटतील. व्रतें-वैकल्यें, अन्नसंतर्पणें, सहस्रभोजनें, यांचें प्रस्थ वाढविणारे ब्राह्मण भविष्यकालांत दिसणार नसून दलित वर्ग, दुःखी वर्ग, मागासेलला वर्ग यांच्या सेवेंत धन्यता मानणारे समाजसेवक उत्पन्न होतील! सती जाण्यांत आनंद मानणाऱ्या स्त्रियांऐवजीं पतीचें कार्य शेवटास नेणें, हिंदु राष्ट्रांतील स्त्रीजीवन सुखाचें करणें याकरितां जन्म आहे, असें समजणाऱ्या हजारों स्त्रिया उत्पन्न होतील! तात्पर्य, हिंदु समा-जांतील सर्व घटक अद्यावत् होतील व तसें होणें हेंच उत्कर्षाचें चिन्ह आहे.

(४५८) **हिंदुत्वाची तीव्र जाणीवः**—समान संपत्ति नि समान विपत्ति हीं माणसांना लौकर एकत्र करतात. इंग्रजी राज्याचा जुलूम, शिक्षणाचा प्रसार, दळणवळणाचीं साधनें, वाढलेले व्यवहार, यांमुळें भरतखंडांतील अखिल हिंदु एकरूप, एकध्येयी व एका संस्कृतीचे होऊं लागलेले आहेत. आचार, पोषाख, राहणी यांमधील वैचित्र्य जात चाललें आहे. इंग्रजी

राज्याच्या जुलमामुळें जसे अखिल हिंदु एका सूत्रांत येत आहेत, त्याचप्रमाणें मुसलमानांचीं दररोज चाललेलीं हिंदुसंस्कृतीवरील आक्रमणें, हिंदूंना अधिकाधिक संघटित करीत आहेत. श्रीशंकराचार्यकालीं, श्रीज्ञानेश्वरकालीं फार काय पण पेशवाईमध्यें हिंदुत्वाचा अभिमान जेवढा दिसत होता, त्यापेक्षां हल्लीं तो अधिक दिसत आहे. दळणवळणाच्या साधनांच्या अभावीं श्रीज्ञानेश्वरांना पंजाबांतील हिंदूंची कल्पना नसावी. श्रीशंकराचार्यांना बंगाल्यांतील हिंदु समाजाचें दुःख माहीत नसावें. पण आज भरतखंडांत हिंदूंना कोठेंहि दुःख झालें, त्यांच्यावर कोठेंहि आक्रमण झालें तर अखिल हिंदु त्यांच्या साह्यास धांवत आहेत. निजामच्या राज्यांतील हिंदु प्रजेवर असह्य जुल्म होत आहे, तेथें अनन्वित प्रकार घडत आहेत. म्हणूनच भरतखंडांतील हिंदुत्वनिष्ठ त्या जुलमाचा निःशस्त्र प्रतिकार करण्याकरितां हिंदुजनतेला साह्य करीत आहेत. आज हैदराबादचें प्रकरण निजामच्या जुलमामुळें उपस्थित झालें आहे! बंगालमध्यें जातिनिष्ठ मुसलमान सरकारचा हिंदूंवर जुल्म चाललेला आहे. त्याचा कहर गेल्या १६ आगष्टला झाला. हिंदुत्वाला आव्हान दिलें गेलें! त्याच्या प्रतिकाराकरितांहि अखिल भारतीय हिंदु साह्य करतील. पंजाब, सिंध व मलबारवरील हिंदूंवर जर असें संकट येईल तर तेथेंहि भरतखंडांतील अखिल हिंदु निःशस्त्र प्रतिकाराकरितां धांवून जातील. या जागृतीवरून हिंदुसंस्कृतीच्या संघटनेची व विकासाची चांगली कल्पना येते.

एकंदरींत सर्व चळवळींचें निरीक्षण केल्यास हिंदुसंस्कृति ही प्रगतीच्या मार्गावर आहे हें उघड होतें. हिंदुसंस्कृतीच्या उत्कर्षाचे जे मुख्य तीन उपाय जाज्वल्य **देशाभिमान, भौतिक शास्त्रज्ञानसंपन्नता आणि शिस्त व संघटना या बाबतींत फारच प्रगति होत आहे.** सर्व जग जसें त्रिगुणांत, सर्व ज्ञान जसें मुळाक्षरांत सांठवलें आहे, तसेंच हिंदुसंस्कृतीच्या उत्कर्षाचे सर्व उपाय या तीन उपायांतच अंतर्भूत झालेले आहेत. इच्छाशक्ति, ज्ञानशक्ति व क्रियाशक्ति यांनीं युक्त हे तीन उपाय आहेत.

(४५९) **देशाभिमानः**—हिंदुसंस्कृतीचा उत्कर्ष होण्यास देशाभिमानाची आवश्यकता आहे. ही वृत्ति पूर्वी नव्हती असें म्हणतां येत नाहीं. वेदकालीन प्रार्थनांवरून मातृभूमि व राष्ट्र यांविषयीं अभिमान नांदत

होता हें उघड होतें. अलीकडे ज्या तऱ्हेचा देशाभिमान आणि राष्ट्रियता म्हणून ओळखिली जाते त्या तऱ्हेची राष्ट्रियता कदाचित् पूर्वीं नसेल. युरोप खंडांतील लोक देशाभिमानी होण्याचीं कारणें कडक थंडी, जीवन-साधनांची दुर्मिळता, अन्नाचा तुटवडा, त्याकरतां करावे लागणारे अतिशय कष्ट आणि टीचभर देश हीं होत. स्वाभाविकच पोटाच्या आगीमुळें साहस, धाडस आणि चढाई हे गुण माणसांत येतात. त्यांतच भौतिक शास्त्रें आणि यंत्रें यांची भर पडली म्हणजे देशाभिमान उदित होतो. यंत्रांमुळें उत्पादन व उद्योगप्रियता वाढते व माल खपविण्याकरतां परदेशच्या पेठा शोधणें आवश्यक होतें. यावरून देशाभिमानाचा आणि भौतिक व भौगोलिक परि-स्थितीचा बराचसा संबंध आहे, हें सिद्ध होतें. भरतखंडाची हवा सम-शीतोष्ण, अन्नाचें वैपुल्य, जीवनसाधनांची समृद्धि आणि कमी कष्ट; त्यामुळें पाश्चात्यांप्रमाणें हिंदुस्थानांत देशाभिमान उत्पन्न झाला नाहीं. रानटी हपापलेल्या मोंगलाला व युरोपियनाला मारामाऱ्या करूनच जगावें लागलें. परक्यांना अन्न मिळविण्याकरतां प्राण वेंचावे लागत. तर भारतीयांना प्राण वेंचून हातचें अन्न गमवावें असें वाटत नसे. हा मागचा इतिहास असा असला तरी आज भरतखंडांत जाज्वल्य देशाभिमान उत्पन्न झालेला आहे. हिंदुस्थान हें हिंदुसंस्कृतीचें मातृस्थान आहे, तें हिंदूंचें आहे, हीच आपली पितृभूमि, मातृभूमि आणि पुण्यभूमि अशा अभिमानानें हिंदूंनीं हिंदु-राष्ट्रसंरक्षणार्थ स्वतःच्या रक्ताचा सडा घातला आहे. गेल्या पन्नास वर्षांत ही देशाभिमानाची वृत्ति इतकी वाढली आहे कीं निर्भेळ स्वातंत्र्या-करितां वाटेल तो त्याग करण्यास हिंदुराष्ट्रभक्त अहमहमिकेनें पुढें येत आहेत. आमच्या देशाचा कारभार आम्हीच करणार, आमच्या हातांत सत्ता आली पाहिजे, इंग्रजांनीं आतां बाडबिस्छाड गुंडाळावें व चालते व्हावें, अशा घोषणा होत आहेत. हिंदुसमाजामध्यें स्वराज्य मिळविण्याची, तें चाल-विण्याची आणि जगाला आपलें राष्ट्र ललामभूत करण्याची महत्त्वाकांक्षा उत्पन्न झाली आहे. सर्व तऱ्हेचीं सत्ताकेंद्रें काबीज करून त्यांचा उपयोग अधिकांत अधिक करून घेऊन प्रबळ होण्याच्या मार्गास आतां हिंदुराष्ट्र लागलें आहे. इंग्रजी राज्य होऊन थोडे दिवस न लोटतात तोंच स्वातंत्र्य-युद्धाचा पहिला यत्न १८५७ सालीं झाला. अर्थात् स्वातंत्र्यनिष्ठेनें अनेक

यत्न करीत करीत १९५७ च्या आंत हिंदुराष्ट्र हें निर्भेळ स्वातंत्र्याचें ध्येय गांठणार असा विश्वास वाटतो. स्वातंत्र्यप्राप्तीनंतर तें टिकविण्याचा देशाभिमानहि हिंदु समाजांत भरपूर आहे, असें प्रत्ययास येईल.

(४६०) **देशाभिमानाचा मोठा आदर्श–नेताजी सुभाष बोसः**— या महापुरुषानें जी अद्‌भुत, रोमहर्षण आणि अघटित घटना केली, तीमुळें अखिल हिंदुराष्ट्र देशाभिमानानें जागृत झालें. ब्रिटिश साम्राज्यवादीसुद्धां हिंदी सैन्यांतील ही देशाभिमानी वृत्ति पाहून गडगडले! स्वतंत्र हिंदुस्थान सरकार या संस्थेची स्थापना या महापुरुषानें केली. त्या सरकारनें बँका काढून कोट्यावधि रुपये जमविले. जपाननें युद्धबंदी म्हणून पकडलेल्या सर्व हिंदी सैनिकांचें सैन्य जमविलें आणि जपानच्या आहारीं न जातां हिंदुस्थानची सरहद्द लढवून आंत घुसून 'आमचे 'आम्ही बघतों, तुम्ही फक्त लांबून साह्य करा, ' अशा मुत्सद्दीपणानें ज्यांनीं जपानशीं करार–मदार केले, त्या नेताजी सुभाषांचा व संग्रामदेवता कॅप्टन लक्ष्मी यांचा युद्धांत जरी जय झाला नाहीं तरी त्यांनीं कल्पनेंत केलेली क्रांति हा मोठा विजयच होय. सैनिकांमध्यें देशाभिमान उत्पन्न होणें आणि देशभक्तीपुढें कोणत्याहि सरकारची नोकरी तुच्छ समजून त्या सरकारला नष्ट करून देशाला स्वतंत्र करणें हें परमपवित्र कर्तव्य आहे, असें सिद्ध झालें. मुंबईतील नौसैनिकांच्या बंडानें इंग्रजांना बराच हादरा दिला. १९४२ च्या आंदोलनानें लोकांचें सामर्थ्य आणि संघटना वाढविली. सरकारला गुन्हेगार मिळेनात व मिळाले तरी पुराव्याचे अभावीं त्यांना सोडून देणें भाग पडलें. सरकारी तिजोऱ्या लुटणें, कलेक्टरकचेऱ्यांवर आक्रमण करणें व कलेक्टरांना क्रांतीमध्यें घेणें एवढेच प्रकार ४२ च्या आंदोलनांत व्हावयाचे राहिले ! पण जे झाले त्यावरून राष्ट्रांतील देशाभिमान, शिस्त आणि संघटना किती जाज्वल्यतेनें वाढत आहेत, व त्या क्षेत्रांत हिंदुराष्ट्र कसें समर्थ होत चाललें आहे, याचें प्रत्यंतर येतें. १९४२ च्या आंदोलनामध्यें कांहीं अनिष्ट प्रकार घडले. तथापि पुष्कळ ठिकाणीं न्याय्य हक्क मिळविण्याकरितां चळवळ करणाऱ्या निःशस्त्र लोकांवर लाठीहल्ले करण्याचें पोलिसांनीं नाकारलें! "पोट जाळण्याकरितां हें पातक आम्ही करीत नाहीं." असें त्यांनीं खडखडीतपणें सांगितलें! मूलभूत हक्काविरुद्ध असलेले अन्याय्य कायदे मोडणाऱ्या वीरांना मॅजिस्ट्रेट लोकांनीं शिक्षा

तर दिल्या नाहींतच, परंतु सारासार विचार गुंडाळून असल्या शिक्षा देण्यापेक्षां नोकऱ्यांचे राजिनामे देऊन देशभक्तांच्या मेळाव्यांत जाण्याचें त्यांनीं पत्करलें! अधिक मजुरी मिळावी म्हणून संपावर गेलेल्या लाखो मजुरांवर त्यांचा जमाव बेकायदा आहे म्हणून गोळ्या घालण्यास सैनिक सिद्ध झाले नाहींत ! " निःशस्त्रावर गोळ्या घालणें हें दुष्कृत्य आपण करणार नाहीं," असेंच त्यांनीं बजावलें ! देशभक्त, सत्याग्रही, निःशस्त्रप्रतिकारक यांच्या चुगल्या करण्यास गुप्त पोलीस मिळाले नाहींत. राजबंद्याचा अनन्वित छळ करणारे पूर्वींचे जेलरहि पालटले व त्यांना अनेक सवलती देऊं लागले. या सर्व घटना जाज्वल्य देशाभिमान, शिस्त व संघटना यांच्या द्योतक नाहींत काय ?

(४६१) **शिस्त आणि संघटनाः**–हिंदु राष्ट्राच्या उत्कर्षाकरितां शिस्त व संघटना हीं अखिल हिंदूंमध्यें आलीं पाहिजेत. याहि बाबतींत निराशाजनक परिस्थिति नाहीं. यंत्रयुगामुळें आज शहरें वाढत आहेत. शहराशीं खेड्यांचा संबंध पूर्वीपेक्षां अधिक येत आहे. नव्या तऱ्हेची शिस्त व संघटना हीं लोकांत अनेक संस्थांच्या द्वारें येऊं लागलेलीं आहेत. अगदीं खेड्यांतसुद्धां सार्वजनिक कार्यांचा विचार, प्रचार, उच्चार व आचार चालू असून गांवोगांवीं संस्था निर्माण होत आहेत. संस्थांचें यंत्र बनवून यंत्राप्रमाणें काम करण्याची वृत्ति उत्पन्न होऊं लागली आहे. बाजारबुणगेपणाचा वीट येत असून व्यवस्थितपणा, शिस्त आणि संघटना यांचें महत्त्व पटूं लागलेलें आहे. शिक्षणसंस्था, व्यायामसंस्था, पतपेढ्या, व्यापारी पेढ्या, विमाकंपन्या, लिमिटेड-अन्‌लिमिटेड कंपन्या आणि शेंकडों प्रकारच्या निरनिराळ्या लहानमोठ्या संस्था आज पद्धतशीर, व्यवस्थित व बिनबोभाट काम करीत आहेत. संस्थेशिवाय, संघाशिवाय, मंडळाशिवाय या कालांत जगतां येत नाहीं. वैय्यक्तिक जीवनक्रम मागें पडून संस्थेशीं संबद्ध असा जीवनक्रम समाजांत रूढ होत आहे. यांत्रिक युगाची पकड जशी जशी दृढ होत जाईल तशी तशी शिस्त व संघटना अधिकाधिक मुरत जाईल.

(४६२) **सैनिक शिक्षणः**–राष्ट्रामध्यें शिस्त आणि संघटना यांचे संस्कार दृढ होण्यास प्राथमिक शिक्षणापासून सैनिक विद्येच्या अभ्यासक्रमाचा अंतर्भाव झाला पाहिजे. अन्य सुधारलेल्या देशांतील समाज

आणि हिंदुसमाज यांची तुलना केली म्हणजे शिस्त आणि संघटना यांचें महत्त्व तेव्हांच समजतें इंग्रजांनीं हिंदुस्थानला सैनिक शिक्षण द्यावयाचें नाहीं असें ठरविलें होतें. कारण हत्यारांच्या निर्बंधानें लोकांना निःशस्त्र करून थोडक्या सैन्यासह हिंदुस्थानावर राज्य करतां येत होतें; परंतु या महायुद्धाच्या सुप्रसंगामुळें हिंदुस्थानाला सैनिक शिक्षणाची संधि मिळाली. अहिंसेच्या गोंधळांत सांपडलेल्या एका वर्गानें जरी सैनिक शिक्षणाला विरोध केला तरी हिंदुसमाजांतून लक्षावधी तरुण सैन्यामध्यें शिरलें. भू, जल व आकाश अशा सर्व क्षेत्रांत मोठमोठ्या हुद्यांच्या जागा पराक्रमानें व्यापल्या आणि संधि मिळतांच विमान, आरमार, आणि भूसैनिक अशा सर्व विद्यांमध्यें आपण समर्थ होऊं शकतों असें हिंदुराष्ट्रानें जगाला दाखविलें. लढाऊ आरमारावरचें वरिष्ठपण स्वीकारून त्यांतहि हिंदुवीरांनीं नांव गाजविलें. हिंदुसमाजांतील क्षात्रतेज चमकण्यास सुप्रसंग लाभला, केवळ व्हाईसराय कमिशन व किंग्ज कमिशन येवढ्यावर हिंदुवीर संतुष्ट राहिले नाहींत. पराक्रमाचें निदर्शक म्हणून बहुतेक व्हिक्टोरिया क्रॉस हिंदुवीरांनीं मिळविले आणि इंग्रज सेनापतींनाही आश्चर्य वाटण्याजोगीं पराक्रमाचीं कृत्यें केलीं. यामुळेंच आतां इंग्रज सरकारला सैनिक शिक्षणाच्या शाळा, विद्यालयें, कॉलेजें आणि विद्यापीठें काढणें भाग पडत आहे. पुण्याजवळ खडकवासले येथें एक मोठें सैनिक शिक्षणाचें विद्यालय निघणार असून त्याचें सर्व सूत्रचालकत्व वीरबहाद्दर थोरात यांचेकडें सुपूर्त केलेलें आहे. या संस्थेसारख्या अनेक संस्था आतां निघण्याच्या वार्ता ऐकूं येत असून त्याकरतां कोट्यवधी रुपये खर्च होणार आहेत. हिंदुस्थान हा स्वसंरक्षणक्षम आणि समर्थ होण्यास दहालक्ष खडें सैन्य हिंदुस्थानांत सिद्ध पाहिजे. जागतिक घटनाकडे लक्ष दिल्यास तो योग लौकर येईलसें दिसतें. शस्त्रनिर्बंध नष्ट करण्याच्या मागण्या होत असून तो रद्द झाल्यास प्रत्येक मनुष्य आपल्या ऐपतीप्रमाणें शस्त्रवान होईल. आणि शालेय शिक्षणाबरोबर दोन वर्षें सक्तीचें लष्करी शिक्षण सुरू झाल्यास हिंदुस्थान हा देश सर्व जगाला भारी होईल. राष्ट्रजीवनाच्या ज्या तीन मुख्य शक्ति प्रज्ञा, पौरुष व पैसा त्या आत्मसात करण्याच्या मार्गास हिंदुसंस्कृति लागली असून हिंदुसंस्कृतीच्या

सर्व अंगांचा उत्कर्ष सर्व बाजूंनीं होत असून निर्भेळ स्वातंत्र्य हें ध्येय तिच्या आटोक्यांत आलेलें आहे.

हिंदुसंस्कृतीच्या उत्कर्षापकर्षांची मीमांसा करतांना असें सिद्ध झालें कीं अपकर्षांचीं कारणें झटाझट नष्ट होत असून उत्कर्षांचे उपाय हिंदुसंस्कृति आत्मसात् करीत आहे. जागृत झालेल्या हिंदुसमाजामध्यें स्वराज्याची आकांक्षा उत्पन्न झाली असून त्याला संस्कृतीचें श्रेष्ठत्व पटलेलें आहे. आत्मश्रद्धा आणि स्वाभिमान हीं इतकी वाढत आहेत कीं त्यामुळें निर्भेळ स्वातंत्र्याच्या आणि स्वसंस्कृतीच्या आड जें जें येईल तें नाहींसें करण्यास हिंदुसमाज सज्ज झालेला आहे. पाश्चात्यांची संकुचित राष्ट्रभावना, त्यांचा साम्राज्यवाद, भौतिक सुखाबद्दलची अनिवार तृष्णा, भांडवलशाहीचा संघटित लोभ व लष्करशाहीमुळें सर्व जगांत होणारा आकांत; यापेक्षां श्रीकृष्णाचा प्रवृत्तिपर कर्मयोग, वेदांतविचाराचें महात्म्य, श्रीशंकराचार्यांचा अद्वैत सिद्धांत, सनातनधर्मनिष्ठा, समाजधारणेस उपयुक्त असणारी हिंदुधर्मांतील सनातनधर्मतत्त्वें, यांवर अधिष्ठित अशी जागतिक संस्कृति निर्माण करण्याच्या मार्गास हिंदुसंस्कृति लागलेली आहे. स्वतःकरितां निर्भेळ राजकीय स्वातंत्र्य संपादून सर्व जगाला अध्यात्मिक शांतीचा लाभ मिळवून देण्याचें ईशनियोजित कार्य हिंदुसंस्कृतीलाच करावयाचें आहे.



## प्रकरण एकोणतिसावें

# मुसलमानांचा प्रश्न कसा सुटेल ?

गेल्या प्रकरणांत सांगितल्याप्रमाणें हिंदुसंस्कृति स्वातंत्र्याच्या ध्येयाकडे निश्चित चालली आहे. निर्भेळ स्वातंत्र्य तिच्या आटोक्यांतहि आलें आहे; परंतु मुस्लिम लीगवाले अल्पसंख्य मुसलमान या स्वातंत्र्याच्या मार्गांत

आडमुठेपणानें विघ्न करीत आहेत, तेव्हां तो प्रश्न कसा सुटेल याचा विचार प्रस्तुत प्रकरणांत कर्तव्य आहे.

(४६३) **समानशीलव्यसनेषु सख्यम्**:—स्वातंत्र्याकरितां मुसलमान हे हिंदूंच्या खांद्यास खांदा लावून इंग्रजांशीं लढण्याकरितां आले तर हवेंच आहेत, न आले तरी एकटे हिंदु मुसलमाननिरपेक्ष स्वराज्य मिळवूं शकतील व मिळविलेलें रक्षणहि करतील. स्वातंत्र्याकरितां मुसलमानांचा प्रश्न सुटलाच पाहिजे असें नाहीं, व अनुनय करून असले प्रश्न सुटतहि नसतात. हिंदुराष्ट्र हें सर्व जगाला सर्व दृष्टीनें आदर्श व्हावें, जगाला शांतता, समता व बंधुत्व यांचा संदेश या राष्ट्रानें द्यावा, भिन्न धर्मांचे आणि भिन्न संस्कृतीचे लोक एका ठिकाणीं राहून गुण्यागोविंदानें आपला अभ्युदय कसा साधतात हें सोदाहरण जगाला दाखवावें, या उच्च ध्येयाकरितां हा प्रश्न सोडवावयाचा आहे. उच्च ध्येयाच्या मार्गावर असतांना दररोज वाद्यें, नमाज, मोहरम, गोहत्या या निमित्तानें जें वितुष्ट निर्माण होतें व जी रोज कटकट वाटते ती जर एकदां मिटेल तर तेंहि इष्ट आहे.

हिंदु व मुसलमान या दोन समाजांत सलोखा व्हावा असें वाटत असेल तर तो समान स्वभाव, समान संस्कृति, समान ध्येय, समान आपत्ति यांमुळेंच होईल. ‘समानशीलव्यसनेषुसख्यं’ हा सिद्धांत त्रिकालाबाधित आहे. पण हा विसरून काँग्रेसचे पुढारी या प्रश्नाची निरगांठ सोडवीत असतांना ती घट्ट आवळीतच आहेत. दोन व्यक्ति, दोन समाज, दोन जमाति यांचें सख्य देण्याघेण्याच्या अटीवर होत नाहीं. तर तें समानशीलत्वामुळें होतें. जगांत सख्य, स्नेह वा मैत्री देऊन घेऊन होत नाहीं व झाली तर टिकत नाहीं. मिळकतीवर व डबोल्यावर लक्ष्य ठेवून वागणारा मुलगा पितृभक्त होणार नाहीं. “उंची वस्त्रें व उंची दागिने मिळतील तर पातिव्रत्याचें व्रत, नाहीं तर घटस्फोटाची नोटीस” असें म्हणणारी स्त्री पतिव्रताधर्मानें राहणार नाहीं. बक्षिसें व पदव्या या अटीवर गुरुशिष्यांचें नातें कधींच प्रेमळपणाचें राहात नाहीं. त्याप्रमाणें नोकऱ्या, जागा आणि प्रांतविभागणी यांच्या अटीवर मुसलमानांचा प्रश्न कधींच सुटणार नाहीं.

हिंदुस्थान देश हा हिंदूंचा प्रामुख्यानें आहेच; पण त्याबरोबर मुसलमान, खिश्चन, पारशी, यहुदी अशा सर्वांचा आहे. आपला देश

स्वतंत्र व्हावा म्हणून सर्वांनीं त्याग करावा. देश स्वतंत्र झाल्यावर सर्वां-बरोबर त्याग करणाऱ्यांनाहि यथायोग्य प्रमाणांत वांटा मिळेलच. देशभक्ति ही ईश्वरभक्तीप्रमाणें निरपेक्ष करावयाची असते. आणे, पै, नोकऱ्या, धुगऱ्या व जागा यांच्या भाषेनें राष्ट्रभक्ति होत नसते. माझा देश मी स्वतंत्र करणार, त्याकरितां वाटेल तो त्याग करणार, स्वातंत्र्याच्या भावनेंतच मला आनंद व समाधान आहे, ही उच्च कल्पनाच स्वातंत्र्याच्या लढ्यांत पाहिजे. वाघाची डरकाळी ऐकतांच भित्रे लोक पळून जातात आणि शूर लोक देण्याघेण्याची भाषा न करितां एकदम चाल करून वाघाला ठार करितात. समाज त्या वीरांचा गौरव करितो व त्यांचीं स्मारकें उभारतो. १८५७ पासून जे जे क्रांतिकारक झाले, ज्यांनीं आत्मयज्ञ केला, स्वार्थाचा होम केला, हंसत-मुखानें मृत्यूला कवटाळलें, त्यांनीं कधींहि देण्याघेण्याची भाषा काढली नाहीं. परतंत्र राष्ट्रांतील सर्व जमाति परतंत्रच, तेथें देणार कोण व घेणार कोण, कोणाच्या बापाचें कोण देणार ! तात्पर्य देण्याघेण्याचे भाषेवर मुसलमानांचा प्रश्न सोडविण्याचा यत्न काँग्रेसच्या पुढाऱ्यांनीं चालू ठेवल्यानें तो प्रश्न सुटत तर नाहींच, उलट देण्याघेण्याच्या लालुचीनें सर्व जमातच्या जमात जरी नसली तरी कांहीं मुसलमान लीगच्या द्वारानें खरोखर देशद्रोहच करीत आहेत.

(४६४) **मुसलमान हें भिन्न राष्ट्र नव्हे**:–मुसलमानांच्या पूर्वींच्या मागण्या अल्पसंख्य जमात म्हणून संरक्षण पाहिजे अशा होत्या. परंतु प्रथम चौदा, पुढें एकवीस, नंतर बेचाळीस आणि त्याचा कडेलोट " हिंदुस्थानांत दोन स्वतंत्र नि सार्वभौम राष्ट्रें उत्पन्न करून पाकिस्तानांत मुसलमानांचें स्वतंत्र राज्य " अशा भाषेंत झालेला आहे. ही सर्व विचारसरणीच अथपासून इतिपर्यंत चुकीची आहे. हिंदुस्थानांतील मुसलमान हे मुळीं स्वतंत्र राष्ट्र नाहींत. रक्तानें, वंशानें ते हिंदूच आहेत. हिंदुस्थानांतील मुसलमान आपण तुर्क व मोंगलांचे वंशज आहोंत असें म्हणत नाहींत. हिंदूंतील बाटून जे मुसलमान झाले तेच हे सर्व हिंदुस्थानांतील मुसलमान आहेत. दोन वर्षांपूर्वीं जे हिंदू होते ते आज मुसलमान झाले किंवा दोनशे वर्षांपूर्वीं जे हिंदू होते त्यांनीं इस्लामचा स्वीकार केला; तर त्यामुळें त्यांचें रक्त व वंश बदलला असें मुळींच होत नाहीं. हिंदुस्थानांतील मुसलमानांची उर्दू ही मातृभाषा

नाहीं. सर्व प्रांतिय भाषाच त्यांच्या मातृभाषा आहेत. कांहीं चालीरीति आणि कांहीं आचारविचार भिन्न आहेत, त्यावरून मुसलमान हे भिन्न-राष्ट्र होऊं शकत नाहींत. म्हणजे एका हिंदुस्थानांत दोन राष्ट्रें ही तर्क-दुष्ट कल्पना तगच धरूं शकत नाहीं.

(४६५) **राज्यकर्तेंहि नव्हतेः-** हिंदुस्थानांतील कांहीं मुसलमानांना अजाणतेपणानें असें वाटतें कीं आम्ही हिंदूवर आठशें वर्षें राज्य केलें, म्हणून यापुढें आम्ही राज्य करणार, परंतु ही कल्पनाहि निर्मूल आहे. हिंदुस्थानांत मुसलमानांचें व्यवस्थित राज्य असें अकबर ते औरंगजेबापर्यंतच झालें व तें हिंदूंच्या मदतीनेंच झालें. हिंदुस्थानबाहेरच्या परक्या तुर्कांनीं आणि मोंगलांनीं हिंदुस्थानांत येऊन हिंदूंवर आणि बाटलेल्या मुसलमानांवरहि राज्य केलें. हिंदुस्थानांतील बाटलेल्या मुसलमानांनीं कधींहि राज्यें केलीं नाहींत. इस्लामचा स्वीकार करून स्वाभिमानशून्यतेनें राज्यकर्त्यांची त्यांनीं मर्जी संपादन केली इतकेंच. आज इंग्रजांचें राज्य आहे. एखादा हिंदु ख्रिस्ती झाला तरी तो इंग्रजाप्रमाणें राज्यकर्ता झाला, असें कोणी समजत नाहींत. राज्यकर्त्यांचा धर्म स्वीकारल्यानें वंश व जात बदलत नाहीं. हिंदू-मधून मुसलमान झालेल्या लोकांची संख्या आज अवघी ७ कोटी आहे. हे मुसलमान राज्यकर्ते नव्हते. कारण अरब, तुर्क, मोंगल यांच्या रक्ताचे हे मुसलमान नाहींत. तात्पर्य आम्ही भिन्न-राष्ट्र आहोंत व राज्यकर्ते होतों म्हणून आम्हाला स्वतंत्र पाकिस्तान पाहिजे हा विचार कोलमडून पडतो ! पाकिस्तान हें भौगोलिकदृष्ट्या, अर्थदृष्ट्या व संरक्षणदृष्ट्या अशक्य व अव्यवहार्य आहे, हें आतां सूर्यप्रकाशाइतकें उघड झालें आहे. आतां या प्रश्नाच्या बुडाशीं ज्या धार्मिक कोत्या व खोट्या कल्पना आहेत, त्यांचा परामर्श घेतों.

(४६६) **हिंदुलोक काफीर नव्हेतः-**हिंदुलोक हे मूर्तिपूजक व काफीर आहेत. त्यांच्याशीं सख्य करूं नये, मैत्री करूं नये, अनुदारपणें वागावें, प्रसंगीं धर्मयुद्ध करून त्यांची कत्तलहि करावी, म्हणजे स्वर्गप्राप्ति होते; अशा प्रकारचे न्यूनगंड मुसलमानांमध्यें आहेत. हिंदुस्थानावर स्वाऱ्या करणाऱ्या बुभुक्षित, रानटी महमद गिझनीपासून तों गेल्या १६ आगस्टला

कलकत्त्यास झालेल्या हिंदूंच्या भयंकर कत्तलीपर्यंत हीच कल्पना अधिष्ठित आहे. रानटी व बुभुक्षित राज्यकर्त्यांनीं कुराणाचा दुरुपयोग केला व त्यावेळीं तो त्यांना इष्ट वाटला. परंतु या विसाव्या शतकांत या कल्पना आतां मुळींच टिकणार नाहींत.

कुराणामध्यें परस्पर विरोधी आज्ञा आहेत, त्याचें कारण भिन्न परिस्थिति हें होय. तपस्वी, साक्षात्कारी, धर्मोपदेशक आणि सेनापती अशा निरनिराळ्या अवस्थांत पैगंबरसाहेबांनीं केलेला उपदेश हा एकच कसा असणार ? कुराणामध्यें अन्यधर्मीय म्हणजे काफीर असें म्हटलेलें नाहीं.

The Apostle believes in what is sent down to him by his Lord, and the believers all believe in God and His Angels, and His books and his Apostles, we make no difference between any of his Apostles.
(11-285 P. 46)

जे कोणी ईश्वरावर, त्याच्या धर्मग्रंथावर आणि प्रेषितावर (अवतारावर) विश्वास ठेवितात ते आस्तिक होत. ईश्वर, प्रेषित व अवतार यामध्यें आस्तिक लोक भेद करीत नाहींत. असा वरील इंग्रजी वाक्याचा आशय आहे. कुराणांत एका ठिकाणीं काफीर किंवा नास्तिक याची पुढीलप्रमाणें चर्चा केली आहे.

Verily those who disbelieve in God and His Apostles desire to make a distinction between God and His Apostles, and say ' We believe in part and disbelieve in part and desire to take a midway course between the two.' These are the misbelivers.
( IV-145 to 150 P. 93 )

यावरून जे कोणी ईश्वर, प्रेषित आणि धर्मपुस्तकें यांच्यामध्यें भेद मानतात, प्रतारणा करतात, ईश्वरावर विश्वास ठेवीत नाहींत, धर्मग्रंथाचा कांहीं भाग मानतात व कांहीं मानीत नाहींत, तेच नास्तिक होत. अन्यधर्मीय म्हणजे काफीर किंवा मूर्तिपूजक म्हणजे काफीर असा अर्थ नसून जे धर्मामध्यें, ईश्वरामध्यें आणि धर्मपुस्तकामध्यें भेद मानतात, तेच काफीर होत.

असें उघड होतें. कुराणांतील या वाक्याप्रमाणें **धर्मवेडे मुसलमानच काफीर ठरतात. कारण** ते हिंदुधर्म व मुसलमानी धर्म, हिंदु देव व मुसलमानी देव असा भेद करतात. तेव्हां खरा काफीर कोण ह्याचा त्यांनीं विचार करावा. हिंदुलोक ईश्वर मानतात, धर्म मानतात, परलोक मानतात, पाप पुण्य मानतात, व पापभीरूपणानें, न्यायानें वागण्याचा यत्न करितात. त्यांना काफीर समजून त्यांच्याशीं अनुदारतेनें वागणें म्हणजे पैगंबरसाहेबाचा द्रोह करणें होय.

जे अन्यायानें वागतात ते काफीर होत.

The misbelievers, they are the unjust.

(II–255 p. 39)

सर्व हिंदुसमाज अन्यायानें वागतो असें समजणें व त्यांचा काफीर म्हणून छळ करणें हें महामूर्खपणाचें आहे.

(४६७) कुराणांतील आज्ञा परिस्थितिसापेक्ष आहेत:–कुराणामध्यें अशा तऱ्हेचे उच्च विचार आलेले आहेत, पण ते पैगंबरसाहेबांच्या पहिल्या तापस व साक्षात्कारी अवस्थेंतील आहेत. महंमद पैगंबर ज्या समाजांत जन्माला आले तो कुरेशी अरबांचा समाज अत्यंत रानटी, क्रूर, व रांगडा होता. त्या लोकांना पैगंबराचा धर्म आवडला नाहीं. कुरेशी अरबांनीं त्याचा छळ केला म्हणून तो मदिनेला पळून गेला व बरेच अनुयायी जमवून त्यांचें सैन्य तयार केलें; आणि कुरेशी अरबांविरुद्ध तरवार घेऊन प्रतिकार करण्यास पैगंबरानें अनुयायास सांगितलें. पैगंबराचा स्वभाव शांत व सहिष्णु होता; पण अनुयायांच्या आग्रहामुळें हातांत तलवार घेतांच शांततेचा बाणा सुटला! बुद्ध, साक्रेटीस, शंकराचार्य, महावीर या सर्वांनीं छलकांचा छल सोसून सहिष्णुतेनें व शांततेनें आपले संप्रदाय वाढविले. पैगंबराला त्या परिस्थितींत तसें करतां न आल्यामुळें प्रथम छलकांचा व नंतर आपणांस न मानणाऱ्यांचा समाचार घेण्याचा उपदेश करण्यांत आला. कुराणाचें निर्विकार मनानें अध्ययन केल्यास कुराणामध्यें अन्यधर्मीयाविषयीं उदारता आहे व नाहीं असें दोन्ही तऱ्हेचें उत्तर द्यावें लागतें.

(४६८) **कुरेशी अरब व पैगंबर**:–कुराणामध्यें अहिंसा, उदारता, सहिष्णुता वगैरे सर्व आहे, असें कोणी म्हणतात; परंतु तो भ्रम आहे. अखिल

मानवजातीवर प्रेम करा, सर्वांशीं समतेनें वागा, सर्वांशीं सहिष्णुता ठेवा, असा उपदेश कुराणांत नाहीं. मुसलमान तेवढे बंधु, त्या सर्वांशीं समत्वानें वागावें, असें पैगंबरनें प्रतिपादिलें आणि आपल्या भोंवतालच्या रानटी टोळ्यामध्यें ऐक्य उत्पन्न केलें. कुरेशी अरबाविरुद्ध लढण्याचा व आपलें मत जे मानीत नाहींत, त्याशीं लढण्याचा उपदेश कुराणामध्यें ठिकठिकाणीं आलेला आहे. महंमद कासीमच्या स्वारीपासून तों कलकत्याच्या १६ ऑगस्टच्या हिंदूंच्या भयंकर कत्तलीपर्यंत जी वागणूक मुसलमानांनीं हिंदूंशीं केली, तिला कुराणांत कांहींच आधार नाहीं, असें म्हणतां येत नाहीं. कुराणांतील उपदेशाचा स्थल, काल व परिस्थितिदृष्ट्या विचार न करतां सर्व आक्रमकांनीं आपल्या मतलबाप्रमाणें त्याचा अर्थ व उपयोग केला. कुराणांतील पुढें दिलेले उतारे हे आजच्या मूर्तिपूजक हिंदूंना उद्देशून नाहींत; कारण सहाव्या शतकांत पैगंबरापुढें हिंदुस्थानांतील हिंदु मुळींच नव्हते. पुढील सर्व उतारे हे लढाईच्या प्रसंगाचे आणि कुरेशी अरबांच्या पराभवाकरतां उत्तेजनार्थ उच्चारलेले आवेशाचे शब्द आहेत हें ध्यानांत ठेविलें पाहिजे.

" Prescribed for you is fighting, but it is hateful to you. "

( Chapter II Page 31 )

" A believing slave is better than an idolater, even though he please you." ( Chapter II Page 33 )

" Say to those who misbelieve, ye shall be overcome and driven together to hell, and ill couch will it be. " ( Chapter III Page 47 )

" Those who believe shall not take misbelievers for their patrons rather than believers. "

( Chapter III Page 49 )

" O ye who believe ! Take not to intimacy with others than yourselves; they will not fail to spoil you; they would fain ye came to trouble,—hatred is shown by their mouths; but what their breasts conceal is greater still. " ( Chapter III Page 61 )

" Count not those who are killed in the way of God as dead, but living with their Lord. "

( Chapter III Page 67 )

" O ye who believe ! take not misbelievers for patrons rather than believers. Do ye wish to make for God a power against you ? "

( Chapter IV Page 92 ).

" O ye who believe ! take not the Jews and Christains for your patrons. They are patrons of each other; but whose amongst you takes them for patrons, verily, he is of them, and, verily God guides not an unjust people."

( Chapter V page 105. )

" I will cast dread into the hearts of those who misbelieve, strike off their necks then, and strike off from them every finger tip. " ( Chapter VIII page 164-165 ).

" But when the sacred months are passed away, kill the idolaters wherever ye may find them; and take them and besiege them, and lie in wait for them in every place of observation."

( Chapter IX page 173).

" O thou Prophet ! Strive strenuously against the misbelievers and the hypocrites, and be stern against them; for their resort is hell, and ill journey shall it be."

( Chapter IX Page 183 )

(The quran-E. H. Palmer Part I and II the Sacred Book of the East Series Vol. VI and IX-F Max muller).

" लढणें हा तुमचा धर्म आहे. मूर्तिपूजकांपेक्षां गुलाम हा श्रेष्ठ आहे. नास्तिकांना सांगा कीं तुमची हकालपट्टी नरकांत होईल. नास्तिकांशीं

मैत्री करूं नका, त्यांचा आश्रय घेऊं नका, ते तुम्हाला बिघडवतील. जरी वरून त्यांनीं तुम्हाला प्रेम दाखविलें तरी आंतून ते तुमचा द्वेषच करीत असतात ! तोंडानें ते द्वेषाचेच उद्‌गार काढतात. नास्तिकांशीं लढतांना जे मेले त्यांची क्षिती बाळगूं नका. ते ईश्वराघरींच पोचले आहेत. ज्यू व ख्रिश्चन लोकांशीं मैत्री करूं नका, ते एकमेकाचे साथीदार आहेत. तुम्ही जर त्यांचा आश्रय घ्याल तर फसाल. नास्तिकांच्या छातींत मी धडकी भरवितों. तुम्ही त्यांच्या माना छाटा आणि बोटांच्या पेरा पेरावर चोपा ! ”

कलकत्त्यास १६ ऑगस्टच्या पूर्वी ज्या घटना झाल्या आणि ज्यांचें वर्णन मुसलमान पक्षपाती स्टेटस्‌मन पत्रानें केलें, त्यांत “ रमजान महिन्याचे पवित्र उपासाचे दिवस ! तत्‌जन्य पुण्य व तें संपतांच पैगंबरानें नास्तिकावर मिळविलेला विजय ” अशा भाषणांनीं चेतावणी दिल्याचा उल्लेख आहे. ते कुराणांतील वाक्य वर दिलें आहे, त्याचा आशय असा कीं,

“ रमजान महिन्याचे पवित्र उपवासाचे दिवस संपले कीं एकदम बाहेर पडा आणि मूर्तिपूजक जेथें भेटतील तेथें त्यांचा सप्पा उडवा ! त्यांना चोहोंबाजूंनें वेढा, दबा धरून बसा व शरण येईपर्यंत सोडूं नका. कारण नास्तिक जे काफीर त्यांची जागा नरक हीच आहे. म्हणून त्याविरुद्ध लढण्याची अल्लानें आज्ञा केली आहे. ”

**(४६९) धर्माला काळिमा लावला:**—कुराणांतील वरील आज्ञा या त्रिकालाबाधित आहेत असें समजणें व त्याप्रमाणें वागणें म्हणजे मानव-समाजावर मोठी आपत्तीच आहे. महंमद कासीम, महंमद गझनी, महंमद घोरी, ऐबक, बल्बन, अल्लाउद्दिन खिलजी, फिरोज तुघलख, शिकंदर लोदी, शेरखान, औरंगजेब इत्यादि पूर्वींचे आक्रमक आणि राज्यकर्ते आणि अलीकडील हिंदुविरुद्ध चेतावणी देणारे मुसलमान पुढारी कुराणांतील वरील वाक्यांचा आधार घेऊनच वागतात. दिल्लीच्या रक्तपिपासू सुलतानांना आपलीं सर्व क्रूर कृत्यें धर्माला धरून आहेत, असें दाखविण्याकरतां कुराणाचे हे आधार उपयोगी पडले. अल्लाउद्दिनचें कडवें फर्मान, फिरोज तुघलखाचीं क्रूर कृत्यें, शिकंदर लोदीचा जुलूम, शेरखान आणि औरंगजेब यांनीं केलेले अनन्वित प्रकार, आदिलशाहींतील हिंदूंच्या छळाविषयीं सुटलेले हुकूम या सर्वांना कुराणांतील वरील आधार होते असें त्यावेळीं भासविण्यांत

आलें. लुटारूंना, आक्रमकांना आणि राज्यकर्त्यांना दुष्कृत्यें पचविण्यास उपयोगी पडतील, अशीं हीं नेमकीं वाक्यें मुल्ला आणि मौलवींनीं आणि काजींनीं राज्यकर्त्यांना दाखविली आणि या सर्व वाक्यांचा विपर्यास करून कुराणांतील मूळ शुद्ध धर्माला काळिमा आणला.

(४७०) **जहांगिराचें क्रौर्यः**—जहांगीरची डायरी मेजर डेव्हिड यानें प्रसिद्ध केली आहे. तींतील पान १२८ वर जहांगीर असें म्हणतो कीं ( हा उतारा पान ३४३ वर दिला आहे. ) " दरसाल प्रत्येक सुभ्यांत निदान ५ लाख लोक तरी निरनिराळ्या कारणानें मारले जात असत. " याशिवाय झाडावर उलटे टांगून कत्तली करणें, स्वारीस निघतांच लोकांचीं डोकीं उडविणें अशा गोष्टी होत त्या वेगळ्याच. जेत्यांना जितावर दहशत बसविण्याकरतां धर्माच्या नांवाखालीं या गोष्टी करावयाच्या होत्या. म्हणूनच त्यांनीं जगांतील माणसांचे आस्तिक व नास्तिक असे दोन वर्ग केले आणि पैगंबरांना न मानणारे ते नास्तिक असें समजून हिंदू प्रजेला खूप छळलें. माणसाप्रमाणें पृथ्वीचेहि दोनभाग त्यांनीं कल्पिले. दार-उल्-हरप म्हणजे शत्रूची भूमि, आणि दार-उल-इस्लाम म्हणजे मुसलमान राज्य करतात ती मित्रभूमि. शत्रु राष्ट्रांत नाइलाजानें राहण्याचा प्रसंग आला तर केव्हांतरी जिहाद म्हणजे धर्मयुद्ध करून त्याला नाहींसा करावा, असा हा विजेत्यांनीं दंडक उत्पन्न केला.

(४७१) **दोन प्रसिद्ध ग्रंथकार व कुराणः**—अशा तऱ्हेच्या या अनुयायांच्या प्रकारामुळेंच एल्फिन्स्टन, म्यूर, स्टोबर्ट, जॉनपूल, एच्. जी. वेल्स, गिबन वगैरेसारख्या नामांकित ग्रंथकारांनीं कुराण व त्याचा प्रणेता हे दोन्ही मानवजातीचे शत्रू होत असले संतापजनक उद्गार अनुयायांच्या कृतीवरून गैरसमजुतीनें काढले आहेत. हिस्टरी ऑफ इंडियाचा कर्ता एल्फिन्स्टन पान २९४—९५ वर म्हणतो कीं:—

The spirit of intolerance in which it was preached ........must place its author among the worst enemies of mankind. तसेंच लाईफ ऑफ महंमद या पुस्तकाचा कर्ता म्यूर हा पान ५२१—२२ वर म्हणतो कीं:—

The sword of Mohamad and the Kuran are the most stubborn enemies of civilization, liberty and truth which the world has yet known.

या तऱ्हेचे विचार आणखी पुष्कळांचे असले तरी ते गैरसमजुतीचे असें समजून आम्हीं त्यांना महत्त्व देत नाहीं.

(४७२) **रॉयचें मतः**–'इस्लामचें क्रांतिकार्य' या ग्रंथाचे कर्ते श्री. मानवेंद्रराय यांनीं हेंच म्हटलें आहे कीं "कुराणांतील मूळ उपदेश शांततेचा असतांना अनुयायांनीं त्याला क्रौर्य, कत्तल, जाळपोळ, यांनीं विकृत रूप दिलें! इस्लामच्या अनुयायांत रानटी व अर्धरानटी, तसेच तुर्क व मोंगल हे समाविष्ट झाल्यामुळें इस्लामचा इतिहास काळवंडलेला आहे." याच कारणास्तव मुसलमानी धर्माबद्दल तिटकारा दाखविणारे अनेक मुसलमान पूर्वीं होते व आतांहि आहेत. कारण त्यांत उच्च तत्त्वज्ञान नाहीं; विचारशीलाला कुराणांतील वरील अनुदार शिकवण पटत नाहीं. म्हणूनच अकबरानें उघड उघड मुसलमानी धर्माविरुद्ध बंडच पुकारलें, व दिने–इ–लाही या नांवाचा स्वतंत्र धर्म काढला. राजपुत्र दारा, सुजा व खुश्रू यांची प्रवृत्ति हिंदुधर्माकडे होती. हिंदु धर्माची आणि तत्त्वज्ञानाची त्यांचे मनावर इतकी पकड होती कीं, हे राजपुत्र जगले असते तर इतिहासावर निराळा परिणाम झाला असता.

(४७३) **गोविंदराव काळे यांचें पत्रः**–इतिहासकालीन आक्रमक मुसलमान हिंदूंना काफीर समजत असत आणि हिंदूंशीं म्हणजे काफिराशीं जितक्या अनुदारतेनें वागतां येईल, तितकें वागण्याचा यत्न करीत. मराठ्यांनीं मोंगलशाहीचा विध्वंस केला. हिंदुपदपादशाही स्थापिली. सर्वत्र दरारा बसविला. त्यावेळीं हिंदूंचें राज्य म्हणजे मूर्तिपूजक काफिरांचें राज्य झालें, असें मुसलमानांना वाटे. त्यावेळीं उत्तरेंत पेशव्यांचा सुप्रसिद्ध वकील गोविंदराव काळे हा होता, तो एका पत्रांत लिहितो कीं, "इकडे दोस्त दुष्मन फार, यवनांचे मनांत कीं काफीरशाही झाली असें बोलतात." त्यावेळचे आक्रमक व राज्यकर्ते यांची ही वृत्ति ठेवून आजचे मुसलमान पुढारी वागत आहेत, ही फार अनिष्ट गोष्ट आहे. आम्ही अफगाणशीं मैत्री करूं, रशियाचा दाब आणूं, हिंदू हे आमचे कोणी नव्हेत, चेंगिझखानी

कत्तली करून पाकिस्तान मिळवूं, असलीं दमदाटीचीं भाषणें जर एकत्र केलीं तर त्यांचें महाभारत होईल! त्या भरीस न पडतां राष्ट्रीय मुसलमान म्हणून ज्यांना समजतात असे एका काळचे राष्ट्रीय सभेचे अध्यक्ष मौलाना पै. वा. महंमदअल्ली यांनीं कुराणप्रणीत शास्त्राधारें म. गांधीजीविषयीं जे उद्गार काढले तेवढे देतों म्हणजे शितावरून भाताची परीक्षा होईल.

**(४७४) महम्मद्अल्ली व म. गांधीः**–महंमद अल्लींनीं कोकोनाडा येथें राष्ट्रिय सभेच्या व्यासपीठावरून गांधीजींची ख्रिस्ताशीं तुलना करून श्रोत्याकडून टाळ्या घेतल्या, पण पुढें लखनौ व अजमीर येथें त्यांच्या जातभाईंनीं त्यांना जेव्हां छेडलें त्यावेळीं त्यांच्या तोंडचीं मुक्ताफळें बाहेर पडलीं तीं अशीं.

However pure Mr. Gandhi's character may be, he must appear to me from the point of view of religion inferior to a musalman ever though he be without character.

गांधीजी हे कितीहि मोठे असले तरी त्यांची योग्यता मुसलमान धर्मदृष्ट्या फाटक्या तुटक्या मुसलमानापेक्षां कमी आहे. अजमीर येथें तर महंमदअल्ली म्हणाले कीं,

Yes, according to my religion and creed, I do hold that adulterous and fallen musalman be better than Gandhi. ( थॉट्स ऑन पाकिस्थान पान ३०१।२ ) होय, नीतिभ्रष्ट आणि व्यभिचारी मुसलमानसुद्धां मी गांधीपेक्षां श्रेष्ठ समजतों !!!

मुसलमान पुढारी जर स्थलकालाचा विचार न करतां कुराणांतील वचनांचा विपर्यास करून वरील तऱ्हेचे उद्गार काढतील तर या विसाव्या शतकांत हें चालणार नाहीं. मध्य कालांतील धार्मिक कल्पनांचें जग आतां नाहीं. आजच्या या कालांत राष्ट्रियता, देशाभिमान, संघटना आणि शिस्त यांचीच आवश्यकता आहे. मुसलमानामध्यें हिंदुस्थानाविषयीं जाज्वल्य देशाभिमान उत्पन्न झाला पाहिजे आणि अन्य धर्मियांशीं त्यांची वागणुक सहिष्णुतायुक्त झाली पाहिजे. संख्येवर प्रतिनिधित्व, गुणावर नोकऱ्या, हिंदुस्थानचें

अखंडत्व व अविभाज्यत्व या तत्त्वांना त्यांनीं आत्मसात् केलें पाहिजे; तरच मुसलमानांचा प्रश्न सुटणार आहे.

(४७५) **मुसलमान आणि स्त्रीदाक्षिण्यः**–मुसलमानांमध्यें स्त्रियांविषयीं फारच अनुदार विचार आहेत. म्हणून ते काफिरांच्या स्त्रियांप्रमाणें स्वसमाजांतील स्त्रियांवरहि अनन्वित अत्याचार करतात. मॉडर्न रिव्ह्यूच्या १९३९ मे च्या अंकांत बंगालमधील स्त्रीविषयक गुन्ह्यांची माहिती आली आहे. १९३४ ते ३८ या पांच वर्षांत ४४५६ गुन्हेगारांवर खटले भरण्यांत आले. त्यांपैकीं दीड हजारांना शिक्षा झाल्या. अत्याचारांना बळी पडलेल्या स्त्रियांची संख्या ४५०० असून त्यांपैकीं निम्या मुसलमान स्त्रिया आहेत. कुराणांत स्त्रियांविषयीं उलट सुलट दोन्ही तऱ्हेचे विचार आहेत. व त्याचा फायदा आक्रमकांनीं पूर्वीं घेतला व दंगेखोर गुंड हल्लीं घेत आहेत. लढाईमध्यें व दंग्यामध्यें सांपडलेल्या स्त्रिया खुशाल भोगाव्या, जरी त्या विवाहित असल्या तरी चालतील, असें कांहीं ठिकाणीं म्हटलेलें आहे.

कुराणांत एका ठिकाणीं हातीं सांपडलेल्या कुमारिकांच्यावर अत्याचार करूं नका व चुकून तसे अत्याचार झाले तर ईश्वर क्षमा करतो असें म्हटल्यामुळें अत्याचारी वृत्तीला उत्तेजनच मिळतें.

(कुराण भाग २ अध्याय ७७)

Do not compel your slave girls to prostitution when they desire chastity......but he who does compel them, verily God after they are compelled is forgiving and compassionate.

इतिहासकालीन आक्रमक विजेत्यांनीं हिंदु स्त्रियांवर किती अत्याचार केले तें इतिहासप्रसिद्धच आहे. अल्लाउद्दिननें पद्मिनीच्या अभिलाषानें किती भयंकर आक्रमण केलें हें सांगावयास नकोच. पण अकबरासारख्या बादशहानेंहि उदेपूरची राजकन्या मिळावी म्हणून मीनाबाजार भरवणें, स्त्रियांच्या मेळाव्यांत हिंडणें असले प्रकार सुरू केले होते. हें मागें पृष्ठ ३२३ वर लिहिलेलें आहे. गेल्या पंचवीस वर्षांत विशेषतः हिंदुमुसलमानांचें ऐक्य झालें पाहिजे अशी गर्जना झाल्यापासून धर्मवेड्या मुसलमान गुंडांनीं पुढाऱ्यांच्या प्रक्षोभक भाषणाला अनुसरून किती अत्याचार केले, त्यांचा

उल्लेखहि करवत नाहीं. मुसलमानांमध्यें हिंदु स्त्रियांविषयीं जी रावणाची, कीचकाची आणि दुर्योधनाची अधम वृत्ति झालेल्या अत्याचारावरून पदोपदीं दिसते, तिचा प्रतिकार हिंदुलोक वाटेल तें मोल देऊन करतीलच करतील. मानव्याच्या विकासाकरितां मुसलमान समाजामध्यें स्त्रीवर्गाविषयीं उदारता यावयास पाहिजे. मिळकत व वारसा या दृष्टीनें मुलीविषयीं मुसलमानी धर्म हा उदार आहे, पण विवाहित स्त्रियांविषयीं तो अनुदार आहे. छलकाविरुद्ध सांगितलेल्या आज्ञा आतां बाजूस ठेवून धर्मप्रसाराविषयीं सक्ति करूं नये. आईच्या पायाशीं स्वर्ग आहे वगैरे ज्या उच्च प्रकारच्या मानव्यविकासक आज्ञा आहेत, त्यांचाच अवलंब मुसलमानांनीं करावा.

Let there be no violence in religion.
......... belongeth preaching only.
Heaven lies at the feet of mother.

(कुराण अ. ३ सुरा १९)

अन्यधर्मीय म्हणजे काफीर त्यांत हिंदु म्हणजे महा काफीर आणि त्यांच्या स्त्रिया म्हणजे उपभोग्य पशू असल्या वेड्या समजुतींना कुराणांतील विपर्यस्त आधाराचा पाठिंबा घेऊन जे व्यवहार चालू आहेत, ते मतपरिवर्तनानें बंद पडले, म्हणजे मुसलमानांचा प्रश्न तेव्हांच सुटणार आहे.

(४७६) मानव्यविघातक तत्त्वः—अस्पृश्यता जशी मानव्याच्या विकासाला विघातक तशीच अन्यधर्मीयांसंबंधींची अनुदारता ही मनुष्यत्वाला घातक आहे. मुसलमानांनीं हिंदुस्थानांत आल्यापासून हिंदूंशीं विश्वासघात, कपट, नि क्रौर्ययुक्त जें वर्तन केलें, त्याचें बीज हिंदूविषयींच्या अनुदारतेंत आहे; आणि तेंच आज त्या समाजांतील प्रत्येक घटकांत दिसत आहे. जोंवर मुसलमान हे हिंदूविषयीं अनुदार वृत्ति धारण करीत आहेत, जोंवर ते त्यांना काफीर समजतात, जोंवर ते मूर्तिपूजक कितीहि भला असला तरी त्याची मैत्री करणें हें पाप आहे असें समजतात, तोंवर मुसलमानांचा प्रश्न सुटणार नाहीं.

वेद प्रमाण मानणारे पण अस्पृश्यतानिवारणाला अनुकूल शास्त्राधार काढून देणारे प्राचीन परंपरेबद्दल आदर बाळगून देशकालमानाप्रमाणें धर्म

बदलतो असें सांगणारे तत्त्वनिष्ठ परिवर्तनवादी पंडित जसे हिंदु समाजांतून उत्पन्न झाले, तसे मुसलमान समाजांतून परिवर्तनवादी मुल्ला व मौलवी जेव्हां पुढें येऊन कुराणांतील अनुदार आज्ञा या ज्यांनीं पूर्वी साक्षात् पैगंबराचा छळ केला त्यांनाच उद्देशून आहेत, आजच्या मूर्तिपूजकांना म्हणजे हिंदूंना आणि इतरांना उद्देशून महंमद पैगंबराच्या त्या आज्ञा मुळींच नाहींत, त्या हिंदूंना उद्देशून आहेत असें म्हणून त्या आज्ञांचा जे दुरुपयोग करीत असतील ते पैगंबराचे आणि मनुष्यसमाजाचे शत्रु होत, असें जेव्हां स्पष्ट व सडेतोडपणें म्हणूं लागतील व मुसलमानांतील समंजस माणसें जेव्हां या विधानाला पुष्टि देऊन मनोवृत्तींत पालट झाल्याचें आपल्या वृत्तीनें व वागणुकीनें दर्शवतील त्याच वेळीं मुसलमानांचा प्रश्न त्वरित सुटेल.

मुसलमानांच्या वाटेस जर नास्तिक न जातील तर त्यांस त्रास होणार नाहीं, असें प्रतिपादन कुराणांत असल्याचें कोणी सांगतात. पण प्रश्न असा कीं, ‘ अरबस्थानामध्यें कोणचे हिंदु लोक पैगंबरांच्या वाटेस त्या वेळीं गेले होते ? त्या रेताड प्रदेशावर आक्रमण करण्याची इच्छा कुणाला तरी होईल काय ? जेथें उन्हाळ्यांत सुद्धां भरपूर पाणी पिण्यास मिळत नाहीं आणि अन्न तर बारा महिने जेमतेम मिळतें तेथें कोण व कशाला जाणार? बुभुक्षितपणानें दुसऱ्याच्या देशांत यावयाचें, त्यांना नास्तिक म्हणावयाचें, त्यांनीं केलेलें मूर्तिपूजेचें पातक धुवून टाकण्याचा अभिनिवेश धरावयाचा, त्यांचे देव फोडावयाचे, स्त्रिया भ्रष्ट करावयाच्या व जर कोणी प्रतिकार करावयास आलें तर काफीर म्हणून त्यांच्या कत्तली करावयाच्या यांत कांहीं माणुसकी आहे काय ? विश्वासघात, क्रौर्य, कत्तल असल्या गोष्टी करून संभावित व सुसंस्कृत समाजावर दहशत बसविण्याचा रानटी यत्न करून पुनः संभावितपणें अहिंसेचें प्रवचन झोडावयाचें हें न्याय्य आहे काय?

एकंदरींत मुसलमान समाजांत अनुदारता व असहिष्णुता फार दिसते. हिंदूंशीं वागतांना मुसलमान अनुदारतेनें वागतातच, पण आपपसांतसुद्धां ते पुष्कळ मारामाऱ्या करतात. शिया व सुनींच्या मारामाऱ्या दरसाल कांहीं कमी होत नाहींत. तुर्क व मोगल हे सुनी पंथाचे व इराणी हे शिया पंथाचे, त्यांच्यामध्यें परस्पर वैमनस्य अद्यावत् आहेच. हुमायुनाला शिया पंथ कां स्वीकारावा लागला हें इतिहासप्रसिद्ध आहे.

(४७७) **ज्ञान व संस्कृति यांचा अवमान:**– ज्या हिंदु समाजाशीं मुसलमान समाज इतका अनुदारतेनें वागतो, त्या हिंदु समाजांतील बऱ्याच बाबी मुसलमानांनीं अनुकरणानें स्वीकारलेल्या आहेत. मुसलमानांमध्यें जातिसंस्था आहे, अस्पृश्यता आहे, पंथ व संप्रदाय आहेत. शकुन, ज्योतिष, भुतेंखेतें, अवतार हेंहि आहे. मूळ रक्त हिंदूंचें, चालीरीती व समजुती हिंदूंप्रमाणें; फार काय पण मूर्तिपूजासुद्धां हिंदूंप्रमाणें मुसलमानांत आहे, असें सर्व असतांना मुसलमानांनीं हिंदूंचा द्रोह करणें हें अत्यंत विपरीत आहे. मुसलमान लोक जर शांतपणानें व अन्तर्मुखतेनें विचार करतील तर त्यांना आजचा हिंदु समाज मुसलमानांपेक्षां अधिक सुसंस्कृत आहे हें मान्य करावें लागेल. हजार वर्षांपूर्वींचे परके मुसलमान त्या वेळेच्या हिंदूंच्या मानानें किती तरी रानटी होते. त्या वेळचा हिंदु समाज हा मुसलमानांपेक्षां अधिक सुसंस्कृत होता. आजहि तुलना केल्यास शिक्षण, साक्षरता, शोधकता, शस्त्रज्ञता, सौजन्य, देशाभिमान, त्याग, धैर्य, शौर्य अशा सर्व गुणांत हिंदु हे मुसलमानांपेक्षां श्रेष्ठ आहेत, हें अनिष्ट व कटु सत्य मुसलमानांना कसेंहि करून मान्य करणें भाग आहे. आज जगांतील संशोधकांच्या, शास्त्रज्ञांच्या, मुत्सद्यांच्या, विद्वानांच्या मांडीस मांडी लावून बसण्याजोगे शेकडों पुरुष हिंदूंमध्येंच आहेत. पण मुसलमानांत त्यांचा अभाव आहे. हिंदुस्थानांत काय पण स्वतंत्र मुसलमानी राष्ट्रांतसुद्धां नांव घेण्याजोगीं माणसें नाहींत. असें असतांना मुसलमानांनीं हिंदूंना धार्मिक दृष्ट्या आपल्यापेक्षां कमी समजणें, त्यांना तुच्छ लेखणें, त्यांचा तिरस्कार करणें, म्हणजे रानटीपणानें **ज्ञानाचा व उच्च संस्कृतीचा अवमान** करण्यासारखें आहे. मुसलमानांमध्यें अरब मात्र थोडे सुसंस्कृत होते, त्यांची ज्ञानलालसा चांगली होती. त्यांनीं हिंदुस्थानांत ज्ञानार्जनाकरितां माणसें पाठविलीं. बगदादच्या खलिफानें हिंदु पंडितांना आश्रय देऊन वैद्यक, ज्योतिष, गणित या विद्या मिळविल्या; पण आजच्या मुसलमानांना ज्ञानाचें कांहींच वाटत नाहीं. याचें कारण हिंदुस्थानांतील बराचसा मुसलमान समाज हा अडाणी आहे. या समाजांत तुर्क–मोंगलांचे रानटी संस्कार आणि हिंदु समाजांतील अगदीं खालच्या थरांतील अनिष्ट संस्कार तेवढेच एकवटलेले आहेत.

हिंदूंशीं राष्ट्रिय बुद्धीनें सहकार्य करण्यांत, हिंदु हीं आपल्यासारखीं ईश्वराला प्रिय माणसें आहेत असें समजण्यांत मुसलमानांची हानि मुळींच नाहीं. उलट अशा सुसंस्कृत समाजाच्या शेजारीं राहण्यांत त्यांना भूषण आहे. मुसलमानांच्या टोळधाडींनीं कांहीं वेळां हिंदूंवर विजय मिळविले आणि मुसलमानांनीं कांहीं दिवस राज्य केलें, याचा अर्थ हिंदूंपेक्षां मुसलमान श्रेष्ठ आहेत असें नव्हे. हिंदूंना पूर्वीं कधींहि तसें वाटलें नाहीं. फार काय पण आज इंग्रजांनीं शास्त्राच्या व संघटनेच्या जोरावर हिंदुस्थान जिंकलें आहे तरी हिंदु लोक इंग्रजांना श्रेष्ठ समजत नाहींत. म्हणूनच पूर्वीं मुसलमानांना मुली देण्यांत आणि आजहि इंग्रजांशीं लग्नें करण्यांत हिंदूंना मुळींच भूषण वाटत नाहीं. रांगडे, असंस्कृत व आडदांड लोक प्रसंगीं कांहीं साधनांनीं सुसंस्कृत समाजावर जय मिळवितात, पण तो कांहीं सांस्कृतिक विजय नव्हे ! हिंदूंच्या सहवासानें सुसंस्कृतपणा, सौजन्य, सहिष्णुता यांचा मुसलमानांनीं अंगीकार केला, तर मुसलमानांचा प्रश्न त्वरित सुटेल.

(४७८) **वेद, गीता व अनुदारता:**—एकादा वेदाचा अभ्यासी म्हणेल कीं, 'अहो, तुमच्या वेदांत दस्यु, अनार्य व शूद्र यांसंबंधानें अनुदार विचार नाहींत काय? मग कुराणालाच नांवें काय ठेवतां? त्याचें उत्तर अनुदार विचार असले तरी शूद्र व अनार्य यांचा संघर्ष जसा अधिक अधिक होऊं लागला तसतसें आर्यांनीं त्यांना आत्मसात् केलें असें आहे. अनार्यांतील अनेक लोकांना आर्यांनीं सुसंस्कृत करून, त्यांना चातुर्वर्ण्यांत स्थान दिलें, त्यांना धर्म दिला व अध्यात्माचें भांडार खुलें केलें ! म्हणजे प्रथम प्रथम दस्यु व अनार्यांविषयीं आर्य जरी थोडे अनुदारतेनें वागले, तथापि पुढें कांहीं वर्षांनीं ती वृत्ति बदलली. पण मुसलमान हे हिंदूंच्या सहवासांत हजारों वर्षें असतांना त्यांची हिंदूंविषयींची अनुदार वृत्ति जी आहे ती कायम आहे.

एकादा गीताभ्यासी गृहस्थ असें विचारील कीं, अहो, तुमच्या गीतेंतसुद्धां अध्याय ३, श्लोक ३१—३२ व अध्याय १६, श्लोक १९—२० मध्यें भगवान् श्रीकृष्णानें कुराणाप्रमाणें अनुदार उद्गार काढलेले नाहींत काय? भगवान् श्रीकृष्णानें गीतेंतील तिसऱ्या अध्यायामध्यें कर्मयोगाचें तर्कशुद्ध व मार्मिक मंडण केलें. या कर्मयोगाचें अनुष्ठान जे कोणी मत्सरानें करणार नाहींत, ते मूर्ख होत; एवढेंच तेथें म्हटलें आहे. तसेंच अध्याय

सोळामध्यें दैवी संपत्तीचें सोज्वल स्वरूप सांगून नरकाला नेणाऱ्या आसुरी संपत्तीचेंहि वर्णन केलें. तें सर्व ऐकून जर कोणी भ्रमिष्टपणानें, रागानें, अहंकारानें व असूयेनें आसुरी संपत्तीचा स्वीकार करतील तर ते असुरीयोनीमध्यें जन्माला येतील असें श्रीकृष्णानें सांगितलें आहे. तेथें या असुरांना, नास्तिकांना, माझें न ऐकणाऱ्यांना, माझा मत्सर करणाऱ्यांना “मारा, ठोका, बडवा, त्यांच्याशीं अनुदारतेनें वागा” असें कुराणाप्रमाणें कोठेंहि सांगितलेलें नाहीं. अत्यंत दुराचाऱ्यालासुद्धां पश्चात्ताप झाल्यास सद्गति मिळते. ज्यानें त्यानें आपापल्या धर्मांप्रमाणें वागावें, पसंत पडेल त्या देवतेस भजावें, अशी गीतेची उच्च नि उदात्त शिकवण आहे.

(४७९) हिंदुधर्म ही एक उच्च संस्कृतिः-हिंदु समाज इतका उदार होण्याचें एक कारण भौतिक व भौगोलिक आहे. भरतखंड हा मोठा अफाट देश, समशीतोष्ण हवा, अन्नाचें वैपुल्य, जीवनोपयोगी साधनें प्राप्त करण्यास कष्ट कमी, देशाचा विस्तार खूप असल्यामुळें कितीहि लोक आले तरी जगण्याला मुळींच अडचण नाहीं. प्रचंड पर्वत, मोठमोठ्या नद्या, खोल दऱ्या व खोरीं इत्यादिकांच्या भव्यतेमुळें हिंदूंचीं मनें भव्य व उदात्त झालीं. धर्मातील तत्त्वज्ञानावर बाह्य परिस्थितीचा अंशतः परिणाम होतो. किंबहुना परिस्थितिसापेक्ष अशीं नीतितत्त्वें व आचारविचार उत्पन्न होत असतात. शिवाय हिंदु धर्म हा एक व्यक्तिनिष्ठ पंथ वा संप्रदाय नाहीं किंवा एक पुस्तकनिष्ठ धर्म नाहीं. हिंदुधर्म ही एक उच्च संस्कृति आहे व ती विचारनिष्ठ आहे. त्यामुळें या संस्कृतीनें अनेक पंथ, संप्रदाय व मतें पचवून सर्वांना वावरण्यास क्षेत्र दिलें आहे. पारमार्थिक क्षेत्रांत हिंदूइतका उदार कोणीच नाहीं. आस्तिकनास्तिक अशा दोघांनाहि तो सारखें वागवितो. उदात्त तत्त्वज्ञान, निष्काम कर्मयोग, अहेतुक भक्ति, बुद्धिस्वातंत्र्य, आचारस्वातंत्र्य, हेंच हिंदु संस्कृतीचें लक्षण आहे. अनेक विचारवंतांना येथें स्थान आहे म्हणून समाजसुधारणा व समाजाभ्युदय हें ध्येय डोळ्यांपुढें ठेवून अनेक ऋषिमुनींनीं देशकालसापेक्ष निरनिराळे धर्मग्रंथ लिहिले आहेत. हिंदु धर्म हा परिवर्तनशील आहे. इस्लाम धर्माचा एकच ग्रंथ, त्याचा ठराविक एकच अर्थ, व तोहि ईश्वरानें केलेला या समजुतीमुळें मुसलमानांमध्यें प्रतिगामी वृत्ति व अनुदारता आली आहे. परिस्थितिसापेक्ष धर्म-

समजुतींत, वृत्तींत व कृतींत परिवर्तन करणें हें शहाणपणाचें आहे. मुसलमानांच्या वृत्तींत व कृतींत हिंदूप्रमाणें परिवर्तन होणें अवश्य आहे. हिंदु धर्म ही एक सुसंस्कृत समाजाची संस्कृति आहे, तर इस्लाम संप्रदाय हा ६ व्या शतकांत अडाणी व रानटांतून उद्‌भूत झालेला आहे. धार्मिक क्षेत्रांत सहनशीलता ठेवावी, आपली संस्कृति हळू हळू शिकवावी, इतरांशीं सहिष्णुतेनें वागावें, शांतता, समता व विश्वबंधुत्व यांतच आत्मोन्नति आहे असें शिक्षण हिंदु समाजाला हजारों वर्षें मिळालेलें आहे. इस्लाम धर्माची शिकवण अशी नाहीं.

हिंदु हा जात्या मृदु, सभ्य, शांत, परधर्मांच्या बाबतींत उदार व सहिष्णु असा आहे, तर मुसलमानांचा स्वभाव त्या उलट आहे. हिंदूंचा धर्मोत्साह आत्मोन्नतिप्रवर्तक असा आहे, तर मुसलमानांचा धर्मोत्साह इतरांना पीडा देणारा आहे. जुलूम जबरदस्तीनें बाटविणें, थोडक्याकरितां एकेरीवर येणें, कलागती करणें, हें हिंदुस्वभावाला आवडत नाहीं. आपली संस्कृति व आपला सभ्याचार देऊन इतरांना आत्मसात् करण्याची मनोवृत्ति हिंदूंची आहे. शांततामय मार्गाची संवय हिंदूंना लागलेली आहे, तर मुसलमानांचें सर्वस्वीं त्या उलट आहे.

**(४८०) दोघांच्या मनाची ठेवण निराळीः**—इस्लामी धर्माची शिकवण अनुदार होण्याचें एक कारण भौतिक व भौगोलिक आहे. रूक्ष व ओसाड प्रदेश, रखरखीत वाळवंट, अन्नाची दुर्मिळता, पाण्याचा अभाव, ना झाडें ना झुडुपें अशा परिस्थितींत उत्पन्न झालेला धर्म अनुदारच असणार. त्यांत रानटी अनुयायांच्या स्वभावाची भर पडल्यामुळें अनेक विद्वानांचे मतें इस्लामला अतिशय विकृत स्वरूप आलें. पण हिंदुस्थानांतील मुसलमान आतां त्या रखरखीत अरबस्थानांत नाहींत म्हणून त्यांनीं आपला स्वभाव हिंदूप्रमाणें उदार बनविला पाहिजे.

महात्मा गांधींचा प्रभाव हिंदी राजकारणावर पडूं लागल्यापासून त्यांनीं राजकारणांत आत्मवाद आणला. पाशवी शक्तीपेक्षां आत्म्याची शक्ति, Soul ची शक्ति फार मोठी आहे, असें सिद्ध करण्याचा त्यांनीं यत्न केला. इंग्रजांसारख्या प्रबळ, पाशवी शक्तिसंपन्न, पण सुसंस्कृत माणसांवर सर्वस्वीं नसला तरी थोडा तरी प्रभाव महात्मा गांधींनीं पाडला, यांत शंका

नाहीं. परंतु तो प्रभाव मुसलमान समाजावर मुळींच पडला नाहीं. याचें कारण, मुसलमान समाजाला त्यांच्या धर्मानें बुद्धिस्वातंत्र्य मुळींच ठेवलेलें नाहीं हें होय !

हिंदु व मुसलमान यांच्या मनाची ठेवणच अगदीं भिन्न भिन्न आहे. पं. जवाहरलाल म्हणतात, " हिंदु हे आचाराचे बाबतींत कर्मठ, प्रतिगामी, रूढिप्रिय असे असले तरी, विचाराचे बाबतींत ते अत्यंत पाखंडी मतांचीसुद्धां चर्चा करतात. त्यामुळें विचारामध्यें फरक पडतोच. परस्पर विरोधी मतें व चालीरीति यांमुळें हिंदु समाजांत हें सहिष्णुत्व उत्पन्न झालें आहे. हिंदुधर्माला सांप्रदायिक अर्थानें धर्म म्हणतां येणार नाहीं. त्यांत मतामतांचा गलबला असला तरी, त्याच्या अंगची चिकाटी आश्चर्यकारक व जीवनशक्ति कल्पनातीत आहे. निरीश्वरवादी चार्वाकसुद्धां हिंदुधर्मांतच पचविला जातो. नास्तिकाची इच्छा असो वा नसो हिंदुधर्मानें त्याला कवटाळूनच धरलें आहे.

" धर्मासंबंधीं चर्चा करणें बहुतेक मुसलमानांच्या बाबतींत अधिकच बिकट होतें. कारण धर्मानें त्यांना यत्किंचितहि विचारस्वातंत्र्य दिलेलें नाहीं. वैचारिक दृष्ट्या मुसलमान धर्मानें आंखून दिलेला मार्ग धोपट पण अरुंद आहे. तो सोडून कोणाहि सच्चा मुसलनानानें जातां कामा नये किंवा त्या विषयाची शंकाहि घेतां कामा नये. "

पै. वा. महंमदअलीसारखा सुशिक्षित मुसलमानसुद्धां " कुराणांतील शेंकडा सत्याण्णव टक्के भाग बुद्धीला पटतो. राहिलेला तीन टक्के भाग पटत नसला तरी मीच चुकतों, कुराणच बरोबर असण्याचा संभव आहे, " असें म्हणतो. यावरून त्या धर्मानें बुद्धिस्वातंत्र्य किती दिलें आहे, हें समजतें.

( इंग्रजी जवाहर–पान ११८।१९ मराठी ज. ने. पृ. १२०।१२१ )

हिंदु व मुसलमान या उभयतांच्या मनाच्या ठेवणींतील हा फरक लक्षांत ठेवला म्हणजे खालील प्रश्नांचीं उत्तरें आपोआप मिळतात.

हिंदु हा गोडवा कां ? व मुसलमान हा कडवा कां ? हिंदु सहिष्णु व उदार कां ? व मुसलमान असहिष्णु व अनुदार कां ? हिंदु हा अवार्धिष्णु कां ? व मुसलमान हा आक्रमणशील कां ? हिंदु दयाळू कां ? व मुसलमान

क्रूर कां ? हिंदु शांतताप्रधान कां असतात ? व मुसलमान दंगेखोर कां असतात ? असले प्रश्न अलीकडे सर्वत्र विचारण्यांत येतात. असल्या सर्व प्रश्नांचीं उत्तरें वरील विवेचनांत आलेलीं आहेत.

मुसलमान राज्यकर्त्यांच्या वर्तनांत सहिष्णुता आढळत नाहीं. बऱ्याच शोधानंतर आमच्या प्रदीर्घ वाचनांत बाबरानें हुमायुनाला पाठविलेलें एक पत्र गालबोटादाखलच सहिष्णुतेचें असें आढळलें. बाबराचें तें पत्र राजकीय धोरण, राज्याची सुस्थिरता अशा दृष्टीनें जरी असलें, तथापि तेंहि मुसलमानांना अनुकरणीय आहे. पत्र 'इंडियन रिव्ह्यू' ऑगस्ट १९२३ चे अंकांत छापलें गेलें आहे, तें असें:–

"प्रिय पुत्रा ! हिंदुस्थानांत अनेक धर्मांचे लोक राहतात. परमेश्वरानें कृपाळुपणें या देशाचें राज्य तुझे हवालीं केलें आहे, तर धर्मासंबंधानें मनांत दुराग्रह धारण करूं नकोस. सर्वांचा न्याय निःपक्षपातानें करीत जा; आणि लोकांच्या धर्मभावना आणि चालीरीति यांस कोणत्याहि प्रकारें दुखवूं नकोस. मुख्यतः राज्यांत गोवध बंद ठेव, म्हणजे लोकांचीं अंतःकरणें तुला वश होतील; आणि ते कृतज्ञभावानें तुला भजतील. कोणत्याहि मंदिरास व तीर्थांस उपद्रव करूं नकोस व न्यायानें वाग, म्हणजे प्रजा संतुष्ट राहून देशांत शांति व संतोष वास करतील. लोकांचीं मनें शस्त्रानें न जिंकतां प्रेमानें व उपकारानें आपलींशीं करून घे. शिया व सुनी यांचे कलहांत लक्ष घालूं नकोस, नाहीं तर इस्लामलाच कमीपणा येईल."

(मु. रि., भा. २ पृ. २९)

**(४८१) नमाज व वाद्यवादनः**–येथपर्यंत कुराणावरून जी अन्य धर्मीयांविषयीं अनुदारता अनुयायांनीं अज्ञानानें आणली आहे, ती सर्व दृष्टीनें कशी त्याज्य आहे याचें तर्कशुद्ध विवेचन केलें. हें जर मुसलमानांना पटलें आणि त्यांच्या वृत्तींत अन्य धर्मीयांसंबंधीं उदारता आली तर नमाज, मशीद, वाद्यवादन, गोहत्या, मोहरम या निमित्तानें होणारे दंगे आपोआप कसे टळतील, याचें आतां दिग्दर्शन करतों.

'आलेकुम सलाम,' म्हणजे शांति हें प्रधान तत्त्व आहे. इस्लाम म्हणजे ईश्वराला शरण जाणें व मुसलमान म्हणजे ईश्वराला शरण गेलेला

असा अर्थ आहे. पण आश्चर्य असें कीं, ईश्वराला शरण जाण्याच्या निमित्तानें हिंदुस्थानांतल्या मुसलमानांनीं दंग्याला अगदीं ऊत आणलेला आहे. ईश्वर कुठें आहे, कसा आहे, तो निराकार आहे कां साकार आहे, याचें बरोबर ज्ञान अद्याप कुणालाहि झालेलें नाहीं व पुढेंहि होईल असें वाटत नाहीं. ईश्वराच्या स्वरूपाची कल्पनाच जेथें अनिश्चित तेथें त्याच्या निमित्तानें दंगे करीत बसणें हा वेडेपणा नव्हे काय? ईश्वर सर्व पाहतो असें म्हटलें तर त्याला डोळे असावे लागणार! त्याला नमाज ऐकूं जातो असें म्हटलें कीं, त्याला कान फुटणार! आणि तो ईश्वर शरीरधारी आहे असें म्हटलें म्हणजे त्याला हातपाय, तोंड सगळें येणार!! एकीकडे तो निराकार आहे असें म्हणावयाचें व दुसरीकडे त्यावर साकारतेचा आरोप करावयाचा हें त्या ईश्वराचें विडंबन आहे! ही त्याची थट्टा आहे! ईश्वराला शरण जावयाला कोण नको म्हणतो? पण मी नमाज पढतों आहें अशा वेळीं इतर लोकांनीं सर्वत्र स्मशानशांतता ठेवावी असा आग्रह धरणें म्हणजे चातुर्मास्यांत कांदे न खाणाऱ्यानें बाजारांतहि कांदा येतां कामा नये, असें म्हणण्याइतकें वेडेपणाचें आहे!

दिवसांतून खुशाल पन्नासदां प्रार्थना करावी व प्रत्येक वेळीं तीनदां हात, नाक, तोंड, कोपरें धुवावीं, तीन चुळा भराव्या, डोक्याकानावरून हात फिरवावे म्हणजे सारा दिवस हेंच करीत बसावें! हें अशक्य म्हणून दिवसांतून पांच वेळां प्रार्थना करण्याची ईश्वरानें आज्ञा केली असेल तर ती प्रार्थना पांच वेळां नाहीं दहा वेळांहि करावी, पण ती प्रार्थना चित्तप्रसन्नतेकरितां करावयाची का दुसऱ्याला उपद्रव देण्याकरितां करावयाची? ईश्वरभक्ति हें ढोंग नाहीं, हा दांभिकपणा नाहीं, हा उपद्रव नाहीं, तर तो चित्तशुद्धीचा मार्ग आहे. मग ज्याला खरोखर अशी ईश्वरभक्ति करावयाची असेल त्यानें एकांतांत, रानावनांत, शांत ठिकाणीं जावें हें उत्तम. हिंदुधर्मांत याचकरितां अरण्यवास, एकांतसेवन व वानप्रस्थाश्रम सांगितला आहे. पण नगरांत राहून, शहरचे धंदे करून, मशिदीवरून हिंदूंची सवाद्य किंवा सगीत मिरवणूक जाऊं लागली कीं, पिसाटासारखे वागून दंगे करावयाचे हा कोणता धर्म? मशिदीजवळ वाद्यें वाजवूं नयेत, गडबड करूं नये अशी जर कुराणांत आज्ञा असेल तर ती मुसलमानांना उद्देशून असली पाहिजे,

इतर धर्मीयांना ती बंधनकारक होत नाहीं. म्हणून इतरांना उपद्रव न देतां त्यांचे नागरिकत्वाचे हक्क कायम ठेवून म्हणजे स्वतःशीं व इतरांशीं माणुसकीनें वागून खुशाल प्रार्थना करावी, त्यांतच खरें कल्याण आहे.

दिवसांतून पन्नास वेळां नमाज पढणें काय किंवा हिंदुधर्मशास्त्राप्रमाणें नवविधा भक्ति करणें काय हे दोन्ही प्रकार एकच. पण मुसलमानांच्या नमाजापासून दुसऱ्याला उपद्रव होतो तर हिंदूंच्या भक्तीमुळें तो होत नाहीं ! नमाज स्वतःच्या चित्तशुद्धीकरतां आहे, ढोंगाकरितां अगर परपीडेकरितां नाहीं. एवढें जर मुसलमानांच्या ध्यानीं आलें तर मग वाद्यांचा प्रश्न उद्भवेल तरी काय ? आम्ही चोवीस तास नमाज पढणार, चोवीस तास वाद्यबंदी झाली पाहिजे, असला आग्रह तुर्कस्थानांत नाहीं, दमास्कसमध्यें नाहीं, अफगाणिस्थानांत नाहीं, मग तो हिंदुस्थानांत यापुढें कोणी चालू देतील काय ? हिंदुस्थानांतील बाटग्या मुसलमानांपेक्षां खरे जातिवंत असे मुसलमान पश्चिम आशियांत पुष्कळ आहेत, पण मशिदीपुढें वाद्यें न वाजविण्याचा आग्रह ते कधीं धरत नाहींत. मशिदीपुढें घोड्यांची वर्दळ, मोटार लॉऱ्यांचा घडघडाट, स्टीमरोलरचा दंगा, फायर इंजिनाची येरझार, भयसूचक घंटेचा नाद, पोलिसांच्या शिट्या, गाढवाडुकरांचें कर्कश ओरडणें हें सर्व चालतें. पण सूर, सनई, मधुर मुरली, झांज, चौघडा हीं हिंदूंचीं वाद्यें तेवढींच सलतात, हा दुष्टपणा नव्हे काय ? पावसाळ्यांतील मेघांचा कडकडाट, विजांचा दणदणाट, मुसळधार सरींचा सडसडाट व आगगाड्यांचा घडघडाट, पक्ष्यांचा किलबिलाट यानें मुसल्मानांच्या नमाजांत व्यत्यय येत नाहीं, आणि हिंदूंची सवाद्य मिरवणूक आली कीं मात्र पित्त खवळतें !! याचा अर्थ हिंदूंचा पदोपदीं अपमान करण्याचा चंग मुसलमानांनीं बांधला आहे हाच होय ! मशिदीच्या भोंवतालीं बाजारचा गलबला, दुकानांतील गोंगाट, माणसांची वर्दळ, गुराढोरांचें हंबरणें हें सर्व वावडें नाहीं; पण हिंदूंचें वाद्यवादन मात्र वावडें आहे. या वाद्यबंदीला ना शास्त्राधार, ना शिष्टाधार, ना निष्ठाधार, ना धर्माधार, ना कायदाधार, ना न्यायाधार, असला निराधार अत्याचार यापुढें कोण चालू देणार ?

ईश्वराला प्रसन्न करून घेण्याचा मार्ग म्हणजे सत्कर्में करणें, सद्वृत्ति धारण करणें, दुसऱ्याच्या उपयोगी पडणें, व स्वतःचें कर्तव्य उत्तम पार पाडणें, हाच होय! परमेश्वरा, तूं पवित्र आहेस, थोर आहेस, कल्याणकारक आहेस, असें सारखें म्हणून गुढघे टेकणें, नमस्कार घालणें, ही खरी भक्ति नसून, सत्कृति करणें हीच भक्ति आहे. आईचें सारखें स्तवन करणारा, 'बाबा बाबा' म्हणून जपमाळ घेणारा मुलगा जसा मातृभक्त व पितृभक्त ठरत नाहीं तर त्यांच्याशीं प्रेमळपणानें वागून कर्तव्य करणारा मुलगाच जसा मातृपितृभक्त ठरतो, त्याचप्रमाणें स्वकर्तव्यरूपी कुसुमानें ईश्वराला संतुष्ट करणारा मनुष्यच खरा ईश्वरभक्त होय! स्वकर्तव्य सोडून ईश्वराची सारखी स्तुति करून डोकें उठविणारा व दुसऱ्याला पीडा देणारा मनुष्य हा ईश्वरभक्त नसून तो ईश्वरद्रोही होय! मुसलमान जर या गोष्टींचा शुद्ध मनानें विचार करतील तर नमाज व वाद्यवादन यापायीं होणारे सर्व अनर्थ टळतील.

हिंदूंच्या वाद्यबंदीबाबत मुसलमान लोक रोज ज्या कटकटी उपस्थित करून दंगे करतात तें अत्यंत गैर आहे, असें अलाहाबाद, मद्रास हायकोर्टमध्यें व प्रिव्ही कौन्सिलमध्येंहि सिद्ध झालें आहे. सार्वजनिक रस्त्यानें अखंड सवाद्य मिरवणूक काढण्याचा हिंदूंचा हा हक्क त्रिकालाबाधित आहे. सन १९२५, ४७ अलाहाबाद व १५१ प्रिव्ही कौन्सिलचा १९२७ सालच्या निकालांतील महत्त्वाचा भाग येथें भाषांतर करून उध्दृत करतों.

"प्रत्येक ज्ञातीला, हमरस्त्यावरून तत्संबंधींच्या योग्य विधिव्रतांसहित धार्मिक मिरवणूक काढण्याचा हक्क आहे. हा स्वयंसिद्ध हक्क आहे; व तो कोणत्याहि पुरातन वहिवाटीचे अगर चालीरीतीचे पुराव्यावर अवलंबून नसतो. जरी अशी मिरवणूक काढण्याचा नवीन उपक्रम असला तरीदेखील तो कायदेशीर हक्कांचा उपयोग आहे. हा हक्क पुरातन वहिवाटीपासून स्वतंत्र आहे व कांहीं वर्षें याचा उपभोग न घेतल्यास तो गमावला जात नाहीं म्हणून जुनी वहिवाट होती किंवा नाहीं याबद्दलची चौकशी अनावश्यक व अस्थानीं आहे.

"सार्वजनिक रस्ता हा मुख्यतः जनतेच्या रहदारीकरितां आहे, व प्रत्येक इसमाला योग्य तऱ्हेनें त्याचा उपयोग करण्याचा हक्क आहे. परंतु

सर्वस्वीं प्रार्थनेकरितां त्याचा मी उपयोग करीन असें त्याला म्हणतां येणार नाहीं. प्रत्येक पंथाच्या लोकांना सार्वजनिक रस्त्यांवरून धार्मिक मिरवणुकी नेण्याचा हक्क आहे. पण त्यायोगें जनतेमधील इतर लोकांना असल्या रस्त्याचा नेहमींचा मामुली उपयोग करण्यास अडथळा येतां कामा नये.

"सार्वजनिक रस्त्याला लागून असलेल्या देवळांतील अगर मशिदींतील उपासकांना प्रार्थना चालली आहे या सबबीवर देऊळ अगर मशीद यांवरून मिरवणूक जात असतांना मिरवणुकवाल्यांना त्यांचीं वाद्यें अजिबात बंद करण्यास भाग पाडण्याचा हक्क नाहीं. जरी त्या वाद्यांनीं, मग तीं धार्मिक असोत वा नसोत, दुसऱ्या ज्ञातीच्या लोकांच्या धार्मिक वृत्तींना धक्का बसत असला, तरी त्या सबबीवर त्यांना त्या वाद्यांना हरकत घेतां येणार नाहीं. जसें वाद्यें वाजत राहिल्यानें एका ज्ञातीच्या धार्मिक वृत्तीस धक्का बसेलच तद्वतच वाद्यें बंद केल्यानें मिरवणूक नेणाऱ्या ज्ञातीच्या वृत्तीस तितकाच धक्का बसेल म्हणून वाद्यें अजिबात बंद करण्याचा आग्रह धरण्याबद्दलचा हक्क असणें शक्य नाहीं."

सार्वजनिक रस्त्यानें अखंड सवाद्य मिरवणूक काढण्याचा हिंदूंचा त्रिकालाबाधित हक्क आहे, असा निकाल अलाहाबाद हायकोर्टानें दिला, तो वर दिलाच आहे. बडोदा हायकोर्टांतहि हा प्रश्न एकदां निघाला होता. हायकोर्टानें कुराणांत वाद्यवादनाला बंदी आहे कीं नाहीं याचें संशोधन करण्याकरितां दोन विद्वान् मौलवी नेमले. त्यांनीं कुराणाच्या वाचनाच्या आवृत्त्या करून असें सांगितलें कीं, वाद्याच्या मनाईसंबंधाचें एकहि वचन कुराणांत आढळत नाहीं. मुसलमानांचें म्हणणें असें होतें कीं, इस्लाम धर्मानें सर्व प्रकारच्या वाद्यांची मनाई केली आहे, परंतु हायकोर्टानें त्यांच्या विरुद्ध निकाल दिला !

काबुलांत जी प्रसिद्ध शाही मशीद आहे तींत वाजविण्यासाठीं बँड आहे. मुसलमानांच्या इतर देशांतहि मशिदीवरून वाद्यें वाजविण्यास प्रतिबंध नाहीं. पण हिंदुस्थानांत मात्र नमाज, मशीद, वाद्यवादन आणि त्या निमित्तानें दंगे हा एक मोठा विषयच होऊन बसला आहे ! आज अस्तित्वांत आलेलें राष्ट्रीय सरकार हें नागरिकांचे मूलभूत हक्क रक्षण करितें का काय करितें हें पाहावें.

(४८२) गोहत्या:—नमाज व वाद्यवादनाची जशी रोजची कटकट आहे, त्याप्रमाणें बकरीदचा सण आला कीं गायीच्या कुरबानीचा प्रश्न व त्यामुळें तंटे हें एक दरसालचें अरिष्ट आहे. गायीची कुरबानी केवळ हिंदूंना चिडविण्याकरितां सुरू केलेली आहे. कुराणांत सुराबक्क व सुराफात्तीरमध्यें जें वर्णन आहे त्यावरून गाय ही पूज्य आहे असेंच सिद्ध होतें. कुराणामध्यें उंट, बकरा अथवा मेंढा यांची कुरबानी सांगितली आहे. कारण हीं जनावरें मैला खात नाहींत; गाय हें जनावर घाण खातें म्हणून तें कुर्बानीस अयोग्य असें असतांना केवळ हिंदूंना चिडवण्याकरितां धर्मवेडे मुसलमानलोक दिवसां मिरवणूक काढून रस्त्यावर गोहत्या करितात व त्या निमित्तानें दंगे होतात ! पूर्वी अरबस्थानांत उंट व बकरीं समारंभांत मारलीं जात असत. देव नवसास पावला म्हणजे याच जनावरांच्या हत्या होत असत. पैगंबराच्या आज्यानेंसुद्धां नवस फेडण्याकरितां उंट व बकरीं बळी दिलीं अशीच माहिती मिळते. गायीच्या कुरबानीची चाल अफगाणिस्थानांत, अरबस्थानांत व तुर्कस्थानांतहि नाहीं. असें असतांना हिंदुस्थानांतील मुसलमानांनीं हिंदूंना चिडविण्याकरितां व त्यांच्या भावना दुखविण्याकरितां गोहत्येचा आग्रह धरणें यासारखी संतापजनक गोष्ट नाहीं. समंजस मुसलमानांची गोवधाला मुळींच मान्यता नाहीं. काबूलचे एक भूतपूर्व अमीर हबीबउल्लाखान हे हिंदुस्थानच्या भेटीस कांहीं वर्षांपूर्वी आले होते. त्यावेळीं बकरीदचा सणहि होता. त्यांच्या आगमनाप्रीत्यर्थ एकशेंएक गायींची कुरबानी करण्याचें धर्मवेड्या मुसलमानांनीं ठरविलें. ही बातमी अमीरसाहेबांना समजतांच त्यांनीं मुसलमान पुढाऱ्यांची कानउघाडणी केली व धर्मविरुद्ध असली गोष्ट न करण्याची ताकीद दिली.

अफगाणचे माजी अमीर हबीबउल्लाखान यांनीं १९०७ सालीं ईदच्या दिवशीं पुढील उद्गार काढले:—

" गाय मारण्यांत मुसलमानांचा सर्व धर्म आहे किंवा एकाद्या विशेष सणाचे वेळीं गाय मारलीच पाहिजे अशी मुसलमानी धर्माची आज्ञा आहे अशांतला मुळींच प्रकार नाहीं. गाय मारली असतां आपला धर्म बुडाला असें ज्याप्रमाणें हिंदु लोकांना वाटतें, त्याप्रमाणें मुसलमानी धर्मांत गोवधाचा निषेध नाहीं एवढाच काय तो फरक; म्हणून ज्या बारीकसारीक गोष्टी

धर्माच्या प्रधान आज्ञा नाहींत, त्या केल्यानें हिंदु नाराज होत असले व त्यांचीं मनें दुखत असलीं तर मुसलमानांनीं विनाकारण हट्ट कां करावा?"

(चौं. म. च., पृ. १६०)

अफगाण अमीरांचा हिंदुस्थानच्या आजच्या राजकारणाशीं साक्षात् संबंध नव्हता, पण राजकारणाशीं ज्यांचा साक्षात् संबंध असे, असे पै. वा. दिल्लीचे सुप्रसिद्ध हकीम अजमलखान यांनीं सन १९१९ सालीं अमृतसर येथें मुस्लिम लीगच्या अधिवेशनाचे अध्यक्ष या नात्यानें गायीच्या कुरबानीच्या बाबतींत प्रकट केलेले विचार मननीय आहेत. ते असेः—"गोवधामुळें आपल्या हिंदु बांधवांचीं मनें फार दुखावतात हें आपणां सर्वांस माहीत आहे. तेव्हां त्या बाबतींत आपला धर्म काय सांगतो तें पाहूं. तसेंच कुरबानीची मर्यादा काय आहे तेंहि पाहिलें पाहिजे. कुरबानीचें बलिदान हें सन्नत–इ–मुवॉकिद म्हणजे पैगंबरसाहेबांनीं स्वतः आचरिलेलें असें आहे, म्हणून मुसलमानांनीं तें शक्य तोंवर पाळलेंच पाहिजे. मात्र बलिदान द्यावयाचें तें उंट, मेंढी, शेळी किंवा गाय यांपैकीं मर्जीस येईल तें दिलें तरी चालतें. ह्या ईदच्या प्रसंगीं उंटाचा बळी देण्याचें ज्यांस ठाऊकहि नाहीं असे कोट्यवधि मुसलमान ह्या देशांत आहेत, म्हणून आचारभ्रष्टतेचा दोष त्यांस लागणार नाहीं. तसेंच अरबस्थान, सीरिया, इजिप्त, त्रिपोली, तुर्कस्थान इत्यादि देशांतील मुसलमान आजपर्यंत एकहि गाय न मारतां कुरबानी पाळीत आले आहेत; तथापि त्यांनीं पैगंबरसाहेबांची अवज्ञा केली, अथवा धार्मिक विधीची अवहेलना केली असा आरोप कोणताहि विद्वान् धर्मवेत्ता अथवा मुफ्ती यांचेवर करूं शकणार नाहीं. आपण हादीसचा विचार केला असतां गायीपेक्षां इतर प्राण्यांचेंच बलिदान श्रेयस्कर असल्याचें त्यावरून दिसून येईल. अरब लोक शेळीचा बळी देत होतेसें दिसतें. बळी देण्याला पशूंत शेळीच चांगली, असेंहि पैगंबरसाहेबांनीं म्हटलें आहे. हें सर्व ध्यानांत घेतां मुसलमानांनीं गायीखेरीज इतर पशु बळी देण्याचें ठरवावें म्हणजे देशांत शांतता राखण्यास मोठी मदत होईल. हिंदूंच्या काशी, अयोध्या, मथुरा इत्यादि क्षेत्रांतील मुसलमान रहिवाश्यांनीं ही सूचना ताबडतोब अंमलांत आणून तिचा गांवोगांव फैलाव करावा."

(चौं. म. च., पृ. १६१)

ईश्वराला प्रसन्न करून घेण्याकरितां, नवसपूर्तीकरितां किंवा इतर कोणत्याहि धार्मिक कारणानिमित्त गायींचें बलिदान केलें पाहिजे, असें मुळींच नाहीं. गोहत्या करणें एकंदरींत अत्यंत अनिष्ट आहे असें वरील मतावरून स्पष्ट होतें. थोडा स्वतंत्र विचार केल्यास कोणत्याही सुबुद्ध माणसाला असें दिसेल कीं दुसऱ्या जिवाची हत्या केल्यानें कधींहि ईश्वर प्रसन्न होणार नाहीं. अडाणी लोक देवतांपुढें कोंबडीं बळी देतात. गांवोगांवच्या ज्या अशा तामस ग्रामदेवता असतात, त्यांच्यापुढें बकरीं व रेडे मारण्याचीहि चाल आहे. निरुपद्रवी बकऱ्यांना व रेड्यांना मारून देवता प्रसन्न होईल तरी कशी ? या सर्व चाली अडाणीपणाच्या आहेत. कलकत्याच्या कालीमातेच्या पुढें आणि नेपाळांतील पशुपतेश्वरापुढें पुष्कळ हत्या होत असते. शिकारीच्या दृष्टीनें सिंह, वाघ, रानडुकरें, गेंडे अशा हिंस्र पशूंची हत्या करणें निराळें, आणि ईश्वराच्या प्रसन्नतेकरितां निरुपद्रवी पशूंची आणि पक्ष्यांची हत्या करणें निराळें ! यज्ञामध्यें बोकड मारून त्याची वपा अग्नीला अर्पण केली म्हणजे त्या पशूला व यजमानाला म्हणे स्वर्ग मिळतो ! तसेंच मुसलमानांनीं बकरीदच्या दिवशीं व अन्य प्रसंगीं गोहत्या केल्यानें म्हणे अल्ला प्रसन्न होतो. या सर्वच कल्पना तर्कदुष्ट आहेत. पूर्वींच्या काळांत त्या ठीक होत्या. आतां बोकडाच्या हत्येचा आणि यजमानाच्या स्वर्गाचा, तसेंच गोहत्येचा व अल्लाच्या प्रसन्नतेचा संबंध जोडणें अडाणीपणाचें वाटतें. तेव्हां या असल्या हत्येच्या कल्पना टाकून दिल्या पाहिजेत. जगण्याकरितां नि कर्तृत्वाकरितां, वैद्यशास्त्रदृष्ट्या नि आरोग्यदृष्ट्या जो शाकाहार अगर मांसाहार अवश्य असेल तो करावा. पण धर्माच्या नांवाखालीं ईश्वराप्रीत्यर्थ निरुपद्रवी पशुपक्ष्यांची हत्या करणें हें अगदीं असमंजस होय. ईश्वर हा हत्येनें संतुष्ट होत नसून तो तप, त्याग, शील व सौजन्य यानेंच संतुष्ट होतो. दुसऱ्याकरितां झिजण्यांत, समाजाकरितां स्वार्थत्याग करण्यांत, दुसऱ्याशीं भलेपणानें वागण्यांत ईश्वरभक्ति आहे, हें हिंदूंनीं व मुसलमानांनीं ध्यानांत ठेवावें.

(४८३) मोहरमः—नमाज व वाद्यवादन, बकरीदच्या निमित्तानें गोहत्येचा आग्रह, या जशा नेहमींच्या कटकटी आहेत त्याप्रमाणें मोहरम हा दरसालच्या दंग्यांचा एक भीषण प्रसंग असतो.

पैगंबराच्या वंशांतील हसनहुसेन यांचा व त्यांच्या मुलाबाळांच्या कत्तलीचा हा प्रसंग आहे. ताबुतांत हा प्रकार दाखविला जातो. हा वास्तविक दुःखाचा प्रसंग आहे. अर्थात् मुसलमानी धर्माप्रमाणें ताबूत करणें चुकीचें आहे. ताबुताची चाल अरबस्थानांत नाहीं, ती फक्त हिंदुस्थानांत आहे. ईश्वराची प्रतिमा करून तिची पूजा करणें, हें मुसलमानी धर्मांत मोठें पाप गणलें गेलें आहे. ताबूत ही एक मूर्तिपूजाच होते. म्हणून जाणते मुसलमान यांत मुळींच भाग घेत नाहींत. पीर, ताजे, पंजे काढून, हैदोस धुल्ला करून दंगा करणें व हिंदूंशीं भांडणें उपस्थित करणें हें धर्मदृष्ट्या, व्यवहारदृष्ट्या व समाजदृष्ट्या चुकीचें आहे. ताबुताच्या पद्धतींत मुसलमानांनीं सुधारणा केली पाहिजे आणि हिंदूंनीं या अधर्म्य कृत्यांत मुळींच समाविष्ट होतां कामा नये.

हिंदु लोक रामकृष्णादींच्या मूर्ति घडवितात व त्यांच्या मिरवणुकी काढतात. मुसलमान हसनहुसेनच्या कबरी ताबुताच्या रूपानें बसवून त्यांची वाजतगाजत मिरवणूक काढतात, हें हिंदूंचेंच अनुकरण नव्हे काय ? हिंदु लोक मूर्तींना भजतात व पुजतात ! तर मुसलमान मेलेल्यांच्या विटामातीच्या कबरा बांधतात व त्यांना पुजतात ! त्यांना पीर समजून त्यांचे उरुस करतात, म्हणजे प्रेतपूजाच करितात. प्रेतपूजा काय किंवा मूर्तिपूजा काय, या आजच्या युगांत दोन्हीहि सारख्याच आक्षेपार्ह होत. मक्का येथें जाऊन कृष्णपाषाणाचें चुंबन घेणें, झमझम विहिरीचें पाणी तीर्थ म्हणून कुप्या भरून नेणें, करबला नदीचें पाणी व तिच्या कांठची मातीहि पूज्य व पवित्र समजणें, पैगंबराच्या कबरीवर सबजा वाहून पूजा करणें, मक्केची यात्रा करणें, या सर्व गोष्टी, गंगास्नान करणें, कुप्यांतून गंगा आणणें, ज्ञानवापीचें दर्शन घेणें, विश्वेश्वरावर बेल वाहणें, त्रिस्थळीची यात्रा करणें यासारख्याच नाहींत काय ? पण हिंदूंच्या जत्रा, उत्सव, रामलीला इत्यादिकांपासून इतरांना उपसर्ग पोंचत नाहीं, पण मुसलमानांच्या मोहरमापासून हिंदूंना उपसर्ग पोंचतो. कारण या वेळीं प्रतिवर्षी दंगे होतात.

(४८४) **हिरवें निशाण, चंद्र व स्वर्गः**–हिंदूंशीं नेहमीं कटकट करण्याच्या, त्यांना त्रास देण्याच्या, त्यांचे नागरिकत्वाचे हक्क पायाखालीं तुडविण्याच्या या तीन बाबी मुसलमानांनीं विचारानें सोडून दिल्या पाहिजेत.

इतकेंच नव्हे तर सारासार विचारानें आणखीहि कांहीं बाबी विचारपूर्वक सोडल्या पाहिजेत. मुसलमानांनीं अलीकडे चंद्रांकित हिरव्या निशाणाचा फारच गाजावाजा चालविला आहे. त्याबरोबर इतरांच्या ध्वजाबद्दल ते तिरस्कारहि दर्शवीत आहेत. पण हिरवें निशाण हें त्या कालीं रखरखीत प्रदेशांत ठीक होतें. पैगंबरानें डोळ्याला सुखकर, उष्ण प्रदेशांत हितकर असा तो हिरवा रंग त्या कालांत योग्य ठरविला. डोळे अधु असलेल्या माणसाला हिरवा चष्मा वापरण्यास देतात! ना झाड, ना झुडूप, ना हिरवळ, ना कोणताहि थंडोसा; अशा परिस्थितींतला तो हिरवा बावटा आहे. येथील मुसलमान हिंदुस्थानांत राहतात, येथें रखरखीतपणा नाहीं; पाणी विपुल, नद्या विपुल, झाडें विपुल, सर्व कांहीं परिपूर्ण नैसर्गिक आनुकूल्य आहे. म्हणून या राष्ट्राचा राष्ट्रीय झेंडाच मुसलमानांनीं स्वीकारला पाहिजे.

हिंदूंना चंद्र व सूर्य हे सारखेच प्रिय व पूज्य! पण अरबस्थानांत अति उष्णतेमुळें सूर्य हा अप्रिय वाटे. चंद्रदर्शनाची, चंद्राच्या शीतल व अमृततुल्य किरणांची मार्गप्रतीक्षा लोक अगदीं हपापून करीत. रात्र झाली; त्यांत चंद्रदर्शन झालें म्हणजे लोकांना अमृत चाखल्याचा आनंद होई, म्हणून सूर्यापेक्षां त्या देशांत चंद्राला महत्त्व नैसर्गिक आलें. येथील मुसलमान हे आतां अरबस्थानांत नाहींत, रखरखीत प्रदेश हें त्यांचें मूळचें स्थानहि नव्हे! देश हिंदुस्थान, मूळ पूर्वज हिंदु, संस्कृतीवर हिंदुत्वाची छाप पडलेली, अशा स्थितींत ऊर्ध्वचंद्राचाच अभिमान न धरतां चंद्र, सूर्य आणि इतर सर्व राष्ट्रिय चिन्हें हीं मुसलमानांचीं अभिमानस्थानें झालीं पाहिजेत.

पैगंबर साहेबांनीं मुसलमानांना कुराणांत जें मोठ्यांत मोठें उच्च आमिष दाखविलें आहे तें स्वर्गाचें. पण तो स्वर्ग परिस्थितिसापेक्ष दिसतो. स्वर्गांत बागा आहेत, पाणी आहे, फळें आहेत, स्त्रिया आहेत, हुऱ्या व पऱ्या आहेत. रखरखीत अरबस्थानांत ना पाणी, ना झाडें, सारखे पायाला चटके! अर्थात् स्वर्गांत शीतलाई आहे असें आमिष दाखवावें लागलें! त्या दृष्टीनें हिंदुस्थान हा प्रत्यक्ष स्वर्गच आहे. येथें पाणी आहे, बागा आहेत, झाडें आहेत, नद्या आहेत व नैसर्गिक पूर्ण आनुकूल्य आहे, हिंदूंच्या संगतीनें व सहवासानें मुसलमानांचे संसारहि वाढत आहेत.

स्त्रियांचा तुटवडा येथें नाहीं. म्हणून त्या स्वर्गाच्या कल्पनाहि परिस्थिति-सापेक्ष समजून सोडून दिल्या पाहिजेत. हिंदुस्थानांत म्हणजे एका दृष्टीनें प्रत्यक्ष स्वर्गातच आहोंत, असें मुसलमानांनीं समजावें आणि या राष्ट्रास स्वतंत्र करून साक्षात् स्वर्ग बनविण्याच्या उद्योगास लागावें.

(४८५) कट्टर सनातनीपणा सोडाः—मुसलमानांनीं धार्मिक बुद्धीनें स्वीकारलेल्या अनेक समजुती तर्काच्या कसोटीवर घांसून पाहिल्या म्हणजे त्यांचा त्यांनाच अडाणीपणा दिसून येईल. आजचा काल हा शास्त्रीय व चिकित्साप्रधान असा आहे. उगाच मुल्लामौलवींच्या सांगण्याप्रमाणें कडवेपणानें वागण्याचा हा काळ नाहीं. धार्मिक कडवेपणा सोडून, व्यापक व उदात्त ध्येय ठेवून शुद्ध राष्ट्रिय दृष्टीनें वागण्याचा हा काल आहे. म्हणून हिंदूंप्रमाणें मुसलमानांनीं परिवर्तनशीलता अंगिकारावी. एका काळीं हिंदूं-मध्यें यज्ञ ही मुख्य संस्था होती. यज्ञांतील पशुहत्या ही वेदप्रणीत असतांना हिंदूंनीं परिस्थितीप्रमाणें यज्ञाला गौणत्व दिलें. यज्ञाचा व स्वर्गाचा संबंध होता. स्वर्गातील सुखाच्या कल्पनाहि अप्सरा, अमृत वगैरे भोगकारक होत्या. पण हिंदु समाजानें त्या मागें टाकल्या व तो उच्च अध्यात्म तत्त्वज्ञानांत गेला. आतां या राष्ट्राचा स्वर्ग बनविण्याची भाषा हिंदु पुढारी बोलत आहेत. हिंदु समाज जसा सनातनी चाकोरींतून पुढें येत आहे, तसाच मुसलमान समाजहि पुढें आला पाहिजे.

सनातनीपणा हा यापुढें कोणाचाच चालावयाचा नाहीं. अंधश्रद्धा, हट्ट व एककल्लीपणा यानें या जागतिक स्पर्धेत टिकाव लागणार नाहीं, म्हणूनच तुर्कस्थाननें विचारपूर्वक ज्या खिलाफतीकरितां हिंदुस्थानांत उगाचच पानिपत केलें गेलें, त्या खिलाफतीचा गाशा स्वतःच गुंडाळला! तुर्की फेज टोपीचें भूषण जें येथील मुसलमानांना वाटतें तीहि केव्हांच भिरकावून दिली. दाढ्यांना खो दिला असून तेथें नव्या धर्माच्या पुनर्घटनेस प्रारंभ केला. आधुनिक इस्लाम जागतिक स्पर्धेस समर्थ व्हावा म्हणून केमालपाशानें इस्तंबूलचें विद्यापीठ बंद केलें. मूळची त्रासदायक लिपी सोडून रोमन लिपी स्वीकारली. अरेबी परंपरा जवळजवळ सोडून बुद्धिस्टिक परंपरेचा अभ्यास चालू केला. आधुनिक आशियाचें इराक हें एक प्रातिनिधिक आहे. अफगाणिस्थानामध्यें

सुद्धां नव्या कल्पना व भौतिक शास्त्रें यांवर अधिष्ठित असें राष्ट्र बनविण्याचे यत्न चालू आहेत. हें सर्व ध्यानांत घेऊन जागतिक परिस्थिति नीट पाहून त्या मार्गानेंच येथील मुसलमानांनीं गेले पाहिजे.

हिंदु व मुसलमान या दोन समाजांचें सख्य सनातनी कट्टर वृत्तीनें होणार नाहीं. दोन्ही समाजांनीं परस्परांतील चांगल्या गोष्टी उचलल्या पाहिजेत. मुसलमानांपासून हिंदूंनीं समष्टिधर्म व एकेश्वरत्व या बाबी घेण्याजोग्या आहेत. मुसलमानांनीं हिंदूंपासून उच्च अध्यात्म, दैवी संपत्ति, स्त्रीदाक्षिण्य, सुसंस्कृतता, सौजन्य, सहिष्णुता, उदारता, बुद्धिस्वातंत्र्य, ज्ञानलालसा, परिवर्तनशीलता, शोधकता इ. अनेक बाबी घेण्याजोग्या आहेत. विरक्तांचा, संन्याशांचा धर्म कुराणांत नाहीं. कुराणामध्यें प्रवृत्तिपर समष्टि-धर्म सांगितला आहे. मुसलमानांमध्यें हिंदूंप्रमाणें पंथ, संप्रदाय, जाति, विटाळ वगैरे सर्व असले तरी एकंदरींत तीं बंधनें फार सैल आहेत. त्यामुळें सामुदायिक प्रार्थना, सहभोजन, स्मशानयात्रा अशा प्रसंगीं ते सर्व एक होतात. एकेश्वर भक्तीनें, दगडी देवांच्या व मूर्तींच्या भारापासून अरबांचीं मनें मुक्त करून सर्व रानटांना एका सूत्रांत आणण्याचें कार्य केलें. त्यामुळें त्या समाजांत समष्टिधर्म वाढला, नि तो समाज बलवान् झाला.

हिंदूंमध्यें जगाचें तत्त्व एक, जगाचें मूळ एक, जगाचा नियंता एक असा सिद्धांत असला तरी त्याचे प्रतिनिधि म्हणून अनेक देव आलेले आहेत, अनेक देवता समष्टिधर्माला बाधक आहेत. पूर्वीच्या परिस्थितींत भिन्न भिन्न समाजांचें समावेशन करण्याचे दृष्टीनें त्या त्या समाजाच्या देवांना स्थान दिलें, हें ठीक केलें. पण आतां अखिल हिंदूंचा एकच निराकार ईश्वर ही कल्पना जोरानें पुढें मांडली पाहिजे. देवतांचे पूजेचे जागीं वीरपूजा, विभूतिपूजा रूढ करावी. राम, कृष्ण इत्यादि देव हे त्या त्या कालचे वीर व थोर पुरुष होत.

मुसलमानांनीं हिंदूंना काफीर म्हणून त्यांच्या मूर्तीविषयीं इतकी अढी ठेवण्याचें मुळींच कारण नाहीं. जितक्या मूर्ती तितके त्या त्या कालां-तील थोर व श्रेष्ठ पुरुष होत. मूर्तीमध्यें विशेष असतें व त्यांत कांहीं अद्‌भुत सामर्थ्य असतें असेंहि आतां हिंदूंना वाटत नाहीं. हिंदूंच्या मूर्ति म्हणजे

इतिहासकालांतील वीरपुरुषांचे पुतळे होत. हे पुतळे हिंदूंना त्यांच्या प्राचीन परंपरेचें, वीरत्वाचें व पराक्रमाचें स्मरण देत असतात. अर्थात् यांचा भंग केल्यानें, त्यांच्या सवाद्य मिरवणुकीस प्रतिबंध केल्यानें हिंदुसमाज चवताळून उठेल हें ध्यानीं घेऊन हिंदूंच्या मूर्ति फोडण्याचा व सवाद्य मिरवणुकीस हरकत घेण्याचा मूर्खपणा यापुढें मुसलमानांनीं मुळींच करूं नये.

मुसलमानांतच कडवेपणा आहे व हिंदूंत नाहीं असें नाहीं. आज नसला तरी तो मुसलमानांच्या सहवासानें हळुहळू हिंदूमध्यें येईलच. तसा तो येत चालल्याचें एक उदाहरण देतों. माथेफिरू धर्मवेडे मुसलमान सदैव हिंदूंचे बळी घेत असतात हें महशूर आहे. हिंदूमध्यें तसा माथेफिरू धर्मवेडा वर्ग उत्पन्न होऊं लागला आहे. बिहार प्रांतांत यदुनंदन नांवाच्या तरुणानें चोरून पिस्तुल आणलें व तें मुसलमानांवर झाडून अनेकांना ठार केलें. न्यायालयांत त्यानें स्पष्ट सांगितलें कीं, "मुसलमान हिंदूंच्या प्रत्यहीं हत्या करितात, हें मला असह्य झालें ! मुसलमानांचा या तऱ्हेनें प्रतिकार करणें हें धार्मिक कर्तव्य होय असें मला ईश्वरानेंच सांगितलें. त्याकरितां मला फांसावर चढविलें तरी आनंद आहे; कारण ईश्वर माझा पाठीराखा आहे, या तरुणाप्रमाणें अनेक हिंदु तरुण उत्पन्न झाले व दिसला मुसलमान कीं त्याला चीर व काप असें करूं लागले व त्यांचा मुसलमानाप्रमाणें हिंदु समाज 'गाझी' म्हणून गौरव करूं लागला तर त्यामुळें राष्ट्रहित साधेल काय ? दोघांच्या सख्यानेंच राष्ट्रहित होणार आहे, म्हणून परस्पर कडवेपणा न धरितां गोडवेपणा धरण्यांतच शहाणपण आहे. मुसलमान जर हिंदूंना काफीर समजतील तर हिंदूमध्येंहि 'न नीचो यवनात् परः', 'न वदेत् यावनीं भाषाम्', 'न म्लेच्छैः सह संविशेत्', 'चोराच्या भयानें घेतलें रान, वाटेंत भेटला मुसलमान' या तत्त्वाचा पुन्हां जोरानें प्रचार होईल. क्रियेला प्रतिक्रिया हा निसर्गाचा धर्म आहे. मुसलमान जितके जितके दंगे वाढवितील व हिंदूंच्या हत्या करतील त्या मानानें प्रतिक्रिया अधिक होणारच ! हिंदूंनीं स्वतःच्या हौसेनें विचारपूर्वक हिंदुसंघटनेचें कार्य जेवढें केलें असतें त्यापेक्षां दसपट कार्य त्यांना मुसलमानांच्या या आक्रमणामुळें करणें भाग पडत आहे. कारण आजचा हा काल कोणाचेंहि अन्याय्य आक्रमण वा वर्चस्व सहन करण्याचा नाहीं. बायकासुद्धां नवऱ्यांचा जुलूम नष्ट करण्याकरितां नवरेशाही-

विध्वंसक संघ काढतील. बुवाशाही, भिक्षुकशाही, नोकरशाही, भांडवलशाही नष्ट करण्याचे उपक्रम सर्वत्र चालू असतांना ही मुसलमानांची मुसलमानशाही हिंदु कशी चालू देतील? हिंदूंनीं पूर्वी मुसलमानशाही नष्ट केली आहे. मुसलमान जर पूर्वींप्रमाणें अनन्वित प्रकार करूं लागतील तर त्याचें सव्याज उट्टें निघणें मनुष्यस्वभावास अनुसरून आहे.

**(४८६) देशाभिमान व राष्ट्रियता यांचा मुसलमानांमध्यें अभाव**:–येथवर हिंदु–मुसलमान यांच्या सख्याकरितां मुसलमान समाजामध्यें धार्मिक व सामाजिक दृष्ट्या हिंदूंप्रमाणें समान शील, समान संस्कार, समान स्वभाव कसकसा उत्पन्न झाला पाहिजे, याचें विवेचन केलें. आतां राष्ट्रियत्व व स्वातंत्र्य हें जें उभयतांचें समान ध्येय तें मुसलमानांमध्यें पूर्णपणें कसें आलें पाहिजे याचा विचार करून हें प्रकरण संपवितों.

मुसलमानांमध्यें देशाभिमानापेक्षां जातिनिष्ठा जाज्वल्य आहे. मुसलमानांच्या जातिनिष्ठेविषयीं पंडित जवाहरलाल नेहरू आत्मचरित्रांत लिहितातः–'नोकरीवाला वर्ग निर्माण करण्याकरितां सर सय्यदांनीं अलीगड कॉलेज काढलें. त्या कॉलेजांतील विद्यार्थ्यांना कलेक्टरची जागा मिळाली कीं मुसलमानांना कृतकृत्यता वाटे.' सर व्हॅलेंटाइन् चिरोल म्हणतो कीं, 'नामदार एच्. एच्. आगाखानांनीं व्हाइसरॉयांच्या नजरेला अशी गोष्ट आणून दिली कीं हिंदूंना राजकीय हक्क अधिक दिले तर ते वरचढ होतील व ब्रिटिश साम्राज्याला आणि निःसंशय राजनिष्ठ मुसलमानांनाहि धोका येण्याचा संभव आहे.' इं. जवाहर ४६४।६५ (मराठी ज. ने., पृ. ४६७)

मुसलमानांमध्यें राष्ट्रिय दृष्टीचा व देशाभिमानाचा पूर्ण अभाव आहे. मुस्लिम लीगचे पुढारी किती जात्यंध व अराष्ट्रिय वृत्तीनें भाषणें करतात व हिंदूंविषयीं कसे अनुदार उद्गार काढतात हें सुप्रसिद्ध आहे. हिंदु व आपण एक होऊं आणि जगाला भारी होऊं ही कल्पना अद्याप मुसलमानांच्या मनालाहि शिवत नाहीं. बाहेरच्या मुसलमानांच्या मदतीनें हिंदूंवर वर्चस्व ठेवण्याचा उद्देश आजच्या मुसलमान पुढाऱ्यांचा आहे. इंग्रजांशीं दोस्ती करण्यांत व बाहेरच्या मुसलमान राष्ट्रांशीं संबंध जोडण्यांत, हे मुसलमान देशद्रोहीपणाच करीत आहेत. पूर्वी इंग्रजांच्या घशांत हिंदुस्थानला

होण्याला आधीं मुसलमानांनींच मदत केली! वसईच्या तहानंतर बाजीराव इंग्रजांस मिळाला, पण सन १८०० पूर्वीं एकहि हिंदु इंग्रजांना मिळाला नव्हता. अर्काटचा नबाब, बंगालचा नबाब, अयोध्येचा नबाब व हैदराबादचा निजाम या चौघांनीं आधीं देशद्रोहीपणा केला व ते इंग्रजांना मिळाले. त्या वेळींसुद्धां परदेशांतील मुसलमानांशीं संधानें लावून इंग्रजांना हांकून देण्याच्या विचारांतच ते नबाब होते. पण येथील हिंदूंशीं सहकार्य करून, हिंदु व आपण एक होऊन इंग्रजांना घालवूं, असे विचार वरील नबाबांच्या मनांत आले नाहींत. आजच्या मुसलमान पुढाऱ्यांच्या डोक्यांतहि अद्याप अराष्ट्रिय विचारच दिसतात.

राष्ट्रियता व देशाभिमान हे गुण हिंदूंमध्यें बऱ्याच अंशानें दृग्गोचर होत आहेत. म्हणूनच ते राष्ट्राकरितां आत्यंतिक त्याग करीत आहेत. गेल्या अर्ध शतकांत राष्ट्रिय स्वातंत्र्याकरितां हिंदूंनींच इंग्रजांशीं चढाईचें युद्ध केलें. स्वदेशीकरतां झीज हिंदूंनींच सोसली. पण स्वदेशी चळवळीमुळें मुसलमान व्यापाऱ्यांचें नुकसान होतांच त्यांनीं बंगाल्यांत व इतरत्र दंगे केले, व हिंदूंना मारलें. बहिष्काराच्या, राष्ट्रिय शिक्षणाच्या चळवळींत हिंदूच पुढें होते. फार काय पण क्रांतिकारकांतील सर्व अग्रेसर हिंदूच होते व आहेत. मुसलमानांनीं सरकारशीं सहकार्य केलें, हिंदूंच्या चहाड्या सांगितल्या, स्वतःचा स्वार्थ साधला, म्हणजे एका दृष्टीनें मुसलमानांनीं देशद्रोह केला! गेल्या कायदेभंगाच्या चळवळींत सीमाप्रांतांतूनच काय ते एक दीड हजार मुसलमान तुरुंगांत गेले; इतरत्र बेताचेच! तेवढे वगळल्यास गेल्या पन्नास वर्षांत हिंदूंनीं केलेल्या चळवळीमुळें, हिंदूंच्याच त्यागानें, कष्टानें आणि श्रमानें आजचें स्वराज्य जवळ आलें आहे. पण या बाबतींत "खानेको मैं और लढनेको मेरा बडा भाई" अशी मुसलमानांची स्वार्थी वृत्ति स्पष्ट दिसत आहे.

(४८७) **बंगालचा बळीः**—स्वातंत्र्ययुद्धाची लढाई प्रथम बंगाली हिंदूंनीं पुकारली. बंगालची फाळणी होतांच त्यांनीं आकाशपाताळ एक केलें. बंगालला साह्य महाराष्ट्रानें, पंजाबनें व इतर प्रांतानें केलें. स्वदेशी, बहिष्कार, राष्ट्रिय शिक्षण, स्वराज्यपोषक चळवळी, सर्व हिंदूंनींच केल्या.

क्रांतिकारक चळवळी करून अनेक हिंदू फांसावर लटकले पण त्या बंगाली हिंदूंचा बळी इंग्रजांनीं जातीय निर्णयाच्या तातेनें मोठ्या नाजुकपणानें घेतला. बंगालमधील हिंदु शिक्षणांत पुढारलेले, संपन्न आणि कर देणाऱ्यांत त्यांचेंच प्रमाण अधिक. एकंदर कर भरणाऱ्यांमध्यें शेंकडा ३५ मुसलमान आहेत. बाकी सर्व हिंदु आहेत. पांच रुपयापेक्षां अधिक कर भरणाऱ्यांत अवघे शेकडा २८ मुसलमान आहेत. प्राप्तीवरील कर भरणाऱ्यांत मुसलमानांची संख्या अगदीं क्षुद्र म्हणजे शेंकडा बारा आहे. जमिनदार, खाणीवाले, धंदेवाले अशा सर्व संपन्नांचें उत्पन्न हिशेबीं धरल्यास मुसलमानांचें उत्पन्न ६१ कोटीचें भरतें तर हिंदूंचें उत्पन्न मुसलमानांच्या सातपट म्हणजे ४१८ कोटीचें भरतें. बंगालच्या विधिमंडळाचे हिंदु मतदार ५४०००० तर मुसलमान मतदार ५१३००० आहेत. सेंट्रल लेजिस्लेटिव्ह असेंब्लीचे हिंदु मतदार १५७००० असून मुसलमान अवघे ६३००० आहेत. इंग्रजानें जातीय निर्णयाचें भूत बंगालच्या बोकांडीं बसवून बंगाली हिंदूंचें कंबरडें मोडलें. मुसलमानांच्या हातीं सत्ता जातांच त्यांनीं सरकारी नोकऱ्यांमध्यें व कार्पोरेशनमध्यें मुसलमानांना नोकऱ्या राखून ठेवण्याची व्यवस्था केली.

बंगाल इलाख्यांतील पंचायतींचें उत्पन्न ३७ लाख रुपये आहे. त्यांत हिंदूंचा हिस्सा तीनचतुर्थांश असून मुसलमानांचा हिस्सा एकचतुर्थांश आहे. खेडेगांवांतील उत्पन्नामध्यें ७६५६ लक्ष हिंदूंचें उत्पन्न असून ३५९२ लक्ष मुसलमानांचें उत्पन्न आहे. जमीनमहसुलाच्या वार्षिक उत्पन्नांत ५६७ लक्ष हिंदूंचें असून अवघें ६३ लक्ष मुसलमानांचें आहे. युनियन बोर्डें, म्युनिसिपालिट्या, कलकत्ता शहर कॉर्पोरेशन, जमिनदाऱ्या, कोळशाच्या खाणी अशा सर्व बाबतींत हिंदूंचें उत्पन्न ४८३ कोटी असून मुसलमानांचें अवघें ३७॥ कोटी आहे.* म्हणजे कोणच्याहि दृष्टीनें कसेंहि पाहिलें तरी हिंदूंपेक्षां मुसलमान हा कमी योग्यतेचा व मागसलेला असतांना मुसलमानांच्या वांटणीला १२० जागा व हिंदूंच्या वांट्याला ८० जागा देऊन कायद्यानेंच मुसलमानी

* पुरुषार्थ शके १८५९ मार्गशीर्ष अंकांतील श्री. ल. ना. साने यांच्या लेखाचे आधारें.

राज्य बंगालमध्यें स्थापन झालेलें आहे. जातीय निर्णयामुळें बंगाल प्रांतांत तरी पाकिस्थानी चळवळीचा विजय झाला.

हिंदूंच्याच आत्यंतिक त्यागामुळें आणि चळवळीमुळें हिंदुस्थानला प्रांतिक स्वायत्तता मिळाली. त्याचा उपयोग बंगाली हिंदूंच्या नाशांत झाला.

(४८८) **बंगाली हिंदूंवर अनन्वित जुलूमः**—बंगालच्या हिंदूंना सर्व बाजूंनें सतावण्याचें कार्य कडव्या जातीय अभिमानानें मुसलमान मंत्र्यांनीं प्रांतीय स्वायत्तता मिळाल्यापासून चालविलें आहे. ना. हक्क यांचे अन्याय डॉ. एच. सी. मुकर्जी यांनीं पूर्वींच चव्हाट्यावर मांडले. तेथें हिंदूंच्या मिरवणुकी, वाद्यें, उत्सव यांना बंदी होते. गोवध भर रस्त्यावर होतो. गुंड वाटेल ते अत्याचार करितात, पण त्याची दाद मुळींच लागत नाहीं. गेल्या सोळा आगष्टला लीगचा प्रतिकारदिन होता. मंत्र्यांनीं सुट्टी दिली होती. सरकारच्या साह्यामुळें मुसलमानांनीं हिंदूंची कत्तल केली ! घरें जाळलीं. ५ हजार मेले, १० हजार जखमी झाले. स्त्रियांवर अत्याचार केले. कोवळीं मुलेंहि कापून काढलीं. दोनशे कोटींचें नुकसान केलें. असें मुसलमान पक्षपाती स्टेटस्मन पत्रानें प्रसिद्ध केलें आहे. १६ आगष्टची कत्तल म्हणजे बंगाली हिंदूंच्या अस्तित्वाला आव्हानच होय. या झालेल्या चेंगिझखानी, तैमुरलंगी प्रकारावरून मुसलमान मंत्रिमंडळाचें कट्टर जातिनिष्ठ घोरण उघड होतें.

(४८९) **शौकत उस्मानीचें मतः**—हिंदुस्थान हेंच आपलें राष्ट्र आहे, हीच आपली पितृभूमि आहे. हिंदुस्थानांतच आपले हितसंबंध निगडित झाले आहेत, आपले व आपल्या मुलाबाळांचें जें कांहीं बरें वाईट व्हावयाचें असेल तें येथें व्हावयाचें आहे, या देशाचे आपण अविभाज्य घटक आहों, अखंड हिंदुस्थानचें जें सुखदुःख तेंच आपलें सुखदुःख, हा देश जर आपण सोडून बाहेर गेलों तर आपणांस कोणीहि विचारणार नाहीं, या जगांत आपलें आश्रयस्थान हिंदुस्थानच आहे असें निश्चयानें व अभिनिवेशानें मुसलमानांना वाटलें पाहिजे. हिंदुस्थानाबाहेर आपले हितसंबंध निगडित झाले आहेत व कोणी बाहेरचा येऊन आपणांस तारणार आहे, हा समज सर्वथैव चुकीचा आहे. खिलाफत चळवळीचे वेळीं शौकत उस्मान यानें कांहीं लोकांसह देशत्याग करून हिजरात केला. पण त्यांना पश्चात्ताप झाला 'पेशावर ते मास्को' या पुस्तकांत लेखक म्हणतोः—

" अफगाण लोक केवळ राष्ट्रिय दृष्टीचे आहेत. राष्ट्र हेंच त्यांचें सर्वस्व. खिलाफत ही काय चीज आहे हें त्यांना माहीत नाही. स्वदेशापेक्षां मक्कामदिनेवर जास्त प्रेम असल्याचा बहाणा करणाऱ्या आमच्या मुसलमान पुढाऱ्यांनीं अफगाणिस्थानांत जाऊन तेथील शेतकऱ्यापासून देशाभिमानाचें शिक्षण अवश्य घ्यावें. स्वदेशापेक्षां धर्मभूमीवर जास्त प्रेम करण्याची दुष्ट प्रवृत्ति हिंदुस्थानांतील मुसलमानांत बळावल्यामुळें त्यांना स्वदेशविषयक कर्तव्याची जाणीव उरलेली नाहीं. " ( स. के. वा., सं. खं. पृ. ६९३ ).

मुसलमानांना या देशांत जर रहावयाचें आहे व हा देश जर त्यांचा आहे तर त्यांनीं हिंदूंशीं सहकार्यानें, सहानुभूतीनें व माणुसकीनें वागलें पाहिजे. हिंदुस्थान हा हिंदूंचाच देश आहे. कांहीं ऐतिहासिक घडामोडींमुळें जरी विधर्मी लोक स्थायिक झाले आहेत तरी त्यांचा निःपात होईल अशी मुसलमानांनीं मुळींच भीति बाळगण्याचें कारण नाहीं. हा देश बहुसंख्य हिंदूंचा असला तथापि जे विधर्मी लोक या देशाला मातृभूमि–पितृभूमि म्हणून येथें नांदूं इच्छित असतील, तर त्यांना येथें सुखानें राहतां येईल. हिंदूंनीं या देशाकरितां पूर्वीं अपरंपार त्याग केला आहे, रक्त सांडलें आहे आणि यापुढें या राष्ट्राच्या स्वातंत्र्याकरितां ते वाटेल तो त्याग करण्यास सिद्ध आहेत. याच राष्ट्रियतेनें जर विधर्मी राहातील तर हिंदूंकडून त्यांना केव्हांहि संरक्षण मिळेल. सात कोट मुसलमानांना हांकलून देणें किंवा जुलमानें हिंदु करणें असली आसुरी व शेखमहंमदी कल्पना कोणत्याहि हिंदूच्या डोक्यांत नाहीं. हिंदूंना मुसलमानांकडून राष्ट्रियत्व हवें आहे. ज्या राष्ट्रियत्वावर अधिष्ठित होऊन हिंदु मुसलमानांशीं वागूं इच्छितात तें राष्ट्रियत्व पुढील-प्रमाणें आहे.

(४९०) राष्ट्रियत्व म्हणजे काय ?:–(१) स्वराष्ट्र, राजकीय दृष्ट्या पूर्ण स्वतंत्र व स्वराज्योपभोगी असावें. (२) त्यावर प्रत्यक्ष अगर अप्रत्यक्ष परकीयांचा ताबा असूं नये. (३) जगांतील सर्व राष्ट्रांमध्यें आपला दर्जा सर्वश्रेष्ठ असावा; निदान बरोबरीचा तरी असावा. (४) आपलें राष्ट्र विद्या, वैभव व पराक्रम या गुणांनीं तळपत राहावें; व त्याकरितां विश्वप्रयत्न करण्याची बुद्धि असावी. (५) राष्ट्रांतील सर्व समाजांना, घटकांना, राजकीय, धार्मिक, सामाजिक व आर्थिक हक्क बरोबरीनें असावे; कोणच्याहि मूलभूत हक्कांवर

गदा येऊं नये. (६) सर्वांना सारखेपणें सर्व क्षेत्रें मोकळीं असावीं. (७) कोणाचा कोणावर जुलूम होऊं नये. राष्ट्रियत्वाची ही सप्तसूत्री आहे. या सप्तसूत्रीवर अधिष्ठित होऊन हिंदु समाज अन्यधर्मीयांशीं वागण्यास सिद्ध आहे. शुद्ध राष्ट्रिय बुद्धि ती ही. तींविरुद्ध जातीय बुद्धि ती मुसलमानांमध्यें अधिक आहे. जातीयता सोडून देऊन मुसलमानांनीं राष्ट्रियता स्वीकारावी म्हणजे मुसलमानांचा प्रश्न फार त्वरित सुटेल. मुसलमान अल्पसंख्य असले तरी हिंदु लोक त्यांना अन्यायानें मुळींच वागविणार नाहींत किंवा त्यांना उगाच भरमसाट देऊन बहुसंख्य हिंदु समाजावर अन्यायहि करणार नाहींत. अल्पसंख्याचे प्रश्न सोडविण्याकरितां राष्ट्रसंघानें जे नियम ठरविले आहेत त्यांचा अंगीकार करण्यास हिंदु समाज सदैव सिद्ध आहे. राष्ट्रसंघाचे अल्पसंख्य समाजासंबंधाचे नियम आहेत ते असेः—

(४९१) राष्ट्रसंघ व अल्पसंख्यः-(१) अल्पसंख्याकांना नागरिकत्वाचा हक्क मिळावा. (२) त्यांच्या इच्छेप्रमाणें कामधंदा करण्याचा हक्क असावा. (३) व्यक्तिस्वातंत्र्य असावें. (४) धार्मिक आचारविचार पाळण्यास आडकाठी नसावी. (५) आपसांतील व्यवहारांत स्वतःची मातृभाषा उपयोगांत आणावी. (६) शिक्षण व दानधर्म यांप्रीत्यर्थ इच्छेप्रमाणें द्रव्याचा उपयोग करण्याचें स्वातंत्र्य असावें. (७) नोकऱ्या, कारखाने, धंदे, लष्कर या बाबतींत अल्पसंख्याकांनाहि योग्यतेप्रमाणें जागा मिळाव्या. अल्पसंख्यांना देश तोडून द्यावा असें कोणींच म्हणत नाहीं म्हणून पाकिस्थानचा विचार मुसलमानांनीं डोक्यांतून काढून टाकावा.

—*—

## प्रकरण तिसावें

# समालोचन

या प्रकरणांत वेदकालापासून तों आजच्या कालापर्यंत हिंदुसंस्कृतीच्या स्वरूपाचें विहंगमदृष्ट्या समालोचन करितों.

(४९२) **ऋग्वेदकालीन आर्य**:–सर्व जगांत आर्यसंस्कृति अत्यंत प्राचीन होय ! ऋग्वेद हें सर्व जगांतील प्राचीन वाङ्मय असून त्यामध्यें आर्यांच्या संस्कृतीचें प्रतिबिंब पूर्णपणें पडलेलें आहे. ऋग्वेद हें वाङ्मय आर्यांनीं निर्माण केलें. ऋग्वेद हा दहा हजार गीतांचा समूह आहे. हेंच आर्यांचें पहिलें वाङ्मय होय ! वैदिक आर्य हे लढवय्ये, जेते, प्रतिभासंपन्न, संपत्ति बाळगणारे, शत्रूंचा पराभव करून त्यांचीं गांवें, नगरें, संपत्तीचीं कोठारें हस्तगत करणारे असे होते, असे ऋग्वेदांत उल्लेख आहेत. ऋग्वेद-कालीन आर्यांच्या देवता अग्नि, सूर्य, पर्जन्य, उषा, वरुण, मरुत् इत्यादि होत्या. त्यांत इंद्र हा प्रमुख देव होता. इंद्र हा पराक्रमी, रथांत बसणारा, पोलादी वज्र धारण करणारा, शत्रूंची कत्तल करणारा, भक्तांचे मनोरथ पूर्ण करणारा, आर्यांना युद्धांत सदैव मदत कर-णारा असा होता. आर्यांनीं दस्यूंना जिंकलें. दस्यु वा दास हे आर्यांचे शत्रू होते. यांतूनच पुढें शूद्र वर्ग उत्पन्न झाला. एक आर्यवर्ण व दुसरा दास अथवा शूद्र असे प्रथम दोनच वर्ण होते. आर्यांत पुढें कालांतरानें पुरोहित वर्ग, राजन्य वर्ग व वैश्य वर्ग असे त्रैवर्णिक निर्माण झाले. त्रैवर्णिकांच्या पराक्रमाचा व सत्तेचा प्रांत म्हणजे पंजाब व गंगा-यमुनांचा प्रदेश होय. आर्यांचीं आपापसांत युद्धें होत. दशराज्ञ युद्धाचा उल्लेख ऋग्वेदांत आहे. ब्राह्मणांनीं यज्ञयाग, व्रतें, मंत्रतंत्र, ग्रहदेवता, होम, पशुयाग, सोमयाग, इत्यादींचें सविस्तर वर्णन करणारे ग्रंथ निर्माण केले.

(४९३) **चातुर्वर्ण्यस्थापना**:–भारतीय युद्धापूर्वी चातुर्वर्ण्य हें उत्तर कुरूंत उत्पन्न झालें. ही चातुर्वर्ण्याची रचना गुणकर्मांवरच झाली. वंशजां-मध्यें जर ते गुण नसतील तर ज्या वर्णाचे गुण त्यांच्यामध्यें असतील त्यांत

त्यांचा समावेश होई. श्रेष्ठ गुणानें वरच्या वर्णांत व कनिष्ठ गुणानें खालच्या वर्णांत समावेश होत असल्याचीं उदाहरणें वेद, स्मृति व विष्णुपुराण, भागवत इत्यादि ग्रंथांत आढळतात. त्यागी, तपस्वी, विद्याविनयसंपन्न, शमदमादींनीं युक्त, असे ब्राह्मण त्या कालीं होते. क्षत्रियहि पराक्रमी, बलाढ्य, ऐश्वर्यसंपन्न असे होते. त्यांतील मनु, इक्ष्वाकु, मांधाता, सगर, जनक इत्यादींचीं नांवें अद्याप सर्वतोमुखीं आहेत. ब्राह्मण, क्षत्रिय आणि इतरहि वर्ण त्याकालीं आपआपल्या धर्माप्रमाणें वागत असत. समाज-धारणा, कर्तव्य, पुरुषार्थ, राजशासन, कायदा इतक्या व्यापक अर्थानें धर्म शब्द त्यावेळीं रूढ होता.

(४९४) **वैदिक संस्कृतीचा उत्कर्षकालः**—वैदिक आर्यांच्या उत्कर्ष-कालांत वाङ्मय, कला, शास्त्रें यांची वाढ झाली. बौद्धकालापर्यंत चातुर्वर्ण्यप्रधान संस्कृति उत्कर्षांत होती. आर्यांची ऐहिक जीवनाकडे पाहाण्याची दृष्टि आशावादी होती. पराक्रम व ऐहिक वैभव यांना ते महत्त्व देत होते. जगाचें मूलतत्त्व ब्रह्म असून तें ज्ञानमय व आनंदमय असें आहे, तें जगांत भरून राहिलें आहे, असें आर्यांचें तत्त्वज्ञान होतें. वैद्यक, ज्योतिष, व्याकरण, संगीत, स्थापत्य, शिल्प, धर्म, कायदा व तत्त्वज्ञान या सर्वांची वाढ यावेळीं आर्यांनीं केली. राजसूय व अश्वमेध, सोमयाग व पशुयाग यांसारखे आर्यांचे मोठमोठे उत्सव होते. त्या महो-त्सवांत व राजदरबारांत विद्या व कलांचे दीप उजळले गेले. यज्ञविधीची सुसंगत मांडणी करणारे व वर्णाश्रमव्यवस्थेचें आणि व्यवहाराचें निरूपण करणारे सूत्रग्रंथ व स्मृतिग्रंथ निर्माण झाले. तक्षशिलेसारखीं विद्यापीठें उत्पन्न झालीं. हा सर्व संस्कृत-विस्तार पंजाबपासून बिहारपर्यंतच्या प्रदेशापर्यंत झाला. बुद्धपूर्व-कालीं आर्यसंस्कृति उत्कर्षबिंदूवर होती.

(४९५) **ब्राह्मणांचें वर्चस्वः**—याच सुमारास भारतीय युद्धामुळें क्षत्रियकुलांचा संहार झाला. त्यामुळें ब्राह्मणांना फार महत्त्व आलें. ब्राह्मण-प्रमुख चातुर्वर्ण्यसंस्था स्थिर झाली. स्वास्थ्यामुळें लोकांस क्षत्रियांची गरज नाहीं असें वाटूं लागलें. बाह्य सत्ता क्षत्रियांचे आधीन, पण अंतःसत्ता म्हणजे समाजाच्या मनावर छाप ब्राह्मणांची—पुरोहितांची अशी स्थिति

उत्पन्न झाली. शूद्र व अतिशूद्र या नांवाचा बहुसंख्य वर्ग अत्यंत हीन समजला गेला. त्यांनीं त्रैवर्णिकांची सेवाचाकरी करावी व ते सांगतील ते उद्योग करावेत असे नियम त्रैवर्णिकांनीं केले. त्यामुळें एकाकाळीं उत्कर्षाच्या परमोच्च बिंदूवर गेलेल्या चातुर्वर्ण्ययुक्त आर्यसमाजाच्या ऱ्हासास तीन कारणें घडलीं:—

(१) ब्राह्मणक्षत्रियांमध्यें कलह उत्पन्न झाले.

(२) प्रत्येक व्यक्तीस गुण, कर्म व प्रवृत्ति यांना अनुसरून वाटेल त्या वर्णांत जातां येत असे तें बंद पडलें.

(३) राजन्य वर्गाचें महत्त्व कमी होऊन पुरोहितांचें महत्त्व वाढलें. त्रैवर्णिक आर्यांचा एक गट व दस्यु, अनार्य व शूद्रातिशूद्रांचा दुसरा गट होता. आर्य हे जेते आणि तदितर जित असा संबंध होता. दास, अनार्य, शूद्रातिशूद्र यांपेक्षां आर्य श्रेष्ठ व आर्यांमध्यें ब्राह्मण श्रेष्ठ असा समज होता. ब्राह्मण हा सर्वांत श्रेष्ठ, वंद्य किंबहुना भूदेवच झाला. सत्र करण्याचा अधिकार ब्राह्मणांनाच होता. तीन्ही वर्णांनीं ब्राह्मणांच्याच आज्ञेंत राहिलें पाहिजे असा दंडक होता. ( त्रयो वर्णा ब्राह्मणस्य वशे वर्तेरन्—व. ध. सू. ) राजाचा अंमल इतरांवर चालावा, ब्राह्मणांवर चालूं नये. ( राजा सर्वस्येष्टे ब्राह्मणवर्जम्–गौ. ध. सू. ११–१ ) ब्राह्मण हा निर्धन नव्हता. त्याला सर्व कर माफ होते. तो धनाचा मालक होता. ( ब्राह्मणेभ्यः करादानं न कुर्यात् । अकरः श्रोत्रियः ॥ वि. ध. सू. ३–२६ ). गुप्तधन अगर ठेव सांपडली तर ती राजाकडे द्यावी लागे. पण हा नियम ब्राह्मणांना लागू नव्हता. कोणत्याहि जातीशीं लग्न करण्याची ब्राह्मणाला अनुज्ञा होती. न्यायदानाचा व ज्ञानदानाचा मुख्य अधिकार ब्राह्मणांचा होता. अध्यापन, याजन व प्रतिग्रह हे अधिकार ब्राह्मणांचेच होते. महा-अपराध केला तरी ब्राह्मणाला शारीरदंडाची किंवा वधाची शिक्षा नव्हती. त्याची मानहानि करीत, मुंडण करीत व धिंड काढून हांकलून देत असत. कांहीं अपराधांत ब्राह्मणाला इतरांहून दंड कमी सांगितला होता. शूद्रानें श्रमानें मिळविलेली संपत्ति घेण्याचा अधिकार आर्यांना होता. ( कारण द्रव्यामुळें तो उन्मत्त होण्याचा संभव ! ) ब्राह्मणाला अब्राह्मणानें साक्षीदार म्हणून बोलावूं नये. इतर कोणी निपुत्रिक वारला तर त्याच्या मिळकतीचा

वारस राजा; पण निपुत्रिक ब्राह्मणाचें धन ब्राह्मणाकडेच जाई. इतरांपेक्षां ब्राह्मणाला अशौचाचा अवधी थोडा असे. उच्चवर्णीय स्त्रीशीं शूद्रानें संसर्ग केल्यास त्याला जबर शिक्षा असे. शूद्राला कोणत्याहि गुन्ह्याकरितां देहदंडच सांगितला होता. न्यायदानाचें काम मूर्ख ब्राह्मणानें करावें, पण शहाण्या शूद्रानें करूं नये. शूद्राला वेदाध्ययनाचा अधिकार नव्हताच. पण त्याच्या सन्निध द्विजानेंहि वेदपठण करूं नये, शूद्र म्हणजे चालतें बोलतें केवळ स्मशान, म्हणून त्याच्याकडे इतरांनीं जाऊं नये, शूद्रापासून ब्राह्मणांनीं दक्षिणा घेऊं नये, इत्यादि नियम होते. शूद्रपुत्राला इतर पुत्रांच्या मानानें पित्याचें अल्प धन मिळे. शूद्राचे संस्कार अमंत्रक व्हावेत, त्यांना धर्मोपदेश किंवा व्रतोपदेश करूं नये असाहि दंडक होता.

**(४९६) शुद्ध व मिश्र असे दोन तटः**—अशा या अस्वाभाविक भासणाऱ्या वैषम्यामुळें चातुर्वर्ण्ययुक्त आर्यसंस्कृतीविरुद्ध जोराची प्रतिक्रिया सुरू झाली. त्रैवर्णिकांशीं स्पर्धा करणारे व्रात्य, क्षत्रिय, वैश्य, लिंगपूजक, संकरजाति असे अनेक मानवसमुदाय होते. त्यांनीं वैदिक संस्कृतीविरुद्ध बंड पुकारलें. पाणिनिपूर्वकालीं सर्वांचे अगोदर चार्वाकानें हा हल्ला केला व जैन आणि बौद्ध धर्मांच्या उभारणीचा पाया घातला. जैन धर्माचा चोविसावा तीर्थंकर महावीरस्वामी व त्याच्या मदतीला बिहारप्रांतानें पाठविलेला गौतमबुद्ध यांनीं वैदिक तत्त्वज्ञान, परंपरा, यज्ञयाग, पौरोहित्य, समाजरचना अशा सर्वांवर प्रहार करून सर्वव्यापी क्रांति केली. असें होण्याचें कारण आर्य व अनार्य यांतील मिश्रण हें होय. हिंदुस्थानांत आर्य व अनार्य यांचा समागम होऊं नये म्हणून कडक निर्बंध केले होते तरी त्यांचे शरीरसंबंध झालेच, आणि मिश्रजाति उत्पन्न झाल्या. मिश्र व शुद्ध असे दोन तट पडले. शुद्ध हे मिश्रांचा तिटकारा करूं लागले व त्यांस दाबून टाकण्यास प्रवृत्त झाले. मिश्रांना वाटे कीं, शुद्धांप्रमाणें सर्व अधिकार आपणाला कां नसावेत ? ( उदाहरणार्थ, कवषऐलुषाची कथा. ) मिश्रांमध्येंहि कांहीं विद्वान् उत्पन्न झाले. त्यांचा पक्ष शुद्धांनीं घेतला. शुद्धांप्रमाणें वागणाऱ्या मिश्रांना कोणी पुसत नसे. शुद्धांना उच्च समजत व मिश्रांना खालचे समजत. मिश्र आर्य व शुद्ध आर्य असे दोन तट पडून त्यांमध्यें मोठे मतभेदहि उत्पन्न झाले. शुद्ध आर्य असें मानीत कीं, जग सत्य व स्थायिक आहे.

अशुद्ध आर्य असें मानीत कीं, जग मायारूपी आहे, जगतामध्यें तापत्रय ज्ञात धुऊन मनुष्याच्या पाठीस लागलें आहे, नवीं नवीं दुःखें भोगण्याकरितां पुनर्जन्म होतो. शुद्ध आर्य असें मानीत कीं, यज्ञ हें ऐहिक सुखाचें साधन आहे; मिश्र आर्य असें मानीत कीं, यज्ञापासून दुःख उत्पन्न होतें. शुद्ध आर्य आपणांस पशु, प्रजा व ऐश्वर्य प्राप्त व्हावें म्हणून झटत. मिश्र आर्य लोकांस वैराग्यच बरें वाटे आणि ते स्वेच्छेनें क्लेश भोगीत. आपणांस श्रमण ( श्रम करणारे ) म्हणण्यांत संतोष मानीत. ऐहिक सुखाचें साधन ज्ञान आहे असें आर्य समजत; आणि वेद हे ईश्वरप्रणीत आहेत असें म्हणत. मिश्र आर्यांस ध्यानच बरें वाटे आणि ते संन्यास घेऊन मठांत वास करीत. शुद्ध आर्यांचा कर्ममार्गावर आणि प्रवृत्तिमार्गावर भर असे. मिश्र आर्यलोक प्रवृत्तीपासून सर्व दुःखें उत्पन्न होतात असें मानीत. शुद्ध आर्यांच्या स्त्रिया ऐहिक भूषणें मिळवून यज्ञ करण्यामध्यें यजमानाला मदत करीत तर मिश्र आर्यांच्या स्त्रिया बैरागिणी होत. शुद्ध आर्य वंशाभिमानी होते, तर मिश्र आर्य सर्वांभूतीं दया करावी व प्रीति करावी असें म्हणत. शुद्ध आर्य जगतावर आपली सत्ता असावी असें समजत, तर मिश्र आर्य मनुष्य व इतर प्राणी यांची योग्यता सारखीच समजत. शुद्ध आर्यांना बुद्धीचें महत्त्व वाटे तर मिश्रांना भक्तीचें महत्त्व वाटे. शुद्ध आर्यांच्या धार्मिक आणि सामाजिक धर्मसंस्थेचें नांव वैदिक धर्मसंस्था आणि मिश्र आर्यांच्या व अनार्यांच्या धर्मसंस्थेचें नांव बौद्धधर्मसंस्था असें होतें.

( म. मो. कुंटे, केसरी–दि. १४।१०।३८ )

(४९७) बौद्धधर्माचें आकर्षण:–उत्तर हिंदुस्थानांत विशेषतः मगधांत कोट्यवधि लोकांनीं बौद्ध धर्माचा स्वीकार केला, याचें कारण त्यांत समतेची आकर्षकता होती. त्रैवर्णिकांनीं दास, शूद्र, संकरजाति यांसंबंधीं कडक निर्बंधानें जें वैषम्य उत्पन्न केलें होतें त्यामुळें पोळलेल्या व्रात्यक्षत्रियांनीं व अनेक संकर जातींनीं बौद्धधर्माचें अनुसरण केलें. गौतमबुद्ध जन्मजात जाति मानीत नव्हता. उपाली हा न्हावीजातींतील व सुनीत हा भंगीजातींतील त्याचा शिष्य होता. गुण व प्रवृत्ति चांगली असतांना पुढें येण्यास चातुर्वर्ण्यांत स्थान नव्हतें. चातुर्वर्ण्यांची जन्मावलंबी उच्चनीचत्वाची

जी पोलादी चौकट होती, तीमुळें पीडलेल्या अनेक शूद्रादि जाति बौद्धधर्मी बनल्या. बुद्धाचीं नीतितत्त्वें व समता यांनीं लोकांना मोहनी पाडली! बौद्धधर्माची छाप उच्च वर्णावर पडली नाहीं. बौद्धक्रांति ही एक सामाजिक व वैचारिक क्रांति होती. बुद्धानें चातुर्वर्ण्य व वेद यांवर जरी आघात केले तरी त्याचें बौद्धिक सामर्थ्य कमी पडल्यामुळें वेद टिकले, चातुर्वर्ण्यहि नष्ट झालें नाहीं; फक्त व्रात्यक्षत्रियवैश्यांना व भ्रष्ट शूद्रादिकांना पुढें येण्यास वाव मिळाला. गुणानें, कर्मानें व सत्प्रवृत्तीनें जे चांगले होते ते प्रथम पुढें आले व त्यांनीं बौद्धधर्मांत चांगलीच कामगिरी केली. पुढें चांगल्या माणसांची परंपरा तुटली व बाजारबुणग्यांची दाटीवाटी झाली. व्रात्यसंकरजाति आणि हीनजाति यांना महत्त्व आल्यामुळें पुनश्च आर्यसंस्कृतीचा उदय झाला.

(४९८) **भिक्षु व ब्राह्मणः**–आर्य व बौद्ध यांच्या विग्रहांतून बुद्धोत्तर कालांत हिंदु संस्कृति उदयाला आली व आर्यसंस्कृति बहुजनांच्या संस्कृतींत अंशतः विलीन झाली. बौद्ध तत्त्वज्ञानाच्या आघातानें यज्ञसंस्था रोडावली, पण ब्राह्मण हा गृहस्थाश्रमी असल्यामुळें व त्याचा जनतेच्या जीवनाशीं पौरोहित्य, ज्योतिष, मंत्रक्रिया, वैद्य, अध्यापन इत्यादि द्वारांनीं दैनंदिन संबंध असल्यामुळें ब्राह्मणांचा पराभव झाला नाहीं. भिक्षुसंघ, आर्हतसंघ, ब्राह्मणांची प्रतिक्रिया करणारे अग्रणी महंत हे सर्व बैरागी असल्यामुळें मान्यता पावले; पण जनतेच्या नित्य व्यवहाराशीं त्यांचा संबंध न राहिल्यामुळें ब्राह्मण्याचें मूळ ते उखडूं शकले नाहींत. बौद्धिक दृष्ट्याहि वेदांचें, समाजव्यवस्थेचें आणि तत्त्वज्ञानाचें वैयर्थ्य हे भिक्षु व आर्हत दाखवूं शकले नाहींत. ब्राह्मणांनीं अज्ञजनतेशीं, त्रैवर्णिकेतरांशीं समरस होऊन भक्ति, पूजा, दान, यात्रा, मंदिरें, तीर्थें यांचें स्तोम माजविलें. वैदिक देवता व यज्ञ यांचा त्याग करून सामान्य जनांत असलेल्या अवैदिक देवता आत्मसात् करून उपासनाविधि व इतर विचारसरणी त्यांनीं जनतेंत रूढ केली. त्रैवर्ण्यप्रधान जुनी समाजव्यवस्था मागें पडली व शेंकडो जातींच्या पसाऱ्यानें बनलेली विशाल जातिसंस्था प्रादुर्भूत झाली. सर्व जातींवर पुरोहितांचें वर्चस्व कायम टिकलें. संस्कृतीचीं सूत्रें ब्राह्मणांच्याच हातीं राहिलीं.

(४९९) **हिंदु संस्कृतीचा उदयः**–स्वास्थ्याचे कालांत राजन्यवर्ग मागें पडतो. अशा वेळीं धर्मप्रवर्तक लोकांना पुढें येण्यास संधि मिळते.

यावेळीं ब्राह्मणवर्ग पुढें सरसावला. त्यानें हळु हळू राजोपाध्याय या नात्यानें क्षत्रिय राजांवरहि छाप बसविली. राजा स्वाधीन झाल्यावर लोकहि उपाध्यायांचे नादीं लागतातच. बाह्यसत्ता क्षत्रियांचे हातीं होती. परंतु मनावर सारी सत्ता उपाध्यायांची होती. धर्माची, नित्य कर्मांची गुरुकिल्ली ब्राह्मणांच्या स्वाधीन राहिली. ब्राह्मणांनीं अन्नसंतर्पणें व पूजाअर्चा यांच्या खटाटोपांत सामान्य जनतेला गुंतविलें. वैदिक देवता मागें पडल्या व ऐतिहासिक मृतवीर देव म्हणून पुढें आले. यज्ञमंडपाच्या जागीं मंदिरें आलीं. सामगायनाच्या स्वरापेक्षां भक्तिसंगीतानें जीवन दुमदुमून गेलें, वेदांपेक्षां उपवेदांचें महत्त्व वाढलें. घृतमांसाच्या आहुतींची जागा अगरु–चंदनानें घेतली. वैदिक मंत्रांची जागा शब्दालंकारांनीं भूषविलेल्या स्तोत्रांनीं घेतली. मोक्षाचें व अध्यात्माचें महत्त्व वाढलें. अनेक उपासनामार्ग, विविध तत्त्वज्ञानानें भरलेले शेंकडो संप्रदाय, भ्रांतिमय पंथ निर्माण होऊन हिंदु संस्कृतीची वाढ झाली. संघटित राजसत्ता प्रभावी न झाल्यामुळें ब्राह्मण्य प्रभावी ठरलें. तात्पर्य, बुद्धोत्तर कालांत आर्यसंस्कृति मागें पडून ती हिंदुसंस्कृति या नांवानें सामान्य जनांशीं अधिक संबद्ध व अधिक समरस अशा स्वरूपांत प्रगट झाली.

(५००) **बौद्ध धर्माचा ऱ्हासः**–उत्तरेंत शबरस्वामी, कुमारिलभट्ट, पुष्यमित्र, समुद्रगुप्त, विक्रमादित्य, इत्यादींच्या प्रयत्नांमुळें बौद्ध संस्कृतीचा पाडाव होऊन हिंदु संस्कृतीचा विजयध्वज पुनः डोलूं लागला. दक्षिणेंत आंध्रभृत्य राजा शातकर्णी, श्रीशंकराचार्य, चालुक्य राजे यांच्या यत्नामुळें हिंदुसंस्कृतीचा झेंडा डौलानें फडफडूं लागला. राजपुतान्यांतील राजपुतांनीं उत्तरेवर स्वाऱ्या करून काशी, मगध, ओरिसा या प्रांतांत असलेल्या अवशिष्ट बौद्ध धर्माचें वर्चस्व नष्ट केलें. उत्तरेंत व दक्षिणेंत अनेक हिंदु राजे त्यावेळीं राज्य करीत होते. त्यामुळें बौद्ध संस्कृतीचा सर्व बाजूंनीं कोंडमारा झाला. मगध व ओरिसा प्रांतांत जो थोडा बौद्ध धर्म होता त्याचें समूळ उच्चाटन मुसलमानांनीं कत्तली करून केलें.

(५०१) **बौद्ध क्रांतीचे परिणामः**–येणेंप्रमाणें आर्यसंस्कृतीनें बौद्ध संस्कृतीवर विजय मिळवून हिंदुसंस्कृति हें नांव धारण केलें. तथापि बौद्ध संस्कृतीनें आर्यसंस्कृतीवर चांगलाच आघात केला. बौद्ध क्रांतीनें आर्य-

संस्कृतीचें तत्त्वज्ञान, जीवनाचें रहस्य, सामाजिक आकांक्षा या सर्व बदलून टाकल्या. कलिवाद, दैववाद, दुःखवाद, मिथ्यावाद, संन्यासवाद हे बोकांडीं बसले. अंत्याश्रमाला महत्त्व आलें. शिवाशीव, विटाळ, कठोर जातिबंधनें, जन्मजात उच्चनीचता, खाण्यापिण्याचे फाजील निर्बंध, सोवळें-ओवळें, अदृष्ट, अपूर्व, निवृत्तिपरता, मूर्तिविषयक अद्भुत कल्पना या सर्व बोकाळल्या. चतुर्थाश्रमाच्या महत्त्वामुळें स्त्रियांविषयीं अनुदारता वाढली. अहिंसाधर्म पत्करल्यामुळें वीरवृत्तीला पारखें व्हावें लागलें. अशाहि बिकट परिस्थितींत कांहीं काल हिंदु संस्कृतीचा उत्कर्षच होत होता. कारण विधर्मीयांचीं आक्रमणें कडव्या वृत्तीनें अद्याप झालीं नव्हतीं.

(५०२) **सुखाचा कालः**—दक्षिणेंत शके ४०० ते १२०० पर्यंत आठशें वर्षें ब्राह्मण व क्षत्रिय यांमध्यें स्नेह होता. प्रत्येकाला आपापल्या वर्णाची, जातिधर्माची व कर्तव्याची ओळख चांगली होती. क्षत्रिय राजे धर्मरक्षण व प्रजापालन करून धर्मप्रणेत्या ब्राह्मणांचा अग्रहार देऊन परामर्श घेत असत. याच कालांत विज्ञानेश्वर व हेमाद्रि यांसारखे धर्मशास्त्रज्ञ पंडित उत्पन्न झाले. पण या कालाच्या शेवटीं शेवटीं ब्राह्मणवर्ग फार सुखासीन, स्वधर्मपराङ्मुख असा झाला. ऋग्वेदकालीं जसा यज्ञयागादींचा अतिरेक झाला तसा या कालांत देवालयांचा व व्रतोद्यापनांचा अतिरेक झाला. चालुक्य, राष्ट्रकूट व यादव यांनीं असंख्य देवळें बांधलीं. मूर्तींच्या स्थापना, षोडशोपचार पूजा, व्रतें, उद्यापनें व दानें यांचा इतका सुकाळ झाला कीं, त्यामुळें ब्राह्मणांची चंगळ उडाली. हेमाद्रीच्या चतुर्वर्गचिंतामणीमध्यें दानखंड व व्रतखंड हा मुख्य भाग असून दररोज सुमारें दोनतीन व्रतें पडतील, इतकीं तीं सांगितलेलीं आहेत.

(५०३) **ब्राह्मणक्षत्रियांची स्वधर्मच्युतिः**—या व अशा कांहीं कारणांमुळें ब्राह्मणांविषयीं पुन्हां अनादर उत्पन्न झाला. क्षत्रिय, वैश्य ब्राह्मणांचा मत्सर करूं लागले. ब्राह्मण हा त्रिवर्ण व संकरजाति यांपासून दूर झाला. क्षत्रिय, वैश्य संस्कारहीन झाले. ब्राह्मणांनीं हीन जातीवर पुनः वर्चस्व स्थापन करण्याचा यत्न केला. क्षत्रिय व वैश्य या वर्णांचा अभाव ब्राह्मण प्रतिपादूं लागले. ब्राह्मणानें शूद्राचें पौरोहित्य करूं नये, त्याला वेद

शिकवूं नयेत, त्याला बरोबरीचा मान देऊं नये, अशा कल्पना पुढें आल्या. ज्ञानाचा मक्ता एका वर्गाकडे आला. क्षत्रिय, वैश्य विद्याहीन झाले. पंडितांचा व्यवहार संस्कृतामध्यें तर इतरांचा प्राकृतामध्यें असल्यानें दोन्ही वर्गांत तुटकपणा उत्पन्न झाला. स्वास्थ्यामुळें कांहीं ब्राह्मण धर्म-पराङ्मुख झाले. कांहींनीं इतर व्यवसाय अंगीकारले. याप्रमाणें ब्राह्मणवर्ग स्वधर्मच्युत होतांच क्षत्रियवर्गाचेंहि अधःपतन झालें. ब्राह्मण व क्षत्रिय यांची स्वधर्मच्युति होतांच दक्षिणेंत मुसलमानी राज्य झालें. देवळें मोडली, देव फोडले, स्त्रिया भ्रष्ट केल्या, बलात्कारानें हिंदूंच्या सुंता केल्या, साधु-संतांचा छळ झाला, क्षत्रियत्व वांझ झालें, वैश्यवर्ग नागवला गेला, स्वधर्मानें चालणारा ब्राह्मण राहिला नाहीं. कांहीं घरांत एक भाऊ हिंदु तर दुसरा मुसलमान अशी व्यवस्था झाली.

(५०४) साधुसंतांचे उपकारः—अशा या बिकट परिस्थितीमध्यें साधुसंतांनीं कारुण्यानें भक्तिमार्ग सुरू केला. भक्तिमार्गानें मनुष्यव्यक्ति मोक्षाकडे आकर्षिली गेली. भक्तिमार्ग हा निवृत्तिप्रधान होता. तो सशस्त्र व अशस्त्र प्रतिकाराचा नव्हता. साधुसंतांच्या भक्तिमार्गानेंच हिंदुसमाज हिंदुत्वांत राहिला. नुसत्या नामस्मरणानें मोक्ष मिळतो, अशी आरोळी ठोकतांच लाखो लोक साधुसंतांच्या मागें धांवले. ज्ञानेश्वरादि संतांनीं मराठी भाषेंत ब्रह्मविद्येचा सुकाळ करून अमृताला जिंकणाऱ्या गोड मराठी भाषेनें सर्वांना आकर्षून घेतलें. महाराष्ट्रांतील दुर्दैवी हिंदु समाजाला हिंदु-धर्मांत थोपवून धरण्याचें महत्कार्य या संतांनीं केलें. त्या कालांत जर भरत-खंडांत व महाराष्ट्रांत साधुसंत झाले नसते तर येथील प्रजा एकवर्णी मुसलमान झाली असती, आणि आर्यसंस्कृति, आर्यधर्म, यांचें नांवहि जगांत राहिलें नसतें.

(५०५) इस्लामचा चौखुर पराभवः—साधुसंतांनीं आपल्या तप-श्चर्येनें व ब्रह्मविद्येच्या सिंचनानें हिंदुसंस्कृतीचा आत्मा जसा जतन केला, तसाच राजकीय सत्ता हातामध्यें घेऊन संस्कृतीचें वर्चस्व आणि ऐश्वर्य स्थापण्याचा उद्योग संबंध हिंदुस्थानांत निरनिराळ्या पराक्रमी कर्मवीरांनीं केला. जगांत ज्या पराक्रमाला तोड नाहीं आणि ज्या त्यागाला सीमा नाहीं, अशा असीम त्यागानें व पराक्रमानें इतिहासाचें पान नि पान रक्तानें लाल

करून राजपुतांनीं इस्लामला थोपवून धरलें. दक्षिणेंत विजयनगरच्या कर्मवीरांनीं, धर्मवीरांनीं, पंडितांनीं आणि वेदांत्यांनीं स्वतंत्र राज्यस्थापना करून इस्लामचा प्रतिकार करीत करीत तिला नामशेष करून सबंध दक्षिण हिंदुस्थानभर हिंदुसंस्कृतीचे झेंडे नाचविले. महाराष्ट्रांत मराठ्यांनीं तर औरंगजेबासारख्याला अशी धूळ चारली कीं त्याला भग्न मनःस्थितींतच मरावें लागलें. मराठ्यांनीं हिंदुपदपादशाहीची स्थापना करून, अटकेपार झेंडे फडकावून, दिल्लीच्या तक्तावर घण घालून, बादशहाला पेन्शनर बनवून हा सबंध हिंदुस्थान हिंदूंचा आहे, येथें हिंदुसंस्कृतीच डौलानें मिरविली पाहिजे अशी घोषणा केली. उत्तरेंत पराक्रमी शीखांनीं बहादुरी दाखवून बादशाहीचे लचके लचके तोडून स्वतंत्र राज्याची स्थापना केली, आणि इस्लामला चोहोंबाजूंनीं घेरून तिचें आक्रमण नष्ट केलें. या पराक्रमी इतिहासानें हिंदुजातीनें वेदकालीन आर्यांचा आक्रमणशील, तेजस्वी, ओजस्वी, जयस्वी, मनस्वी, पराक्रमी आणि धैर्यशाली असा स्वभाव प्रगट केला. सृष्टीच्या उत्पत्तीपासून या भरतखंडांत राहणारे वेदकालीन आर्य हे जसे विजिगीषाबुद्धीनें संस्कृतिप्रसारार्थ सुमेरुपर्वतावरून उत्तर ध्रुवाकडे गेले आणि जलप्रलय, हिमप्रलय व इतर आपत्ति यांना तोंड देऊन जशी त्यांनीं आपली संस्कृति तत्कालीन ज्ञात प्रदेशामध्यें पसरविली, बरोबर त्याचेंच अनुकरण अर्वाचीन कालांतील राजपुत, मराठे, शीख आणि विजयनगरकर यांनीं करून आपली संस्कृति श्रेष्ठ दर्जाची आहे हें सिद्ध केलें. पराक्रमाबरोबर समाजधारणा, समाजव्यवस्था, समाजशास्त्र, धर्म, वाङ्मय, काव्य, कला, तत्त्वज्ञान अशा संस्कृतीच्या विविध अंगांतहि त्यांनीं वेदकालीन आर्यांप्रमाणें प्रगति केली.

(५०६) **पाश्चात्य संस्कृतीशीं संबंधः**—यानंतर हिंदुसंस्कृतीचा इंग्रजांच्या द्वारानें पाश्चात्य संस्कृतीशीं संबंध आला. शास्त्र, शोध, संघटना व देशाभिमान यांमुळें हिंदुसंस्कृतीला पाश्चात्य संस्कृतीपुढें शेवटीं हार खावी लागली, हें जरी खरें असलें तथापि इंग्रजांशीं प्राथमिक ज्या लढाया झाल्या, त्यांमध्यें मराठ्यांनीं इंग्रजांवरहि जय मिळविलेले आहेत. या संस्कृतीच्या आक्रमणाला अद्याप शंभर वर्षें व्हावयाचीं आहेत तोंच क्रांतिकारकांच्या चळवळीनें, निःशस्त्र प्रतिकारानें, सनदशीर चळवळीनें, सत्याग्रहानें आणि जमल्यास सशस्त्रतेनेंहि तिचा प्रतिकार करण्यास हिंदुराष्ट्र

सुसज्ज झालेलें आहे असें गेल्या शंभर वर्षांच्या चळवळीचें अवलोकन केल्यास सिद्ध होतें. सर्वश्रेष्ठ वैदिक वाङ्मय उत्पन्न करून तें पठण-पाठण करून जिवंत ठेवणारी, आणि संग्राहकतेच्या गुणानें अनेक संस्कृतींना आत्मसात् करून चिवटपणानें व जिवटपणानें राहिलेली हिंदुसंस्कृति ही पाश्चात्य संस्कृतीला पचवून तिला पुरून उरेल यांत शंका नाहीं.

(५०७) **हिंदुसंस्कृतीचें जगावर ऋण:**—सर्व युरोपखंडांत ग्रीक राष्ट्राला प्राचीनत्वाचा मान मिळतो. ग्रीक राष्ट्र फार उद्योगी होतें, त्यानें युरोपला संस्कृति दिली. पण त्या ग्रीक देशाला विद्या, कला, गणित, ज्योतिष आणि समाजधारणेचे नियम हिंदुसंस्कृतीनें दिले. शिकंदरनें बरोबर आणलेल्या पंडितांकरवीं अनेक विद्या तिकडे नेल्या हें महशूर आहे. ग्रीक राष्ट्रानें युरोपला ज्ञान देऊन जसें ऋणी केलें, तसेंच भारतीय आर्यांनीं ग्रीकांना ज्ञान देऊन परंपरेनें सर्व जगाला ऋणी करून सोडलें आहे. कारण ग्रीक राष्ट्राच्या पूर्वींच भारतीय वैदिक आर्यांनीं ज्ञानाच्या विविध शाखांमध्यें शोध लावले, शास्त्रांची वाढ केली, सामाजिक उच्च कल्पना पुढें मांडल्या आणि तत्त्वज्ञानाचे श्रेष्ठ सिद्धांत जगापुढें ठेवले.

It may also be asserted, without much exaggeration, that Greece perfected and spread ancient Aryan culture. India originated it.

( History of Civilization–R. C. Dutt, P. 344. )

ग्रीक राष्ट्राच्या इतिहासाचा जनक हीराडोटस म्हणतो कीं, ‘ भरतखंड हें प्राचीनकाळीं अत्यंत प्रबळ राष्ट्र होतें. मनुष्याचें मन सर्व क्षेत्रांत विकसित करण्याचें कार्य प्रथम भरतखंडानेंच केलें. शाश्वत सुखाचें, सात्त्विक आनंदाचें, मानव्याच्या विकासाचें स्थान भरतखंडच होतें. स्वर्गीय सृष्टिसौंदर्य येथेंच प्रथम उत्पन्न झालें व जगांतील सर्व तत्त्ववेत्त्यांच्या बुद्धीला थक्क करून सोडणारे तत्त्वज्ञानाचे सिद्धांत ऋषींच्या प्रतिभेंतून येथेंच जन्माला आले. एडमंड बर्कच्या व्याख्येप्रमाणें उत्तम राजशासन येथेंच चालू झालें, तर स्पेन्सर व मिल यांच्या कल्पनेप्रमाणें व्यक्तिमत्वाचा विकास येथेंच झाला. भारतीयांच्या सुसंस्कृतपणाविषयीं अनेक विद्वानांच्या उत्तम

अभिप्रायांचें संकलन पहिल्याच प्रकरणांत केलेलें असल्यामुळें त्याची पुनरुक्ति येथें नको.

(५०८) स्पेंगलरचें मतः–स्पेंगलर नामक एक विद्वान् ग्रंथकार म्हणतो कीं कोणतीहि संस्कृति दीड हजार वर्षांपेक्षां अधिक काल टिकत नाहीं. या त्याच्या सिद्धांताप्रमाणें ॲटम बॉंबच्या शोधामुळें कदाचित् पाश्चात्य संस्कृतीचा अंतकाल आपसांतील यादवीमुळें जवळ येणार कीं काय अशी शंका येते. पण हिंदुसंस्कृतीचा गेल्या दहा हजार वर्षांचा इतिहास डोळयांपुढें ठेवला तर स्पेंगलरच्या सिद्धांताला अपवाद म्हणून कां होईना हिंदुसंस्कृति यापुढेंहि दहा हजार वर्षें ईश्वरानें तिजकडे सोंपविलेलें कार्य पुरें होईपर्यंत जिवंत राहाणार असा सिद्धांत निघतो.

(५०९) सर्व जगावर हिंदु संस्कृतीचा वारसाः–भविष्यकालांत संग्राहकता, सहिष्णुता व उदारता या तीन गुणांवरच जगांत शांतता, समता व बंधुत्व नांदण्याची आशा आहे. हिंदु संस्कृतीचा प्रसार सर्व जगावर होऊन तिचे वरील तीन गुण सर्व जगांतील मानवांत मुरावयास पाहिजेत. हिंदुसंस्कृतीचा भूतकाल या क्षेत्रांत उज्ज्वल असल्यामुळें भविष्यकालींहि ती सर्व जग व्यापून राहील, अशी आशा करण्यास जागा आहे. अलीकडील संशोधनामुळें हिंदुसंस्कृतीनें आपला संसार सर्व जगावर थाटला होता अशी माहिती मिळते. ग्वाल्हेर राज्यांतील वीसनगर खेड्यांत सांपडलेल्या खिस्तपूर्व दीडशेंच्या शिलालेखावरून ग्रीक लोक भागवत मतानुयायी होते असें विष्णुमंदिर व गरुडध्वज यांवरून दिसतें. खिस्तपूर्व १७५ च्या सुमारास बॅक्टेरियाच्या राजानें वासुदेव-मंदिरांत गरुडध्वज बांधला. ग्रीक महाराजा ॲंटीऑलसिडास व त्याचा वकील हे दोघे भागवतधर्मी होते. जर्मन लोकांना बोघाजकॉई येथील उत्खननांत खि. पू. १५०० च्या सुमारचे लेख सांपडले असून त्यांत मित्र, वरुण व इंद्र यांचा उल्लेख आहे. बाबिलोन राजे सूर्य, मरुत् यांचे उपासक होते. डॉ. स्टीन व इंजिनीअर बॉअर यांच्या शोधांवरून चीनमध्यें हिंदुसंस्कृति, हिंदी भाषा व देवनागरी लिपी होती अशी माहिती मिळते. सम्राट् अशोकापासून चीन व जपान देशांत बुद्धधर्माचे अनेक प्रचारक गेल्याचे उल्लेख शेकडों ठिकाणीं आहेत. बोर्निओमध्यें महाराकानन येथें

चार लिखित स्तंभ सांपडले. त्यावरील लेख संस्कृतमध्यें असून हे यूप ब्राह्मणांनीं स्थापन केले असें दिसतें. यूपावर विष्णूची मूर्ति व कासव सोनेरी अक्षरांत कोरलेलें आहे. कोईटीजवळ अनेक गुहांमध्यें गणेश, विष्णु, महादेव, नंदी यांच्या मूर्ति आहेत. जावामध्यें संस्कृतभाषेला कविभाषा म्हणतात व तेथें रामायण, मनुस्मृति, रघुवंश, कुमारसंभव हे ग्रंथ गेलेले आहेत. जावामधील कित्येक राजे हिंदुधर्मीय होते. आठव्या शतकांतील बुद्धमंदिर कलाकौशल्यांत प्रसिद्ध असून पंचतंत्रांतील अनेक गोष्टी त्यावर कोरलेल्या आहेत. बलिबेटांत मनूचा कायदा अद्याप रूढ आहे. सुवर्णद्वीप म्हणजे सुमात्रा येथील राजा बलपुत्रदेव याचें नालंदा विद्यापीठाशीं दळणवळण होतें. मलायामध्यें हिंदुसंस्कृति घेऊन कलिंग लोक गेले. त्यांचीं धर्मकृत्यें भिक्षुकांनीं वैदिक मंत्रांनीं केलीं. मलायांतील बुद्ध व मुसलमान यांच्या सामाजिक जीवनांत भारत–रामायणांतील कथा, गोष्टी, वाक्प्रचार पदोपदीं आढळतात. लंबोक येथें हिंदुसंस्कृतीचे अवशेष सांपडतात. मेक्सिको, आफ्रिका, अमेरिका, सोमाली लँड येथें हिंदुसंस्कृतीचे अवशेष सांपडतात. इराण, अरबस्तानांत तर ग्रीकांच्या द्वारानें गणित, ज्योतिष, वैद्यक यांवरील ग्रंथ गेलेले आहेत. पंचतंत्राचीं तिकडे भाषांतरें झालीं आहेत. संख्या, दशमपरिमाण व गणिताचे सिद्धांत हिंदुसंस्कृतीनेंच अरबांना व इराण्यांना दिलेले आहेत. फार काय, मक्केचा राजा मुक्तेश्वर या नांवाचा सारस्वत ब्राह्मण होता. ( कनिंगहॅम रिपोर्ट १८१२ ). भविष्य पुराणांत मुक्तेश्वरलिंगाची प्रतिष्ठा व काबा येथील मंदिर वगैरेची माहिती आहे. ( रा. ब. म. म. नरसिंहाचारिअर यांच्या मद्रास येथील व्याख्यानाचे आधारें ) ही सर्व माहिती ध्यानीं घेतली म्हणजे सर्व जगावर हिंदुसंस्कृतीचा वारसा आहे असें सिद्ध होतें.

—*—

## प्रकरण ३१ वें

# उपसंहार व उज्ज्वल भविष्य

गेल्या प्रकरणांत हिंदुसंस्कृतीच्या इतिहासाचें समालोचन केलें. प्रस्तुत प्रकरणांत ग्रंथांत सांगितलेल्या विषयाचें प्रकरणशः कथन करून समारोप करतों.

(५१०) सिंहावलोकनः—पहिल्या प्रकरणांत हिंदुसंस्कृति ही सर्व दृष्टीनें अभिमानास्पद कशी आहे, हें सांगून संस्कृतीच्या विद्वत्कृत व्याख्या दिल्या, आणि हिंदुसंस्कृतीचें वैशिष्ट्यहि सांगितलें. प्रकरण २ मध्यें वेदकालीन संस्कृतीचें वैभव ध्यानीं यावें म्हणून विविध विषयांवरील मंत्र अर्थासह दिले. वैदिक वाङ्मयांतील उपनिषदंतर्गत ब्रह्मविद्येचा परिचय ३ ऱ्या प्रकरणांत करून दिला! रामायण व भारत हे ग्रंथ इतिहासांत मोडतात. यावेळीं भारतीय आर्यांचा समाज सुप्रतिष्ठित होऊन संस्कृतीच्या सर्व अंगांचा विकास होऊन ती त्यावेळीं उत्कर्षाच्या मध्यान्हावर होती. म्हणून प्रकरण ४ व ५ या प्रकरणांमध्यें रामायणकालीन व भारतकालीन संस्कृतीचें स्वरूप थोडें विस्तारानें मांडलें.

वैदिक आर्यांचा मुख्य धर्म यज्ञ हा होता. त्यांत पशुहनन बरेंच होऊं लागलें. त्या यज्ञीय हिंसेविरुद्ध ज्यांनीं निकराचे हल्ले केले त्या जैन व बुद्ध सांप्रदायांचें थोडें दिग्दर्शन प्रकरण ६ व ७ मध्यें केलें. बौद्ध-संस्कृतीच्या आक्रमणानें वैदिक आर्यसंस्कृतीचें स्वरूप आमूलाग्र कसें बदलून गेलें, निवृत्तिपरता व दुःखवाद यांच्या दृढ संस्कारानें वैदिक संस्कृति कशी ऱ्हास पावली याचा प्रपंच प्रकरण ८ मध्यें केला.

बुद्धोत्तर कालांत पावित्र्यकल्पनेचा अतिरेक, अहिंसेचा अतिरेक आणि मूर्तिविषयक अद्भुत कल्पनांचा अतिरेक कसा झाला, आणि त्यांचा लाभ इस्लामच्या आक्रमक अनुयायांना कसा मिळाला याचें ऐतिहासिक उदाहरणें व घडामोडी यांसह विवेचन प्रकरणें ९ ते १२ पर्यंत केलें. बुद्धोत्तर कालांत निवृत्तिपर तत्त्वज्ञानाचा अतिरेक झाला. त्याची पार्श्वभूमिका

ध्यानीं यावी म्हणून बौद्ध व मीमांसक आणि बौद्ध व श्रीशंकराचार्य यांच्या संघर्षांची माहिती प्रकरणें १३ व १४ मध्यें दिली. ज्ञानेश्वरादि साधुसंतांपासून तों तुकारामापर्यंतच्या संतांनीं निवृत्तीचें लोण आपल्या कालापर्यंत कसें पोचविलें आणि भक्तीच्या मार्गानें हिंदुसमाजाला हिंदुत्वांत ठेवण्याची केवढी महनीय कामगिरी या साधुसंतांनीं केली, हें प्रकरण १५ मध्यें सांगितलें.

राजकीय घडामोडींच्या पार्श्वभूमिकेवर संस्कृतीचा संकोच व विकास अवलंबून असतो म्हणून मध्यकालीन राजकीय घडामोडींचा खिस्तपूर्व ३०० पासून देवगिरीच्या यादवापर्यंतच्या कालाचा परामर्श प्रकरण १६ मध्यें घेतला. वीरशैव तथा लिंगायत आणि मानभाव यांच्या कामगिरीचें वर्णन प्रकरण १७ मध्यें केलें. प्रकरण १८ मध्यें इस्लामवर ओझरती नजर टाकली आणि मुसलमान राज्यकर्त्यांच्या वेळीं हिंदुसंस्कृतीची स्थिति किती वाईट झाली होती यासंबंधीं दोन इतिहासकारांचीं मतें दिलीं. इस्लामच्या रांगड्या, कडव्या आणि सर्वभक्षक अशा आक्रमणाखालीं असतांहि महान् पराक्रमी राजपुतांनीं ८०० वर्षें तेजस्वितेनें इस्लामचा प्रतिकार करून जगाला थक्क करून सोडणारा स्वपराक्रमाचा इतिहास कसा घडविला याचें वीररसानें भरलेलें वर्णन प्रकरण १९ मध्यें केलें. प्रकरण २० मध्यें विजयनगरच्या विजयी विजेत्यांनीं साम्राज्य स्थापन करून संस्कृतिरक्षणाचें जें अचाट कार्य केलें त्याचे पोवाडे गाइले.

इस्लामच्या आक्रमणामुळें हिंदुसंस्कृतीचा कसा संकोच झाला त्याची मीमांसा अनेक विद्वानांचीं मतें देऊन केली. ज्या ठिकाणीं एक तिळभरहि जागा हिंदुसंस्कृतीला उभें रहावयाला नव्हती, त्या सर्व विरुद्ध परिस्थितीशीं सर्वथैव झगडून महाराष्ट्रधर्माच्या प्रसारानें ज्यांनीं राष्ट्रांत प्रतिकारशक्ति उत्पन्न केली आणि आनंदवनभुवनामध्यें "औरंग्या पापी बुडाला, स्नानसंध्या करावया उदंड पाणी झालें" अशी ज्या समर्थांनीं गर्जना केली त्या कर्मयोगी श्रीसमर्थांच्या कार्याचें प्रकरण २२ मध्यें दर्शन घेतलें. ज्या महाराष्ट्रिय कर्मवीरांनीं हिंदुपदपादशाही स्थापून अटकेपार झेंडे फडकावले आणि मोंगल साम्राज्याचा विध्वंस करून मोंगल बादशहाला पोटगीचे मालक बनविलें, तो अद्‌भुत रोमांचकारी इतिहास प्रकरण २३ मध्यें निवेदन केला. मोंगलाईच्या उत्तरकालांत ज्या शिखांनीं स्वतंत्र राज्य स्थापण्याची बहादुरी

दाखविली, त्यांचीहि माहिती देऊन इस्लामच्या संघर्षांत हिंदुसंस्कृति ही कशी विजयी झाली, याचें प्रकरण २४ मध्यें विवेचन केलें.

पोर्तुगिजांचे द्वारें ख्रिश्चन संस्कृतीचें आक्रमण कसें झालें, इंग्रजांशीं लढाई होऊन त्यांत स्वातंत्र्याचा नाश कसा झाला, आणि हिंदुसंस्कृतीचा अपकर्ष होण्यास कोणतीं कारणें घडलीं यासंबंधीं चर्चा अनुक्रमें प्रकरण २५।२६।२७ मध्यें दिली. स्वातंत्र्याची आकांक्षा, संस्कृतीचा अभिमान आणि उज्ज्वल देशाभिमानाची वृत्ति यांमुळें हिंदु राष्ट्र हें सर्व दोष व भ्रामक कल्पना झटझट नाहींशा करून स्वातंत्र्याच्या ध्येयाकडे कसें निश्चित चाललें आहे, याचें समालोचन प्रकरण २८ मध्यें केलें. स्वातंत्र्य हें दृष्टिपथांत आलें असतांना व स्वराज्याचा अरुणोदय होत असतांना मुस्लीमलीगच्या अनुयायांनीं कसें आडमुठेपणाचें धोरण स्वीकारलें आहे व त्यामुळें आज संबंध राष्ट्रांत कसा विग्रह आणि संघर्ष उत्पन्न झाला आहे अर्थात् तो प्रश्न सोडविण्याचा यत्न कसा करावा, याचें धार्मिक व सांस्कृतिक दृष्ट्या विस्तृत विवेचन प्रकरण २९ मध्यें केलें. प्रकरण ३० मध्यें वेदकालापासून तों आतांपर्यंत हिंदुसंस्कृतीचें समालोचन करून शेवटच्या या प्रकरणांत ग्रंथाचा उपसंहार करून हिंदुसंस्कृतीचें उज्ज्वल भविष्य कथन केलेलें आहे. आतां अध्यात्माच्या अधिष्ठानावर आणि हिंदुधर्माच्या उच्च तत्त्वावर आरूढ झालेली हिंदुसंस्कृति कशी विजयी होईल तें पाहूं.

(५११) **अध्यात्माचें अधिष्ठानः**–हिंदुसंस्कृतीच्या इतिहासाचें वेदकालापासून आपण समालोचन केलें. त्यावरून हिंदुसंस्कृतीची दृष्टि अध्यात्मावर अखंड खिळलेली आहे, हें उघड होतें. हिंदुस्थानामध्यें गेल्या अर्धशतकांत जीं महाराष्ट्र, बंगाल, पंजाबादि प्रांतांत विविध आंदोलनें झालीं, त्यांतहि अध्यात्माचें अधिष्ठान अनुस्यूत आढळून येतें. लोकहितवादी, विष्णुबुवा ब्रह्मचारी, न्यायमूर्ति रानडे, विष्णुशास्त्री चिपळूणकर, लोकमान्य टिळक, नामदार गोखले या सर्वांच्या भाषणांत आणि लेखनांत स्वसंस्कृतीचा अभिमान जाज्वल्यतेनें आढळतो. बंगालमधील राजा राममोहन राय, महर्षि देवेंद्रनाथ ठाकूर, स्वामी रामकृष्ण परमहंस, केशव चंद्रसेन, अरविंद घोष यांनीं राष्ट्रोद्धारार्थ केलेल्या सर्व उलाढालींमध्यें आध्यात्मिकतेचें

अधिष्ठान आढळतें. महर्षि दयानंद, स्वामी श्रद्धानंद, लाला लजपतराय यांनीं आर्यसमाजाचे द्वारें आणि वैय्यक्तिक दृष्ट्या जीं कार्यें केलीं, त्या सर्व कार्यांना त्यांनीं अध्यात्माचा म्हणजे आत्मसत्तेचा पाठिंबा घेतलेला होता. लोकमान्य टिळकांनीं आपल्या उत्तर आयुष्यांत कर्मयोगाचा संदेश आत्मसत्तेच्या जोरावरच दिला. महात्मा गांधीजी हे ईश्वरनिष्ठा व आत्मबल यांच्या सामर्थ्यावर सत्याग्रहाच्या शस्त्रानें राजकीय आंदोलनें करीत असून राजकारणांतहि अन्य सामर्थ्यापेक्षां आत्मसामर्थ्याचा उपयोग करण्याचा त्यांनीं अट्टाहास चालविला आहे. एकंदरींत केव्हांतरी मानवी सर्व सत्तांचा लोप करून अध्यात्मसत्तेमध्यें सर्व जगाला आणण्याचें कार्य हिंदुसंस्कृतीला करावयाचें आहे, असा ईशसंकल्प दिसतो.

(५१२) **धर्म आणि संस्कृति यांचें नातें:**—समाजधारणेचे नियम म्हणजे धर्म होय. आधीं समाजाची धारणा होते, मग त्याचा प्रभव—म्हणजे उत्कर्ष होतो. समाजाची धारणा सुव्यवस्थित झाली म्हणजे संस्कृति उत्पन्न होते. धर्मशास्त्रामध्यें आचार, व्यवहार आणि प्रायश्चित्त यांचा समावेश होतो. प्राथमिक स्थितींत आचार हाच प्रथम धर्म असतो. समाजाचा जसजसा उत्कर्ष व विकास होत जातो, तसतसा, आचार, नीति, आणि तत्त्वज्ञान या मुख्य तीन धार्मिक अंगांचा विकास होऊं लागतो. धर्मामध्यें आचार, नीति व तत्त्वज्ञान यांचा समावेश होतो तर संस्कृतीमध्यें मानवी जीवनाच्या सर्व अंगांचा आणि उपांगांचा समावेश होतो. धर्म हा पिता, समाजधारणा ही माता, आणि संस्कृति ही त्यांची कन्या आहे. हिंदुधर्मरूपी पित्यानें आपल्या हिंदुसंस्कृतिरूपी कन्येला तिच्या पसंतीप्रमाणें आध्यात्मिक सामर्थ्य वा आत्मसाक्षात्कार या जोडीदाराबरोबर संसार करण्यास मान्यता दिलेली आहे. पित्यानें दिलेल्या संग्राहकता, सहिष्णुता आणि उदारता या तीन अलंकारांनीं सालंकृत झालेली ही कन्या सर्व विश्वभर आपला संसार थाटण्यास निघाली आहे. या कन्येचें माहेर श्रीमंत आहे आणि सासर तर समर्थ आणि संपन्न असें आहे. कन्येच्या संसारांत दोन्ही कुलांतील संस्कारांचा आविष्कार असतो. यास्तव क्रमप्राप्त म्हणून हिंदुधर्माचें थोडें वैभव या ग्रंथाच्या शेवटीं सांगतों. यापेक्षां अधिक वैभव ‘ **नवा हिंदुधर्म** ’ या आमच्या ग्रंथांत वाचकांना आढळेल.

(५१३) **हिंदुधर्माचें वैभवः**–अभ्युदयदृष्टीनें आणि मनःसमाधानाच्या दृष्टीनें हिंदुधर्माची आवश्यकता ही जगाच्या अंतापर्यंत आहे. म्हणूनच ' धर्मो विश्वस्य जगतः प्रतिष्ठा ' हा सिद्धांत अढळ आहे. हिंदुधर्माचें थोर मन अद्याप स्थिर आहे. त्याचा आत्मा असामान्य आहे. जटिल रूढि व आचार यांच्या गाभाऱ्यांत या धर्माचें थोर अंतःकरण दडलेलें आहे. हिंदुधर्मानें आजवर अनेक जीवांना चैतन्य, प्रकाश व आनंद दिलेला आहे. हिंदुधर्माचें तत्त्वज्ञान हें दर्भाच्या टोकाप्रमाणें सूक्ष्म आणि तलवारीच्या पात्याप्रमाणें तीक्ष्ण असें असून उपनिषदांचे द्वारें तें आपल्या प्रज्ञेची व प्रतिभेची चमक सर्व जगावर पाडीत आहे. पृथ्वीवरील सर्व धर्मांना हिंदुधर्मानें ज्ञानऋण दिलें आहे. जगाला त्यानें चकित केलें आहे. अनेक घडामोडी, प्रचंड उत्पात, अनेक क्रांत्या पहात पहात या धर्मानें हिंदु समाजाला आणि त्याबरोबर जगालाहि असत्यांतून सत्याकडे, अंधारांतून प्रकाशाकडे व मृत्यूकडून अविनाशाकडे नेण्याचें कार्य आजवर केलेलें आहे. तो जगाच्या अंतापर्यंत तेंच कार्य करीत राहील.

**असतो मा सद्गमय । तमसो मा ज्योतिर्गमय । मृत्योर्माऽमृतं गमय ।**

बृ. आ. उपनिषद १–३–२८.

असताचा त्याग करून सताकडे चला !
तमाचा त्याग करून प्रकाशाकडे वळा !
मृत्यूला जिंकून अमृतत्व संपादन करा !

(५१४) **उज्ज्वल भविष्यकालः**–हिंदुसंस्कृतीचा वेदकालापासून आतांपर्यंतचा इतिहास ध्यानीं घेतल्यास ही संस्कृति इजिप्शियन, खाल्डियन, रोमन संस्कृतीप्रमाणें ( इतके आघात झाले तरी ) नष्ट झाली नाहीं. आजवर या जगांत अनेक संकृति उत्पन्न झाल्या व विलीन झाल्या. अनेक राष्ट्रें चिरडलीं गेलीं, पण हिंदुसंस्कृति नामशेष झाली नाहीं; यावरून तिच्या ठिकाणीं चिवटपणा, जिवटपणा आणि जगण्यासारखे कांहीं सद्गुण आहेत असें सिद्ध होतें. दहा हजार वर्षें जी संस्कृति अनेक स्थित्यंतरें पहात पहात मार्ग चालत आहे, जिनें अनेक क्रांत्यांचे व उलाढालींचे उन्हाळे पावसाळे पाहिले, वेळोवेळीं थोर थोर बुद्धिमान्, समर्थ व कर्ते स्त्रीपुरुष जिनें उत्पन्न

केले, ती हिंदु संस्कृति यापुढें जगाच्या अंतापर्यंत अखिल मानवांची संस्कृति म्हणून विकास पावून राहाणार यांत शंका नाहीं. हिंदुसंस्कृतीचा भविष्यकाळ उज्ज्वलच आहे. कारण भौतिक शास्त्राच्या वाढीमुळें सर्व जग आतां जवळ जवळ येत आहे. यापुढें कोणतीहि संस्कृति प्रादेशिक न राहातां जागतिक राहील. आणि जी संस्कृति बुद्धिनिष्ठ, तर्काला पटणारी व मानव्याच्या विकासास पोषक अशी असेल तीच यापुढें अखिल मानवांची संस्कृति होणार आहे. भगवान् मनूनें एका काळीं सर्व जगाचें मानवशास्त्र मोठ्या अभिनिवेशानें सांगितलें, तितक्याच अभिनिवेशानें हिंदुसंस्कृति हीच यापुढें अखिल जगाची संस्कृति होणार असें म्हणण्यास जागा आहे. कारण संग्राहकता, सहिष्णुता व उदारता या तत्त्वत्रयीमुळें जगाची संस्कृति होण्यास तीच अधिक पात्र आहे. हिंदुधर्माच्या द्वारें बुद्धिस्वातंत्र्य, उपासनास्वातंत्र्य, कर्मस्वातंत्र्य, व्यक्तिस्वातंत्र्य देऊन प्राणिमात्राला अभय देणारी, पाप्याला आश्वासन देणारी, प्रपंचाचा व परमार्थाचा समदृष्टीनें विचार करणारी, तप, त्याग व भोग यांचा समन्वय करणारी, गृहस्थाश्रमाला महत्त्व देऊन स्त्रियांचा दर्जा वाढविणारी, दैवीसंपत्तीचा स्वीकार करून आसुरीचा प्रतिकार करण्यास सांगणारी जगांतील सर्वश्रेष्ठ अशी ही एकमेव संस्कृति आहे. गेल्या दहा हजार वर्षांचा इतिहास पाहिला तर आर्यसंस्कृति ही सारखी विकासच पावत आहे असें दिसतें. पेशव्यांचा सुप्रसिद्ध वकील गोविंदराव काळे याच्या भाषेंत बोलावयाचें म्हणजे "श्रीशिवाजी महाराजांचें स्वराज्य प्रथम एका कोन्यांत होतें." तशीच आर्यसंस्कृतिहि बुद्धपूर्वकालीं एका कोन्यांतच होती. बाजीराव, नाना व भाऊ यांनीं हिंदवी स्वराज्याचा झेंडा जसा अटकेपार नेला तसाच बुद्धोत्तर कालांत शबरस्वामी, कुमारिलभट्ट, श्रीशंकराचार्यादि सर्व आचार्य, विक्रमादित्य, समुद्रगुप्त व चालुक्य राजे इत्यादिकांनीं बौद्ध संस्कृतीचा पाडाव करून आर्यसंस्कृतीचा ध्वज सर्वत्र भरतखंडभर फडकावला. या कालांत आर्यसंस्कृति अखिल हिंदु समाजांत पसरली व ती हिंदुसंस्कृतीच्या नांवानें सुप्रतिष्ठित झाली. हिंदु समाजांत हिंदुत्वनिष्ठा किती आहे याची जणूं परीक्षा पाहाण्याकरितांच इस्लामचें कडवें आक्रमण हिंदु संस्कृतीवर झालें. पण तेंहि परतविणारे बुद्धिमान्, कर्तृत्ववान्, पराक्रमी, वीर आणि मुत्सद्दी असे शेंकडों हिंदुत्वनिष्ठ पुरुष हिंदु राष्ट्रांत उत्पन्न

झाले व त्यांनीं इस्लामचा चोहों बाजूंनीं चौखूर पराभव केला. आर्य व बौद्ध या कलहांत जसे आर्यच विजयी झाले, तसेच हिंदु व इस्लाम या कलहांत हिंदूच विजेते ठरले. आतां पाश्चात्य संस्कृतीचा आणि हिंदु संस्कृतीचा विग्रह चालू आहे. याहि विग्रहांत हिंदु संस्कृति प्रबलत्वानें विजयी होणार असून ती यापुढें अखिल मानवांची संस्कृति, मनुष्यत्वाची संस्कृति, जगाला शांततेचा, समतेचा, बंधुत्वाचा, संग्राहकतेचा आणि सहिष्णुतेचा संदेश देणारी संस्कृति या नांवानें जगांत वावरणार आहे.

(५१५) भरतवाक्यः--हिंदु संस्कृति ही जगाच्या अंतापर्यंत उज्ज्वलतेनें राहणार हेंच तिचें भविष्य आहे. चार्वाक व बौद्ध यांच्या बौद्धिक आघातांना तोंड देऊन, इस्लामचें कडवें धार्मिक आक्रमण परतवून ही संस्कृति जशी विजेती ठरली तशीच ती पाश्चात्यसंस्कृतीच्या व्यापारी, शास्त्रीय व सत्तायुक्त आक्रमणाचा प्रतिकार करून निर्भेळ स्वातंत्र्य मिळवून, मार्क्सवाद आणि साम्राज्यसत्तावादांतील समाजधारणेस उपयुक्त असलेलीं तत्त्वें पचवून ती मनुष्यजातीच्या प्रलयापर्यंत ऐश्वर्ययुक्त राहणार आहे.

– समाप्त –

# विषयसूचि

( आंकडे परिच्छेदाचे आहेत. )

# आधारग्रंथांची यादी

१. ऋग्वेद, यजुर्वेद, अथर्ववेद–संहिता. २. दशोपनिषदें. ३. षट्दर्शनांचे सूत्रग्रंथ. ४. मन्वादिस्मृति व धर्मसूत्रें. ५. भारत, रामायण. ६. आचार्यांचे भाष्यग्रंथ. ७. धर्मनिबंधकारांचे अनेक निबंधग्रंथ. ८. ज्ञानेश्वरी, दासबोध, तुकारामाची गाथा. ९. वेदामृत व कांहीं निबंध (पं. सातवळेकर). १०. ज्ञानकोशाचे प्रस्तावना–खंड व ११।१८।२३. ११. महाभारताचा उपसंहार (चिं. वि. वैद्य). १२. रामायणाचा उपसंहार (महाराष्ट्रिय). १३. गीतारहस्य (लो. टिळक). १४. इतिहासाचार्य राजवाडे यांचे भाषा, समाज व इतिहासविषयक अनेक ग्रंथ व निबंध. १५. नासदीय सूक्तभाष्य (आहिताग्नि राजवाडे). १६. मध्ययुगीन भारत, भाग १।२।३ (चिं. वि. वैद्य). १७. मुसलमानी रियासत, भाग १।२ (इतिहासकार सरदेसाई). १८. प्रो. रानडे यांच्या तत्त्वज्ञानाच्या इतिहासाचे दोन्ही भाग. १९. बौद्ध धर्माचा अभ्युदय आणि प्रसार–(प्रो. वैद्य सांगली). २०. पवित्र कुराण भाग १।२ (कु. प्र. मं. मुंबई). २१. जगांतील विद्यमान धर्म (आठवले). २२. सर्वश्रेष्ठ हिंदुधर्म (शिखरे). २३. महंमद पैगंबर (प्रधान). २४. इस्लामी संस्कृतीचें क्रांतिकार्य (नखाते). २५. सत्यार्थप्रकाश (महर्षि दयानंद). २६. विजयानगर स्मारक ग्रंथ (भा. इ. सं. मं. पुणें). २७. हिंदुसमाजदर्शन (भोपटकर). २८. तुर्कांचें साम्राज्य (भावे). २९. राजपूत संस्कृति (देशपांडे). ३०. राजपुतांचा उदय व ऱ्हास (देशपांडे). ३१. राधामाधवविलासचंपु (राजवाडे). ३२. मराठ्यांच्या सत्तेचा उत्कर्ष (रानडे). ३३. ब्रिटिश रियासत भाग १।२ (सरदेसाई). ३४. अस्पृष्टांचा प्रश्न (माटे). ३५. समग्र केळकर वाङ्मय भाग ७ व ११ (केळकर). ३६. पेशवेकालीन महाराष्ट्र (भावे). ३७. ऐतिहासिक लेखसंग्रह (भावे) ३८. हिंदु–मुसलमान (शिंदे). ३९. मुंबई इलाख्यांतील जाती (कालेलकर). ४०. हजरत महंमद पैगंबर (स्व) (अमीन). ४१. ऐति-

हासिक जैनवीर ( पाटील ). ४२ महाराष्ट्राचा सांस्कृतिक इतिहास (पेंडसे). ४३. चरित्रकोश ( चित्राव ). ४४. हिंदुपदपातशाही ( सावरकर ). ४५. गुरु गोविंदसिंह चरित्र ( कानोले ). ४६ खलिफांचीं चरित्रें ( काथवटे ). ४७. गोमांतकशुद्धीचा इतिहास (मसुराश्रम). ४८. श्रीशीखचरितामृतम् ( इसूरकर ) ४९. हिंदुत्व ( सावरकर ). ५०. चौंडेमहाराज चरित्र (डोळे). ५१. हिंदुमहासभा विशेषांक (केसरी). ५२. आधुनिक भारत ( जावडेकर). ५३. पुरुषार्थ, सह्याद्रि, धनुर्धारी, भा. इ. सं. त्रैमासिक व केसरीमधील कांहीं तज्ज्ञांचे लेख. ५४. मराठे व इंग्रज ( पोतदार ). ५५. महिकावतीची बखर ( राजवाडे ). ६६. जवाहरलाल नेहरू ( गोरे ).

57. History of Civilization in Ancient. India, Vols. I, II, III–R. C. Dutt. 58 Hindu View of Life. Radhakrishnan. 59. Dharma and Society–Dr. Mess. 60. Caste and Race in India–Dr. Ghurye. 61. Religions of India–Barth. 62. Vicissitudes of the Indian Civilization–Kunte. 63. Hindu Superiority–Harvilas Sharada.. 64. Spirit of Islam–Ameeralli. 65. Islamic Civilization–Khuda Buksh. 66. Study of History, Part III–Toynbee. 67. A brief Sketch of the Life of the Prophet of Islam–Mohamadalli. 68. Islam the Religion of Humanity–S. A. Razzaque. 69. The Spirit of Struggle of Islam–Vaswani. 70. Cultural Heritage of India–Ramkrishna Mission. 71. Evolution of Hindu Moral Ideals–Iyer. 72. Hindu Ethics–Hopkins. 73. Outlines of Islamic Culture Shushtery. 74. The Life of Mahamad–Sir W. Muir. 75. History of India–Wheeler, Vol. IV Part I. 76. History of India–Elphinstone, 9th Edition. 77. History ot Aurangzib–Sir Jadunath Sarkar, Second edition Vol. III. 78. Thoughts on Pakistan Dr. B. R. Ambedkar. 79. The Koran–George Sale. 80. Islam and its Founder–J. W. H. Stobart. 81. The Quran–E. H. Palmer, Part I and II. ( The Sacred Book of the East Series, Vol. VI and IX F. Max–

Muller ). 82. Modern Review May 1939. 83. The Decline and Fall of the Roman Empire—Edward Gibbon, Vol. V. 84. A Study of History—Arnold J. Toynbee. 85. The Outline of History—H. G. Wells. 86. The Legacy of Islam—Sir Thomas Arnold. 87. The Historical Role of Islam—M. N. Roy. 88. The World's Living Religions—Robert E. Hume. 89. The Caliphate—Arnold. 90. The Spirit of Islam—Ameer-alli. 91. The Oxford History of India—Vincent A. Smith. 92. The Crescent in India—A Study in Medieval History—Prof. S. R. Sharma. 93. The History of Medieval India—Ishwari Prasad. 94. Ayene Akabery or Akbar's Regulations for the Government of Hindustan—Abul Fazal. 95. The Annals and Antiquities of Rajasthan, Vol. I—Lieutenant Colonel James Tod. 96. Indian Historical Records Commission, Proceedings of Meetings Vol. XVII. 97. The History of Gujarat Vol. I 1938—M. S. Commissariat M. A. I. E. S. 98. The Bombay Gazetteer—Vol. XII, Khandesh. 99. The Indian Empire—W. W. Hunter. 100. The Life of Charles Lord Metcalfe—Edward Thompson, 1937 Edition. 101. Memoirs of the Emperor Jehangir—Major David. 102. An Autobiography—Jawaharlal Nehru. 103. The Asiatic Studies—Sir Alfred Layal. 104. History of Medieval India, Vol. I—C. V. Vaidya. 105. The Valley of Kashmir—Lorrence. 106. From Peshwar to Moscow—Shaukat Usaman.



हिंदुसमाजोद्धारक वाङ्मयमालेचीं

## दुर्मीळ पुस्तकें

( १ ) हिंदुसमाज समर्थ कसा होईल ?
( २ ) धर्मशास्त्रमंथन.
( ३ ) ब्रह्मज्ञान व [illegible].
( ४ ) गीताप्रदीप.
( ५ ) नवयुग विद्यार्थिधर्म.
( ६ ) आर्यसंस्कृतीचा उत्कर्षापकर्ष भाग १।२.

---

दुर्मीळ पुस्तकांची पृच्छा न करितां खालील दोन
बहुमोल, उत्कृष्ट ग्रंथ मागवा.
हिंदुधर्म आणि हिंदुसंस्कृति
यांवर प्रकाश पाडणारे जणुं
अपर चंद्र व सूर्य
असे हे ग्रंथ आहेत.

# (१) नवा हिंदुधर्म

सुधारून वाढविलेली आवृत्ति दुसरी, मूल्य ५ रु. ट. ख. ८८

# (२) हिंदुसंस्कृतिप्रदीप

मूल्य ५ रु. ट. ख. ८८

टपालखर्चासह ११ रुपये मनीऑर्डरीनें खालील पत्यावर पाठवा. घरपोंच रजिस्टरनें पुस्तकें पाठवूं.

ब्राह्मणांतील भिन्न शाखीय विवाह. मूल्य २ रु. हेंहि पुस्तक विक्रीस आहे.

पत्ता—हिंदुत्वदीपक महादेवशास्त्री दिवेकर,
पो. मिरज ( S. M. C. ).